# फेडरेशन व त्याचें भवितव्य

लेखक

त्र्यं. र. देवगिरीकर.

प्रस्तावनालेखक

नामदार आ बा. लठ्ठे, एम. ए., एलएल्. बी.

अर्थमंत्री.

कि. २ रु.

# प्रस्तावना

वर्तमानपत्रें वाचणाऱ्यांना आणि सभांत होणारीं भाषणें ऐकणाऱ्यांना



**फेडरेशन** हा इंग्रजी शब्द चांगला ओळखीचा झाला आहे. परंतु त्या शब्दाचा अर्थ किती लोकांना बरोबर समजतो, या प्रश्नाचें उत्तर 'फार थोड्या लोकांना' असेंच द्यावें लागेल. विशेषतः ज्या प्रकारचें फेडरेशन हिंदुस्थानावर लादण्याचा प्रयत्न हल्लीं चालू आहे त्याचें स्वरूप काय आहे, त्यांतील गुण-अवगुण कोणते, आणि कोणत्या कारणांकरितां त्या योजनेवर हिंदी पुढारी इतका निकराचा हल्ला करीत आहेत, हें त्यापेक्षांहि कमी लोकांना अचुकपणें सांगतां येईल. ही फेडरेशनची योजना ज्या कायद्यांत ब्रिटिश पार्लमेंटनें ग्रथित केली आहे तो कायदा वाचण्याची तसदी किती लोकांनी घेतली आहे? आणि इतकी तसदी घेऊनहि फेडरेशनची रूपरेखा कितीकांच्या नजरेसमोर ठाकठीकपणें उभी राहते? या प्रश्नांचीं उत्तरें काळजीपूर्वक मनाशीच ठरविलीं म्हणजे माझे मित्र श्रीयुत देवगिरीकरांचें प्रस्तुत पुस्तक किती उपयोगी आहे याची वाचकांना स्पष्ट कल्पना येईल. हिंदी फेडरेशनवर इंग्रजींत आतां बरींच पुस्तकें मिळूं शकतात. पण या विषयाचें सांगोपांग व सहज समजण्यासारखें विवेचन मराठी भाषेंत या पुस्तकाप्रमाणें इतरत्र क्वचितच मिळूं शकेल असें वाटतें. म्हणूनच या पुस्तकाचें मराठी वाचक हौसेनें स्वागत करितील अशी मला आशा आहे.

फेडरेशनची अंधुक कल्पना आज बऱ्याच वर्षांपासून हिंदी मुत्सद्यांच्या मनांत येत होती, यांत शंका नाहीं. न्या. रानडे यांच्या एका जुन्या लेखांत हिंदी राज्यघटना फेडरल वळणाची झाली पाहिजे असा उल्लेख आहे. मांटेग्यू-चेम्सफर्ड रिपोर्टांत याच पद्धतीचा भावी कालाच्या संबंधानें पुरस्कार करण्यांत आला आहे; किंवा बिकानेरच्या महाराजांनीं आपल्या कित्येक भाषणांत १९३० च्याहि पूर्वींच या तऱ्हेच्या घटनेचा उल्लेख केला आहे. या सर्व गोष्टी खऱ्या असल्या तरी १९३० च्या अखेरीस पहिल्या गोलमेज परिषदेच्या सदस्यांना फेडरेशनची

कल्पना असावी तशी नव्हती; आणि त्यामुळें त्यांच्यापैकीं अनेकांनीं–विशेषतः संस्थानीं प्रतिनिधींनीं–त्या कल्पनेला जो पाठिंबा दिला तो पूर्ण विचारानें दिला असें म्हणवत नाहीं, हेंहि तितकेंच खरें आहे. प्रांतिक पुढाऱ्यांच्या मनांत कांहीं तरी करून सायमन कमिशनच्या रिपोर्टापेक्षां कांहीं पावलें पुढें जाण्याची उत्सुकता होती. प्रांतिक राज्यकारभारांत जबाबदारी देण्याची कमिशननें शिफारस केली होती. तीच जबाबदारी हिंदुस्थानसरकारच्या कारभारांतहि निर्माण करण्यास ब्रिटिश मुत्सद्दी कबूल व्हावे, अशी त्यांना इच्छा होती. ती फलद्रूप होण्यासाठीं हवी ती गोष्ट मान्य करण्याची त्यांच्या मनाची तयारी असावी, ही गोष्ट ब्रिटिश मुत्सद्द्यांनीं ओळखली. हिंदी कारभारांत संस्थानिकांना घुसडून दिलें असतां तींत जबाबदारी देण्यामुळें उत्पन्न होणारा धोका बराचसा कमी होईल, असें त्यांनीं ठरविलें. ही अट अर्थातच फारसा विचार न करितां हिंदी पुढाऱ्यांनीं स्वीकारिली.

संस्थानिकांना ही कल्पना कशी पसंत पडली हा प्रश्न येथें मनांत येतो. डॉ. सप्रू यांनीं गोलमेज परिषदेंत संस्थानिकांना फेडरेशनमध्यें येण्याचें आमंत्रण दिलें आणि देशाच्या कल्याणाकरितां संस्थानिकांनीं उदार मनानें तें स्वीकारिलें. ही परिस्थिति पाहून, ब्रिटिश मुत्सद्द्यांना हिंदी कारभारांत जबाबदारीची व्यवस्था करण्यांत आता धोका नाहीं, असा विश्वास वाटूं लागला. याप्रमाणें या तीन पक्षांत एकमत होऊन फेडरेशनचा स्वीकार करण्यात आला. हा बाहेरून दिसावयाचा देखावा झाला! पण संस्थानिकांचा हेतु खरोखर काय होता? देशासाठींच त्यांना एवढी तळमळ वाटत असती आणि त्यासाठीं स्वार्थत्याग करून फेडरेशनमध्यें सामील होण्यास ते तयार झाले हें खरें असतें, तर सगळी योजना कायद्याच्या रूपानें निर्णीत झाल्यानंतर तींत प्रवेश करण्यास ते इतकें कांकूं कां करीत आहेत? त्यांच्यापैकीं अमुक इतके संस्थानिक कबूल झाल्यावांचून फेडरेशन शक्य नाहीं, असा ब्रिटिश सरकार तरी कां हट्ट धरीत आहे? आपल्या कृपाछत्राखालीं त्यांना आणखी पुढेंही ठेवून घेऊन स्वायत्त प्रांताचेंच तेवढें फेडरेशन निदान सुरुवातीला तरी करण्यास या मुत्सद्द्यांची कां हरकत असावी?

या प्रश्नांचीं उत्तरें एकाच वाक्यांत देतां येण्यासारखीं आहेत. बाहेरून सांगण्यांत येत असलेले हेतु त्यांचे खरे हेतु नसून ते अगदीं वेगळे आहेत आणि ते साध्य करून घेणें जसजसें कठीण होऊं लागलें तसतसे ते फेडरेशनबद्दल

निरुत्साही होऊं लागले, हा खरा प्रकार आहे. ब्रिटिश सार्वभौमत्वाचा लगाम तोंडांतून काढून टाकण्याचा खटाटोप व्यर्थ आहे हें संस्थानिकांना अगोदर-पासूनच ठाऊक होतें. पण तो सैल करून घेण्याची आपली खटपट यशस्वी होईल अशी १९३० ज्या शेवटीं त्यांना बरीच उमेद वाटत होती. सार्वभौम-त्वाचे कांहीं पाश तोडून टाकण्याचा मोबदला म्हणजे फेडरेशनचा स्वीकार-अशी त्यांची समज होती. म्हणूनच एका हातानें फेडरेशनस्वीकार करावा व दुसऱ्या हातानें प्यारामाउंटसीचा कांहीं भाग पोलिटिकल खात्याच्या हातांतून परत घ्यावा, असा त्यांचा हेतु होता. पण ब्रिटिश मुत्सद्दी इतके भोळे नाहींत, कीं त्यांना हा डाव ओळखतां येत नसेल ! त्यांनी फेडरेशन पत्करण्याची संस्थानिकांची कबुली खरी करून घेतली. पण सार्वभौमत्वाची व्याख्या कर-ण्याचें साफ नाकबूल केलें ही गोष्ट जसजशी संस्थानिकांच्या लक्षांत येऊं लागली त्या मानानेंच फेडरेशनबद्दलची शंका त्यांच्या मनांत बळकट होऊं लागली. म्हणूनच अद्याप या प्रश्नाचा निकाल लावण्याची ते टाळाटाळी करीत आहेत.

फेडरेशन निर्माण करून जबाबदार कारभाराचें सोंग उभारण्याची ब्रिटिश मुत्स-द्यांनाही मोठी हौस आहे असें नाहीं. परंतु संस्थानिकांवर ठेवलेला विश्वास अना-ठायीं असो कीं नसो, फेडरेशन व ते संस्थानिकांसकट केल्याशिवाय त्यांना गत्यंतर काय आहे ? ब्रिटिश इंडियांतील लोकप्रतिनिधींच्याच एकाकी हातांत जबाब-दारी सोपविण्यापेक्षा आळेंबळें संस्थानिकांना फेडरेशनमध्यें ओढलें पाहिजे, हाच जास्त सुरक्षिततेचा मार्ग ब्रिटिशांच्या पुढें आहे. म्हणून तर ते त्यांना खेचूं पहात आहेत ! परंतु तितक्याच निकरानें संस्थानिक उलट दिशेकडे दोरी खेंचीत चालले आहेत !

संस्थानिकांनीं फेडरेशनमध्यें प्रवेश करावा कीं करूं नये ? या प्रश्नाबद्दल एका संस्थानिकांनीं माझें मत एकदा विचारिलें होतें. तें देण्याची मी प्रथम टाळाटाळी केली. कारण त्यांच्या विश्वासांतील मुत्सद्दी कशा प्रकारचे होते व माझ्या मताचा त्यांनीं कितपत फायदा घेतला असता, याची मला बरोबर कल्पना होती. पण अगदीं आग्रह करण्यांत येऊं लागला, तेव्हां मी त्यांना एक उलट प्रश्न केला,—समजा कीं फेडरेशनमध्यें जाण्यांत तुमचें नुकसान आहे अशी मी तुमची खात्री केली, रेसिडेंटनें तुम्हाला फेडरेशनमध्यें याच असा आग्रह केला, तर आपण काय कराल ? असा माझा प्रश्न होता. अशी खात्री झाली

तरी मी फेडरेशन मान्यच करीन, असें मला त्यांनीं उत्तर दिलें. उलट, फेडरेशन हें तुमच्या हिताचें आहे असें मी तुम्हाला पटवून दिलें व रेसिडेंटनें त्या उलट सल्ला दिला तर आपण काय कराल, असा माझा दुसरा प्रश्न होता व अपेक्षेप्रमाणें, 'तर मी फेडरेशनमध्यें जाणार नाहीं' असेंच उत्तर मिळालें. काठेवाडांतील दिवाणांच्या परिषदेनें एकदा ठराव केला, कीं फेडरेशनप्रवेश ही संस्थानिकांना घातुक गोष्ट आहे. पुढें संस्थानिकांचा दरबार भरला व त्यांना दिवाणांचा हा निकाल सादर करण्यांत आला. झालें, प्रत्येक राजा सांगूं लागला कीं, आपण आतां फेडरेशन अमान्य करणारच ! हे सर्व पाहिल्यावर सर प्रभाशंकर पट्टणी यांनीं त्यांना एक विनंति केली " आमचा अभिप्राय ऐकून त्याप्रमाणें वागण्याचा आपला निश्चय ठीक आहे. पण तो नक्की करण्यापूर्वी एका गोष्टीचा विचार जरूर करा. जेव्हां व्हाइसरॉयसाहेब अखेरचें उत्तर सांगण्यासाठीं तुम्हाला एकेकटे बोलावतील त्या वेळीं तुमच्या बाजूला आम्ही दिवाण बसणार नाहीं. व्हाइसरॉय व एक संस्थानिक तेवढेच तेथें असतील. त्यांच्या टेबलावर हजर असलेल्या संस्थानिकांबद्दलच्या गुप्त कागदांच्या फाइल्स रचलेल्या असतील आणि त्या ढिगाकडे एक दृष्टिक्षेप करून, साहेब विचारतील कीं, महाराज, आपण फेडरेशनच्या स्वीकारपत्रकावर सही करितां कां या फायलींची चौकशी करण्याचा पोलिटिकल सेक्रेटरीला हुकूम देऊं ? असा प्रसंग ठेपल्यावर तेथें आपण काय उत्तर द्याल, याचा विचार करून मग आज काय तो निश्चय करा." पट्टणींनी ही विनंति केल्याबरोबर क्षणभर परिषद स्तब्ध झाली. अखेरीस विचार ठरला कीं, तूर्त ठराव असा कांहींच करूं नये; पुनः परिषद भरवून विचार करणें हेंच बरें !

हे सगळे अनुभव खरे असले तर एकदम संस्थानिकांना हा मंत्र सांगून फेडरेशनची ब्रिटिश सरकार संस्थापना कां करीत नाहीं ? याचीं दोन कारणें असूं शकतील. इतक्या मोठ्या सोट्याचा उपयोग करून संस्थानिकांना आंत घेऊन काय फायदा ? मग ते आपले मित्र राहतील कां ? या शंकेनें सरकार आपला बडगा उभारीत नसावें. दुसरें असें, कीं ब्रिटिश इंडियांतील जनता तरी फेडरेशन कुठें मान्य करीत आहे ? या परिस्थितींत **अशुभस्य कालहरणम्** हाच न्याय जास्त शहाणपणाचा असें इंग्रज मुत्सद्द्यांना वाटत असावें. म्हणूनच फेडरेशनचें घोंगडें भिजत पडलें आहे !

या पुस्तकांत वर्णिलेली घटना कधींकाळीं अमलांत येईल कीं नाहीं ? या

प्रश्नाचें उत्तर भविष्यकाळच बरोबर देऊं शकेल. आज सगळ्या हिंदी जनतेला घटनेचें घातुक रूप दाखवून तिला विरोध करण्याची बुद्धि तीव्र करणें अत्यंत जरूर आहे. श्री. देवगिरीकरांचा हा काळजीपूर्वक तयार केलेला ग्रंथ या विषयावरील लोकमत प्रभावी करण्याला उपयुक्त होईल यांत शंका नाहीं. सरकारनें ठरविलेली योजना वाईट आहे इतकेंच मोघम सांगितलें तर लोकमत व्हावें तसें बलवान होणार नाहीं. इंग्रजी सत्तेनें ब्रिटिश इंडियांत जें ऐक्य निर्माण केलें आहे त्यावर फेडरेशनचा परिणाम काय होईल? हिंदी इतिहासांत वारंवार अनुभवावयास सांपडलेली फुटीची प्रवृत्ति फेडरेशनमुळें बळावेल काय? मूलतः स्वतंत्र राज्यांना निदान अंशतः एकत्रित करण्याकरितां फेडरल घटना उपयोगी पडते. परंतु एकत्र असलेले प्रांत प्रथम तोडून टाकून मग फेडरल करण्यांत शहाणपणा आहे काय? यामुळें राष्ट्रीयत्वाच्या वाढीस अडचण येईल का नाहीं? वगैरे महत्त्वाच्या, किंबहुना आमच्या राष्ट्रीय जीवनांत मूलभूत असलेल्या प्रश्नांच्या दृष्टीनें या विषयाचा सर्वत्र अभ्यास होणें जरूर आहे. अशा अभ्यासानेंच या घटनेचे दुष्परिणाम बरोबर लक्षांत भरतील. या अभ्यासाला हें पुस्तक चांगलें उपयोगीं पडेल.

ता. ३-१२-३८ — **आ. बा. लट्ठे.**

## हरिपुरा काँग्रेसचा
## फेडरेशनबद्दल ठराव.

The Congress is not opposed to the idea of Federation; but a real Federation must even apart from the question of responsibility, consist of free units enjoying more or less the same measure of freedom and civil liberty and representation by the democratic process of election. The Indian States participating in the Federation should approximate to the provinces in the establishment of representative institutions and responsible Government, civil liberties and method of election in the Federal Houses .... .... ...

The Congress therefore reiterates its condemnation of the proposed Federal Scheme and calls upon the provincial and local Congress Committees and the public generally, as well as the provincial Governments and ministries to prevent its inauguration.

Haripura Congress–
Resolution on Federation.
—1938.

# अल्प निवेदन.

कांहीं महिन्यांपूर्वी ऑल इंडिया काँ.कामिटीनें प्रसिद्ध केलेलें फेडरेशनचें छोटेसें पुस्तक म. प्रां. काँ. कामिटितर्फे मी मराठींत भाषांतरीत करावें अशी श्री. शंकरराव देव यांनीं कल्पना सुचविली. भाषांतराच्या दृष्टीनें मी पुस्तक वाचूं लागलों, पण तें पुस्तक मला अनेक दृष्टींनीं अपुरें वाटलें आणि आपण स्वतंत्रपणें पुस्तक लिहून काढलें पाहिजे असा विचार मनांत आला. नंतर फेडरेशनचा कायदा वाचून टाकला आणि त्याच्या वरील विवरणाकरितां व अनुसंधानाकरतां पुस्तकें गोळा करूं लागलों. फेडरेशनवर आतापर्यंत लिहिलीं गेलेलीं सर्व मुख्य मुख्य पुस्तकें मी गोळा केलीं आणि त्यांच्या आधारानें हें पुस्तक तयार केलें. तेंव्हां हें पुस्तक लिहिण्याची कल्पना मला श्री. शंकरराव देव यांच्या सूचनेवरून मिळाली म्हणून त्यांचे प्रथम आभार मानणें जरूर आहे.

फेडरेशनवर आतापर्यंत तीन प्रकारचीं पुस्तकें लिहिलीं गेलीं आहेत. १ प्रचाराच्या स्वरूपाचीं, २ शाळाकॉलेजांतलि विद्यार्थ्यांकरतां लिहिलेलीं आणि ३ कायद्याचा कीस काढून चिकित्सक वृत्तीनें कायदेपंडितांकरतां लिहिलेलीं. मी ह्या तिन्ही प्रकारच्या पुस्तकांचा उपयोग केला आहे व प्रत्येक प्रश्नाबद्दल जेवढी व जितकी माहिती उपलब्ध करून घेतां येईल तितकी घेतली आहे. या पुस्तकांत फेडरेशनची शास्त्रीयदृष्ट्या चर्चा केली आहे; सध्याच्या फेडरेशनचा पूर्वेतिहास दिला आहे, त्या कायद्यांतील कलमांचा आशय सांगितला आहे, वसाहतीच्या स्वराज्याशीं त्याची जरूर तेथें तुलना केली आहे आणि हें फेडरेशन कां नको याचीं कारणें दिलीं आहेत. माझ्या कल्पनेप्रमाणें फेडरेशनबद्दल व राजकीय प्रश्नाबद्दल जितकें लिहिणें शक्य होतें तितकें लिहून या पुस्तकाला परिपूर्णता आणली आहे. नुसत्या फेडरेशनचा प्रश्न समजावा अशी माझी इच्छा नसून हिंदी राजकारणाचा प्रश्न वाचकांना कळावा हा त्यांत उद्देश आहे.

कॉंग्रेसनें अधिकारस्वीकार केल्यापासून सर्वच जनतेचें लक्ष सनदशीर राजकारणाकडे लागलें आहे. ज्यांना इंग्रजी येतें त्यांची गोष्ट वेगळी पण ज्यांना इंग्रजी कमी येतें अगर बिलकूल येत नाहीं अशांच्याकरतां देशी भाषेंत राजकीय

वाङ्मय लिहिलें गेलें पाहिजे. माझ्या अगोदरच आचार्य लिमये यांनीं प्रांतिक स्वराज्यावर एक पुस्तक लिहून मराठी भाषेंत एका उत्तम ग्रंथाची भर घातली आहे. तेव्हां मी करीत असलेला उपक्रम नवा नसला तरी नव्या उपक्रमांत भर घालणारा आहे.

ह्या पुस्तकांत मी प्रत्येक कलम घेऊन त्याचें भाषांतर दिलें नाहीं; पण बहुतेक कलमांचा आशय दिला आहे. इंग्रजी कायद्यांतील शब्दांचे मराठी प्रतिशब्द देणें अत्यंत अवघड आहे. इंग्रजी भाषा त्या दृष्टीनें जितकी समृद्ध आहे तितकी मराठी नाहीं. Should आणि Would सारख्या शब्दांचे बारकावे भाषांतरकर्ता कितीहि कुशल असला तरी काय दाखवूं शकणार? His Majesty, King, Emperor यांचीं भाषांतरें कशी करणार? प्रत्येकाला निरनिराळे व व्यापक अर्थ आहेत. भाषांतर करतांना शब्दांचा तुटवडा तर पदोपदीं भासतो. Act आणि Law या दोघांचें भाषांतर कायदा असेंच केलें जातें. Act ला कोणी कानू असाहि पर्यायशब्द सुचवील. पण त्यामुळें अर्थ स्पष्ट होत नाहीं. Executive authority of the Federation याचें भाषांतर सरळपणें करणें शक्य नाहीं. Peace and Tranquility; Function and Act; Suggestion and Direction वगैरे शब्दांमधील फरक भाषांतराच्या रूपानें दाखविणें कठीण आहे. कित्येक शब्द तर इतके खोंचदार असतात कीं, त्याचें मराठींत भाषांतर करणें अशक्य आहे. त्यामुळें मराठींत फेडरेशन जरी आणलें किंवा दुसऱ्या कायद्याचें पुस्तक भाषांतरित केलें तरी शब्दप्रामाण्याकरतां मूळ इंग्रजी शब्दाकडेच धांव घ्यावी लागते.

हें कायद्याचें पुस्तक असल्यामुळें भाषेबद्दलही फार सावध असावें लागतें. लेखणी साहित्याच्या लपेटींनें सोडतां येत नाहीं. कित्येक वेळां बरोबर अर्थ प्रतिपादन व्हावा म्हणून जरा जपूनच लिहिलेलें बरें असें वाटूं लागतें. त्याचा परिणाम असा होतो कीं, पुष्कळशीं वाक्यें 'आहे किंवा नाहीं' या क्रियापदांत संपवावीं लागतात. या सर्व दोषांची जाणीव मला आहे; पण तेथें माझा इलाजच चालणें शक्य नव्हतें.

नवे शब्द पाडण्याच्या भानगडींत मी पडलों नाहीं किंवा पुस्तक लिहीत असतां मला ते सुचले नाहींत. फेडरेशनला संयुक्त राज्यपद्धति असा जुनाच

शब्द मी वापरला आहे. पण मागाहून त्यापेक्षां संघराज्य हा शब्द चांगला आहे असें मला वाटलें. यापुढें फेडरेशनला संघराज्य जर म्हटलें जाईल तर चांगलें होईल. हिंदीत अगर अन्यप्रांतीय भाषेंत हा शब्द रूढ आहे किंवा नाहीं याची मला माहिती नाहीं. असलाच तर फार उत्तम. निरनिराळ्या स्वयं-शासित संघांचें मिळून झालेलें जें राज्य तें संघराज्य होय. Instrument of Instruction ला मी आज्ञापत्रक हाच शब्द वापरला आहे. Instrument of Accession ला मी मान्यतापत्रक हा शब्द वापरला आहे. पण त्यापेक्षा आचार्य लिमये यांनीं सुचविलेला 'सामीलनामा' हा शब्द जास्त सुटसुटीत आहे. Discretion व Individual Judgment याला विवेचक बुद्धी व वैयक्तिक निर्णय असे शब्द मी वापरले आहेत. माझ्या कल्पनेनें हे शब्द पूर्ण अर्थप्रतिपादक आहेत.

या पुस्तकांतील भूमिकेंत स्वराज्याच्या चळवळीचा इतिहास दिला असून फेडरेशन कां नको याचीं कारणें सांगितलीं आहेत. सामान्य वाचकांना या भागा-वरून फेडरेशनसंबंधीं स्थूल कल्पना येईल. संस्थानिकांच्या प्रश्नाबद्दल मी विशेष तपशीलवार लिहिलें आहे. तेच या फेडरेशनचे जन्मदाते आहेत. ते काय मागावयाला गेले व त्यांना काय मिळालें हें त्यावरून दिसतें.

अशा प्रकारें सर्व सामान्य वाचकापासून तो विशेष अभ्यासू वाचकापर्यंत सर्वांना पुस्तक उपयुक्त व माहितीपूर्ण व्हावें म्हणून परिश्रम केले आहेत. शक्य तितक्या लवकर पुस्तक प्रसिद्ध व्हावें म्हणून मी जरा गर्दीच केली. त्यामुळें कोठें कोठें चुका राहिल्या असण्याचा संभव आहे. त्या कोणी दाखविल्यास मी त्यांचा ऋणी होईन.

हें प्रास्ताविक पुरें करण्यापूर्वी मला कांहीं व्यक्तींचे आभार मानले पाहिजेत. चित्रशाळेचे मालक श्री. वासुकाका जोशी आणि मॅनेजर श्री. शंकरराव जोशी या दोघांनीं पुस्तक छापून प्रसिद्ध करण्याचें कबूल केल्याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहे. त्यांच्या नेहमींच्या उपकारक वृत्तीला अनुसरून त्यांनीं हा जरासा मोठा झालेला ग्रंथ छापून दिला याबद्दल त्यांचे कितीही आभार मानले तरी ते अपुरेच आहेत. प्रुफें तपासणें, हस्तलिखित वाचून पहाणें, सूची करणें वगैरे कामांत श्री. नीळकंठ दामोदर पंडित बी. ए., ध्रुवाचे संपादक

श्री. रा.प्र. कानिटकर, व सौ. सरोजिनीबाई लड्डु बी. ए. वगैरेंचें मला सहाय्य झालें. या सर्वांचा मी आभारी आहे.

श्री. काकासाहेब गाडगीळ एम्. एल. ए. यांच्याबरोबर बरीच चर्चा करावयाला मिळावी अशी माझी इच्छा होती; पण ती सफल होऊं शकली नाहीं. तथापि त्यांनीं व्यवस्थितपणें ठेवलेलीं बजेटाचीं पुस्तकें मला देऊन जें सहाय्य केलें त्याबद्दल त्यांचा मी आभारी आहे. माझे मित्र श्री. तात्यासाहेब देशपांडे यांनीं चार महिनेपर्यंत कॉंग्रेसचें काम एकट्यानें पहाण्याचें कबूल केलें नसतें तर लागला त्यापेक्षां पुस्तकप्रकाशनाला अधिक वेळ लागला असता. या सहाय्याबद्दल मी आभारी आहे.

शेवटीं आभार मानावयाचे म्हणजे ना.अण्णासाहेब लठ्ठे यांचे.पुष्कळ दिवसपर्यंत पुस्तकाला कोणाचीच प्रस्तावना न घेतां माझ्या इतर पुस्तकांप्रमाणें हेंहि पुस्तक प्रकाशित करावें असें मला वाटत होतें. पण या विषयाचें अध्ययन केलेले अधिकारी जर कोणी मिळतील तर चांगले असे विचार मनांत येत. श्री. अण्णासाहेब लठ्ठे यांनीं फेडरेशनवर पूर्वी पुस्तक लिहिलें असल्यामुळें त्यांना विनंती करावी असें वाटत होतें. त्यांच्या निगर्वी, व विनयशील स्वभावाला अनुसरून त्यांनीं ही गोष्ट कबूलहि केली असती. पण त्यांच्या कार्याच्या व्यापामुळें त्यांनीं नाहीं म्हटलें तर काय करा अशा विचारांत असतां माझे मित्र श्री. हरिभाऊ जोशी हे अण्णासाहेबांची मान्यता घेऊनहि आले. श्री. अण्णासाहेबांनीं मार्मिक प्रस्तावना लिहून दिल्याबद्दल त्यांचा मी आभारी आहे.

यांशिवाय इतर अनेक मित्रांनीं अकृत्रिमपणें मला सहाय्य केलें त्या सर्वांचा मी आभारी आहे.

पुणें,
ता.५-१२-३८ } त्र्यं. र. देवगिरीकर.

---

# अनुक्रमणिका.



विषय पृष्ठ

भूमिका— ... ... ... ... ... १
भाग १ ला—फेडरेशन म्हणजे काय ... ... ... ६९
भाग २ रा—फेडरेशनचीं वैशिष्ट्यें ... ... ... ८८
भाग ३ रा—कांहीं फेडरेशन्स ... ... ... ९६
भाग ४ था—फेडरेशनपूर्वी ... ... ... १०६
भाग ५ वा—फेडरेशनला विरोध कां ?... ... ... ११९
भाग ६ वा—संयुक्त राज्यघटनेंतील संस्थानें ... ... १२६
भाग ७ वा—गव्हर्नर जनरल ... ... ... १५१
भाग ८ वा—संयुक्त कायदेमंडळ ... ... ... १८२
भाग ९ वा—कायदेमंडळाचा कारभार ... ... ... १९८
भाग १० वा—प्रांतिक राज्यकारभार ... ... २३६
भाग ११ वा—चीफ कमिशनरचे प्रांत ... ... २४४
भाग १२ वा—कायदेमंडळाची सत्ता व सत्तेची विभागणी ... २५०
भाग १३ वा—भेदाभेदप्रातिबंधक योजना ... ... २७५
भाग १४ वा—फेडरेशन, प्रांत व संस्थानें यांचे संबंध ... २८६
भाग १५ वा—संयुक्त सरकार व आर्थिक प्रश्न ... ... २९७
भाग १६ वा—संस्थानिकांचे आर्थिक प्रश्न ... ... ३२७
भाग १७ वा—पैशाचा जमाखर्च ... ... ... ३५१
भाग १८ वा—रेल्वेचा कारभार ... ... ... ३७४
भाग १९ वा—न्यायदान ... ... ... ... ३८६
भाग २० वा—ब्रिटिश हिंदुस्थानांतील इतर कोर्टें ... ... ३९७
भाग २१ वा—सरकारी नोकऱ्या ... ... ... ४०२
भाग २२ वा—हिंदुस्थानच्या संरक्षणाचा प्रश्न ... ... ४३१
भाग २३ वा—सेक्रेटरी ऑफ् स्टेट ... ... ... ४४२
भाग २४ वा—सर्वसाधारण तजविजी ... ... ... ४४७
भाग २५ वा—उपसंहार ... ... ... ... ४६६

परिशिष्ट १ लें—फे. कौन्सिल व असेंब्ली जागा ... ... ४७२
,, २ रें—संस्थानांतील जागांची वाटणी ... ... ४७५
,, ३ रें—प्रांतिक जागांची वाटणी ... ... ४८५
,, ४ थें—फेडरल, प्रांतिक व समाईक यादी ... ४८८
,, ५ वें—मान्यतापत्रक नमुना ... ... ५००
,, ६ वें—आज्ञापत्रक ... ... ... ५०२
,, ७ वें—ग. जनरल व ग. चे पगार, भत्ते ... ५०८
सूची— ... ... ... ... ... ५०९
आधारभूत ग्रंथांची यादी ... ... ... ५१६

# भूमिका.

ब्रिटिश साम्राज्याच्या विशाल विस्ताराखालीं जे अनेक देश पारतंत्र्यांत अडकून पडले आहेत त्यांतील हिंदुस्थान हा एक प्रमुख देश आहे. साम्राज्यामध्यें अडकून ठेवलेल्या सर्व देशांना सारख्याच सवलती आहेत, तेथें सारखीच शासनपद्धति आहे असें नाहीं. त्या देशांना नामाभिधानेंहि सारखीं नाहींत. कांहींना डोमिनिअन्स म्हणतात, कांहींना कॉमनवेल्थ म्हणतात, कांहींना क्रौन कॉलनीज् म्हणतात, कांहींना प्रोटेक्टरेटस् म्हणतात, कांहींना मँडेटेड टेरिटरिज् म्हणतात, कांहींना रिस्पॉंसिबल गव्हर्मेंटस् म्हणतात आणि आयर्लंडला फ्रीस्टेट म्हणण्यांत येतें. राज्यशास्त्रावर लिहितांना अलंकाराची भाषा वापरणें जरा चमत्कारिक वाटतें. पण ब्रिटिश साम्राज्याच्या या अवाढव्य पसाऱ्याला एका मोठ्या तुरुंगाची उपमा देण्याचा मोह आवरत नाहीं. ह्या तुरुंगांत कांहीं कैदी अंधारकोठडीची शिक्षा भोगत आहेत, कांहीं कैदी नुसत्या बेडया व हातकडया घालून इकडे तिकडे वावरत आहेत, कांहींना वॉचमन केलें आहे व कांहींना वॉर्डर करून बरेचसे हक्क देण्यांत आले आहेत. या सर्व कैद्यांवर इंग्लंडची जनता जेलर-सुपरिंटेंडेंटप्रमाणें देखरेख करीत आहे. पुष्कळ वर्षेंपर्यंत तुरुंगांत दिवस काढल्यानंतर कांहीं देशांना तुरुंगाच्या बाहेर हिंडण्यासवरण्याची परवानगीहि देण्यांत आली

आहे. पण पिंजऱ्यांत कोंडून ठेवलेला पक्षी ज्याप्रमाणें आपण मोठ्या पक्ष्यांच्या भक्ष्यस्थानीं पडूं या भीतीनें पिंजरा सोडत नाहीं, तशी भयग्रस्त स्थिति कांहीं देशांची झाली आहे. हिंदुस्थान हाहि या अभागी देशांपैकीं, एक देश आहे. या तुरुंगांतून सुटण्याची त्याची आज अनेक वर्षे धडपड सुरू आहे.

हिंदुस्थानला नवी राज्यघटना देण्याचें ठरविण्यांत आलें आहे, पण तो हिंदुस्थानचा वाढता प्रक्षोभ थांबविण्याकरितां केलेला प्रयत्न आहे. हिंदुस्थानशिवाय ब्रिटिश साम्राज्याचें वैभव व प्रतिष्ठा कायम रहाणार नाहींत यांत तर शंकाच नाहीं. पण असंतोषाचा वणवा वाढत चालला कीं, आपल्या साम्राज्याची पिछेहाट होईल या भीतीनें अधिकाराचे लहान लहान तुकडे मधूनमधून टाकण्याचा उपक्रम ब्रिटिश सरकार करीत असतें.

सैबीरियांतील एका रोमहर्षण प्रसंगाची या वेळीं आठवण होते. एकदां एक बिनचाकाची चार घोडे जुंपलेली गाडी (sledge) सैबीरियांतील बर्फावरून काळोख्या रात्रीं चालली होती. आंत चार-दोन प्रवासी होते. लांबचा मार्ग आक्रमावयाचा होता. ऐन समुद्रांत जहाज शिरल्यावर जसें वर आकाश व खालीं पाणी दिसतें किंवा वालुकामय प्रदेशांत ज्याप्रमाणें रखरखीत वाळूशिवाय दुसरी वस्तू दिसत नाहीं, तसें या प्रवाश्यांचें झालें होतें. आजूबाजूला उंच उंच झाडें, मनुष्यवस्ती वगैरे कांहीं नव्हतें. अशा या प्रवासांत या गाडीच्या मागें लांडग्यांची मोठी टोळी लागली. प्रवासी भयभीत झाले. इष्ट स्थळीं पोहोंचेपर्यंत लांडग्यांना दूर ठेवणें कसें शक्य होईल याचा विचार सुरू झाला. प्रथम त्यांनीं आपल्या-जवळील खाद्यपदार्थांचे तुकडे त्या लांडग्यांपुढें टाकले. तेवढ्यानें

लांडग्यांचें समाधान कसें होणार ? जवळच्या पिस्तुलांतून त्यांनीं कांहीं गोळ्या लांडग्यांवर झाडल्या पण दारुगोळ्यांचा पुरवठा बेताचाच असल्यामुळें बेताचेच लांडगे मरण पावले. पण बाकीचे लांडगे त्यामुळें बेफाम झाले. त्यांची राक्षसी भूक शमविण्याकरतां एकेक घोडा सोडण्याचे प्रवाश्यांनीं ठरविलें. कांहीं लांडग्यांचेंच तेवढ्यानें पोट भरलें.अखेरीस सारे घोडे सोडले तरी लांडग्यांची धाड थांबली नाहीं. आणि शेवटीं शेवटचा घोडा सोडून ते प्रवासी बाहेर पडले आणि लांडग्यांबरोबर दोन हात करूं लागले. पण त्यांचा निभाव लागला नाहीं आणि सर्व प्रवाशी त्या टोळीच्या भक्षस्थानीं पडले.

परतंत्र जनता जसजशी जागृत होते, तिला आपल्या हक्काची जसजशी जाणीव होऊं लागतें, तिची प्रतिकारक्षमता ज्या ज्या प्रमाणांत वृद्धिंगत होत जाते, तसतसे राज्यकर्त्यांनाहि आपले अधिकार सोडावे लागतात. समंजस व मुत्सद्दी राष्ट्रें लोकक्षोभाची नाडी पारखून, त्यांची संघटना व प्रतिकारशक्ति आजमावून आपली सुलतानी सत्ता आवरती घेतात आणि राज्यकारभाराचे हक्क जनतेला देतात. त्यांत प्रलोभन असतें, भीतीहि दाखवली जाते. या मोहभयाला लवचीक वृत्तीचीं माणसें बळी पडतात आणि राज्यकर्त्यांचा कार्यभाग होतो. पण व्यक्तिनिष्ठ समाजाची जागा जर बलवान व सुसंघटित पक्षानें घेतली तर राज्यकर्त्यांचे हे असंतोष थांबविण्याचे प्रयोग अयशस्वी ठरल्याशिवाय रहात नाहींत.

हिंदुस्थानचें असेंच झालें आहे. हिंदुस्थानला फेडरेशन देण्याचा गाजावाजा करून राज्यकर्त्यांनीं कांहीं काळ बुद्धिभेद केला. फेडरेशन ही ब्रिटिशसाम्राज्याच्या पोतडींतून निघालेली नवी चीज

हिंदुस्थानला अपरिचित होती. आमच्यांपैकीं पुष्कळशा लोकांना फेडरेशनची कल्पनाहि नव्हती. पण फेडरेशन म्हणजे स्वराज्य नव्हे, स्वातंत्र्य तर नव्हेच नव्हे एवढें समजण्याची पात्रता प्रत्येकांत आलेली आहे.

फेडरेशन या शब्दाला हिंदुस्थानांतील एकहि राजकीय पक्ष भुलला नाहीं आणि राज्यकारभाराच्या अभिनव स्वरूपाच्या मायाजाळांत कोणीहि फसला नाहीं. किंबहुना हिंदुस्थानच्या आकांक्षा पूर्णांशानें पार पडण्यालायक राज्यघटना बनविण्याची शक्ति हिंदुस्थानला प्राप्त झाल्याशिवाय या देशांत शांतता नांदणार नाहीं. हिंदुस्थानांत गुंतागुंतीचे प्रश्न आहेत असें सांगण्यात येतें. सरहद्दीवरील टोळ्या आणि भिल्ल-मांगगारोड्यापासून तों म्हैसूरच्या संस्थानिकांपर्यंत सर्व प्रकारच्या हितसंबंधीं लोकांचा हिंदुस्थानांत समावेश होत आहे असें पाश्चात्त्य राष्ट्रांत पुकारलें जातें. नाना जाती, नाना धर्म, नाना पंथ यांचें अवडंबर माजवून हिंदुस्थानला सबूर करा असें सांगण्याचे दिवस आतां गेले आहेत. विचारणारा असें विचारतो, हे धर्म व हे पंथ चिरकाल टिकणारे असल्यामुळें ब्रिटिश साम्राज्यहि चिरकाल टिकणार आहे कीं काय? लोकांची सहनशक्ति आतां अनावर होत चालली आहे. त्यांना हिंदुस्थानला दाखविलेल्या या बागुलबोवांचें आतां भय वाटेनासें झालें आहे. ते विचारतात हिंदुस्थानांत जशी विविधता आहे असें तुम्ही म्हणतां, तशी बलवान, कार्यनिपुण, सुसंघटित, बुद्धिशाली कॉंग्रेससारखी एकमेव संस्था आहे म्हणून कॉंग्रेसच्या हातीं राज्यकारभार कां देत नाहीं? म. गांधी आणि पं. जवाहरलाल नेहरूंसारखीं जगाचें राजकारण चालविण्याची मनगटांत शक्ति

असणारी अलौकिक माणसेंहि हिंदुस्थानांत आहेत. नेव्हिल चेंबर्लेन भले म्हणोत, 'राक्षसी सामर्थ्य आमच्या अंगांत आहे पण तें सामर्थ्य उपयोगांत आणणें शहाणपणाचें नाहीं !' पण असल्या या गर्जनांतून पोकळ आवाज कानांवर पडत आहे. ब्रिटिशांच्या मुत्सद्देगिरीचें आणि अग्रेसरत्वाचे आज वाभाडे निघाले आहेत. राज्यशासन शास्त्राचा मक्ता आपल्याकडेच आहे असें आमच्या शाळेंतील मुलांना इंग्रज ग्रंथकार आणि मुत्सद्दी पाठ देत असत. ती घमेंड आतां निष्फळ ठरली आहे. खेर, राजगोपालाचार्य, पं. गोविंद पंत, श्रीकृष्ण सिंह, वगैरेंसारख्या मुख्य प्रधानांनीं कॉंग्रेसच्या नियंत्रणाखालीं आपल्या शासनशालित्वाची खात्री पटवून दिली आहे. कॉंग्रेसचा हा कारभार एका हातांत दडपशाहीचें पिस्तुल रोखून आणि दुसऱ्या हातांत सुधारणांचें मलम घेऊन चालला नाहीं. पूर्वीच्या गव्हर्नरांना अगर हल्लींच्या गव्हर्नर-जनरलला जसे जुलूम करून राज्य चालवावें लागतें, तसें कॉंग्रेसच्या राज्यांत चाललेलें नाहीं. अशा परिस्थितींत अजूनहि ब्रिटिश साम्राज्यानें आम्हाला चमच्यानें भरविण्याची महत्त्वाकांक्षा बाळगावी ? पण तें शक्य नाहीं. हिंदुस्थानच्या राजकीय आकांक्षांना फेडरेशनचें कृत्रिम बांध कितीहि घातले तरी कोणताही भगीरथ इतउत्तर स्वातंत्र्याची ही अनेक थडींनीं वाहणारी गंगा-नदी थोपवूं शकणार नाहीं.

राज्यघटना कोणत्या धर्तीची पाहिजे याबद्दल ब्रिटिश सरकार आणि आणि कॉंग्रेस यांचे एकमत झालें आहे. हिंदुस्थानला फेडरेशन हवें आहे पण फेडरेशनचें नाटक नको आहे. ब्रिटिश सरकारला औषध जुनेंच द्यावयाचें आहे. मात्र बाटली नवी आहे.

फेडरेशनची ही कल्पना कशी उद्‌भूत झाली, त्या फेडरेशनला

इतकें त्याज्य कां मानलें जातें वगैरे इतिहास समजून घेण्यासारखा आहे. फार पूर्वीच्या इतिहासाकडे आपल्याला जाण्याचें कारण नाहीं. पण अलीकडील घडामोडींच्या पार्श्वभूमीवर फेडरेशनची सजावट केली असल्यामुळें त्या इतिहासाचें थोडक्यांत समालोचन आपण केलें पाहिजे.

## पूर्व इतिहास.

२० ऑगष्ट १९१७ रोजीं भारतमंत्री मॉंटेग्यू यांनीं पार्लमेंटांत एक जाहीर घोषणा केली. तींत तीन वाक्यें महत्त्वाचीं होतीं. एक हिंदी लोकांचा राज्यकारभारांतील प्रत्येक खात्यांत जास्त जास्त संबंध येऊं देणें. दुसरें स्वयंशासित संस्थेच्या स्वरूपाची क्रमशः वाढ करणें आणि तिसरें ब्रिटिश साम्राज्याचा एक अंगभूत भाग म्हणून हिंदुस्थानांत प्रगतिपर मार्गानें जबाबदारीच्या स्वराज्याची घटना घडवून आणणें. १९१९ च्या सुधारणा ह्या या ध्येयाचा विसार म्हणून देण्यांत आल्या. या घोषणेंत दोन्हीं बाजूंनीं सुटका करून घेण्याचा मार्ग मोकळा होता. हिंदुस्थानला ब्रिटिश मुत्सद्दी सांगत कीं, तुमच्या आशाआकांक्षांचा समावेश सूत्ररूपानें या घोषणेंत केला आहे. आणि ब्रिटिशांना सांगत कीं, हिंदुस्थानला वसाहतीचें स्वराज्य देण्याचें आम्ही वचन दिलें नाहीं, जबाबदारीचें स्वराज्य देतों असेंहि म्हटलें नाहीं. फक्त ' आशां कालवतीं कुर्यात् ' या नीतीचा आम्ही अवलंब केला आहे. आजपर्यंत हीच नीति त्यांनीं अवलंबिली आहे. या बाबतींत महाभारतातील सूत्रवाक्य त्यांनीं आजतागायत जागरूकपणें पाळलें आहे.

प्रवक्तव्यं न दातव्यमाशामेव प्रदापयेत् ।<br>
आंशा कालवतीं कुर्यात् कालं विघ्नेन योजयेत् ॥

देतो असें बोलावें, पण देऊं नये. द्यावयाचीच जर असेल तर आशा दाखवीत रहावी. आशेची मुदत सारखी लांबणीवर टाकावी आणि त्या मुदतीवर संकटें आणीत रहावींत. या नीतीचा पाठपुरावा ब्रिटिश मुत्सद्दी करीत असतात.

१९१९ च्या कायद्यानें कोणाचीहि फसवणूक झाली नाहीं. कॉंग्रेसची तर झाली नाहींच नाहीं. ज्या कौन्सिलांत राष्ट्रीय वृत्तीच्या लोकांचें बहुमत होऊं नये म्हणून कायदेशीर तजवीज करण्यांत आली होती त्या कौन्सिलच्या मायामंदिरांत शिरण्याचा प्रयत्न कॉंग्रेसनें केला नाहीं हेंच त्या सुधारणांच्या पोकळपणाचें शिफारसपत्र होतें.

## दोहाती कारभार.

या सुधारणांमुळें सोंपीव व राखीव असा दोहाती राज्यकारभार प्रांतांत सुरू झाला. मध्यवर्ती सत्तेंत कांहींहि महत्त्वाचा बदल झाला नाहीं. हिंदुस्थानला जबाबदारीचें स्वराज्य द्यावयाचें ध्येय जरी पार्लमेंटच्या गच्चीवरून पुकारलें गेलें तरी हिंदुस्थान सरकारनें पार्लमेंटलाच जबाबदार राहिलें पाहिजे असें ठरविण्यांत आलें. हिंदुस्थानच्या राज्यकारभाराची जबाबदारी पार्लमेंटवर म्हणजे भारतमंत्र्यावर येत असल्यामुळें त्याला सर्व अधिकार देण्यांत आले होते आणि गव्हर्नरजनरल हा स्टेट सेक्रेटरीचा हस्तक असल्यामुळें त्याला हे अधिकार वहिवाटावयास मिळाले. सेक्रेटरी ऑफ स्टेटचा पगार १९२० सालापूर्वी हिंदुस्थानच्या तिजोरींतून दिला जात असल्यामुळें पार्लमेंटच्या सर्वाधिकारित्वाला त्यामुळें थोडें वैगुण्य येई. तें वैगुण्य नव्या सुधारणांनीं काढून टाकलें आणि त्याचा

पगार ब्रिटिश खजिन्यांतून दिला जाऊं लागला. या फेरफारामुळें पार्लमेंटच्या सत्तेची पक्कड भारतमंत्र्यावर पूर्णपणें बसली आणि सारा हिंदुस्थान पार्लमेंटच्या काबूंत आणण्यांत आला. सेक्रेटरी ऑफ स्टेटच्या परवानगीवांचून हिंदुस्थानच्या वृक्षाचें पानहि हलूं नये इतका बंदोबस्त या कायद्यानें केला. सेक्रेटरी ऑफ स्टेटला कौन्सिलहि असूं नये, त्यानें एकटयानेंच देखरेख करावी, हुकूम सोडावे, व नियंत्रण करावें अशी क्र्यू-कमिटीची इच्छा होती. पण ती अमान्य झाली आणि त्याला आठ ते बारा जणांचें सल्लागारमंडळ देण्यांत आलें. त्यांत कांहीं हिंदी लोकहि घ्यावेत असें ठरविण्यांत आलें. पण या मंडळामुळें सेक्रेटरी ऑफ स्टेटची सत्ता कमी झाली नाहीं. त्याला व्हेटोचे अधिकार होतेच.

प्रांतामध्यें हिंदी दिवाणांच्या हातीं निरुपद्रवी खातीं देऊन मर्यादित जबाबदारीचें तत्त्व घुसडविण्यांत आलें. राखीव खात्याचा कारभार गव्हर्नर-जनरलनें आपल्या कौन्सिलच्या मार्फत करावा आणि सोंपीव खात्यांचा गव्हर्नरनें मंत्र्याच्या सहाय्यानें करावा असेंहि ठरविण्यांत आलें. या विभक्त कारभाराचे धिंडवडे कसे निघाले याचा इतिहास सर्वांना ज्ञात आहेच. मंत्री हीं शोभेचीं बाहुलीं ठरलीं. गव्हर्नर त्यांच्यावर वाटेल तेव्हां सासूबाईपणा गाजवूं शकत असे.

## नरेंद्रमंडळ

संस्थानांच्या कारभाराला १९१९ च्या कायद्यानें स्पर्शही केला नव्हता. या संस्थानिकांचें एक कायद्याचें सल्लागारमंडळ असावें, अशी सूचना मॉंटेग्यू-चेम्सफर्ड अहवालांत केली होती. या मंडळाचा

उद्देश संस्थानिकांनीं वेळोवेळीं सल्लामसलत द्यावी, त्यांच्या प्रश्नाची चर्चा करावी असा सांगण्यांत आला होता. या सूचनेप्रमाणें ८ फेब्रुवारी १९२१ रोजीं नरेंद्रमंडळ स्थापन करण्यांत आलें. दिल्लीच्या दिवाणी-इ-आममध्यें या मंडळाचें उद्घाटन बादशहाच्या वतीनें ड्यूक ऑफ कॅनॉट यांनीं केलें. त्या वेळीं राजेसाहेबांचा म्हणून जो जाहीरनामा वाचण्यांत आला. त्यांत सर्व नरेंद्रांचे हक्क, अधिकार व मानमरातब कायम ठेवूं असें पुकारलें गेलें. नरेंद्रांनीं हेंहि लक्षांत ठेवावें कीं, त्यांना दिलेलें हें वचन मोडण्यांत येणार नाहीं असेंहि राजेसाहेबांनीं त्यांना अभय दिलें. *

या नरेंद्रमंडळांत संस्थानिक येऊंबसूं लागल्यामुळें आपल्या अनुभवांची व कल्पनांची देवाणघेवाण करूं लागले. या मंडळांत १०९ संस्थानिक स्वयंभूप्रतिनिधी म्हणून येतात आणि १२७ लहान लहान संस्थानिकांचे १२ प्रतिनिधी तेथें पाठविले जातात. व्हाइसरॉयसाहेब त्याचे अध्यक्ष आहेत. या संस्थानिकांनीं कोणच्याहि अंतर्गत कारभाराची चौकशी करावयाची नाहीं. तद्, हक्क वगैरेंला बाध येणारें वर्तन करावयाचें नाहीं असें ठरलेलें आहे. तेथील चर्चा वृत्तपत्रांना मोकळी असते, पण या नरेंद्रमंडळावर मोठाल्या संस्थानिकांचा विश्वास नाहीं असें दिसतें. कारण हैद्राबाद, म्हसूर, बडोदें,

* " In my former Proclamation I repeated the assurance given on many occasions by my Royal Predecessors and myself of my determination ever to maintain unimpaired the privileges, rights and dignities of the Princes of India. The Princes may rest assured that this pledge remains inviolate and inviolable. "

त्रावणकोर, काश्मीर, भोपाळ, ग्वाल्हेर वगैरे संस्थानिक त्यांत जातहि नाहींत व राजीनामेहि देत नाहींत.

या नरेंद्रमंडळाचा उद्देश ब्रिटिश सरकारच्या दृष्टीनें काय आहे हें सांगवत नाहीं. पण १९२१ पर्यंत प्रत्येक संस्थान जें दुसऱ्या संस्थानापासून अलग ठेवावें असें पूर्वीचें धोरण होतें तें बदललें. हीं नररत्नें राष्ट्रसंघांत जातात, साम्राज्यपरिषदेच्या बैठकांना त्यांना हजर ठेवतात, गोलमेजपरिषदेंतहि त्यांचें प्रदर्शन केलें जातें. अशा सभांमधून जाण्यापूर्वी सभाधीटपणा त्यांच्यांत यावा, त्यांना बोलण्याची संवय व्हावी म्हणून हें वादविवादमंडळ काढण्यांत आलें आहे. यापलीकडे नरेंद्रमंडळाला महत्त्व नाहीं.

मॉंटेग्यु-सुधारणा अंमलांत आल्यापासून त्यांविरुद्ध लोकमत प्रक्षुब्ध होऊं लागलें. त्याच सुमारास जालियनवाला बागेंत डायर-ओड्वायरनीं अमानुष प्रकार केले आणि खिलाफत प्रकरणहि उद्भवलें. हिंदुमुसलमान एक झाले आणि म. गांधींच्या नेतृत्वाखालीं असहकारितेची चळवळ सुरू झाली. त्याच सुमाराला प्रिन्स ऑफ वेल्स हिंदुस्थानांत यावयाचे होते. त्यांच्या आगमनावर बहिष्कार घातला जाऊं नये म्हणून चेम्सफर्डच्या मागून गव्हर्नर जनरल झालेले लॉर्ड रीडिंग प्रयत्न करूं लागले. पण कॉंग्रेस व सरकार यांच्यांत तडजोड करण्याचे त्यांचे प्रयत्न अयशस्वी झाले.

## कांग्रेस व कौन्सिलें.

असहकारितेचा ठराव नागपूरला पास झाल्यावर कायदे-कौन्सिलांवर बहिष्कार घातला गेला होता. नव्या सुधारणांचा फोलपणा आणि राष्ट्रांतील प्रक्षुब्ध वातावरण यांमुळें सुधारणांचा

प्रयोग हा होऊंच शकला नाहीं आणि ब्रिटिश मुत्सद्यांचे श्रम वाया गेले. पण जे काँग्रेसेतर लोक तेथें अधिकाराच्या जागा अड-वून बसले त्यांनाहि पैशाच्या व अधिकाराच्या अभावामुळें स्वस्थच बसावें लागलें.

१९२२ च्या मार्च महिन्यांत मि. माँटेग्यु यांनीं राजीनामा दिला आणि त्यांच्या जागीं व्हायकौंट पील हे भारतमंत्री झाले. असहकारितेच्या चळवळींत जे दडपशाहीचें सत्र सुरू झालें होतें त्यांत म. गांधींची आहुति पडली. त्यांनीं राजद्रोह हा आपला बहिश्वर प्राण आहे आणि आपल्याला जास्तींतजास्त शिक्षा द्या अशी मागणी केली. त्यांना सहा वर्षांची शिक्षा देण्यांत आली.

काँग्रेसमध्यें असहकारितेच्या सुरवातीपासून दोन पक्ष होते. एक पक्ष कौन्सिलवर बहिष्कार घालूं नये या मताचा होता व दुसरा त्याविरुद्ध मताचा होता. कौन्सिलची पहिली तीन वर्षे संपल्यावर पुनः प्रवेश कीं बहिष्कार यावर रणें माजलीं आणि ज्यांच्या सद-सद्विवेकबुद्धीला कौन्सिलांत जाणें अप्रशस्त वाटत नसेल त्यांनीं कौन्सिलांत जावें असें ठरलें. या दुसऱ्या कौन्सिलांत जाण्याकरितां देशबंधु चित्तरंजन दास यांनीं स्वराज्यपक्ष काढला आणि निवड-णुका लढविल्या. ह्या निवडणुका जरी प्रत्यक्ष काँग्रेसनें लढवल्या नसल्या तरी स्वराज्यपक्षाला काँग्रेसची सर्व शक्ति उपयोगी पडली आणि त्यांनीं बहुतेक सर्व जागा जिंकल्या.

## सरकारचा पराभव.

१९२४ सालीं मजूरपक्ष पार्लमेंटांत अधिकारारूढ झाला. असेंब्लींत पं. मोतीलाल नेहरू, लाला लजपतराय, विठ्ठलभाई

पटेल यांच्यांसारखे पुढारी जाऊन बसले आणि त्यांनीं १९१९ चा कायदा रद्द करावा, हिंदुस्थानला स्वराज्य द्यावें असे ठराव आणले व ते पास करून घेतले. सरकार या ठरावाची दखल घेईना. असेंब्लींत अडवणुकीचें राजकारण सुरू झालें. बजेट फेटाळलें गेलें. फिनॅन्स बिल नापास केलें गेलें.

अशा प्रकारें बाहेरून व आंतून वातावरण पेटलेलें पाहून सरकारनीं एक अधिकाऱ्यांची कमिटी नेमली. या कमिटीचा उद्देश घटनेंत काय काय दुरुस्त्या करणें अपरिहार्य आहे हें पहाण्याचें होतें. यानंतर लागलेंच त्या वेळचे गृहमंत्री सर अलेक्झांडर मुडीमन यांच्या अध्यक्षतेखालीं दुसरी कमिटी नेमण्यांत आली. या कमिटीचा उद्देश गव्हर्मेंट ऑफ इंडिया ॲक्ट कसा चालला आहे हें पहाण्याचा होता. या कमिटींत बहुमत व अल्पमत असे दोन तट पडले. अल्पमतवाल्यांत सर सप्रू, सर शिवस्वामी अय्यर, मि. जिना, डॉ. परांजपे हे होते. बहुमतवाल्यांचें म्हणणें पडलें कीं, कायद्याच्या हेतूशीं विसंगत अशा मोठ्या सुधारणा कायद्यांत करतां येणार नाहींत. सप्रूप्रभृतींचें म्हणणें असें, तुम्ही लहानसहान ठिगळें कितीही लावलींत तरी जोंपर्यंत मूलभूत फरक होत नाहीं, तोंपर्यंत मनाजोगी परिस्थिति निर्माण होणार नाहीं. सर मुडीमन यांनीं सप्टेंबर १९२५ मध्यें असेंब्लींत बिल आणलें कीं बहुमतवाल्यांच्या सूचना मान्य कराव्यात. या ठरावाला पं. मोतीलाल नेहरु यांनीं उपसूचना आणली कीं, पार्लमेंटनें वसाहतीच्या दर्जाच्या राजकीय सुधारणा हिंदुस्थानला ताबडतोब द्याव्या आणि या सुधारणा अंमलांत कशा आणावयाच्या याचा विचार करण्याकरतां ब्रिटिश प्रतिनिधि व राजकीय हिंदुस्थानचे प्रतिनिधि यांची गोलमेज परिषद भरवावी.

ही उपसूचना ७२ विरुद्ध ४५ मतांनीं पास झाली. सरकारचा पूर्ण पराभव झाला.

असेंब्लीमध्यें हा ' राष्ट्रीय मागणीचा ' ठराव येण्यापूर्वी देशांत बऱ्याच गडबडी झाल्या होत्या. विलायतेंत मजूर मंत्रिमंडळ अस्तित्वांत आल्यानंतर रॅम्से मॅक्डोनल्ड, क. वेजवुड वगैरेंना हिंदुस्थानचा प्रश्न सोडवावा असें वाटे. त्यावेळीं लॉर्ड रीडिंग हे विलायतेंत होते. देशबंधू दास हे १६ जून १९२५ रोजीं मरण पावले. पण त्यापूर्वी त्यांनीं फरिदपूरच्या प्रांतिक परिषदेंत अमुक अमुक अटींवर सरकारबरोबर तडजोड करतां यावी म्हणून भाषण केलें. म. गांधींनीं सरकारच्या अंतःकरणांत बदल झाला नाहीं असें म्हटलें. कै. दास यांनीं गांधींच्यावर वाईट आरोप केले. पण दासांच्या मृत्यूनंतर फरिदपूरच्या अटी व ब्रिटिश मुत्सद्यांची इच्छा हवेंतच विरली. खिलाफतीच्या अन्यायामुळें हिंदुमुसलमानांत जें एकीचें वातावरण निर्माण झालें होतें तें खिलाफत निकालांत निघाल्यामुळें कायम टिकलें नाहीं आणि देशांत चहूंकडे हिंदुमुसलमानांत दंगे होऊं लागले. स्वराज्य पक्षांत फाटाफूट होऊन जयकर, केळकर, मुंजे यांनीं स्वराज्यपक्षाचे आणि असेंब्लीचे राजीनामे दिले व प्रतिसहकार पक्ष काढला. म. गांधी विधायक कार्यक्रमावर भर देऊं लागले आणि त्यांनीं खादीच्या प्रचाराकरतां सर्व हिंदुस्थानभर अभूतपूर्व असा दौरा काढला.

## सायमन कमिशन.

राजकीय वातावरणांत अशा प्रकारें आंदोलनें सुरू असतां ८ नोव्हेंबर १९२७ रोजीं लॉर्ड रीडिंगच्या जागीं आलेल्या

लॉर्ड आयर्विननीं एक स्टॅटयूटरी कमिशन नेमल्याची घोषणा केली. सुप्रसिद्ध सायमन कमिशन म्हणतात तें हेंच. या कमिशनमध्यें सर जॉन सायमन, व्हायकौंट बूर्नहॅम, लॉर्ड स्ट्रॅथ-कोना, एडवर्ड कॅडोगन, स्टीफन वाल्श, मेजर ॲटली व कर्नल लेनफॉक्स हे सात सभासद होते. पुढें वाल्शनें राजीनामा दिला व त्याच्या जागीं हार्टेशॉर्नची नेमणूक केली. या कमिशनकडे हिंदु-स्थानांत जबाबदारीचें राज्य कितपत सुरू करावें ह्या प्रश्नाची चौकशी सोंपविली होती.* त्या अटीमध्यें पुढें सायमन-साहेबांनीं संस्थानिकांचें व ब्रिटिश हिंदुस्थानचे संबंध काय असावेत हाहि प्रश्न अंतर्भूत करून घेतला.

डिसेंबर १९२७ मध्यें नरेंद्रांनीं आपले व बादशहांचे संबंध काय असावेत हें ठरवून घेण्याकरतां एका कमिटीची मागणी केली. या मागणीप्रमाणें सर हारकोर्ट बटलर यांच्या अध्यक्षतेखालीं एक कमिटी नेमण्यांत आली. या कमिटीचा रिपोर्ट १९२९ सालीं प्रसिद्ध झाला. या रिपोर्टांत ज्या शिफारसी केल्या त्यांचा थोडक्यांत परामर्श घेतला पाहिजे. पहिली शिफारस अशी होती कीं, कोण-त्याहि संस्थानिकाला ब्रिटिश हिंदुस्थानांत जी नवी राज्यपद्धति स्थापन होणार आहे तींत त्याच्या संमतीशिवाय गोवूं नये. यापुढें व्हाइसरॉय हा संस्थानिकांचा एजंट असावा व त्याच्या मार्फत संस्थानिकांचा राजेसाहेबांशीं संबंध यावा. गव्हर्नर जनरल हा निराळा

*" To report as to whether and to what extent it is desirable to establish the Principle of responsible Government or to extend, modify or restrict the degree of responsible Government then existing therein.

व्हावा. संस्थानें व ब्रिटिश हिंदुस्थान यांचे आर्थिक देण्याघेण्या-संबंधी जें चौकशीमंडळ नियुक्त केलें जाईल त्यावर संस्थानिकांचे प्रतिनिधी घ्यावेत. या चौकशीकमिटीचा अहवाल १९३० सालीं प्रसिद्ध झाला. ‘ फॅक्ट फाइंडिंग ’ कमिटी असें तिचें नांव होतें. बटलर कमिटीच्या सर्व शिफारसी पुढें मान्य केल्या गेल्या. फक्त पॅरामौंटसी म्हणजे काय व तिची व्याप्ति किती याचें स्पष्टीकरण बटलर कमिटीनें केलें नाहीं.

सायमन कमिशनवर कोणीहि हिंदी प्रतिनिधी घेतला नाहीं म्हणून हिंदुस्थानांतील सर्व पक्ष व सर्व जाती एकवटल्या आणि या कमिशनचा धिक्कार करण्यांत आला. हिंदुमुसलमान वगैरे जाती, कॉंग्रेस, लीग, प्रागतिक, प्रतिसहकार वगैरे पक्ष या सर्वांनीं सायमन कमिशनवर बहिष्कार घालण्याचा प्रचार सुरू झाला. या कमिश-नच्या निमित्तानें हिंदुस्थानांत तात्पुरतें कां होईना पण एकीचें वातावरण निर्माण झालें. ॲनी बिझांट आणि वाच्छांसारखे जुने कॉंग्रेसभक्तहि या कमिशनवर टीका करूं लागले. पं. मोतीलाल हे तेव्हां विलायतेंत होते. त्यांनीं हें कमिशन नुसती धूळ टाकण्या-करितां नेमलें आहे असे उद्गार काढले. मिस विल्किन्‌सन म्हणाल्या, अमृतसरप्रकरणानंतर सरकारचा इतका तीव्र निषेध कधींहि झाला नाहीं. रॅम्से मॅक्डोनल्ड, लॅन्सबरी आणि स्नोडन यांनीं बर्कन-हेडची गांठ घेऊन मध्यस्थी करण्याचा प्रयत्न केला. हिंदी लोकांचा या मजूर पक्षावर विश्वास नव्हता. कारण त्याच्याच कारकीर्दींत बंगाल ऑर्डिनन्स निघाला होता व शेंकडों तरुण अटकेंत पडले होते. १९२७ ची कॉंग्रेस मद्रास येथें भरली असतां सायमन कमिशनवर बहिष्कार घालावा असा ठराव पास झाला. लाला लजपतराय

यांनीं असेंब्लींत हें कमिशन आपण अमान्य करीत आहों असा ठराव आणला आणि तोहि पास झाला.

## कमिशनवर बहिष्कार.

अशा प्रकारें १९२८ सालीं सारें वातावरण सरकारविरुद्ध क्षुब्ध झालें होतें. लॉर्ड आयर्विननें या क्षुब्धतेवर थोडें पाणी ओतण्याचा प्रयत्न केला. हिंदी प्रतिनिधींना या कमिशनच्या बरोबर बसण्यास परवानगी देण्यांत आली पण त्यांना दर्जा व अधिकार काय होते ? २ फेब्रुवारी १९२८ रोजीं लॉर्ड आयर्विन असेंहि म्हणाले, हिंदी लोकांचें सहकार्य मिळो वा न मिळो कमिशन आपलें काम करील. या आव्हानामुळें देशांत अधिकच भडका उडाला. ३ फेब्रुवारीस कमिशन मुंबईंत आलें. सर्व देशभर त्या दिवशीं हरताळ पडला.

हा हरताळ शांतपणें पार पडला पण मद्रासला गोळीबार झाला. कलकत्त्यास पोलिस व विद्यार्थ्यांची चकमक उडाली. ज्या ज्या ठिकाणीं कमिशन गेलें तेथें तेथें कडकडीत हरताळ पडत गेले. दडपशाहीला जोरानें सुरुवात झाली. सायमन कमिशन एकदां जाऊन पुनः दुसऱ्यांदा आलें. लाहोर व लखनौला अनिष्ट प्रकार झाले. लालाजीवर एका गोऱ्या शिपायानें लाठीचा प्रहार केल्यामुळें त्यांतच त्यांचा अंत झाला. जवाहरलालवरहि मार खाण्याची पाळी आली. सायमन कमिशनपुढें साक्षीस जाणाऱ्यांची धडगत नव्हती. कोणताहि महत्त्वाचा राजकीय पुढारी त्यांच्यापुढें गेला नाहीं. विठ्ठलभाई पटेल कमिशन असेंब्लींत आलें असतां उठून गेले.

सायमन कमिशनवर बहिष्कार चालू असतां दिल्ली येथें राष्ट्रीय मागणी तयार करण्याकरितां एक सर्वपक्षीय परिषद भरली. या कमिटीची दुसरी बैठक मे १९२८ मध्यें मुंबईस झाली. तिनें एक पोटकमिटी नेमली व या कमिटीचा ( नेहरु ) रिपोर्ट ऑगस्ट १९२८ मध्यें प्रसिद्ध झाला. सर्व पक्षांना संमत अशा मागण्या त्यांत होत्या. काँग्रेसला स्वातंत्र्याचें ध्येय पुढें ठेवण्यास हरकत घेतली नसली तरी कमिटीनें वसाहतींचे धर्तीवर जबाबदारीच्या स्वराज्याचें ध्येय नमूद केलें. फेडरेशनची कल्पना या कमिटीनें मांडली नव्हती. पण नरेंद्रांनीं ज्या भरमसाट गोष्टी बटलर कमिटीद्वारा रिपोर्टांत अंतर्भूत केल्या होत्या,त्याला नेहरु-रिपोर्टांत विरोध केला होता आणि संस्थानिकांना हिंदी बांधवांवर विश्वास ठेवण्यास सांगितलें होतें.

सायमन कमिशनची हिंदुस्थानांत पुरी फजिती झाली. त्या कमिशनमधील सभासदांनाहि बहिष्कार जाणवला आणि खुद्द सायमन साहेबांनीं १६ ऑक्टोबर १९२९ रोजीं मजूरपक्षाचे मुख्य प्रधान मि. मॅकडोनल्ड यांना पत्र लिहून गोलमेज परिषद भरविण्याची सूचना केली. मॅकडोनल्ड साहेबांनीं २५ ऑक्टोबरला सायमन साहेबांना उत्तर घातलें व गोलमेज परिषद भरविण्याचें कबूल केलें. गोलमेज परिषदेशिवाय हिंदी लोकांचें मत अजमावण्याचा दुसरा मार्गच उरला नव्हता. या वेळीं आणखी एक महत्त्वाची गोष्ट झाली. लॉर्ड आयर्विन हे विलायतेहून छोटी रजा संपवून नुक्तेच आले होते. त्यांनीं ३१ ऑक्टोबरला एक घोषणा केली. हिंदुस्थानच्या राजकीय प्रगतीचा शेवट वसाहतीच्या स्वराज्यांत होणार आहे असें त्यांनीं ब्रिटिश मुत्सद्यांच्या संमतीनें आपण जाहीर करीत असल्याचें सांगितलें. पण काँग्रेसचें ह्या घोषणेमुळें समाधान झालें

नाहीं. गोलमेज परिषदेचा हेतू वसाहतीच्या स्वराज्याची घटना करण्याचा आहे कां असें आयर्विन साहेबांना विचारतां त्यांनीं तसें आश्वासन दिलें नाहीं. त्यामुळें काँग्रेसनें ही घोषणा म्हणजे नुसती फसवणूक आहे असें पाहून गोलमेज परिषदेवरहि बहिष्कार घालण्याचा ठराव पास केला. म. गांधी, थोरले नेहरू, मालवीय, विठ्ठलभाई वगैरेंनीं आयर्विनसाहेबांच्या मुलाखती घेतल्या पण त्यांतून कांहींच निष्पन्न होईना.

## स्वातंत्र्याचा ठराव.

त्यामुळें लाहोरला १९२९ च्या डिसेंबरांत पं. जवाहरलालच्या अध्यक्षतेखालीं कांग्रेस भरली असतां स्वातंत्र्याचा ठराव पास झाला. भगतसिंग, राजगुरू, सुखदेव यांनीं लालाजींच्या खुनाचा बदला घेतल्यामुळें देशाचें वातावरण फारच खवळलें होतें. १९२९-३० सालासारखी जागृति हिंदुस्थानच्या इतिहासांत क्वचितच झाली असेल. मजूरमंत्रिमंडळ त्या वेळीं अधिकारावर होतें आणि लॉर्ड आयर्विन-सारखा गव्हर्नर जनरल हिंदुस्थानांत होता. त्यामुळें चळवळीचा वन्हि चोहोंकडून पेटविण्यास संधि सांपडली. म. गांधीहि कायदे-भंगाच्या चळवळीला अत्यंत उत्सुक झाले होते.

१९३०च्या मार्च महिन्यांत मिठाच्या सत्याग्रहाला सुरवात करण्याचें ठरलें. गांधींनीं दांडीला पायानें कूच केलें. त्यामुळें सारा हिंदुस्थान हादरून गेला. शिक्षा, दंड,धरपकडी,लाठीमार,गोळीबार वगैरेंचा धुमधडाका सुरू झाला.

१९३० च्या जून महिन्यांत सायमन कमिशनचा रिपोर्ट प्रसिद्ध झाला. पण तो रिपोर्ट जन्मतःच गारद होणार असें

त्याचें भविष्यच ठरलें होतें व तसें घडलेंहि. सायमन कमिशनच्या शिफारसींचें स्वरूप थोडक्यांत असें होतें–‘ नव्या घटनेमध्यें अशी योजना करून ठेवावी कीं जीमुळें हिंदुस्थानला स्वतःची राजकीय वाढ स्वतःच करतां यावी; हिंदुस्थानची अंतिम घटना फेडरलस्वरूपाची व्हावी; प्रांतिक कायदेमंडळांत मतदारांची संख्या वाढवावी; नॉमिनेशन्स रद्द करावीं; सभासदांची संख्या अधिक करावी व जबाबदार मंत्री नेमावे. गव्हर्नरांना एक दोन ब्रिटिश किंवा दुसरे मंत्री मग ते अधिकारी असोत किंवा नसोत, नेमण्याची सत्ता द्यावी असेंहि सुचविण्यांत आलें. मध्यवर्ती कायदेमंडळांत वरिष्ठ कौंसिल तसेंच रहावें. मात्र त्याच्या निवडणुका अप्रत्यक्ष कराव्या. खालच्या कायदेमंडळाला फेडरल असेंब्ली म्हणावे व त्याच्या निवडणुका प्रांतिक कायदेमंडळानें अप्रत्यक्ष कराव्या.’ वगैरे सूचना या रिपोर्टांत होत्या.

गोलमेज परिषदेला असल्या सूचनांचा विचार करण्याकरतां जाण्याचें कोण कबूल करणार ? उलट हा रिपोर्ट जर परिषदेपुढें मांडला जाणार नसेल तरच आपण परिषदेला येऊं असें कांहीं जबाबदार हिंदी पुढारी म्हणूं लागले. हिंदुस्थान सरकारनें ह्या रिपोर्टाची चर्चा होणार नाहीं असें आश्वासन दिलें !

पहिली गोलमेज परिषद १२ नोव्हेंबर १९३० रोजीं झाली. या परिषदेंत कांग्रेसनें भाग घ्यावा अशी सरकारची इच्छा होती. पण कांग्रेसचे एकूण एक पुढारी तुरुंगांत पडले होते. परिषदेपूर्वी शांतिदूताचें काम करण्याकरतां सप्रू-जयकर पुढें आले. पण ते अयशस्वी झाले. या सर्व घडामोडींचा इतिहास या ठिकाणीं द्यावयाचा नाहीं. फक्त त्यांतील ठळक ठळक गोष्टी सांगावयाच्या आहेत.

२० जून १९३० रोजीं पं. मोतीलाल नेहरूंनीं लंडन डेली हेरल्ड-चे खास बातमीदार मि. जॉर्ज स्लोकम् यांना मुलाखत दिली. या मुलाखतींत नेहरूंनीं सांगितलें कीं, हिंदुस्थान सरकार व ब्रिटिश सरकार यांनीं आम्हांला असें खासगी आश्वासन द्यावें कीं, हिंदुस्थानला पूर्ण जबाबदारीचें राज्य दिलें जाईल. हें आश्वासन मिळाल्यास गोलमेज परिषदेंत कमी अधिक जुळवाजुळव जी काय करावी लागेल ती करूं. असें आश्वासन आल्यास आपण म. गांधी व पं. जवाहरलाल नेहरूंना तें मान्य करावयास लावूं असेंहि मोतीलालनीं सांगितलें. या पत्राच्या आधारावर सप्रू-जयकरांनीं व्हाइसरॉयांना पत्र लिहिलें व तडजोडीच्या कामाला परवानगी मिळविली.

व्हाइसरॉयनीं ही परवानगी देतांना हिंदी लोकांच्या हातीं जबाबदारीचा कारभार जावा म्हणून आपण जास्तींत जास्त सहाय्य करूं असें म्हटलें.

## तडजोडीचे प्रयत्न

स्लोकमनीं मोतीलाल नेहरूंची गांठ घेण्यापूर्वींच म. गांधींची २० मे १९३० रोजीं येरवडा तुरुंगांत गांठ घेतली होती. गांधींनीं त्यांच्या प्रसिद्ध ११ मागण्या मागें टाकून फक्त तीनच मागण्या सांगितल्या. (१) हिंदुस्थानला स्वातंत्र्याचें सार देण्याकरतां घटना तयार करावयाची आहे असें गोलमेजपरिषदेच्या कार्यक्रम-पत्रिकेवर नमूद करावें. (२) मिठाचा कायदा रद्द करणें, दारू-बंदी करणें, आणि परदेशी कापडाला मज्जाव करणें याबद्दल (गांधींना) समाधान वाटेल अशी तरतूद करणें. (३) कायदेभंगाची चळवळ थांबविण्याबरोबर सर्व राजकीय कैद्यांची मुक्तता करणें.

बाकीचे ८ मुद्दे पुढें घेण्यांत येतील असें ठरलें.* सप्रू-जयकरांनीं अलाहाबादेहून पुण्याला व पुण्याहून अलाहाबादला अशा खेपा घातल्या. एकदां तर पितापुत्र नेहरू, गांधी, वल्लभभाई, सरोजिनी, जयरामदास, डॉ. सय्यद महमूद अशा पुढाऱ्यांची येरवड्याच्या तुरुंगांत बैठक झाली. या बैठकींत राजकीय हक्कासंबंधीं जो शेवटचा मसुदा मान्य झाला तेवढाच आपण पाहूं. १५ ऑगष्टला त्यावर वरील पुढाऱ्यांच्या सह्या झाल्या. त्यांत खालील अटी होत्या (१) ब्रिटिश साम्राज्यांतून वाटेल तेव्हां फुटण्याचा हिंदुस्थानला हक्क असावा (२) हिंदुस्थानला जबाबदारीचें पूर्ण राष्ट्रीय सरकार द्यावें. त्यांत लष्कर, पैसा आणि म. गांधींच्या ११ मुद्यांचा समावेश व्हावा (३) हिंदुस्थानच्या कर्जाचा प्रश्न त्रयस्थ पंचाकडे सोपविण्याचा हिंदुस्थानला हक्क असावा.

सप्रू-जयकर हा मसुदा घेऊन गव्हर्नर जनरलकडे गेले. त्यांनीं आपल्या जुन्या घोषणेचाच पुनरुच्चार केला. त्यावर पितापुत्र नेहरू म्हणाले—लॉर्ड आयर्विनचे उद्गार अस्पष्ट आहेत. त्यांचा अर्थ

---

* गांधींचे ११ मुद्दे—(१) पूर्ण दारूबंदी (२) हुंडणावळीचा भाव १६ पेन्स करणें (३) ५० टक्के शेतसारा कमी करणें व त्याचा ताबा कायदेमंडळाकडे देणें (४) मिठावरील कर रद्द करणें (५) सुरुवातीला लष्करी खर्च ५० टक्के कमी करणें (६) येणारें कमी उत्पन्न भरून काढण्याकरतां वरिष्ठ नोकरांच्या पगारांत ५० टक्के किंवा अधिक कपात करणें (७) परदेशी कापडावर संरक्षक जकाती बसविणें (८) समुद्रकिनाऱ्यावरील वहातुकीचा व्यापार हिंदी लोकांना देणें (९) कांहीं अपवाद सोडून राजबंदी मुक्त करणें (१०) गुप्त पोलिसखातें बंद करणें किंवा लोकांच्या ताब्यांत देणें (११) आत्मसंरक्षणाकरितां शस्त्रास्त्रांचे परवाने देणें व त्याचा ताबा लोकप्रतिनिधींच्या हातीं देणें.

लागेल तो होईल अगर कांहींही होणार नाहीं. गांधी, वल्लभभाई वगैरेंनीं व्हाइसरॉयनीं आमची मागणी धुडकावून लावली असें सांगितलें आणि शांततेचा काळ अद्याप आला नाहीं असें म्हणून शांततेची बोलणीं संपवलीं.*

हा मार्ग खुंटला तरी गोलमेज परिषदेचा मार्ग ब्रिटिश सरकारनें सोडला नाहीं. या परिषदेला १६ ब्रिटिश प्रतिनिधी पाठविले होते. संस्थानिक व संस्थानचे अधिकारी मिळून १६ जण होते आणि हिंदुस्थानतर्फे ५७ सदस्य होते. कॉंग्रेसतर्फे कोणीहि नव्हते. या परिषदेचें उद्घाटन जॉर्ज बादशहानें केलें. इंग्लंडचे मुख्य प्रधान रॅम्से मॅक्डोनल्ड हे त्या परिषदेचे अध्यक्ष होते. या परिषदेंत अनेक उपसमित्या नेमण्यांत आल्या. त्यांतील मुख्य कमिटया पुढील होत्या. फेडरल स्ट्रक्चर कमिटी. तिचे अध्यक्ष लॉर्ड सँकी होते. अल्पसंख्यांक कमिटी तिचे अध्यक्ष रॅम्से मॅकडोनल्ड होते. याशिवाय संरक्षणकमिटी, प्रांतिक घटना कमिटी, नोकऱ्या, मतदान, ब्रम्हदेश वगैरेकरितांहि कमिटया नेमण्यांत आल्या.

पहिल्याच बैठकींत संस्थानिकांनीं आपण फेडरेशनमध्यें यावयास तयार आहोंत असें सांगून सर्वांना आश्चर्यचकित केलें. पण त्यानंतर खरा अडचणीचा प्रश्न अल्पसंख्यांकाबद्दल उद्भवला. या परिषदेचें काम चाललें असतां सर्वांना असें खास वाटत होतें कीं, आपण हें सर्व कोणा करतां करीत आहों? कॉंग्रेस ही लोकांच्या

* We are grieved to say ( that he ) contemptuously dismissed our letter as unworthy of consideration and regards discussion on the basis of the proposals contained in this letter as impossible.

भाग्याची धनी, ती म्हणेल तें होईल अशी स्थिति असतां आपण काँग्रेसशिवाय चर्चा करणें म्हणजे वेळ दवडणें आहे. लोकशाही तत्त्वाच्या ब्रिटिश प्रतिनिधींना ही गोष्ट मनांत पटली होती, म्हणून काँग्रेसबरोबर कांहीं तडजोड निघते का हें पहाण्याकरितां १९ जानेवारी १९३१ ला बैठक बरखास्त करण्यांत आली. या बैठकीच्या विसर्जनाचें भाषणांत मॅकडोनल्ड म्हणाले-अधिकारसंक्रमणाच्या काळांत कांहीं संरक्षक अधिकार जरी गव्हर्नर जनरलच्या हातीं ठेवले तरी हिंदुस्थानच्या प्रांताची व मध्यवर्ती सत्तेची सर्व जबाबदारी कायदेमंडळावर सोपविण्यांत येईल. ह्या संरक्षक अधिकाराची अंमलबजावणी हिंदुस्थानच्या राजकीय प्रगतीच्या आड येणार नाहीं अशाबद्दल ब्रिटिश सरकार जागरूक राहील असाहि निर्वाळा त्यांनीं दिला. *

मॅकडोनल्ड साहेबांचें हें भाषण लाघवी होतें. कांग्रेसनें गोलमेज परिषदेंत भाग घ्यावा म्हणून त्यांत प्रलोभन होतें. त्या परिषदेंतील बेजबाबदारपणा काढून टाकण्याकरतां ही साखर पेरली होती व कांग्रेसला आंत खेचण्याचा प्रयत्न केला होता.

फेडरेशनच्या कल्पनेचें मूळ पहिल्या राउंड टेबल परिषदेंत आपणास पहावयास सांपडतें हें खरें आहे. ही फेडरेशनची कल्पना एकाएकी उद्भूत झाली नाहीं. तिला पूर्व इतिहास आहे. हिंदुस्थानांतील कांहीं संस्थानिक हिंदुस्थानसरकारच्या जाचाला कंटाळले

*'With certain safeguards during the period of transition responsibity for the Government of India should be placed upon legislatures central and provincial.
—Ramsay Macdonald.

होते. हिंदुस्थानला जबाबदारीचें स्वराज्य मिळालें तर आपल्यावरील हा जाच कमी होईल अशी त्यांची कल्पना होती. २९ मार्च १९३० रोजीं दिल्ली येथें संस्थानिकांची एक सभा भरली होती. त्या सभेला जिना, पं. मालवीय व युरोपिअन्स हजर होते. पं. मालवीयांनीं संस्थानिकांना फेडरेशनमध्यें येण्याचा आग्रह केला. तुमचे हक्क कायद्यानें मान्य होतील असें मालवीयांनीं सांगितले. संस्थानिक त्या सभेंत मन मोकळें करून रडले. त्यांनीं हिंदुस्थानसरकारविरुद्ध तक्रारी केल्या. यावरून संस्थानिकांना फेडरेशन हवें होतें असें दिसतें. सर्वपक्षीय परिषदेनें सुद्धां संस्थानिकांना सांगितलें होतें कीं, तुम्ही जर फेडरेशनमध्यें याल तर तुमचे हक्क व अधिकार अबाधित राहतील.

हैद्राबादप्रकरणीं लॉर्ड रीडिंगनें जो सणसणीत टोला संस्थानिकांना लगावला होता, त्यामुळेंहि ते घायाळ झाले होते. पण संस्थानिकांनीं फेडरेशनमध्यें येण्याला जी उत्सुकता दाखवली ती स्वतःच्या प्रेरणेनें दाखविण्याइतकें धैर्य त्यांना झालें असेल असें वाटत नाहीं. ब्रिटिश मुत्सद्यांना हें कळून चुकलें होतें कीं, हिंदुस्थानला जबाबदारीचें राज्य देण्यावांचून गत्यंतर नाहीं. या जबाबदारीला जर संस्थानिकांचें लोढणें अडकवलें तर हिंदुस्थानच्या जबाबदारीचा गाडा जागच्याजागीं खुंटून पडेल असा विचार त्यांनीं केला. ब्रिटिश मुत्सद्यांच्या कारवाईनेंच संस्थानिकांना धैर्य आलें व त्यांनीं फेडरेशनला मान्यता दिली यांत शंका नाहीं. ब्रिटिश सरकारला किंवा हिंदुस्थानसरकारला संस्थानिक फेडरेशन कबूल करतील अशी कल्पना नव्हती असें म्हणतात. तसें असेलहि. पण तेथील मुत्सद्यांनीं हें कारस्थान रचलें नाहीं असें मानण्यास जागा नाहीं.

गोलमेज परिषदेच्या शेवटीं मॅकडोनल्डचें झालेलें भाषण हें

कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांना दुसऱ्या गोलमेज परिषदेंत आणावयास उपयोगीं पडेल असें सप्रू जयकर, शास्त्री वगैरेंना वाटणें स्वाभाविक होतें. पण कॉंग्रेसचे सुटून आलेले पुढारी जोरांत चाललेला लढा थांबविण्यास तयार नव्हते. २१ जानेवारी १९३१ ला वर्किंग कमिटीची बैठक राजेंद्रबाबूंच्या अध्यक्षतेखालीं अलाहाबादला भरली. वल्लभभाई राजेंद्रबाबूंच्या हातीं कारभार सोंपवून तिसऱ्यांदा तुरुंगांत गेले होते. पं. मोतीलाल नेहरु यांची प्रकृति चिंताजनक झाल्यामुळें त्यांना बंधमुक्त केलें होतें व त्यामुळें त्यांचा सल्ला घेतां आला. पं. मालवीयहि वर्किंग कमिटीच्या सभेला हजर होते. या कमिटीनें मॅकडोनल्ड साहेबांची घोषणा संदिग्ध व सर्वसामान्य स्वरूपाची असल्यामुळें आपल्या धोरणांत बदल करण्याची जरुरी नाहीं, उलट लढा जोरानें चालवला पाहिजे असा ठराव केला. हा ठराव प्रसिद्ध करावा किंवा नाहीं याबद्दल चर्चा सुरू असतां डॉ. सप्रू व शास्त्री यांची लंडनहून तार आली कीं, मुख्य प्रधानांच्या भाषणावर कांहीं निर्णय जाहीर करूं नका. आम्हाला येऊं द्या व आमचें म्हणणें ऐकल्यावर काय तें ठरवा. तो ठराव प्रसिद्ध झाला नाहीं. पण सरकारला ती बातमी कळली आणि विरुद्ध ठराव प्रसिद्ध होण्यास सवड देण्यापूर्वीच व्हाइसरॉयनीं २५ जानेवारी १९३१ रोजीं एक पत्रक काढून वर्किंग कमिटीला मुख्य प्रधानाच्या वक्तव्याचा विचार करतां यावा म्हणून ती कमिटी कायदेशीर केली आणि म. गांधी, पं.जवाहरलाल वगैरे वर्किंग कमिटीच्या सभासदांना बंधमुक्त केलें.

यानंतर वर्किंग कमिटीनें सारासार विचार केला आणि कायदेभंगाची चळवळ तहकूब केली. पुढें गांधी-आयर्विन यांच्यांत तडजोड

झाली. सरकारतर्फे सलोख्याचें वातावरण निर्माण करण्याचा प्रयत्न झाला. गांधी-आयर्विन तडजोडींत राजकीय प्रश्नाबद्दल ठरलें तें असें:—

पहिल्या राऊंडटेबलमध्यें जी फेडरेशनची कल्पना निघाली ती हिंदुस्थानच्या पुढील घटनेचा आवश्यक भाग ( essential part ) म्हणून मानण्यांत यावी. त्याचप्रमाणें हिंदुस्थानला द्यावयाची जबाबदार राज्यपद्धति, राखीव अधिकार, लष्कर, परराष्ट्रीय संबंध, अल्पसंख्यांक वर्ग वगैरेबद्दल संरक्षकबंधनें हींहि मान्य करावयाचीं होतीं !

## म. गांधी विलायतेस जातात.

या तडजोडीला कराची कांग्रेसमध्यें मान्यता मिळाली. त्यानंतर कांग्रेसचे एकमेव प्रतिनिधी म्हणून म. गांधी विलायतेस गेले. पण महात्माजी विलायतेस गेल्यावर मजूर मंत्रिमंडळ अधिकारभ्रष्ट झालें आणि दोन देशांत सलोखा घडून येईल अशी जी आशा वाटत होती ती संपली. रॅम्से मॅकडोनल्ड हे नव्या राष्ट्रीय सरकारचे जरी मुख्य प्रधान राहिले तरी त्यांचें अस्तित्व कांझर्वेटिव्ह पक्षावर अवलंबून होतें, त्यामुळें गोलमेज परिषदेचा नूर बदलला. हिंदुस्थानांतही तडजोडीमुळें अवमानित झालेली नोकरशाही धिंगाणा घालूं लागली. दडपशाहीचीं सारीं शस्त्रास्त्रें त्यांनीं पाजळून ठेविलीं. मि. वेजवूड बेन यांनीं पार्लमेंटांत अधिकारपालट झाल्यामुळें सारी परिस्थिति कशी बदलली याचें सुंदर वर्णन केलें होतें. ते म्हणतात, ‘ नवें राष्ट्रीय सरकार आल्याबरोबर हिंदुस्थानांतील राज्यकारभाराचा नूर बदलला. सलोख्याची जागा दडपशाहीनें घेतली. वृत्तपत्रनियंत्रणाचे कायदे प्रखर केल्यामुळें मतप्रचार

अशक्य झाला. नव्या घटनेच्या वाटाघाटींत सहकारित्वाची भावना टाकून देण्यांत आली. हिंदुस्थानला ब्रिटिश राजकारणांत स्थानच उरलें नाहीं.*

म. गांधी विलायतेस गेले तेव्हां भिकाऱ्यापासून बादशहापर्यंत सर्वांनीं त्यांचें स्वागत केलें खरें, पण नव्या अधिकारारूढ पक्षाला हिंदुस्थानविषयीं कांहीं करावें असें वाटेनासें झालें. कदाचित् त्यांना हिंदुस्थानांतून सांगण्यांत आलें असावें कीं आम्ही कायदेभंगाची चळवळ मारून टाकतों; आम्हांला संधि द्या. पण कोणत्या का कारणानें कां असेना विलायतेंत गांधींना सलोखा व मित्रत्वाची भावना दिसली नाहीं.

पण गांधींनीं हिवाळ्यांतील नैसर्गिक थंडींत जी बेपर्वाईच्या थंडीची अधिक भर पडली होती तिला न जुमानतां कांग्रेसची बाजू उत्कृष्टपणें मांडली. फेडरल स्ट्रक्चर कमिटींत भाषण करतांना ते म्हणाले, 'आम्ही स्वातंत्र्य जें मागतों तें उर्मटपणामुळें मागत नाहीं. ब्रिटिशांशीं आम्ही संबंध तोडून टाकला हें जगाला सांगण्याकरतां आम्हाला स्वातंत्र्य नको आहे. आम्हाला ब्रिटिशांच्या बरोबर समानतेचा दर्जा व्हावा. आम्हाला पूर्ण स्वराज्य हवें. सैन्य, पर-

* "Though no change has been made in the phraseology of the legislative intent, the temper of the Indian administration was completely altered. Rigid repression took the place of conciliation; press laws were passed which made the free expression of opinion difficult or impossible. In the negotiations for the new constitution the spirit of cooperation was also gradually abandoned. India dropped out of the picture.

राष्ट्रीय संबंध, आर्थिक धोरण, पैसा, वगैरेंवर आम्हाला पूर्ण ताबा हवा. "

गांधींच्या मार्गांत तेथें अल्पसंख्यांकांची धोंड टाकण्यांत आली. अल्पसंख्यांकांचा प्रश्न सुटल्याशिवाय पुढील बोलणीं करतां येत नाहींत असें तेथील मुत्सद्दी म्हणूं लागले आणि हिंदुस्थानांतून सेवानिवृत्त झालेले अधिकारी हा प्रश्न सुटूं नये म्हणून जीवापाड खटपट करूं लागले. तडजोडीच्या प्रयत्नांत गांधींना यश आलें नाहीं आणि त्यांनीं तशी कबूलीही दिली. 'अल्पसंख्याकांचा प्रश्न कसाही सुटला तरी मला चालेल; पण अस्पृश्यांना जर स्वतंत्र मतदारसंघ दिला तर आपण आपले प्राण पणास लावून त्याला विरोध करूं' असें गांधी म्हणाले.*

हा प्रश्न सुटत नाहीं असें पाहून रॅम्से मॅकडोनल्ड म्हणाले, 'आपण सर्वजण सह्या करून मजकडे हा प्रश्न सोंपवा व तो मान्य करण्याची हमी द्या.' राउंड टेबलला गेलेल्या सर्वच सभासदांनीं यावर सह्या केल्या नव्हत्या. म. गांधींनीं तर केलीच नाहीं. त्यामुळें मुख्य प्रधानाच्या निर्णयाला लवादनिवाडा म्हणावयाचा कां इतर योजनेप्रमाणें ती एक योजना म्हणावयाची यावर वाद माजले. पण

" * We do not want untouchables to be classed as a seperate class. Sikhs may remain such in perpetuity so may Muslims and Christians. Will the untouchables remain untouchables in perpetuity ? I would far rather that Hinduism died than that untouchability lived...... Therefore I want to say with all the emphasis that I command that if I was the only person to resist this thing I will resist it with my life. "

शेवटीं तो हिंदुस्थानच्या माथीं मारण्यांत आलाच. गांधींनी येरवडयाच्या तुरुंगांत असतां अस्पृश्यांना स्वतंत्र मतदारसंघ देऊं नये म्हणून आपल्या पूर्वघोषणेप्रमाणें प्राणांतिक उपवास केला व तेवढा भाग बदलून घेतला.

ब्रिटिश मुत्सद्यांकडून असे कांटे पेरले जाऊं लागल्यामुळें ही परिषद जवळजवळ आटोपलीच असें म्हणावयास हरकत नाहीं. मुसलमान म्हणत, आमचा प्रश्न प्रथम सोडवा आणि नंतर पुढच्या वाटाघाटी करा. हा प्रश्न न सुटल्यामुळें वाटाघाटी नीरस झाल्या. शेवटीं सर सॅम्युएल होअर यांनीं परिषदेची आरती करावी म्हणून सूचना केली. १ डिसेंबर १९३१ रोजीं दुसरी गोलमेज परिषद आटोपली. म. गांधी हिंदुस्थानांत परत येतांच त्यांच्याकरतां सारें रान पेटवून ठेवलेंच होतें. नवे व्हाइसरॉय लॉर्ड विलिंगडन यांनीं त्यांना मुलाखतहि दिली नाहीं. गांधीसह सर्व कॉंग्रेसचे पुढारी तुरुंगांत पडले. सर्व कॉंग्रेससंस्था बेकायदेशीर ठरल्या.

१७ ऑगस्ट १९३२ रोजीं रॅम्से मॅक्डोनल्ड यांनीं जातीय निवाडा प्रसिद्ध केला. तो निवाडा ब्रिटिश सरकारचा म्हणून प्रसिद्ध झाला. निरनिराळ्या अल्पसंख्यांक जातींना निरनिराळे मतदारसंघ व राखीव जागा दिल्या गेल्या. मुसलमानांना अपेक्षेपेक्षांहि जास्त जागा मिळाल्यामुळें ते जातीय निवाडयाचे पाठीराखे झाले. या निवाडयाविरुद्ध म. गांधींनीं प्रायोपवेशन केल्याचें वर आलेंच आहे. २४ सप्टेंबरला येरवडा करार झाला व म. गांधींनीं अन्नग्रहण केलें.

## दडपशाही सुरु.

हिंदुस्थानांत दडपशाहीचा भस्मासुर थैमान घालीत

होता. सरकारलाहि त्यावर कांहीं उपाय योजना केली पाहिजे असें वाटलें. सर सॅम्युएल होअर यांनीं ताबडतोब प्रांतिक स्वायत्तता देऊन टाकावी व फेडरेशनचा मागाहून विचार करावा असा डाव मांडला. त्याजबरोबर हिंदुस्थानचा प्रश्न परिषदेमार्फत सोडविण्याची पद्धतहि सोडून द्यावी असें त्यांनीं सुचविलें. या नव्या धोरणामुळें सर तेजबहादुर सप्रू व इतर प्रतिनिधी चिडले. पण १९३२ च्या जूनमध्यें सरकारनीं थोडी पड खाल्ली. हिंदुस्थानचा सारा प्रश्न एकदम सोडविण्याचें त्यांनीं कबूल केलें, पण गोलमेज परिषदेची जरूरी नाहीं असा त्यांनीं हट्ट धरला. सर सप्रू यांनीं त्याविरुद्ध खटपटी केल्या. व्हाइसरॉयची गांठ घेतली. विलायतेलाहि पत्रव्यवहार केले. त्याचा परिणाम झाला असावा असें दिसतें. सरकारला आपल्या हातांतील हा वर्ग तरी जाऊं नये असें वाटत होतें. म्हणून १९३२ च्या सप्टेंबरमध्यें व्हाइसरॉयनीं मध्यवर्ती असेंब्लींत हिंदुस्थानला जबाबदारीचें राज्य देण्याची घोषणा केली आणि पुढील वाटाघाटीकरितां एक लहान प्रातिनिधिक परिषद भरविण्यास संमति दिली. सप्रू म्हणाले, परिषद लहान कां असेना पण प्रतिनिधी व्यापकदृष्टीचे नेमा म्हणजे झालें.

तिसरी गोलमेज परिषद अशा प्रकारें भरविण्यांत आली. या तिसऱ्या परिषदेला कांहीं जुने प्रतिनिधी गाळले व कांहीं नवे घेतले. ही बैठक १७ नोव्हेंबरपासून २४ डिसेंबरपर्यंत चालली. या बैठकीला कॉंग्रेस नव्हती. आणि पार्लमेंटांतील मजूर पक्षहि हिंदुस्थानांतील दडपशाहीच्या निषेधार्थ दूर राहिला. ब्रिटिश प्रतिनिधींत नवे सभासद आले. सर जॉन सायमन, लॉर्ड आयर्विन, मि. डेव्हिडसन व मि. बटलर हे

चौघेजण नवे घेतले गेले. तसेंच हिंदी प्रतिनिधींत सर एन्. एन्. सरकार, श्री. न. चिं. केळकर आणि पं. नानकचंद यांना घेतलें. हे हिंदी गृहस्थ हिंदुसभेमार्फत घेतले होते. शिखांनीं या परिषदे-वर बहिष्कार घातला. त्यांना जातीय निवाडा अमान्य होता. ख्रिश्चन, स्त्रिया, मजूर यांच्या तर्फेही कोणी नव्हतें.

या परिषदेनें लोथियन,डेव्हिडसन व पर्सी यांच्या उपसमित्यांच्या अहवालांचें पारायण केलें व संरक्षक–बंधनें वगैरेंची चर्चा केली. ब्रिटिश मुत्सद्यांना ही परिषद नकोच होती. तेव्हां त्यांनीं ती लवकरच आटोपती घेतली. या परिषदेंतही कांहीं निश्चित ठरलें नाहीं. आपल्याला कदाचित् पुन्हां आपलें म्हणणें मांडतां येणार नाहीं म्हणून सप्रूजयकरांनीं एक खलिता या परिषदेला सादर केला.

## शुभ्र पत्रिका प्रसिद्ध झाली.

तिसऱ्या गोलमेज परिषदेनंतर सरकारनें आपली योजना लिहून काढली आणि ती व्हाइट पेपरच्या रूपानें १९३३ च्या मार्चमध्यें प्रसिद्ध केली. कॉंग्रेस तुरुंगांत असल्यामुळें या योजनेचा खरपूस समाचार कोणी घेतला नाहीं. उलट जयकरांसारखे प्रतिनिधी राष्ट्राच्या प्रतिकूल वातावरणांतही व्हाइटपेपरमध्यें कांहीं ग्राह्य भाग आहे अशी तरफदारी करण्यास धजले आणि लोकांनीं त्यांचें म्हणणें ऐकून घेतलें. शुभ्रपत्रिका ही नव्या कायद्याची आदिमाता आहे. या पत्रिकेंतच हिंदुस्थानचें भवितव्य लिहिलेलें सांपडतें.ज्या कल्पना हवेंत तरंगत होत्या त्यांचें एकीकरण या पत्रिकेंत केलें आणि हिंदुस्थानला एकप्रकारें तुम्ही काय करतां तें पहातो असें आव्हानच दिलें. या पत्रिकेंत असणाऱ्या बहुतेक सूचना तत्त्वरूपानें जॉइंट

सिलेक्ट कमिटीनें व पुढें १९३५ च्या बिलानें ग्रहण केल्या. कांहीं सूचना फेटाळल्याही; पण ही आदलाबदल म्हणण्यासारखी नव्हती.

शुभ्र पत्रिकेनंतर पार्लमेंटच्या दोन्ही गृहांपुढें या सूचना मांडण्याचा व त्यांची छाननी होण्याचा विधि व्हावयाचा होता. १९३३ च्या एप्रिलमध्यें जाइंट सिलेक्ट कमिटी नेमण्यांत आली. या कमिटींत प्रत्येक गृहाचे सोळा सोळा सभासद घेतले. मार्किस ऑफ लिनलिथगो—सध्यांचे ग. जनरल—हे त्या कमिटीचे अध्यक्ष नेमण्यांत आले. या कमिटीकरतां हिंदुस्थान, संस्थानें व हिंदुस्थानापासून तोडून काढावयाचा ब्रह्मदेश या तिन्ही ठिकाणचे प्रतिनिधि बोलावले. संस्थानचे ७, ब्रि. हिंदुस्थानचे २१ व ब्रह्मदेशाचे १२ सभासद बोलावण्यांत आले. हे ४० जण असेसर्स म्हणून ब्रिटिश सभासदांबरोबर बसत, साक्षीदारांना प्रश्न विचारूं शकत, विचारविनिमय करूं शकत; फक्त मतें देऊं शकत नसत. त्यांच्यापुढें अनेक साक्षीदार व बराच साक्षीपुरावा आला.

या कमिटीपुढें हिंदुस्थानचे दोन महत्त्वाचे खलिते होते. एक ब्रिटिश इंडिया डेलिगेशनचा व दुसरा सप्रूंचा. पहिल्या खलित्यावर आगाखान, आंबेडकर, जयकर, गझनवी, शफात अहमदखान, सर अबदुल रहीम, सर हेन्री गिडने, एन्. एम्. जोशी वगैरेंच्या सह्या होत्या. हिंदुस्थानांतील समंजस-मॉडरेट-मताचे आपण प्रतिनिधि आहों व त्यांना संतुष्ट केलें पाहिजे, असा त्यांचा आग्रह होता. शुभ्र पत्रिकेवर त्यांची टीका होती. त्यांनीं या पत्रिकेंत दुरुस्त्या सुचविल्या होत्या. राखीव सत्ता जबाबदारीच्या राज्यपद्धतीची प्रगति खुंटविणारी नसावी, संक्रमणकाल अमर्याद असूं नये, जबाबदारीचें राज्य दृष्टीच्या टप्प्यांत आणावें, वगैरे सूचना त्यांनीं केल्या होत्या.

## सप्रू खलिता.

सप्रूंची त्यावर सही नव्हती. त्यांनीं निराळाच खलिता तयार केला. त्यांचें म्हणणें यापेक्षां-निराळें नसलें तरी तें अधिक व्यापक अधिक स्पष्ट व अधिक परिपूर्ण होतें. त्यांनीं नव्या सुधारणांचे पांच प्राण आहेत असें म्हटलें होतें व ते दिल्यावाचून हिंदुस्थान-मध्यें शांतता नांदणार नाहीं असें सांगितलें.

( १ ) मध्यवर्ती सत्तेंत जबाबदारी. संक्रमणकालांतील संरक्षक बंधनें हिंदुस्थानच्या हिताच्या दृष्टीनें असावीं.

( २ ) प्रांतिक स्वायत्तता. प्रांतिक संरक्षक बंधनें दरम्यानच्या काळापुरतींच असावीं.

( ३ ) लष्कर, परराष्ट्रीय राजकारण, धर्मखातें ह्यांचें राखीव अधिकार गव्हर्नर जनरलच्या ताब्यांत कांहीं काळ असावे. हा काळ दीर्घ नसावा.

( ४ ) राखीव खात्याचा कारभार हिंदी कायदेमंडळाच्या ताब्यांत ठराविक काळांत देण्यांत येईल अशाबद्दल नक्की योजना करावी.

( ५ ) ब्रिटिश कॉमनवेल्थमध्यें हिंदुस्थानचा दर्जा काय हें कायद्यानें ठरवून टाकावें.

याप्रमाणें सप्रूंनीं पांच महत्त्वाचीं तत्त्वें सांगितलीं.

## जॉ. सि. क. चा रिपोर्ट.

जॉइंट सिलेक्ट कमिटी ११ एप्रिल १९३३ ला नेमली गेली व तिचा रिपोर्ट २२ नोव्हेंबर १९३४ ला बाहेर आला. जॉइंट सिलेक्ट कमिटीनें व्हाइटपेपरपेक्षांही अधिक काटेकोरपणा करून

पारतंत्र्याचे सुटे सुटे दुवे आवळून घट्ट केले. त्यांनीं खालील बाबतींत सुधारणा केल्या.

( १ ) फेडरेशनच्या खालच्या कायदेमंडळांत अप्रत्यक्ष निवडणुका कराव्या असें सांगितलें; ( कलम २०० ).

( २ ) मुंबई मद्रासमध्यें वरिष्ठ गृहें निर्माण केली. शुभ्रपत्रिकेंत बंगाल, बिहार व संयुक्त प्रांतांनाच हीं गृहें दिलीं होतीं.

( ३ ) पोलिसांच्या नियंत्रणाबद्दल गव्हर्नरांना जादा अधिकार दिले.

( ४ ) औद्योगिक बाबतींत ब्रिटिश मालाबद्दल भेदाभेद निदर्शक कायदे करण्याला आज्ञापत्रकांत स्पष्ट मनाई करावी, असें सुचविलें.

( ५ ) गव्हर्नर जनरलला रेल्वे व रिझर्व बँकेच्या बाबतींत अधिक सत्ता दिली.

यांशिवाय इतरही बऱ्याच सुधारणा केल्या. पुढें या रिपोर्टाला अनुसरून बिल आणण्यांत आलें. ५ फेब्रुआरीला त्याचें पहिलें वाचन झालें. ६ तारखेला दुसरें वाचन झालें. मजूरसभासद मि. ॲटली यांनीं हिंदुस्थानला वसाहतीचा दर्जा जाहीर करावा असें म्हटलें पण त्यांची उपसूचना अमान्य झाली. चर्चिल, पेजक्रॉफ्ट, सर रेजिनॉल्ड क्रॅडॉक, नॉक्स व डचेस ऑफ ॲथाल यांनीं देतां तेंच जास्त देतां असें म्हणून बिलाला विरोध केला. ४ जूनला तिसरें वाचन होऊन, लॉर्डांकडे पाठविण्यांत आलें.

## कायदा पास झाला.

६ जूनला लॉर्डांच्या सभेंत हें बिल आलें. त्यावेळीं सर सॅम्युएल

होअर हे बदलून दुसऱ्या जागीं गेले होते, व लॉर्ड झेटलंड भारतमंत्री झाले होते. येथेंहि कांहीं दुरुस्त्या झाल्या. फेडरेशनच्या वरिष्ठ कायदेमंडळांत ६ जागा स्त्रियांना देण्यांत आल्या व त्या कायदेमंडळाच्या निवडणुका अप्रत्यक्ष न करतां प्रत्यक्ष कराव्या असें ठरलें. येथेंहि हिंदुस्थानला वसाहतीचा दर्जा द्यावा असा प्रयत्न झाला. कांहींनीं जातीय तत्त्वावर जागा राखून ठेवू नयेत असें म्हटलें. २४ जुलैला या बिलाची लॉर्डांच्या सभेंतील कसरत संपली. पुढें तें बिल पुन: केलेल्या दुरुस्त्यांना मान्यता मिळविण्याकरितां कॉमन्समध्यें आलें. या सर्व चक्रांतून बिनधोक सोडविलेलें बिल बादशहानें २ ऑगस्टला सहीशिक्क्यानिशीं मंजूर केलें.

पार्लमेंटमध्यें इतकें मोठें बिल तोपर्यंत दुसरें कोणतेंच आलें नव्हतें. या बिलानें पार्लमेंटचे ६१ दिवस घेतले. सर सॅम्युएल होअर यांनीं लाखांनीं मोजावे लागतील, इतके शब्द खर्ची घातले. पैसा तर अगणित खर्ची पडला. या बिलाबरोबरच ब्रह्मदेश स्वतंत्र करण्याचें बिल आल्यामुळें व्याप अधिकच वाढला.

१९३५ च्या कायद्याची पुढें कशी काय वासलात लागली हें आपणांस ठाऊकच आहे. कॉंग्रेसनें हा कायदा कधींच मानला नाहीं. प्रांतिक स्वायत्तता घेतली तीसुद्धां घटनाभंगाकरितां आणि प्रतिकारशक्ति वाढविण्याकरितां घेतली. फेडरेशनचें घोंगडें अद्याप भिजत पडलें आहे. हिंदुस्थान फेडरेशन स्वीकारावयास तयार नाहीं. फेडरेशनला आपण सर्व मार्गानीं विरोध करू असें कॉंग्रेसचें ठराव आहेत. ब्रिटिश सरकारनें जर लोकांच्या इच्छेविरुद्ध फेडरेशन हिंदुस्थानवर लादलें तर तें फेडरेशन येथें नांदणें अशक्य आहे.

हिंदुस्थानला हा जो १९३५चा कायदा लागू करण्यांत आला ( व ज्याचा कांहीं भाग अमलांत यावयाचा आहे ) त्या बाबतींत ब्रिटिश सरकारचें धोरण काय होतें तें आपण पाहूं.

हिंदुस्थानला जबाबदार राज्यपद्धति द्यावी असें रॅम्से मॅकडोनल्ड यांनीं म्हटलें असलें तरी तें नुसतें शुभाशीर्वचन होतें. जॉइंट सिलेक्ट कमिटी म्हणते ' जबाबदारी म्हणजे कांहीं अशी वस्तु नाहीं कीं जी वाटेल तेव्हां काढतां येतें व वाटेल तेव्हां घालतां येते. जबाबदारीची जाणीव हा एक स्वभावगुण आहे व तो अनुभवानेंच जन्म पावतो. लोकांना राजकिदृष्ट्या जबाबदार करूनच तो संपादक करतां येतो.*

ज्या हिंदुस्थानांत अनेक जाती,धर्म अनेक आहेत तेथें ही जबाबदारीची जाणीव लवकर येणार नाहीं असें त्यांना वाटतें. पार्लमेंटरी राज्यपद्धत ही चार गोष्टींवर अवलंबून आहे असें जॉइंट सिलेक्ट कमिटीनें म्हटलें आहे. ( १ ) ज्याचें बहुमत त्याची सत्ता हें पहिलें तत्त्व असावें. ( २ ) अल्पसंख्यांकानीं बहुमतवाल्यांची सत्ता मान्य करण्याची तयारी दाखवली पाहिजे. (३)देशांत कार्यक्रमावर अधिष्ठित झालेले पक्ष असले पाहिजेत. ( ४ ) देशांत ज्यांची राजकीय मतें अनुभवानें बदलूं शकतील असे लोक असावे लागतात.हिंदुस्थानांत तशी परिस्थिति नसल्यामुळें येथें जबाबदारीची राज्यपद्धति क्रमाक्रमानेंच रूढ झाली पाहिजे असें त्यांचें म्हणणें होतें. पण ब्रिटिश धर्मपुस्तकाप्रमाणें जर अनुकुल परिस्थिति नसेल तर काय

---

* A sense of responsibity is an attribute of character born of experience. It can only be acquired by making men responsible politically. ( Para. 17 )

लोकांनीं स्वराज्याकरतां थांबून रहावें? सनातन सिद्धांतांना चिकटून राहण्याचा मूर्खपणा कोणतेंहि प्रगतिपर राष्ट्र करीत नाहीं. तेव्हां ब्रिटिश सरकारची इच्छा हिंदुस्थानला जबाबदारीचें स्वराज्य देण्याला जितका विलंब लावतां येईल तितका लावावयाची आहे. त्याकरतां त्यांनीं अनेक विघ्नें निर्माण केलीं आहेत.

हिंदुस्थानला जें जबाबदारीचें स्वराज्य देऊं केलें आहे, त्यांत जबाबदारीला फक्त जागा नाहीं आणि तें स्वराज्य तर नाहींच नाहीं. या ठिकाणीं ब्रिटिश साम्राज्यांतील सर्व देशांच्या राज्य-पद्धतींची विस्तृत चर्चा करणें शक्य नाहीं. पण वसाहतींचें स्वराज्य कशाला म्हणतात व वेस्टमिनिस्टरच्या कायद्यानें त्यांत काय बदल झाला हें पहाणें अवश्य आहे. त्याच्याशीं तुलना करतां हिंदुस्थानचें फेडरेशन किती मोलाचें आहे हें आपणांस ठरवितां येईल.

## ब्रिटिश साम्राज्यांतील राज्यपद्धति.

ब्रिटिश साम्राज्यांत जे लहानमोठे देश आहेत तेथें कोणत्या प्रकारची राज्यपद्धति चालू आहे याची आपण ओझरती ओळख करून घेऊं.

**दक्षिण ऱ्होडेशिया:**—अंतर्गत कारभारांत पूर्ण जबाबदारी. नेटिव्ह लोकांच्या हिताकरितां कांहीं राखीव सत्ता. परदेशीय राजकारण साम्राज्यसरकारच्या हातीं.

**माल्टा:**—अंतर्गत कारभारांत पूर्ण जबाबदारी. पण बाहेरील प्रश्नाबाबत साम्राज्यसरकारचा ताबा.

**सिलोन:**—अंतर्गत कारभारांत मर्यादित जबाबदारी. बाहेरील प्रश्नावर साम्राज्यसरकारचा ताबा. गव्हर्नरची अंतर्गत कारभारावरहि पूर्णसत्ता.

**बहामा, बर्म्यूडा व बॅरबाडोज्**—असेंब्ली लोकनियुक्त व कौन्सील सरकारनियुक्त. सेक्रेटरी ऑफ् स्टेट आपल्या अधिकाऱ्या-मार्फत कारभार चालवितो.

मॉरिशस, स्ट्रेट सेटलमेंट, फिजी, जमेका, लीवर्ड बेटें, ग्रेनेडा, सेंट लुसिया, सेंट विन्सेंट, ट्रिनिडाड, केनिया, नायगारा, गोल्ड कोस्ट या ठिकाणीं बादशहा कायदे करतात. तेथें कायदेमंडळें आहेत. पण बहुमत सरकानियुक्तांचें.

ब्रिटिश गिआना व सायप्रस येथें कायदेमंडळें आहेत पण येथें बादशहा कायदे करूं शकतात.

ब्रिटिश हंडूरास,फॉकलंड बेटें, गंबिआ, हाँगकाँग, सिचिलीस येथें कायदेमंडळांत सरकारी बहुमत. बादशहा कायदे करूं शकतात.

जिब्रॉल्टर, सेंट हेलिना, बासुटो लँड, अशांटी, गिल्बर्ट, व एलिस बेटें येथें कायदेमंडळेंच नाहींत. बादशहाच त्यांच्याकरतां कायदे करतात.

प्रोटेक्टरेटस्मध्यें सेक्रेटरी ऑफ् स्टेटमार्फत कारभार चालतो. संरक्षित देशांचे दोन प्रकार आहेत. कांहींना अंतर्गत कारभार स्वतंत्रपणें चालविता येतो. बोर्निओ व सारावाक हे या कक्षेंत येतात. पण मलाया, झांझीबार, ब्रुनी येथें अंतर्गत व्यवस्थाही ब्रिटिश सरकारच्या ताब्यांत आहे.

**मँडेटेड टेरिटरिज्**—राष्ट्रसंघाच्या देखरेखीखालीं तेथें राज्य-कारभार चालतो. पॅलेस्टाईन, टँगानिका, कॅमेरून्स, टोगोलँड वगैरे ठिकाणीं सरकारनियुक्त कायदेमंडळें आहेत. पण तीं नांवाचीं आहेत.

हे सर्व देश कमीअधिक प्रमाणांत पारतंत्र्यांत आहेत पण तशी स्थिति वसाहतींची नाहीं. कानडा, ऑस्ट्रेलिया, न्यूझीलंड, द.

आफ्रिका व आयर्लंड या देशांना जवळ जवळ स्वातंत्र्य आहे. या वसाहतींत गव्हर्नर जनरलला काय अधिकार आहेत, कायदेमंडळाला काय अधिकार आहेत वगैरे आपण पाहूं.

## वसाहतींचे गव्हर्नर जनरल.

कानडांत गव्हर्नर जनरल व ले. गव्हर्नर्स राजाचे प्रतिनिधि म्हणून फेडरेशन व प्रांतांत अनुक्रमें असतात. न्यूझीलंडमध्यें गव्हर्नर जनरल असतो. ऑस्ट्रेलियांत गव्हनर जनरल व गव्हर्नर्स हे मध्यवर्ती सत्ता व प्रांतांत असतात. द. आफ्रिकेंत मध्यवर्ती सत्तेंत गव्हर्नर जनरल व प्रांतांत अॅडमिनिस्ट्रेटर्स असतात. गव्हर्नर जनरलची नेमणूक बादशहा करतो पण ती कॅबिनेटच्या सल्लयानें न करतां वसाहतीच्या मंत्रिमंडळाच्या सल्लयानें करतो. ले. गव्हर्नर्स व अॅडमिनिस्ट्रेटर्सची नेमणूक स्थानिक मंत्र्यांच्या सल्ल्यानें गव्हर्नर जनरल करतो. स्टेटचे गव्हर्नर्स जे असतात ते मात्र बादशहा आपल्या मंत्र्यांच्या सल्लयानें नेमतो.

गव्हर्नरला कायद्यानें मिळालेलें असोत किंवा वहिवाटीनें प्राप्त झालेले असोत पूर्ण अधिकार असतात. त्याला युद्ध पुकारतां येत नाहीं किंवा तह करतां येत नाहीं. नाणीं पाडतां येत नाहींत किंवा राज्यविस्तार करतां येत नाहीं. हा गव्हर्नर वसाहतीच्या सरकारच्या सल्लयानें नेमला जात असल्यामुळें तो वाटेल तसा धुमाकूळ घालूं शकत नाहीं. त्याचे मंत्री तर त्याला रबरी शिक्का म्हणतात. प्रत्यक्ष व्यवहारांत त्याचा संबंधहि येत नाहीं. कित्येक गोष्टी तर त्याला कळवीतहि नाहींत. त्यांनीं जर मंत्र्यांची मर्जी संपादन केली व त्यांच्या विश्वासास पात्र झाला तर त्याला कांहीं कळतें.*

* A. B. Keith–The governments of the British Empire. Page 390.

ग. जनरलची तीच अवस्था आहे. १९३०च्या साम्राज्यपरिषदेंत जी चर्चा झाली तींत गव्हर्नर जनरल हा मंत्रिमंडळानें नेमलेला गृहस्थ असावा असें ठरलें. त्यामुळें वसाहतींतील गव्हर्नर जनरल्स हे अधिकार पुष्कळ असलेले पण सत्ता नसलेले ठोकळे ठरले. पण जे गव्हर्नर्स बादशहा आंपल्या मंत्रिमंडळाच्या सल्ल्यानें नेमतो त्यांना सत्ता असते. असे गव्हर्नर्स ऑस्ट्रेलिया न्यूफौंडलंड व न्यूझीलंडच्या स्टेट्समध्यें आहेत. हे गव्हर्नर्स ब्रिटिश पार्लमेंटशीं पत्रव्यवहार करून त्यांना सर्व बातम्या कळवीत असतात. तथापि खरें सांगावयाचें म्हणजे वसाहतींतील सारेच गव्हर्नर्स व गव्हर्नर जनरल्स हे अडगळ झाले आहेत. त्यांची जागा बादशहासारखी आहे असें म्हटलें जातें. याचाच अर्थ मंत्रिमंडळ करील त्याला त्यांना संमति द्यावी लागते.

## वसाहतींतील सिव्हिल सर्व्हिस.

वसाहतींत नोकरीवाल्यांचा पगडा नाहीं आणि ग्रेट ब्रिटन किंवा हिंदुस्थानसारख्या नोकरांची गर्दीही नाहीं. मोठी महत्त्वाचीं कामें मंत्री स्वतः करतात. टेक्निकल नोकऱ्यावर फक्त सिव्हिल सव्हंट्स नेमतात. नोकरांना पगार फार थोडे असतात व उच्च शिक्षणाची अपेक्षाही नसते. कांहीं वसाहतींत सरकारच्या नियंत्रणापासून ह्या नोकऱ्या सोडवावयाचे प्रयत्न चालू आहेत. पब्लिक सर्व्हिस कमिशनकडे नोकर नेमणें, पगार ठरविणें वगैरे सोंपविण्यांत येत आहे. त्यांत वशिलेबाजी कमी करणें हाच मुख्य उद्देश आहे.

**मंत्रिमंडळें—**

मंत्रिमंडळाच्या सभेला गव्हर्नर कधींच अध्यक्ष नसतो. जेथें एक्झिक्युटिव्ह कौन्सिल्स आहेत तेथें गव्हर्नर्स हजर रहातात.

मुख्य मंत्र्यावर मंत्रिमंडळाचें भवितव्य व ऐक्य अवलंबून असतें; मुख्य मंत्री आपले सहकारी नेमतो. पण त्यानें राजीनामा दिला म्हणजे सर्वांनीं राजीनामा दिला असें होत नाहीं. मुख्य मंत्री बदलला तरी उपमंत्री कायम असतात.* वसाहतींत इंग्लंडसारखे जागरुक पक्ष नाहींत व त्यांच्याजवळ पक्षातर्फे निवडणुका लढविण्याला पैसेहि नाहींत. फक्त ऑस्ट्रेलियाचा मजूर पक्ष अत्यंत प्रबळ आहे. त्याच्या जवळ पैसेहि आहेत व त्यांची संघटनाहि चांगली आहे. वसाहतींत पक्षांच्या अस्तित्वाचा अभाव जबाबदार राज्यपद्धति देण्याच्या आड आला नाहीं हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. जॉइंट सिलेक्ट कमिटीनें आमच्या जबाबदारीला तें वैगुण्य दाखविलें होतें.

वसाहती व स्टेट्समधील कायदेमंडळें हीं नांवाचीं दोन दोन आहेत. कांहीं ठिकाणचीं वरिष्ठ कायदेमंडळें अजिबात बंद केलीं आहेत व कांहीं ठिकाणची कामच करीत नाहींत.

**मताधिकार.**

कानडामध्यें वयांत आलेल्या प्रत्येक स्त्रीपुरुषाला मताचा अधिकार आहे. जे कानडामध्यें स्थायिक झाले आहेत, त्यांनाहि हा अधिकार आहे. पण अन्य देशांतील स्त्रियांनीं जर तेथील पुरुषांशीं लग्नें केलीं असतील तर बायकांना मताधिकार नाहीं. हिंदी, चिनी, जपानी वगैरेंना कांहीं कांहीं भागांत मताधिकार नाहींत. एक दोन प्रांतांत संपत्तीची अटहि ठेवण्यांत आली आहे. कायदेमंडळाची मुदत पांच वर्षांची असते. प्रमाणशीर मतदानपद्धतीचा ठराव आला असतां तो कानडाच्या कायदेमंडळानें फेटाळून लावला.

न्यू फौंडलंडमध्यें वयांत आलेल्या स्त्रीपुरुषांना मताधिकार आहेत.

---

*A. B. Keith 398.

फक्त बायकांचें वय २५ असावें लागतें. कायदेमंडळाची मुदत ४ वर्षांची आहे.

ऑस्ट्रेलियाच्या कॉमनवेल्थमध्यें व स्टेट्समध्यें वयांत आलेल्यांना मताधिकार आहे. मूळच्या आफ्रिकन, एशियन, वगैरेंना मताधिकार नाहीं! कांहीं भागांत प्रेफरेन्शिअल व्होटची पद्धत आहे. खालच्या कायदेमंडळाची मुदत ३ वर्षांची आहे.

न्यूझिलंडमध्यें प्रौढमतदान पद्धति आहे. कायदेमंडळाची मुदत ४ वर्षांची आहे.

दक्षिण आफ्रिकेंत केप, नाताळ, ट्रान्सवाल व ऑरेंज फ्रीस्टेटमध्यें गोऱ्या लोकांकरतां प्रौढमतदान पद्धत आहे. केपमध्यें इतरांना शिक्षण किंवा संपत्तीची अट ठेवली आहे. नाताळमध्यें हिंदी व आफ्रिकन लोकांना मताधिकार नाहींच. तीच स्थिति ट्रॉन्सवाल व ऑरेंजची आहे. पार्लमेंटची मुदत ५ वर्षे व प्रांताची ३ वर्षे आहे. सभासदांना पगार देण्याची योजना सर्वत्र केली आहे. जास्तींत जास्त पगार आस्ट्रेलियांत आहे व तो सालीना ८२५ पौंड आहे. म्हणजे महिना ९०० रु. आहे.

## वरिष्ठ कायदेमंडळें.

कानडामध्यें ३० वर्षे वयाच्या गृहस्थाला सीनेटचें सभासद होतां येते. त्याची ४००० डॉलर्सची जमीन असावी लागते. सभागृहांत ९६ सभासद असतात. हे सभासद प्रांतांतून निवडून येतात. न्यूफौंडलंडमध्यें सरकारनियुक्त सभासदांना मर्यादाच नाहीं. एखादा गव्हर्नर १५ सभासद नेमूं शकतो. यापेक्षां जास्त बादशहा नेमतो.

ऑस्ट्रेलियाच्या कॉमनवेल्थमध्यें मताधिकार प्रौढांना आहे. प्रत्येक स्टेटमधून ६ जण निवडून येतात व ६ वर्षे रहातात. तीन

तीन वर्षांनीं कांहीं सभासद निवृत्त होतात. प्रांतांतहि वरिष्ठ कायदे मंडळें आहेत.

न्यूझीलंडमध्यें मताधिकार पैशावर नाहीं. सभासदांची मुदत ७ वर्षें आहे. पण मतदान प्रमाणशीर आहे. आफ्रिकेच्या युनियनमध्यें सभासद ३० वर्षांचा लागतो. तो जन्मानें युरोपियन लागतो. त्याची संपत्ति निर्वेध ५०० पौंड लागते. एकंदर सभासद ४० आहेत. त्यांतील ८नेमलेले ८वरिष्ठ व कनिष्ठ प्रांतिक कायदेमंडळानें निवडलेले व बाकीचे २४प्रत्यक्ष निवडलेले.असतात. त्यांचें सभासदत्व १०वर्षे टिकतें.

## वसाहतींतील फेडरेशन

कानडामध्यें जें फेडरेशन आलें तें ऐक्यसंवर्धनाकरितां आलें. पण स्थानिक लोकांना आपली सत्ता जात चालली याबद्दल खेद झाला. त्यामुळें मूळच्या कल्पनेंत थोडीशी तडजोड करावी लागली. पूर्वीं प्रांत व साम्राज्यसरकार यांचे प्रत्यक्ष संबंध असत, ते फेडरेशननें बंद केलें व प्रांतांना जो साम्राज्यसरकारकडे पत्रव्यवहार करावयाचा असेल तो कानडा सरकारकडे प्रथम करावा व कानडा सरकार आपल्याला पसंत पडेल तेवढयाच गोष्टीं वर कळवील असें ठरलें.

या प्रांतावर जे ले. गव्हर्नर्स नेमले जातात, त्यांचा पगार वसाहत-सरकार देतें व त्यांना वाटेल तेव्हां काढूनहि टाकूं शकतें. वसाहतसरकारचा प्रांतावर प्रत्यक्ष ताबा नसतो; पण ले. गव्हर्नरचा पगार, बडतर्फी व नेमणूक ही वसाहतसरकारच्या हातीं असल्यामुळे अप्रत्यक्षपणें ते प्रांताचा कारभार नियंत्रित करूं शकतात.

प्रांत व वसाहतसरकार यांच्यांत कायदे करण्याची व अंमलबजावणीची जी वाटणी झाली आहे त्यांत शेषाधिकार (residuary

powers) वसाहतसरकारकडे असावे या तत्वावर झाली आहे. युनायटेड स्टेटस् ऑफ अमेरिकेमध्यें शेषाधिकार स्टेट्सना म्हणजे घटकांना आहेत. तेव्हां कानडामध्यें जे अधिकार स्पष्टपणें प्रांतांना दिले नाहींत, ते सर्व वसाहतसरकारकडे गेले आहेत. वसाहत सरकारकडे सैन्य, आरमार, पोस्ट, खानेसुमारी, नौकानयन, नाणीं चलन, बँका, हुंडणावळी, वजनमापें, कॉपीराइटस्, पेटंटस्, लग्न व घटस्फोट, फौजदारी कायदे वगैरे खातीं आहेत. त्यांना कर बसविण्याचीं, कर्जे काढण्याचीं, व्यापारधंद्यांचें नियंत्रण करण्याची सत्ता आहे. व्यापारधंद्यांचें क्षेत्र मात्र न्यायकोर्टानें मर्यादित केलें व राजकीय बाबींचे उद्योगधंदे त्यांच्याकडे ठेवले. उदाहरणार्थ हत्यारांचा व्यापार मध्यवर्ती सत्तेकडे आला. शेती, इमिग्रेशनखातीं प्रांताकडे सोपविलीं आहेत. पण या खात्यांत वरिष्ठ अधिकार वसाहतसरकारचे आहेत. कामगारवर्गाचे पगार, कामाचे तास, सुट्या वगैरेंचे अखेरचें नियंत्रण वसाहत सरकारकडे आहे.

प्रांताकडे मालमत्ता व नागरिक हक्क, प्रांताकरतां व्यापारी कंपन्या काढणें, सार्वजनिक जमिनी, म्युनिसिपालिट्या, तुरुंग, इस्पितळें, प्रांतांतील रेल्वे, न्यायदान वगैरे खातीं सोपविलीं आहेत. त्यांना प्रत्यक्ष कर बसवितां येतो. दुकानें, खानावळी, लिलांव, सलून्स वगैरेंना परवाने देणें व त्या मार्गानें प्रांताच्या खर्चाकरितां पैसे उत्पन्न करणें ह्याचे अधिकार प्रांतांना आहेत. प्रांतांना आपल्या पतीवर कर्ज काढतां येतें. शिक्षण त्यांच्याकडेच आहे. प्रांतांचें उत्पन्न बेताचें असल्यामुळें वसाहतसरकार त्यांना पैसा देते. प्रांतांना आपली घटना दुरुस्त करण्याची पूर्ण सत्ता आहे. फक्त ले. गव्हर्नरबद्दल त्यांना कांहीं करतां येत नाहीं.

## कॉमनवेल्थ ऑफ ऑस्ट्रेलिया—

ऑस्ट्रेलियांतील कॉलनीज्‌ना स्टेट्‌सचा दर्जा दिला गेला. या स्टेट्‌सना पुष्कळ सत्ता आहे. तेथील गव्हर्नर्स हे साम्राज्यसरकार नेमते. ते गव्हर्नर जनरलच्या ताब्यांत नाहींत. ह्या स्टेट्‌सचा व साम्राज्य सरकारचा प्रत्यक्ष संबंध तुटलेला नाहीं. फेडरेशन येण्यापूर्वी या स्टेट्‌सना जी सत्ता होती ती बिलकूल बदलण्यांत आली नाहीं. पण कॉमनवेल्थला कांहीं कांहीं बाबतींत वरिष्ट अधिकार आहेत.

कॉमनवेल्थ व प्रांत यांना बऱ्याचशा बाबतींत समाइक अधिकार आहेत. दोघांचें एकमत न झाल्यास वरिष्ठ सत्ता कॉमनवेल्थची चालते. गव्हर्नर जनरल व गव्हर्नर यांच्या अधिकारांत हाच वरिष्ठ कनिष्ठपणा असतो.

कॉमनवेल्थकडे खालील अधिकार आहेत. पोस्ट, खानेसुमारी, दीपगृहें, मासळी, हवाखातें, चलन, स्टेटच्या कक्षेंत न येणाऱ्या बँका, हुंडया, वजनमापें, पेटंट्‌स, कॉपीराइट्‌स, नादारी, विमा, परराष्ट्रीय व्यापारमंडळें, लग्नें व घटस्फोट, पेन्शन्स, इमिग्रेशन व एमिग्रेशन, गुन्हेगार, रेल्वेची व जहाजांची युद्धाकरतां हालचाल, स्टेट्‌सच्या सल्ल्यानें स्टेटमध्यें रेल्वे बांधणें, विशिष्ट वर्णाकरितां कायदे करणें, परराष्ट्रीय राजकारण, जकाती व कर बसविणें, वगैरे खातीं आहेत.

स्टेट्‌सकडे बाकीचीं खातीं आहेत. पण कानडापेक्षां ऑस्ट्रेलियांतील स्टेट्‌स जास्त सत्ताधारी आहेत.

कॉमनवेल्थच्या ताब्यांत कांहीं कांहीं देश आहेत. नॉर्दर्न टेरिटरी, फेडरल कॅपिटल टेरिटरि, नॉर्फोक बेटें, पापुआ वगैरे विभाग कॉमनवेल्थच्या ताब्यांत आहेत.

**दक्षिण आफ्रिकेची युनियन**—प्रांतिक कार्यकारी मंडळाचा मुख्य म्हणून एक ॲडमिनिस्ट्रेटर, गव्हर्नरजनरल मंत्रिमंडळाच्या सल्ल्यानें प्रांतावर नेमतो. या ॲडमिनिस्ट्रेटरला चौघांची कमिटी दिलेली आहे. या कमिटीच्या सल्ल्यानें त्याला वागावें लागतें व कार्यकारीमंडळाला सल्ला द्यावा लागतो. कार्यकारी मंडळाला प्रांतांतील कारभारासंबंधीं पूर्ण सत्ता आहे. ॲडमिनिस्ट्रेटरला पैशाच्या बाबतींत नियंत्रण दिलें आहे. त्याच्या शिफारसीशिवाय कौन्सिलला पैसा मिळत नाहीं. प्रांतिक कौन्सिलकडे खालील गोष्टी सोंपविल्या आहेत. त्यांना प्रांताच्या पतीवर कर्ज काढतां येते. त्याला युनियन सरकारची परवानगी लागते. उच्च शिक्षणाव्यतिरिक्त सर्व शिक्षण, पार्लमेंटनें ठरविलेल्या मर्यादेंत शेतकी, इस्पितळें व धार्मिक संस्था, म्युनिसिपालिटया, रेल्वे व बंदराव्यतिरिक्त स्थानिक बांधकामें, रस्ते, पूल, मांसळी, प्रांताच्या कायद्याची अंमलबजावणी, दंड, शिक्षा, आणि मध्यवर्ती सत्ता ठरवील त्या गोष्टी प्रांताकडे आहेत. प्रांतांच्या उत्पन्नाच्या बाबी, म्हणजे करमणुकीवरील कर, रेसीसकर, शाळा व इस्पितळांची फी, मोटार कर, खाजगी संपत्तीवरील व कंपन्यावरील कर वगैरे आहेत. यांशिवाय प्रांतांना युनियनच्या फंडांतून रकमा मिळतात.

अशा प्रकारें तेथें प्रांत व मध्यवर्ती सत्ता यांचे संबंध आहेत. ब्रिटिश साम्राज्यांतील फेडरेशन्स हीं अशा प्रकारचीं आहेत. त्यांना संपूर्ण स्वातंत्र्य असल्यामुळें फेडरेशन त्यांना हितप्रद झालें आहे.

**संरक्षण**—

कानडानें अमेरिकेशीं युद्ध करतां कामा नये या समजुतीवर

कानडाच्या संरक्षणाचा प्रश्न सोडविण्यांत आला आहे.तसेंच त्यांना राष्ट्रसंघानें एखाद्या राष्ट्राविरुद्ध युरोपमध्यें सैन्य पाठविण्याची सक्ति करूं नये असेंहि ठरलें आहे.१९२२च्या कायद्याप्रमाणें कानडाच्या संरक्षणाचा प्रश्न सर्वस्वी कानडावर सोंपविला आहे. या खात्यावर एक मंत्री व एक उपमंत्री असतो. या संरक्षणखात्यांत कांहीं लष्करी, आरमारी,वैमानिक सल्लागार आहेत व त्यांचें एक कौन्सिल बनविण्यांत आलें आहे.

कानडाचा राज्यकारभारच असा आहे कीं,त्यांना खडें सैन्य लागत नाहीं. ते राष्ट्राच्या रक्षणाकरितां थोडेफार लष्करी शिक्षण घेतलेल्या देशांतील सैनिकांवर अवलंबून असतात. लहानसें खडें सैन्य त्यांच्याजवळ आहे;पण जास्त भर एकदां शिकून गेलेल्या सैनिकांवर असतो. असें लष्करी शिक्षण घेतलेले १। लाख शिपाई व ९००० अधिकारी तेथें १९३४ सालीं होते. ह्या अधिकाऱ्यांना मधूनमधून इंग्लंडमध्यें शिक्षणाकरतां पाठवितात. इंग्लंडच्या धर्तीवर त्यांची लष्कर रचना केलेली आहे. तेथील वैमानिक दल हिवाळ्यांत लष्करी शिक्षण घेतें आणि उन्हाळ्यांत नकाशे तयार करणें, पिकांवरील रोगांचा अभ्यास करणें वगैरे कामें करतें. त्यांच्या वैमानिक दलांत १०३ अधिकारी व ५९१ वैमानिक आहेत.

कानडाच्या आरमाराचा उद्देश साम्राज्याचें रक्षण करण्याचा किंवा आस्ट्रेलिया, न्यूझीलंड यांच्यावर हल्ला झाला तर त्यांचें रक्षण करण्याचा नाहीं. त्यांच्या आरमारांत ४ विनाशिका व ३ पाणसुरुंग काढून टाकणारीं जहाजें आणि १०४ अधिकारी व ७९२ खलाशी होते. या आरमाराचा उपयोग ते आपल्या बंदरांत

ज्या धोक्याच्या जागा आहेत, त्या व्यापारी जहाजांना दाखविण्याकरतां करतात.

१८ ते ६० वर्षांच्या पुरुषानीं सैन्यांत दाखल झालें पाहिजे असा कायदा तेथें आहे पण तो अंमलांत कधींच आला नाहीं. कानडाचें सैन्य परदेशीं पाठवावयाचें असेल तर त्याकरितां पार्लमेंटची संमति लागते, अगर प्रसंग पडलाच तर प्रत्येक प्रौढ व्यक्तीचें मत घ्यावें लागतें. एकूण संरक्षणाकरतां खर्च अंदाजीं ४ कोटी रुपये होतो.

**ऑस्ट्रेलिया**—प्रत्येक घटकाला स्वतःच्या संरक्षणाची जबाबदारी घ्यावी लागते. साम्राज्यसरकार व जगांतील इतर राष्ट्रें यांच्यामध्यें जें आरमाराचें प्रमाण ठरलें आहे तें टिकविण्याकरितां आस्ट्रेलियाला मदत करावी लागते. ऑस्ट्रेलियाचें आरमार हें ब्रिटिश साम्राज्याच्या आरमाराचा एक भाग असल्यामुळें त्यांना तें आरमार ब्रिटिश आरमाराइतकें उत्कृष्ट ठेवावें लागतें.

संरक्षणखात्यावर एक मंत्री व एक सेक्रेटरी असतो. संरक्षणखात्याचें एक कौन्सिल आहे. मुख्य प्रधान हा त्याचा अध्यक्ष आहे. याशिवाय एक संरक्षणकमिटी आहे. तिच्यावर लष्करी, नाविक, आरमारी वगैरे अधिकारी असतात. १८ ते ४० वर्षांच्या तरुणांना तीन वर्षे सक्तीचें लष्करी शिक्षण घ्यावें लागतें. पण इतकी सक्ती केली जात नाहीं. वर्षांतून १६ दिवस शिक्षण घेतलें म्हणजे पुरतें. कायमचा स्टाफ जो असतो तो या स्वयंसेवकांना शिक्षण देण्याचें काम करतो. वैमानिक दलहि लहान आहे. त्यांत १०२ अधिकारी आहेत. याशिवाय नागरिक वैमानिक दल आहे. त्यांत ४९ अधिकारी व २६१ वैमानिक आहेत.

आरमाराच्या बाबतींत मात्र निराळा प्रकार आहे. युद्धाचे वेळीं तेथील आरमार ब्रिटिश ॲडमिरलच्या ताब्यांत द्यावें लागतें. त्यांच्या आरमारांत दोन क्रूझर्स व कांहीं लहान बोटी आहेत. १९३४ सालीं या आरमारांत ३३४ अधिकारी व २८७९ खलाशी होते. आरमारी शिक्षणाकरितां तेथें शाळा आहे. संरक्षणाप्रीत्यर्थ एकूण ६ ते ७ कोटी रुपये खर्च होतो.

न्यूझीलंडमध्यें संरक्षणाचें नियंत्रण मंत्रिमंडळामार्फत होतें. सैन्य, आरमार व विमानें फारशीं नाहींत. पण त्यांना ब्रिटिश साम्राज्यांच्या संकटाचे वेळीं आपलें आरमार त्यांच्या दिमतीस द्यावें लागतें.

आफ्रिकेच्या युनियनमध्यें संरक्षणाचें नियंत्रण मंत्रीच करतो. तेथील युरोपियनांना युद्धाचे वेळीं परदेशांतहि जावें लागतें. त्यांच्या-जवळ आरमार नाहीं. मात्र वैमानिक दल वाढविण्याचें धोरण आखलें गेलें आहे.

**आयर्लंड:**—आयर्लंडचें सैन्य आयर्लंडच्या रक्षणाकरतां आहे. तें बाहेर जावयाचें नाहीं. लढाईच्या वेळीं मात्र सध्यां जेथें ब्रिटिश आरमार आहे अशा तीन ठिकाणीं तें आरमार आयर्लंडनें राहूं द्यावयाचें आहे व त्याला मदत करावयाची आहे.

आयर्लंड हें स्वतंत्र असल्यामुळें तेथील लष्करी अधिकारी राजाच्या नांवाचा संबंध आपल्या संघटनेंत आणीत नाहींत व सैनिक राजनिष्ठेची शपथहि घेत नाहींत. त्यांच्या संरक्षणमंडळाचा प्रमुख एक मंत्री आहे. ब्रिटिशांशीं या सैन्याचा कांहीं संबंध नसल्या-मुळें संरक्षणखातें हें सर्वस्वी आयर्लंडच्या ताब्यांत आहे.

अशा प्रकारें निरनिराळ्या वसाहतींत कारभार सुरू आहे. त्यांना किती स्वातंत्र्य आहे हें वरील माहितीवरून लक्षांत

येईल. प्रत्येक वसाहतीच्या घटनेची सांगोपांग माहिती देण्याचा उद्देश नसल्यामुळें तेथें काय काय वैशिष्ट्यें आहेत ह्याचेंच दिग्दर्शन येथें केलें आहे. हिंदुस्थानच्या आगामी फेडरेशनचें स्वरूप त्यांच्याशीं तुलना करतां किती पोकळ आहे हें त्यावरून दिसून येते.

वसाहतींचा दर्जा काय असावा ह्याबद्दल बरेच दिवस साशंकता असे. १९२६ सालीं साम्राज्यपरिषद भरली असतां त्या परिषदेंत सर्व वसाहती सारख्या दर्जाच्या, एक दुसरीची अंकित नाहीं, व अंतर्बाह्य कारभारांत त्यांना स्वातंत्र्य आहे असें ठरलें. इंग्लंडच्या राजाला सर्व वसाहतींनीं राजनिष्ठ असलें पाहिजे एवढी समानता त्यांच्यांत आहे. बाकीच्या बाबतींत त्या स्वतंत्र आहेत.

१९२६ सालीं जीं राज्यें समान म्हणून मानण्यांत आलीं तीं (१) युनायटेड किंगडम् (इंग्लंड, स्कॉटलंड व उत्तर आयर्लंड); (२) डोमिनिअन ऑफ कानडा; (३) ऑस्ट्रेलियाची कॉमनवेल्थ; (४) न्यूझीलंड; (५) दक्षिण आफ्रिकेची युनियन; (६) आयरिश फ्रीस्टेट व ७ न्यू फौंडलंड.*

+१९२६ सालीं साम्राज्यपरिषदेंत मान्य केलेल्या तत्त्वाची

*१९३३ च्या कायद्यान्वयें न्यू फौन्डलंड आपलें स्वातंत्र्य समर्पण करून ब्रिटिश साम्राज्याच्या अंकित झालें आहे.

+" The United Kingdom and the Dominions were declared to be autonomous communities within the British Empire, equal in status, in no way subordinate one to another in any aspect of their domestic or external affairs though united by a common allegiance to the crown and freely associated as members of the British commonwealth of Nations. "

—The Government of the B. Empire by A. B. Keith. Page 33.

विस्तृत मांडणी करावी म्हणून एक तज्ज्ञांची कमिटी १९२९ सालीं नेमली. त्या कमिटीनें केलेले ठराव १९३० च्या साम्राज्य-परिषदेंत मान्य झाले व त्याला प्रत्येक डोमिनिअनच्या पार्लमेंटनें मान्यता दिली. या मान्यतेनंतर जो कायदा झाला त्याला वेस्ट-मिनिस्टरचा कायदा असें म्हणतात. तो कायदा १९३१ सालीं झाला. या कायद्याप्रमाणें वसाहती ह्या पूर्णपणें स्वातंत्र्य उपभोगीत आहेत.

हा साम्राज्याचा सांगाडा जो उभा केला आहे तो मोडण्याचे प्रयत्न गेल्या दहा वर्षांत सुरू झाले आहेत. वसाहतींना ब्रिटिश साम्राज्याशीं असलेला नाममात्र संबंधसुद्धां नको आहे.याचीं कारणें काय आहेत हें आपण पाहूं. कानडामध्यें फ्रेंच लोकांचें प्राबल्य आहे, आयर्लंडमध्यें इंग्लिश व स्कॉट्स अगदीं थोडे आहेत, आफ्रिकेंत डच लोक अधिक आहेत. तेव्हां या तीन वसाहतींत इंग्लंडपासून स्वतंत्र होऊन स्वतःचीं रिपब्लिक्स स्थापावीं अशी बलवत्तर इच्छा आहे. वेस्टमिनिस्टरच्या कायद्याप्रमाणें या वसाहती केव्हांहि स्वतंत्र होऊं शकतात. आजहि या तीनहि वसाहतींनीं साम्राज्याच्या धागा-दोऱ्याचा संबंध ठेवला नाहीं. आफ्रिकेच्या संरक्षण मंत्र्यानें ब्रिटिशांना साफ सांगून टाकलें कीं, आम्ही युद्धाचे वेळीं तुम्हांला बिलकूल मदत करणार नाहीं. कानडानें व आयर्लंडनें अगदीं स्पष्ट शब्दांत ब्रिटिश साम्राज्याला तसेंच कळविलें आहे. या तीन वसाहती परराष्ट्रांत आपले स्वतंत्र वकील पाठवूं लागल्या आहेत व राष्ट्र-संघांत त्यांना स्वतंत्र जागा आहेत.

वेस्टमिनिस्टरचा कायदा म्हणजे वसाहतींना स्वातंत्र्याची सन-दच आहे. पण गंमत अशी आहे कीं, ऑस्ट्रेलिया व न्यूझीलंड या

दोन राष्ट्रांना पासिफिक महासागरांत भय वाटत असल्यामुळें त्यांनीं हा वेस्टमिनिस्टरचा कायदा आपल्याला लावूं नका म्हणून विनंति केली ! न्यूझीलंडनें सिंगापूरच्या तळाकरतां पैसे दिले व ऑस्ट्रेलिया साम्राज्याकरतां लढाऊ जहाजेंहि ठेवतें. या वसाहतींना आपल्याला पाहिजे तशी घटना करण्याचा पूर्ण अधिकार आहे. ब्रिटिश साम्राज्याशीं त्यांनीं पाहिजे तर संबंध ठेवावा, पाहिजे तर ठेवूं नये. वेस्टमिनिस्टरच्या कायद्यांत ज्या वसाहतींचा समावेश होतो, त्या वसाहती, वसाहती राहिल्या नसून स्वतंत्र राज्येंच झालीं आहेत. हिंदुस्थानविषयक प्रश्न जेव्हां पार्लमेंटांत निघाला होता व त्याला वसाहतीचा दर्जा द्यावा अशी मजूरपक्षानें उपसूचना आणली होती, तेव्हां चर्चिलसाहेब म्हणाले, तुम्ही वेस्टमिनिस्टरचा कायदा हिंदुस्थानला लावणार काय ? नाहीं असें उत्तर देण्यांत आलें. त्यावरून हिंदुस्थानला वसाहतीचा दर्जा दिला तरी वेस्टमिनिस्टरचा कायदा लावावयाचा नाहीं म्हणजे पूर्ण स्वातंत्र्य द्यावयाचें नाहीं असा ब्रिटिश मुत्सद्यांचा डाव आहे.

वर वर्णन केल्याप्रमाणें वसाहतींची स्थिति व दर्जा आहे. आतां आपण हिंदुस्थानच्या फेडरेशनचें स्वरूप थोडक्यांत पाहूं. त्याची पूर्ण माहिती विस्तारानें पुढील भागांतून दिलीच आहे.

## हिंदी फेडरेशन.

हिंदुस्थानच्या फेडरेशनची रचना ही अत्यंत सदोष आहे; किंबहुना असेंहि म्हणतां येईल कीं, त्यांत सर्व दोषच आहेत. हें फेडरेशनचें सोंग सजवतांना सर्वसंमत अशा मूलभूत तत्त्वांनाहि धुडकावून दिलें आहे. फेडरेशन जें बनविण्यांत येतें तें स्वयं-

शासित घटकांची संघटना व्हावी व त्यांना एक विशिष्ट ध्येय गांठतां यावें याकरतां बनविण्यांत येतें. सार्वभौम सत्ता (Sovereignty) ही फेडरेशनमध्येंच अंतर्भूत करावी लागते, ती पार्लमेंटसारख्या दूरच्या संस्थेला देऊन चालत नसते. फेडरेशनच्या घटकांमध्यें समान राज्यपद्धति लागते तरच तें फेडरेशन कार्यक्षम होऊं शकतें. सुलतानी सत्ता गाजविणारीं संस्थानें व स्वयंशासित कायदेमंडळें यांचें फेडरेशन करूं पहाणें म्हणजे साप व मुंगूस यांची वसाहत करण्यापैकींच आहे. हिंदुस्थानांत आज फेडरेशनला अनुकूल अशी परिस्थितीच नाहीं. फेडरेशनचे जे घटक आहेत त्यांच्यांत कितीतरी विषमता आहे ! प्रांतांना जी स्वायत्तता मिळाली आहे ती पार्लमेंटच्या ठरावानें मिळाली आहे. त्यांत जर कांहीं बदल करावयाचा असेल तर पार्लमेंट करूं शकेल. तेव्हां प्रांताची घटना बदलण्याची सत्ता प्रांतांना नाहीं. याचा अर्थ असा कीं, प्रांतांना आपली प्रगति अगर वाढ करण्यास पूर्ण मुभा नाहीं. दुसरे घटक जीं संस्थानें, त्यांच्याविषयीं न बोललेलेंच बरें. एका संस्थानचा दुसऱ्या संस्थानांशीं मेळ नाहीं. कुठें मध्ययुगीन पद्धत सुरू आहे तर कुठें १९ व्या शतकांतला राज्यकारभार सुरू आहे. हिंदुस्थानांतील लोक एकच असतां ते संस्थानांत जन्मले अगर संस्थानांत राहतात एवढ्याकरतां तेथें रानटी कारभार सुरू असावा ही गोष्ट शरमेची आहे. अशी स्थिति असूनसुद्धां ब्रिटिश सरकारनें त्यांना व आम्हांला एकत्र आणण्याचा व्यूह रचला आहे.

ब्रिटिश सरकारची इच्छा या संस्थानिकांना फेडरेशनच्या कुंपणांत कोंडण्याची कदाचित् नसेलहि. पण ब्रिटिश सरकारनें हिंदुस्थानला जबाबदारीचें राज्य देण्याचें पुकारलें.या राज्याला संस्था-

निकांचें लोढणें बांधल्याशिवाय हिंदुस्थान आपल्या हातांत रहाणार नाहीं असें बघून संस्थानिकांचा व ब्रिटिश हिंदुस्थानचा सहयोग करण्याचें त्यांनीं ठरविलें आहे. अशा प्रकारें मूलतःच फेडरेशनची रचना ही दुष्ट आहे व ती यशस्वी करण्याची कामगिरी कोणताहि भगीरथ करूं शकणार नाहीं.

हिंदुस्थानच्या बऱ्यावाईटाची, प्रगतिपरागतीची, सर्व जबाबदारी पार्लमेंटवर आहे; नामधारी जबाबदार राज्यावर नाहीं. पार्लमेंटचा प्रतिनिधी म्हणून गव्हर्नर जनरल येथें रहाणार आहे. त्याची सत्ता एखाद्या सुलतानी संस्थानिकालाहि लाजवील इतकी प्रचंड आहे. तो जबाबदार (?) कायदेमंडळाचे कोणतेहि ठराव उधळूं शकतो. त्याला स्वतःचे कायदे करण्याची, ऑर्डिनन्सेस काढण्याची, जरूर तर सर्व राज्यकारभार रद्द करण्याची आणि स्वतःचा अंमल सुरू करण्याची सत्ता आहे. कायद्याच्या क्षेत्राप्रमाणें अंमलबजावणीच्या क्षेत्रांतहि तो सर्वसत्ताधीश आहे. त्याची ही सत्ता कोणी हिरावून घेऊं शकत नाहीं. या सत्तेशिवाय त्याला संरक्षण, परराष्ट्रीय राजकारण, संस्थानिकांशीं संबंध, या बाबतींत स्वतःच पूर्ण नियंत्रण करावयाचें आहे. शेकडा ८० टक्के बजेट त्यालाच ठरवावयाचें आहे. आणि बाकीच्या वीस टक्क्यांत ढवळाढवळ करण्याची त्याला सत्ता दिली आहे. याशिवाय त्याच्यावर खास जबाबदाऱ्या टाकल्या आहेत. या जबाबदाऱ्या पार पाडतांना त्याला स्वेच्छेनें वागण्याची सवलत दिली आहे.

गव्हर्नर जनरलला इतकी अमर्याद सत्ता दिल्यानंतर जबाबदार राज्यकारभार काय रहातो तेंच कळत नाहीं. त्यामुळें फेडरल कायदेमंडळांना शाळेंतील वादविवादमंडळापेक्षां जास्त महत्त्व उरत नाहीं.

या कायदेमंडळांत लोकशाहीचें बहुमत होऊं नये म्हणून संस्थानांना राखीव जागा दिल्या आहेत. त्यांच्यावर फेडरेशनमध्यें येतांना हिंदुस्थानच्या तिजोरींत आपल्या वांट्याचे पैसे देण्याची सक्ती केली नाहीं.

याशिवाय रेल्वेचा कारभार स्वतंत्र करून, रिझर्व्ह बँक काढून, व्यापारविषयक भेदाभेदाला प्रतिबंध करून फेडरेशनला प्रेतकळा आणली आहे. या घटनेचा मुख्य उद्देश हिंदुस्थानला जबाबदारी द्यावयाची नसून ब्रिटिशांची साम्राज्यशाही कायम टिकविण्याचा आहे. तेव्हां ध्येयाच्या दृष्टीनें, शास्त्रीय स्वरूपाच्या दृष्टीनें किंवा तपशीलाच्या दृष्टीनें फेडरेशन हें टाकाऊ व प्रतिगामी स्वरूपाचें आहे. वसाहतींमध्यें व हिंदुस्थानमध्यें कोणत्याही प्रकारचें साम्य नाहीं. तेथें पूर्ण स्वातंत्र्य तर येथें पूर्ण पारतंत्र्य, तेथला गव्हर्नर जनरल हा ' रबरी शिक्का ' तर हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल हा सुलतान; तेथें संरक्षणाची जबाबदारी, आर्थिक व्यवहार, परराष्ट्रीय राजकारण हें पूर्णपणें लोकांच्या हातांत, तर येथें तें ग. जनरलच्या हातांत. तेथें वसाहतींचा व पार्लमेंटचा संबंध नाहीं. उलट हिंदुस्थानांत राज्य कोणाचें तर पार्लमेंटचें! हिंदुस्थानला वसाहतीच्या स्वराज्याकडे नेण्याची कल्पना कोणाची असेल ती असो पण कायदा मात्र तसें सांगत नाहीं.

## फेडरेशन कां नको त्याचीं ४० कारणें.

व्यावहारिक दृष्टया फेडरेशन कां नको याची ठळक ठळक व अत्यंत अन्याय्य अशीं कारणें क्रमवार येथें देतों. तत्त्वाचा विरोध हा कायमच आहे.

( १ ) गव्हर्नर-जनरलला निर्णयात्मक दिलेले अधिकार.

( विवेचकबद्धि व वैयक्तिक निर्णय )

( २ ) गव्हर्नर-जनरलची नेमणूक मंत्र्यांच्या सल्ल्यानें करावयास पाहिजे आणि त्याचा पगारहि कायदेमंडळानें मंजूर करावयास पाहिजे. दोन्ही सत्ता हिंदी लोकप्रतिनिधिंना दिल्या नाहींत.

( ३ ) गव्हर्नर-जनरलकडे सोपविलेलीं कामें--१ संरक्षण, २परराष्ट्रीय कारभार ३ धर्म ४ टोळ्यांचा टापू.

( ४ ) त्याच्यावर टाकलेल्या आठ खास जबाबदाऱ्या, ज्यांना संरक्षक बंधनें म्हणतात त्या.

( ५ ) आर्थिक सल्लागार व कायद्याचा सल्लागार नेमण्याची गव्हर्नर-जनरलला दिलेली सत्ता.

( ६ ) फेडरल कायदेमंडळाच्या कनिष्ठ गृहाच्या अप्रत्यक्ष निवडणुकी.

( ७ ) संस्थानिकांना त्यांत दिलेल्या १२५ जागा व वरिष्ठ मंडळांत दिलेल्या १०४ जागा. दोन्ही प्रमाणबाह्य आहेत.

( ८ ) पास झालेलीं बिलें फेटाळण्याची बादशहा व गव्हर्नर-जनरलला दिलेली सत्ता.

( ९ ) गव्हर्नर जनरलच्या हातांत दिलेले ८० टक्के बजेट.

( १० ) कर्ज उभारणें, कर बसवणें वगैरे बाबतींत गव्हर्नर-जनरलची ठेवलेली अडचण.

( ११ ) मंत्र्यावर सोपविलेल्या खात्यांत गव्हर्नर-जनरलला ऑर्डिनन्स काढण्याची परवानगी; स्वतःवर सोपविलेल्या जबाबदारीच्या बाबतींत ऑर्डिनन्स व कायदे करण्याची गव्हर्नर-जनरलला दिलेली सत्ता.

( १२ ) चीफ कमिशनरचे म्हणून ठेवलेले स्वतंत्र प्रांत व त्यावर ठेवलेली ग. जनरलची सत्ता.

( १३ ) फेडरेशनला प्रांतिक कारभारांत कायदे करण्याचे दिलेले अधिकार.

( १४ ) गव्हर्नर-जनरलकडे ठेवलेले शेषाधिकार (Residuary powers)

( १५ ) कांहीं बिलांना गव्हर्नर-जनरलची आगाऊ घ्यावयाची परवानगी.

( १६ ) ब्रिटिश प्रजाजन, ब्रिटिश कंपन्या, ब्रिटिश नौकानयन, ब्रिटिश व्यापारी, ब्रिटिश डॉक्टर्स, एंजिनीअर्स, वकील वगैरेंना दिलेल्या खास सवलती.

( १७ ) फेडरेशनच्या कायद्यांचा संस्थानांत स्वतःच्या अधिकाऱ्यांऐवजीं संस्थानांच्या अधिकाऱ्यामार्फत होणारी अंमलबजावणी.

( १८ ) संस्थानी प्रजेला नसणारे लोकशाही राज्यकारभाराचे हक्क.

( १९ ) संस्थानांत इन्कमटॅक्स व इतर कर घेण्याला केलेली बंदी.

( २० ) संस्थानिकांना फेडरेशनकडून देण्यांत येणारें वर्षासन.

( २१ ) संरक्षणाकरतां संस्थानांना द्यावयास न लागणारा पैसा.

( २२ ) संस्थानी कारभारावर देखरेख करण्याकरतां राजेसाहेबांना फेडरेशनकडून द्यावयास लागणारा पैसा.

( २३ ) रिझर्व बँक व तिच्यावर असणारा गव्हर्नर-जनरलचा ताबा.

( २४ ) ब्रह्मदेश स्वतंत्र केल्यामुळें हिंदुस्थानच्या तिजोरींत पडणारी वार्षिक तूट.

( २५ ) रेल्वेच्या बजेटावर व रेल्वेवर नसणारा मंत्रिमंडळाचा ताबा.

( २६ ) रेल्वेॲथॉरिटी ही प्रतिस्पर्धि सत्ता निर्माण करून रेल्वेचें केलेलें नवें राज्य.

( २७ ) सिव्हिल सर्व्हिसवर नसणारा मंत्र्यांचा ताबा.

( २८ ) त्यांचे पगार, पेन्शन, नेमणुका, वगैरे बाबतींत सेक्रेटरी ऑफ स्टेटला दिलेले अधिकार.

( २९ ) पब्लिक सर्व्हिस कमिशनच्या सभासदांची गव्हर्नर-जनरल व गव्हर्नर यांनीं स्वेच्छेनें करावयाची नेमणूक.

( ३० ) धर्मखात्याचा हिंदुस्थानवरील बसविलेला खर्च.

( ३१ ) सेक्रेटरी ऑफ स्टेटची ठेवलेली अडगळ.

( ३२ ) मूलभूत हक्कांचा अभाव.

( ३३ ) घटनादुरुस्तीच्या हक्काचा अभाव.

( ३४ ) मतदान, नवे प्रांत करणें, वगैरे बाबतींत बादशहांच्या हातीं ठेवलेली सत्ता.

( ३५ ) पोस्ट, रेल्वे, वगैरे नोकऱ्यांत ॲंग्लो-इंडियनांना ठेवलेल्या राखीव जागा.

( ३६ ) कायदेमंडळांतील प्रतिनिधींच्या बाबतींत विभक्त मतदारसंघ ठेवून चिरंजीव केलेली जातवारी.

( ३७ ) सैन्याच्या हिंदीकरणास जवळ जवळ दिलेला नकार.

( ३८ ) संस्थानिकांना मान्यतापत्रकाची दिलेली सवलत.

( ३९ ) फेडरल कोर्टातील न्यायाधिशांवर बादशहाची असलेली सत्ता. त्यामुळें त्यांना प्राप्त झालेला गौण दर्जा.

( ४० ) हिंदुस्थानवरील कर्जाच्या बाबतींत दाखविलेला ताठरपणा.

ह्या ४० वैगुण्यांशिवाय पदोपदीं अनेक बारिकसारिक वैगुण्यें

कायद्यांत दिसतात. पण त्यांची यादी लांबवून ह्या कायद्याचें स्वरूप अधिक भयानक करणें आवश्यक नाहीं. दिलेलीं कारणें फेडरेशन कां नको हें सिद्ध करण्यास पुरेशीं आहेत.

## फेडरेशन कसें हाणून पाडतां येईल ?

अशा प्रकारचा हा कायदा कसा फेटाळून लावतां येईल याबद्दल अनेकांकडून प्रश्न विचारले जातात. कायदा फेटाळण्याचे दोन मार्ग उपलब्ध आहेत. एक प्रत्यक्ष प्रतिकाराचा मार्ग. हा मार्ग राजमार्ग आहे. स्वयंनिर्णयाची मागणी हा या मार्गाचा पाया आहे. प्रत्येक राष्ट्राला आपल्याला घटना कशा-प्रकारची पाहिजे हें सांगण्याचा अधिकार आहे. प्रेसिडेंट विल्सन साहेबांनींच महायुद्धसमाप्तीचे पूर्वी ह्या मंत्राची घोषणा केली होती. पण प्रेसिडेंट विल्सनचीं सारींच तत्त्वें गारद करण्यांत आलीं. आज स्वयंनिर्णयाचें तत्त्व हें फक्त कागदपत्रांत सांपडतें. या तत्त्वाची विस्मृति ब्रिटिश सरकारला झाली असली तरी हिंदुस्थानला झालेली नाहीं. हें स्वयंनिर्णयाचें तत्त्व मान्य व्हावयास पाहिजे व त्या तत्त्वाला अनुसरून घटनापरिषदेच्याद्वारां आम्हांला स्वतंत्र हिंदु-स्थानची घटना करावयाची आहे. ब्रिटिश सरकार जर हें मागणें मान्य करणार नाहीं आणि आमच्यावर फेडरेशनच लादणार असेल तर त्याला प्रतिकार केव्हां व कसा करावयाचा हें काँग्रेस ठरवील. ब्रिटिशसरकारनें नुकतेंच झेकोस्लाव्हियाच्या बाबतींत हिटलरच्या दंडुक्यापुढें नमतें घेऊन स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाला मान्यता दिली हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

सनदशीररीत्या फेडरेशनला विरोध करून तें बंद पाडणें जवळ

जवळ अशक्य आहे. फेडरेशन बंद पाडण्याचे मार्ग दोन. पण ते दोन्ही मार्ग परावलंबी आहेत. ५२ जागा व निम्मी लोकसंख्या वरिष्ठ कौन्सिलांत भरण्याइतके संस्थानांचे सभासद आले नाहींत तर फेडरेशन अस्तित्वांत येणार नाहीं. पण हा मार्ग संस्थानिकांच्या हातांत आहे. ते कितपत स्वतंत्र रहातील याबद्दल शंका वाटते.

दुसरा मार्ग म्हणजे फेडरेशनमध्यें प्रांतांनीं प्रतिनिधी न पाठविणें. पण ही गोष्ट अशक्य आहे. ३७५ पैकीं, १२५ संस्थानिकांचे प्रतिनिधी हे बिनबोभाट तेथें हजर रहाणार असल्यामुळें कोरमला लागणाऱ्या ⅙ पेक्षां म्हणजे ६३ पेक्षां कमी सभासद कधींच असणार नाहींत. अमुक एका प्रांताचे प्रतिनिधी आले नाहींत म्हणून किंवा २५० सभासदांची संख्या पूर्ण झाली नाहीं म्हणून फेडरेशन अडून रहाणार नाहीं. तेव्हां कॉंग्रेसनें ७ प्रांतांत जरी पेंचप्रसंग घडवून आणला आणि गव्हर्नरला हातांत सत्ता घ्यावयास लावली तरी फेडरेशनचा कारभार थांबणार नाहीं. फेडरेशनमध्यें कॉंग्रेससारख्या संस्थेला मताधिक्य मिळणें अशक्य असल्यामुळें कॉंग्रेसला फेडरेशनचा विध्वंस करण्याकरतां किंवा लोकांची प्रतिकारशक्ति वाढविण्याकरतां तेथें संमिश्र मंत्रिमंडळें बनविणें अशक्य आहे. तेथें संस्थानिकांचे १२५ सभासद असल्यामुळें त्यांचा मोठा गट तयार होईल व त्या गटानें जातिनिष्ठ व अराष्ट्रीय मुसलमानाबरोबर गट्टी केली तर त्यांची मंत्रिमंडळें स्थापन होतील. पण कॉंग्रेसला जर मुसलमानांचे बरोबर एकी करतां आली तर व मुसलमान जर कॉंग्रेसच्या घटनाभंगाचा कार्यक्रम मान्य करावयास तयार झाले तर दोघांच्या जुटीनें फेडरल असेंब्लींत पेंचप्रसंग निर्माण करतां येईल. प्रो. के. टी. शहानें

आपल्या पुस्तकांत काँग्रेसला फेडरल असेंब्लींत ३७५ पैकीं, १३० जागा मिळवतां येतील असें म्हटलें आहे. ही संख्या गृहीत धरली तरी बहुमताला ६० जागा कमी पडतात. या ६० जागा मिळवावयाच्या असतील तर संस्थानी प्रजेला प्रतिनिधी पाठविण्याचा हक्क मिळालाच पाहिजे. सांगण्याचा उद्देश एवढाच कीं, फेडरेशनमध्यें जर रुकावट करावयाची असेल व ४५ कलमाप्रमाणें राज्यकारभार चालविणें अशक्य करावयाचें असेल तर तेथें हमखास बहुमत पाहिजे. हें बहुमत घटनाभंगाकरतां हवें आहे, फेडरेशन राबवण्याकरतां नको आहे. संस्थानी प्रजेला जर मताधिकार मिळाला तरच काँग्रेसला सनदशीरपणें घटना मोडून टाकतां येईल.

## सनदशीर मार्ग अशक्य.

कांहींची कल्पना अशी आहे कीं, प्रांतांत काँग्रेसचीं प्रधानमंडळें असल्यामुळें त्यांनीं फेडरल कायदेमंडळाचे हुकूम व कारभार करण्याचें नाकारावें. पण फेडरल कायदेमंडळाचा प्रांतामार्फत होणारा कारभार फारच थोडा आहे व तो प्रांतिक मंडळानें करण्याचें नाकारल्यास गव्हर्नर आपल्या अधिकाऱ्यामार्फत करूं शकेल. फेडरेशनच्या अधिकाराला बंदी करण्याचा प्रांताला अधिकार नाहीं. उदाहरणार्थ रेल्वे, पोस्ट, जकाती, प्राप्तीवरील कर, पीनल कोडांतील कायदे हे आम्ही आमच्या प्रांतांत चालूं देणार नाहीं असें म्हणण्यास जागा नाहीं. बंडखोरीच करावयाची म्हटली तर प्रांतिक प्रधानांना तुरुंगाची तयारी करावी लागेल अगर मंत्रिमंडळ बरखास्त होईल. आमच्या प्रांतांत पोस्टऑफिस असलें अगर रेल्वे स्टेशन असलें किंवा त्यांचे अधिकारी असले तर त्यांना बेकायदा ठरविणें व अटक करणें कठीण आहे.

समाईक यादीपैकीं, कांहीं बाबी प्रांत व फेडरेशननें वहिवाटावयाच्या आहेत. त्या बाबबींत जर प्रांतानें सहकार्य केलें नाहीं तर गव्हर्नरला खास जबाबदारीचा उपयोग करावा लागेल व आपल्या मंत्र्यांना बाजूला सारावें लागेल. आपण असें समजूं कीं, फेडरेशननें शांतता स्थापण्याकरितां एखादा कायदा केला आणि प्रांताच्या मंत्रिमंडळानें त्या कायद्याची अंमलबजावणी करण्याचें नाकारलें तर त्या परिस्थितींत गव्हर्नर आपल्या जादा अधिकारान्वयें तो हुकूम जारी करील. सध्यांच असा प्रसंग आला आहे. मध्यवर्ति असेंब्लीनें लष्करी भरती विरोधी प्रचारास १ वर्ष शिक्षा दिली आहे. हा कायदा समाईक यादींतील असल्यांमुळें प्रांतांना लागू करण्यांत आला आणि प्रांतानें त्याची अंमलबजावणी नाकारली तर गव्हर्नर-जनरल गव्हर्नर्सना आपल्या विवेचक बुद्धीनें जादा अधिकाराचा उपयोग करण्यास लावील.

( १२६ पोटकलम २. )

अशा प्रकारें कायद्यानें फेडरेशनला सनदशीर विरोध करण्याचीं सर्व द्वारें बंद केलीं आहेत. किरकोळ बाबतींत कायद्याचे सूक्ष्म पापुद्रे उकलून थोडीफार गडबड करतां येईल पण त्यामुळें फेडरेशनचा कारभार अडणार नाहीं. तेव्हां फेडरेशनची जर खरोखर रुकावट करावयाची असेल तर प्रांताप्रमाणें तेथें बहुमताची शाश्वती पाहिजे. एकतर मुसलमानांच्या बरोबर तडजोड झाली पाहिजे किंवा संस्थानी प्रजेला प्रतिनिधित्व मिळालें पाहिजे.

## कायदेभंगाचा मार्ग.

दुसरा मार्ग कायदेभंगाचा. तो केव्हांही खुला आहे. प्रांतांत

केव्हां व कसा पेंचप्रसंग निर्माण करावयाचा हें ठरविणें कठीण नाहीं. पण कांहीं लोकांच्या कल्पनेप्रमाणें मधली स्थिति मात्र अशक्य आहे. प्रांतिक कायदेमंडळांतील सत्ता सोडून देऊन व निवडून आल्यावर फेडरल असेंब्लींत जाण्याचें नाकारून फेडरेशनला विरोध केला असें होणार नाहीं. त्याकरितां प्रत्यक्ष प्रतिकाराची चळवळच करावी लागेल. त्याचा मार्ग आंखणें कॉंग्रेसच्या हातीं राहील. फेडरेशनच्या कायद्यांचा अंमल प्रांतांत होऊं देण्याचें नाकारून प्रत्यक्ष प्रतिकाराला सुरवात झाली तर लोकांना विरोधाची स्पष्ट कल्पना येईल. ब्रिटिश सरकारचें या बाबतींत काय धोरण राहील हा मुद्दा गौण आहे व त्याचा विचार करण्याचें आपल्याला कारण नाहीं. पण ब्रिटिशांना आपल्या कोणत्याही हालचालींत हिंदुस्थानचा विचार सोडून चालणार नाहीं. याकरतांच आज ब्रिटनमध्यें हिंदुस्थानसंबंधीं विचार चालू आहेत व जोंपर्यंत हिंदुस्थानचा प्रश्न सुटला नाहीं तोंपर्यंत ते विचार तसेंच चालत रहातील. एके काळीं हिंदुमुसलमानांचा किंवा संस्थानांचा प्रश्न उभा करून त्यांनीं आम्हांला भेवडावलें पण इतउत्तर अशी काल्पनिक विघ्नें आणणें त्यांना फलदायी होणार नाहीं.

वसाहतीच्या स्वराज्याचें आमिष त्यांच्याकडून पुनः एकदां दाखविलें जाणार नाहीं असें नाहीं. पण त्या बाबतींत कॉंग्रेस, म. गांधी, पं. जवाहरलाल नेहरु हे स्पष्टपणें विरोध करीत आहेत. एकतर वसाहतीच्या स्वराज्याचें माप आमच्या पदरांत पुरेपुर टाकण्यापूर्वी त्यांच्याकडून अनेक थापा दिल्या जातील आणि दुसरें असलें वसाहतीचें स्वराज्य हें हिंदुस्थानच्या संस्कृतीला, परिस्थितीला आणि वाढीला उपयुक्त ठरणार नाहीं. ब्रिटिशांची लोकशाही ही

भांडवलशाहीवर उभारली आहे. या भांडवलशाहीची घाण हिंदुस्थानांत आणून आम्हांला यूरोपचें अनुकरण करावयाचें नाहीं. हिंदुस्थानला संपूर्ण स्वातंत्र्य पाहिजे याचा अर्थच असा आहे. आम्हांला युरोपमधील वर्गविद्वेषावर उभारलेली राज्यघटना नको आहे.

## स्वातंत्र्याची कल्पना

म. गांधी म्हणतात, ‘ I want for India complete Independence in the full English sense of that English expression. For me Purna Swaraj has an infinitely larger meaning than complete independence, but even Purna Swaraj is not self-explained’ * ( कंप्लीट इंन्डिपेंडन्स या शब्दप्रयोगाला इंग्रजींत जो अर्थ आहे त्या अर्थाचें स्वराज्य मला पाहिजे. संपूर्ण स्वातंत्र्यापेक्षां पूर्ण स्वराज्याला फारच जास्त व्यापक अर्थ आहे. पूर्ण स्वराज्य या शब्दानें त्याच्या अर्थाचें आपोआप स्पष्टीकरण होत नाहीं. )

गांधींच्या स्वातंत्र्याच्या कल्पनेंत सत्य व अहिंसेला प्राधान्य आहे. हिंदुमुसलमानांची एकी, अस्पृश्यतानिवारण, संपूर्ण दारूबंदी, आणि सात लाख खेडयांची खादीच्या उद्योगाच्या द्वारां पुनर्घटना हें गांधींच्या स्वातंत्र्याचे आधार आहेत.

वसाहतीचें स्वराज्य व संपूर्ण स्वातंत्र्य यांतील फरक दाखवतांना पं. जवाहरलाल नेहरू म्हणतातः—

‘ The former ( D. S. ) envisages the same old structure with many bonds visible and invisible. Tying us to the British economic system; the latter ( Independence ) gives us or ought to give us freedom to erect a new structure to suit our circumstances. *

* Congress History Page 978.
* J. Nehru’s Autobiography Page 418.

त्यांच्या म्हणण्याचा तात्पयार्थ असा:—वसाहतीच्या स्वराज्यांत जुना सांगाडाच स्वीकारावा लागतो. ब्रिटिशांच्या आर्थिक व्यवस्थेच्या पुष्कळ दृश्य व अदृश्य पाशांनीं आपण बांधले जाऊं. पण स्वातंत्र्यामध्यें आम्हाला आमच्या परिस्थितीप्रमाणें नवी घटना करतां येईल.

हिंदुस्थानला अनेक गुंतागुंतीचे प्रश्न सोडवावयाचे आहेत हें खरें आहे. संस्थानिक, हिंदुमुसलमान, भांडवलदार व मजूर असे अनेक मूलभूत प्रश्न सोडवून आम्हाला आमची स्वतंत्र राज्यव्यवस्था आखावयाची आहे. पण म. गांधी व पं. जवाहरलाल नेहरू यांच्या स्वातंत्र्याविषयीं कल्पना एकच असल्या तरी त्यांच्या साधनांत फरक आहे. म. गांधींची कल्पना ही पूर्णपणें स्वतंत्र आहे. म. गांधींच्या स्वातंत्र्यांत अहिंसा व सत्य यांला प्राधान्य येईल, खेडीं सुखी व स्वयंपूर्ण होतील, अर्थशास्त्र व वर्गयुद्ध यांचा पूर्ण अंत होईल आणि हिंदी संस्कृतीच्या उत्कर्षाला वाव मिळेल. पं. जवाहरलाल यांची कल्पना निराळी आहे. तींत वर्गकलहाला आळा घातला जाईल अशी शाश्वती नाहीं आणि संस्कृतीविषयीं म्हणावयाचें तर पाश्चात्यांच्या संस्कृतीची आमच्यावर छाप पडल्याशिवाय रहाणार नाहीं.

वास्तविकपणें हिंदुस्थानला हिंदुस्थानची राज्यघटना बनवूं देणें यांत ब्रिटिश सरकारचें काय जातें असा कोणीं प्रश्न विचारील. पण त्यांना हिंदुस्थानला वसाहतीचें स्वराज्य दिलें तरी आपली पक्कड सोडावयाची नाहीं. त्यांना मिळणारे अनेक फायदे ते एकाएकीं सोडणार नाहींत. त्यामुळेंच त्यांचें व हिंदुस्थानचें वैर हें सतत धुमसत राहील.

## कांहीं अडचणी.

कॉंग्रेस जी घटनापरिषदेची मागणी करीत आहे ती पार पाडा-

वयाची असेल तर कोणत्या अडचणी येतील व या परिषदेपुढें येणाऱ्या प्रश्नांना कसें तोंड द्यावें लागेल याचा विचार कर्तव्य आहे.

( १ ) घटनापरिषद कशी बोलावणार ?

( २ ) संस्थानिकांना त्यांत घेणार किंवा नाहीं ?

( ३ ) संस्थानिकांच्या तहनाम्याचें काय करावयाचें ?

( ४ ) कर्जाच्या प्रश्नाची कशी विल्हेवाट लावणार ?

( ५ ) संरक्षणाचा प्रश्न कसा सोडवणार ?

( ६ ) व्यापारविषयक तडजोडी करणार किंवा नाहीं ?

हिंदुस्थानला संपूर्ण स्वातंत्र्य मिळणार या कल्पनेवर घटना-परिषद आधारलेली आहे. घटनापरिषद बोलावण्याचें काम प्रांतिक कायदेमंडळाचें जें मंत्रिमंडळ आहे त्यानेंच करावें. प्रौढांना मताचा अधिकार देऊन आज ज्या प्रमाणांत प्रांतांचे प्रतिनिधी आहेत, त्याच प्रमाणांत घटनापरिषदेच्या सदस्यांच्या निवडणुका कराव्यात. साऱ्या हिंदुस्थानांतून ३०० पेक्षां जास्त सभासद ह्या परिषदेंत नसावेत. संयुक्त मतदारसंघ घटनापरिषदेंत मान्य होईपर्यंत आजच्या मतदार-संघामार्फत हे प्रतिनिधी सध्याच्या प्रमाणांत यावेत. सुरवातीलाच जर संयुक्त मतदारसंघाचा हट्ट धरला तर पुढील काम बंद पडेल. या घटनापरिषदेंत जे संस्थानिक आपल्या प्रजेला मतदानाचे हक्क देतील त्यांचेच प्रतिनिधी घ्यावेत. जे संस्थानिक या परिषदेंत भाग घेणार नाहींत त्यांची व्यवस्था परिषदेनेंच लावली पाहिजे. या घटना परिषदेंत सारा हिंदुस्थान एक करण्यांत यावा. जे संस्थानिक स्वतंत्र हिंदुस्थानांतील प्रांताप्रमाणें राज्यकारभार चालूं देण्यास तयार असतील त्यांनाच स्वतंत्र हिंदुस्थानच्या घटनेंत समाविष्ट करावे. बाकीच्या संस्थानांना ५ वर्षांची सवड द्यावी आणि त्या

काळांत जर ते संयुक्त राज्यघटनेंत आले नाहींत तर त्यांच्या संस्थानांतील कारभार फेडरेशनमार्फत चालविला जावा.

हिंदुस्थान स्वतंत्र झाल्यावर पूर्वीचे सर्व तहनामे आपोआपच रद्द होतील. संस्थानिकांना जे काय अधिकार मिळावयाचे ते नव्या तहान्वयें हिंदुस्थानमार्फतच मिळतील. आज जे अधिराज्याचे अधिकार इंग्लंडच्या राजाच्या हातांत आहेत ते स्वतंत्र हिंदुस्थानच्या हातीं आले पाहिजेत.

हिंदुस्थानच्या कर्जाची त्रयस्थ पंचांकडून चौकशी केली जावी व जें कर्ज निघेल तें देऊन टाकावें. पेन्शन वगैरेंबद्दल हिंदुस्थाननें जबाबदार रहावें.

संरक्षणाच्या बाबतींत इंग्रजांच्या बरोबर तह करावा. या तहान्वयें परस्परांनीं परस्परांना मदत करावी. हिंदुस्थानला जे तज्ञ शिक्षक लागतील ते ब्रिटिशांकडून घ्यावे. तसेंच आरमार किंवा विमानांच्या बाबतींत त्यांची मदत घ्यावी. पण ब्रिटिश सैन्य हिंदुस्थानांत रहातां कामा नये. पं. जवाहरलाल नेहरू यांनीं इंग्लंडमध्यें भाषण करतांना सांगितल्याप्रमाणें हिंदुस्थान हा स्वतःचें रक्षण करण्यास समर्थ आहे, त्याला ब्रिटिशांच्या सैन्याची जरुरी नाहीं.

व्यापारविषयक करारमदार केले जावेत. स्वतःच्या व्यापाराला योग्य तें संरक्षण दिल्यानंतर मग ब्रिटिशांचा विचार करावा. हिंदुस्थान हा औद्योगिकदृष्ट्या स्वयंपूर्ण झाला पाहिजे हें ध्येय डोळ्यांपुढें असावें.

हिंदुस्थान व ब्रिटन हे दोन देश समानतेच्या नात्यानें नांदूं लागले तर कोणाही ब्रिटिशाचा हिंदुस्थानला द्वेष करण्याचें कारण नाहीं. दोघांनाही परस्परांच्या देशांत जातां येईल; व्यापारधंदे

करतां येतील. समानतेचें नातें ब्रिटिश लोक मानावयास तयार झाले व हिंदुस्थान स्वतंत्र झाला तरच आजचा लढा संपणार आहे. घटनापरिषदेंत उपोद्घात उपसंहारासह सर्व गोष्टींची कलमवार योजना करावी. याच्या उलट जर हें स्वातंत्र्य आम्हाला मिळालें नाहीं तर आयर्लंडप्रमाणें हिंदुस्थानही ब्रिटिशांचे कट्टे वैरी होईल व चाललेला लढा असाच पुढें चालवावा लागेल. त्या लढ्यांत शेवटीं जय हिंदुस्थानचाच होणार आहे पण दोघांच्या सख्यत्वाची आज जी संधि मिळणार आहे ती मात्र पुढें मिळणार नाहीं.

हिंदुस्थानला हें जें स्वातंत्र्य संपादन करावयाचें आहे तें राष्ट्रीय वृत्तीच्या निरनिराळ्या गटांची एकजूट होईल तरच शक्य होईल. निवळ राजकीय गटांची एकजूट करून भागणार नाहीं. जातिनिष्ट लोकांच्या चळवळीचा अग्नी जर सतत भडकत राहिला तर स्वातंत्र्याचें वाढणारें रोपटें अशा आगींत टिकाव धरणार नाहीं; तेव्हां त्यांचाहि समावेश या स्वातंत्र्याच्या लढ्यांत झाला पाहिजे. परमताची असहिष्णुता वाढत गेली, तर व्यक्तींप्रमाणें पक्ष हटवादी होतात आणि आपलें तत्वज्ञान पटविण्याला व त्या तत्वज्ञानाप्रमाणें सैनिक दल उभारण्याला दीर्घ काल लागतो. पण राष्ट्रीय स्वातंत्र्यांत सर्वांच्या गाऱ्हाण्याचा कमी अधिक प्रमाणांत निरास होत असल्यामुळें तेवढी तडजोडीची मनोवृत्ती ठेवणें हें अवश्य ठरते. अशा प्रकारची एकजूट करण्याचें सामर्थ्य काँग्रेसमध्यें आहे आणि म. गांधी जोंपर्यंत काँग्रेसचें सुकाणूं फिरवीत आहेत, तोंपर्यंत हिंदुस्थानच्या एकजूटीबद्दल अगर स्वातंत्र्य संपादण्याबद्दल संशयित होण्याचें कारण नाहीं. त्यामुळेंच फेडरेशनचें आलेलें हें संकट फार काळ टिकून राहील असें वाटत नाहीं.

१

# फेडरेशन म्हणजे काय ?

पहिल्या गोलमेज परिषदेला हिंदुस्थानांतून जे प्रतिनिधी गेले होते, त्यांच्यापैकीं, किती जणांना फेडरेशनची कल्पना होती हें सांगवत नाहीं. त्यांपैकीं, एका सभासदानें आपल्याला फेडरेशन म्हणजे काय हें कळत नाहीं अशी तक्रार केली. त्यावर पार्लमेंटच्या सभासदांनीं असा बूट काढला कीं, हिंदी प्रतिनिधींना फेडरेशन समजावून देण्याकरतां एका इंग्रज प्रोफेसराची नेमणूक करावी. कल्पना मोठी चांगली होती आणि ती अंमलांत आणली असती तर आमचे अज्ञ सभासद सुज्ञ तरी झाले असते. एखादा सभासद प्रामाणिकपणें आपल्याला फेडरेशन कळत नाहीं असें म्हणाला असेल; पण बाकीच्या सभासदांनीं आपल्या ज्ञानाच्या घमेंडींत अज्ञान झाकून ठेवलें. तथापि त्या दिवसांत राजकारण शास्त्रावरील बरेचसे ग्रंथ हिंदी प्रतिनिधींनीं विकत घेतले एवढें मात्र खरें.

हिंदुस्थानचे प्रतिनिधी म्हणून गेलेल्यांची जर ही गत तर सामान्य माणसांना फेडरेशनची कल्पना नसल्यास आश्चर्य नाहीं. तसा विचार केला तर फेडरेशन म्हणजे वेदांताप्रमाणें कठिण शास्त्र नाहीं कीं ज्यावर अनेकांनीं भाष्यें लिहावींत. फेडरेशनची स्थूल कल्पना आतां सर्वांनाच आली आहे. तेव्हां या पुस्तकांत नवीन कांहीं सांगितलें जात आहे अशी कल्पना करण्याचें कारण नाहीं.

फेडरेशन हा शब्द मात्र नवा आहे.आपण हिंदी लोकांनीं स्वराज्य, स्वातंत्र्य, वसाहतींचें स्वराज्य, होमरूल, जबाबदारीचें स्वराज्य, स्वयंनिर्णय आणि अगदीं अलिकडे घटनापरिषद इत्यादि शब्द परिचित करून घेतले होते. त्यांत ह्या नव्या शब्दाची भर पडल्यामुळें आपली भाषा समृद्ध झाली अगर कांहींच्या कल्पनेप्रमाणें अशुद्ध झाली असें समजण्याचें कारण नाहीं.

फेडरेशन हा राज्यपद्धतीचा एक प्रकार आहे. स्वराज्य अगर स्वातंत्र्याचा मार्ग त्यानें बंदहि होत नाहीं अगर खुलाहि होत नाहीं. याचाच अर्थ असा कीं, स्वराज्य अगर स्वातंत्र्य मिळवावयाचें असेल तर बाहेरून चळवळ केली पाहिजे म्हणजे फेडरेशनभोंवतीं जे पाश घातले असतील ते तुटून पडतील. फेडरेशनची पद्धत येथें सुरू केली म्हणजे आपण स्वतंत्र होऊं असें नाहीं. स्वतंत्र राष्ट्रांत फेडरेशनची पद्धत आहे आणि परतंत्र राष्ट्रांतहि फेडरेशन असूं शकतें. तेव्हां फेडरेशन हें परतंत्र राष्ट्रांतच असतें आणि स्वतंत्र राष्ट्रांत नसतें, असें समजण्याचें कारण नाहीं. अमेरिकेंत फेडरेशन आहे, रशियांत फेडरेशन आहे, कानडांत आहे, जर्मनींत होतें आणि इतर पुष्कळ राष्ट्रांत ही पद्धत सुरू आहे.

फेडरेशन याचा शब्दार्थ एका संघांत समाविष्ट होणें असा आहे. फार प्राचीन काळापासून ही राज्यपद्धत अमलांत आहे. सुरवातीसुरवातीला ती अत्यंत अव्यवस्थित स्वरूपांत होती, पण पुढें ती शास्त्रशुद्ध होत गेली. एका संघांत समाविष्ट होण्याची आवश्यकता कां वाटू लागते? जेव्हां लहान टोळ्या एकेकट्या स्वतःचें संरक्षण करूं शकत नाहींत, तेव्हां ह्या टोळ्या एक होतात व आपली फळी बनवतात. त्यामुळें परक्या शत्रूंना त्यांच्यावर स्वारी

करणें अशक्य होतें. संघामुळें शक्ति निर्माण होते आणि या शक्ती-करतांच संघ बनवावे लागतात. अगदीं आरंभीं असेच गट अगर संघ निर्माण झाले. ग्रीकांच्या वेळीं असे संघ बनले होते. या संघांचा उद्देश उघडउघड स्वसंरक्षण करण्याचा होता. जगांतील पुष्कळ देशांत कारणपरत्वें असे संघ बनत जातात. विशेषतः जेथें लहान लहान टोळ्या असतात, त्यांना आसपासच्या मोठया शहरापासून आपला बचाव व्हावा म्हणून एकत्र यावेंच लागतें. कळपानें रहाण्याची बुद्धि ही पशुसृष्टींतसुद्धां दिसून येते. हरणांचे, गाईंचे कळप हे अशाचकरतां होत असतात. दुर्बलांना अशा संघांची जितकी जरूरी असते, तितकी सबलांना नसते. त्यामुळें समाजांतील अगदीं खालच्या थराचे जे वर्ग असतात ते ताबडतोब एक होऊं शकतात. लहान लहान टोळ्या, खेडीं, समूह वगैरेंमध्यें ही प्रवृत्ति जितकी असते, तितकी मोठाल्या शहरांत अगर राज्यांत नसते.

ग्रीस देश हा फार जुना. त्याचें वैशिष्टय तुटकपणा हेंच होतें. शहरांची लहान राज्यें बनवावींत, तीं अत्यंत भक्कम करावींत, एवढीच त्यांना चिंता असे. जेव्हां एखादा मॅसेडोनियाचा किंवा इराणचा राजा त्यांच्यावर चाल करून येई तेव्हांच त्यांना प्रतिकाराकरितां एकत्रित यावेसें वाटे. पण हें ऐक्य कारणापुरतें असल्यामुळें त्याला चिरस्थायी स्वरूप नव्हतें. ग्रीकांच्या साम्राज्याचा अंत होण्याची वेळ आली, तेव्हां त्यांच्यांत व्यापक स्वरूपाच्या संघटनेची जाणीव निर्माण होऊं लागली होती. पण ही जाणीव व्यक्त होण्याला संधीच मिळाली नाहीं.

तेव्हां फेडरेशनचें बीज जर आपण ग्रीसमध्यें शोधूं लागलों तर

त्याचें विशुद्ध स्वरूप आपणांस सांपडणें कठीण जाईल. त्या काळांत फेडरेशन्स नव्हतीं असें नाहीं. पण त्यांत जोम नव्हता. आपलें स्वातंत्र्य गेलें तरी हरकत नाहीं पण शाश्वत फायद्याकरितां एक व्हावयाचें नाहीं असा जणूं काय तेव्हांचा जमाना दिसतो. पण त्याहि काळांत थीसली, बोएटिआ, इटोलिया, एचिअन या ठिकाणीं फेडरेशन्स जन्मास आलीं. या चारहि फेडरेशन्सचा उद्देश परचक्रापासून आपआपल्या राज्यांचा बचाव करावा असा होता. पण तो उद्देश सफल झाला नाहीं. मॅसेडोनियाच्या अतिक्रमणाला त्यांचा बळी पडला.

या चार संघांपैकीं, एचिअन संघ हा बराच निर्दोष व परिपूर्णतेला पोहोंचलेला होता. या संघामध्यें येणारीं जीं घटक राज्यें होतीं, त्यांना अन्तर्गत कारभारांत संपूर्ण स्वातंत्र्य होतें. परराष्ट्रीय खातें फक्त मध्यवर्ती असे. पैशाचा बोजा निरनिराळीं घटक राज्यें उचलीत असत. त्यामुळें मध्यवर्ती सत्ता अत्यंत प्रभावशाली होती. लोकशाहीच्या तत्त्वाचा प्रचार त्यांत फारसा नव्हता; सरदारांचें प्राबल्य त्यांत जास्त होतें. तथापि राष्ट्रीय भावना आणि संयुक्तराज्यघटना यांचा विचार करतां एचीअन फेडरेशन ही त्या काळांतील अपूर्णावस्थेंतहि बरीच पूर्णत्व पावली होती असें म्हणण्यास हरकत नाहीं.

रोमच्या साम्राज्यांत फेडरेशनला वाव मिळाला नव्हता. उलट रोमन साम्राज्य ज्यावेळीं वायुगतीनें आपला अंमल बसवीत गेलें, त्या वेळीं त्यांनीं तेथें असलेल्या फेडरेशन्सचा नायनाटच केला. इटलींत तेव्हां तीन फेडरेशन्स होतीं. एक एट्रुरियाचें, दुसरें सॅमनियमचें आणि तिसरें लॅटियमचें. या तिघांपैकीं, शेवटची म्हणजे

लॅटिन लीग बरीच पुढारलेली होती. तींत ३० शहरें समाविष्ट झालीं होतीं. समानधर्म व समान राजकारण यामुळें हा संघ बराच कार्यक्षम झाला होता. इ. स. पू. ३३४ सालीं रोमबरोबर त्यांचें युद्ध झाले व हा संघ लय पावला. रोमनें या संघाचें अस्तित्वहि शिल्लक ठेवलें नाहीं.

यूरपमध्यें सुरवातीसुरवातीला फेडरेशन्ससंबंधी जी काय माहिती मिळते ती वर दिली आहे. त्या काळांतील हें संघ प्रामुख्यानें एकाच गोष्टीकरतां बनले होते. परक्या सत्तेपासून स्वतःचा बचाव करण्यांची त्यांत दृष्टि होती.

त्यानंतर यूरपमध्यें मध्ययुगांत एकदोन अपवाद सोडल्यास फेडरेशन्सचें अस्तित्व सांपडत नाहीं. त्यावेळीं सरंजामशाही व सार्वभौमत्व याला प्राधान्य होतें. त्यामुळें एकछत्री राज्य स्थापण्याकडे तेव्हां कल असे. राजमंडळें हींच प्रभावशाली झालीं व त्यांनीं आपली कराल सत्ता चहूंकडे स्थापली.

जर्मनी, हॉलंड व स्वित्झर्लंडमध्यें मात्र एकछत्री राज्यपद्धतिऐवजीं संयुक्त राज्यपद्धतीला प्राधान्य मिळालें आणि त्याची वाढ फारच सुंदर रीतीनें झाली. स्वित्झर्लंडमधील संयुक्त राज्यघटना ही अत्यंत जुनी आहे व ती सुधारत सुधारत आज पूर्णत्वाला गेली आहे. जर्मनी व हॉलंडमधील संयुक्त घटना ही अल्पायुषी ठरली. त्यांपैकीं, जर्मनीनें सावरासावर करून पुनः आपलें अस्तित्व प्रगट केलें.

जर्मनीची संयुक्त घटना मोडकळीस यावयास फ्रेंच राज्यक्रांति कारणीभूत झाली पण नेपोलियनच्या गंडांतरामुळें र्‍हाइन नदीच्या आसपासचे राजे एकत्र आले व एकत्र प्रतिकार करूं लागले. पुढें

नेपोलिअनचा पराभव झाला, व्हिएन्नाचा तह झाला आणि जर्मनीची पुनर्घटना होऊन त्यांचा एक विस्कळित संघ स्थापन झाला. या संघांत समाविष्ट होणारीं राज्यें आपापल्या मुलखांत स्वतंत्र होतीं. मात्र अंतर्गत व बाह्य शांततारक्षणाचे बाबतींत त्यांना मध्यवर्ती संस्थेवर अवलंबून रहावें लागे.ही मध्यवर्ती संस्था 'डाएट' होती. तींत निरनिराळ्या राजकीय घटकांतून प्रतिनिधी येत व आपल्याला आज्ञा असेल तसें मतदान करीत. या डाएटकडे युद्ध, शांतता, संस्थानासंस्थानांतील भांडणें मिटविणें वगैरे कामें असत; पण त्यांच्याजवळ स्वतंत्र नोकर नव्हते. त्यांना या घटकामार्फत कारभार करावा लागे.ह्या डाएटची घटना मोठी भानगडीची होती. ऑस्ट्रियाचा प्रतिनिधी हा कायमचा अध्यक्ष होता व प्रशियाचा प्रतिनिधी हा कायमचा उपाध्यक्ष होता. या विचित्र घटनेमुळें ऑस्ट्रियाच्या हातीं जर्मनीचें भवितव्य असे.

वास्तविकपणें फेडरेशनचीं सर्व लक्षणें डाएटला लागू पडत नव्हतीं. मध्यवर्ती सत्तेच्या हातीं आपल्या हुकुमाची अंमलबजावणी करण्यास जर अधिकारी नसतील तर त्या सत्तेची केविलवाणी स्थिति होते. तथापि जर्मनीची राज्यव्यवस्था ही संयुक्तच होती. तेथील फेडरेशन हें निरनिराळ्या राज्यांच्या सरकारांचें बनलें होतें.

जर्मनीशिवाय युरपमध्यें डचांचा संघ निर्माण झाला होता. स्पेनच्या फिलिप राजाच्या भीतीनें हॉलंड, झीलंड व इतर पंधरा प्रांतांनीं आपली संयुक्त घटना निर्माण केली. पुढें या घटकांनीं फिलिप राजाचें स्वामित्व मान्य केलें आणि तेथील सरकार लष्करी व औद्योगिक बाबतींत सत्ता चालवूं लागलें.पण अंतर्गत कलह व युरपमधील कारस्थानी मुत्सद्यांच्या हस्तक्षेपामुळें ही घटना विस्कळित झाली.

अशा प्रकारें इ.स.पूर्वी आणि त्यानंतर सोळा सतराशें वर्षे फेडरेशनचे निरनिराळे प्रकार ठिकठिकाणीं आढळून येतात. या प्रकारामध्यें फक्त जर्मनी व स्वित्झर्लंड या दोन देशांतच म्हणण्यासारखें फेडरेशनला स्वरूप आलें होतें. या फेडरेशनना प्रमुख कारण आत्मरक्षणाची आवश्यकता हेंच होतें.

आज जगामध्यें एकंदर नऊ ठिकाणीं संयुक्त राज्यघटना अस्तित्वांत आहेत. स्वित्झर्लंड, अमेरिका, जर्मनी, कानडा व ऑस्ट्रेलिया या पांच मोठ्या देशांत संयुक्त राज्यघटना आहे. रशियांतहि ह्याच धर्तीची पद्धत आहे. याशिवाय आर्जेन्टाईन, ब्राझिल, मेक्सिको आणि व्हेनिझुएला या चार लहान देशांत या धर्तीवर राज्य कारभार सुरू आहे. अशा प्रकारें रशियाचा स्वतंत्र प्रयोग सोडला तर पांच मोठया व चार लहान देशांत फेडरेशन्स अस्तित्वांत आहेत असें आढळतें.

## फेडरेशनचीं अंगें व उपांगें.

फेडरेशन ही एक राज्यपद्धति आहे असें वर सांगितलें. राज्यपद्धतींचें एकंदर प्रकार खरोखर दोनच आहेत. त्यांपैकीं, एका प्रकाराची थोडक्यांत कल्पना वर दिली. दुसरा प्रकार एकछत्री अगर एकतंत्री ( unitary ) राज्यकारभाराचा. त्याचें उत्तम उदाहरण म्हणजे इंग्लंडचें. या पद्धतींत सर्व स्थानिक सरकारसंस्था ह्या मध्यवर्ती संस्थेच्या पूर्णपणें अंकित असतात. मध्यवर्ती सत्तेकडून जे जे हुकूम सुटतील तें तें या स्थानिक संस्थांना अंमलांत आणावे लागतात. अगदीं किरकोळ गोष्टीपासून तों युद्ध-शांततेपर्यंत सारीं सूत्रें मध्यवर्ती सत्ता हलविते. परगणे, जिल्हे, प्रांत वगैरे

ठिकाणीं अधिकारी असतात, पण ते हुकमाचे बंदे असतात. या विभागांचें अधिकारक्षेत्र लहानमोठें करणें, त्यांची घटना बदलणें, त्यांच्या कारभारांत कमी अधिक करणें, पैशाबद्दल तरतूद करणें हीं कामें मध्यवर्ती सत्ता ठरवील त्याप्रमाणें करावयाचीं असतात. मध्यवर्ती सत्तेच्या हातीं कर्तुमकर्तुम् शक्ति असते.

अलिकडे अलिकडे या एकछत्री राज्यपद्धतींतसुद्धां बदल होत आहे. मध्यवर्ती सत्ता आपल्या हातांतील अधिकार थोडे थोडे सैल करूं लागल्या आहेत. स्थानिक अधिकारी जे निव्वळ वरून येणारे हुकूम बजावणारे ताबेदार असत, त्यांऐवजीं त्या अधिकाऱ्यांना त्यांच्या क्षेत्रांत छोटीं छोटीं कायदेमंडळें स्थापण्याची व लहान लहान कायदे करण्याची सत्ता द्यावी अशी प्रवृत्ति अलिकडे वाढत आहे. तसेंच आपल्या ताब्यांतील प्रांत जर एका विशिष्ट धर्माचे अगर देशाचे असतील तर त्यांना सुद्धां असलीं उपकायदेमंडळें बनविण्याचा अधिकार देण्याची वृत्ति बळावत आहे. तथापि असल्या अधिकारविभागणीमुळें मध्यवर्ती सत्तेचा सासूबाईपणा कमी होतो असें नाहीं. आपल्या हातांतील सत्ता वाटून अगर विभागून देणें हा फेडरेशनचा पूर्वकाळ असतो. त्याला संयुक्त राज्यघटना हें नांव मात्र मिळत नाहीं.

## वसाहतींचा कारभार.

ब्रिटिशांच्या वसाहती आयर्लंड, कानडा, ऑस्ट्रेलिया, न्यूझीलंड व दक्षिण आफ्रिका या आहेत. या वसाहतींचा व ब्रिटिश साम्राज्याचा जो संबंध आहे, त्याला संयुक्त राज्यघटनेचें स्वरूप नाहीं. या वसाहती आपापल्या देशाचा कारभार चालविण्यास पूर्णपणें

स्वतंत्र आहेत. तथापि या वसाहती व साम्राज्यसरकार यांच्यांत अजूनपर्यंत नात्याचा थोडासा धागादोरा शिल्लक आहे. इंग्लंडचा राजा हा या वसाहतींचा राजा मानण्यांत येतो. याशिवाय साम्राज्यपरिषद म्हणूनहि एक संस्था शिल्लक आहे. या परिषदेला सर्व वसाहती आपले प्रतिनिधी पाठवितात. पण ही परिषद नुसती विचारविनिमय करणारी संस्था आहे. तिच्या हातीं वसाहतींना नियंत्रण करण्याची कोणतीच सत्ता नाहीं. ही परिषद ठराव पास करते व ते ठराव वसाहतींनीं अंमलांत आणावेत अशी इच्छा प्रगट करते. तेव्हां राजाला मान्यता आणि साम्राज्यपरिषद या दोन निरुपद्रवी बंधनापलीकडे ब्रिटिश साम्राज्य व वसाहती यांचा संबंध नाहीं.

वर आपण एकसूत्री राज्यपद्धतीचा प्रकार पाहिला आणि वसाहतीच्या राज्यव्यवस्थेसंबंधींहि उल्लेख केला. आतां आपण संयुक्त राज्यघटनेकडे वळूं. संयुक्त राज्यघटना ही फक्त नऊच देशांत आहे. बाकीच्या देशांत एकसूत्री राज्यकारभार चालू आहे. संयुक्त राज्यघटना ही प्रारंभीच्या काळांत आत्मरक्षणाकरितां अस्तित्वांत आली. ही आत्मरक्षणाची जाणीव ग्रीक, रोमन लोकांनाच होती असें नाहीं. अगदीं अलिकडच्या काळापर्यंत संयुक्त राज्यघटनेला स्वसंरक्षण हेंच कारणीभूत झालें आहे. अमेरिकेनें जेव्हां १७७७ सालांत आपलें राज्यमंडळ (Confederation) बनविलें, तेव्हां त्यांच्यापुढें इंग्लंडचें संकट होतें. आपण स्वातंत्र्याकरतां लढतों खरें; पण स्वातंत्र्य मिळाल्यानंतर जर आपण एकजूट केली नाहीं तर पुनः गुलामगिरींत पडूं, या भीतीनें १३ संस्थानें एकत्र आलीं. १८७१ मध्यें जर्मन साम्रा-

ज्याचे संस्थापक याच भावनेनें संघटित झाले. जर्मनींतील सुट्या सुट्या राज्यांचें फ्रान्स किंवा ऑस्ट्रियाच्या आक्रमणापासून संरक्षण करावें आणि यूरोपमध्यें जर्मनीला लष्करी बाबतींत अग्रपूजेचा मान मिळवून द्यावा म्हणून तेथें जर्मन फेडरेशन अस्तित्वांत आलें. १८८३ नंतर पासिफिक महासागरांत परक्यांच्या संकटाचा बागुल-बोवा दिसूं लागतांच ऑस्ट्रेलियांत संयुक्त राज्यघटना निर्माण झाली. कानडा हा जर तुटक राहिला तर अमेरिकेकडून खाल्ला जाईल म्हणून कानडानें संयुक्त राज्यघटना बनवली. इतर फेडरेशन्सच्या बाबतींत हीच परचक्राची भीति कारणीभूत झाली आहे.

आत्मरक्षणाच्या खालोखाल आर्थिक कारणाकरतां फेडरेशन्सला महत्त्व आहे. परचक्र हें जसें एक संकट आहे, तसें आर्थिक नागवणूक हेंहि जबरदस्त संकट आहे. जवळजवळ असणारे देश परस्परांना कच्चा माल पुरवूं शकतात व पक्का माल खरेदी करूं शकतात. निरनिराळीं राज्यें जर आपल्याच पुरती पाहूं लागतील तर आधुनिक अर्थशास्त्राप्रमाणें उद्योगधंद्यांची भरभराट होणार नाहीं. प्रत्येक छोटें छोटें राज्य शेजारून येणाऱ्या कच्च्या अगर पक्क्या मालावर जबर जकाती बसवूं लागलें तर उद्योगधंदे पुढें कसें सरसावणार ? खुला व्यापार ही एक महत्त्वाची बाब आहे. जकाती-च्या ओझ्याखालीं जर प्रांतोप्रांतीचे कारभार वांकूं लागले तर मालाची निर्यात करणें अशक्य होतें; भांडवल कुजून जातें; मजूरवर्ग बेकार होतो; दळणवळणाचीं साधनें मर्यादित होतात. तेव्हां शेजार-शेजारच्या देशांत जर एक संयुक्त घटना निर्माण झाली, तर पक्क्या कच्च्या मालाचे प्रश्न सुटतात, भांडवल स्थगित होत नाहीं, रेल्वे

मोटारींची वाढ होते आणि मजुरांना मजुरी मिळते. तेव्हां खुला व्यापार करतां यावा आणि मालाला बाजारपेठ मिळावी म्हणून लहानलहान स्वतंत्र संस्थानें हीं एका मोठ्या राज्यव्यवस्थेंत संलग्न झाली. फेडरेशन अस्तित्वांत यावयास हा दुसरा महत्त्वाचा विचार अशा प्रकारें कारणीभूत झाला आहे अगर होणार आहे.

फेडरेशनला तिसरेंहि एक कारण आहे व तें राजकीय आहे. संयुक्त राज्यघटना ही केव्हांहि व्यापक असते. एकेकटा माणूस हा फारसा आपला प्रभाव पाडू शकत नाहीं. तीच स्थिति लहान राज्याची. त्यामुळें लहान राज्यें ही मोठ्या संस्थेंत अंतर्भूत केलीं म्हणजे त्यांची शक्ती वाढते, सत्ता वाढते, महत्त्व वाढतें, प्रतिष्ठा वाढते, सोशिक शक्ति अधिक येते, वैयक्तिक गुणांच्या उत्कर्षाला अधिक क्षेत्र मोकळें होतें, पैसा निर्माण करण्याची अगर जरुरीप्रमाणें कर्ज काढण्याची शक्ति विस्तृत होते; आंतरराष्ट्रीय राजकारणांत त्याला महत्त्वाचें स्थान प्राप्त होतें; व जीवनांतील निरनिराळ्या ध्येयांचा विकास सुलभपणें होऊं शकतो. संयुक्त राज्यघटनेला अशा प्रकारें हे तीन विचार कारणीभूत झाले आहेत.

पण याहीपेक्षां एक चवथा व महत्त्वाचा विचार त्यांत असतो. निव्वळ फायद्याकरितां एकत्र येण्यानें कोणतीही सत्ता प्रभावी होत नाहीं. गेल्या महायुद्धांत इंग्लंड, फ्रान्स, रशिया, इटली यांनीं आपला संघ बनविला होता. तसेंच युरोपमधील राष्ट्रें परस्परांशीं व्यापारविषयक करारनामे करीत असतात. पण त्यामुळें त्यांची संयुक्त राज्यघटना कधीं झाली नाहीं. निवळ बाह्य संकटाकरितां झालेली ही एकी संकट दूर होतांच संपते. संयुक्त राज्यघटनेंत अन्तर्भूत होणाऱ्या शासनसंस्था व जनता यांना परस्परांबद्दल

आपलेपणा, प्रेम, जिव्हाळा वगैरे वाटावा लागतो तरच ती घटना कार्यक्षम होते. परस्परांच्या कल्याणाकरितां परस्परांना प्रसंगानुसार त्यागहि करावा लागतो. सर्वांच्या हितसाधनांत आपलेंहि हित साधणार आहे अशी उदार भावना असल्यावांचून एकीचें सूत्र पुरें होत नाहीं. विभक्त असून एकत्र असणें असें फेडरेशनचें स्वरूप आहे. एखादें कुटुंब मोठें झालें म्हणजे त्या कुटुंबांतील घटक निरनिराळ्या चुली मांडतात. पण कुटुंबांच्या स्थैर्यांत व उत्कर्षांत आपलेंहि स्थैर्य व उत्कर्ष आहे ही जर भावना त्याच्या मनांत नसेल तर ते विभक्तच रहातील. मग त्यांत कांहींचा परमोत्कर्ष होईल आणि कांहीं रसातळास जातील. पण लहानमोठें, गरीबश्रीमंत असे सर्व भाऊभाऊ कुटुंबाच्या कल्याणाकरतां कधीं कष्ट व कधीं त्याग करतील आणि नेहमीं आपण एक आहों ही बुद्धि ठेवतील तर ते कुटुंब खचणार नाहीं.

फेडरेशन म्हणजे काय हें सोप्या भाषेंत उपमेनें सांगावयाचें झाल्यास विभक्त पण एकत्र असणारें कुटुंब असें सांगतां येईल. फेडरेशनमध्यें जी एकीची भावना अवश्य आहे तिलाच आपण राष्ट्रीय भावना म्हणूं शकूं. या भावनेशिवाय जगांत कोणतीहि राज्यें अगर साम्राज्यें टिकणार नाहींत. मग तें रशियाचें सोव्हिएट राज्य असो, किंवा हिटलरचें नाझी राज्य असो अथवा ब्रिटिशांचें भांडवलशाही राज्य असो. लग्नाला वधूचें स्वरूप अथवा वराची विद्वत्ता कारणीभूत झाली असली, तरी सुखाच्या प्रपंचाला स्वरूप किंवा विद्वत्तेसारख्या तात्कालिक गोष्टी पुरत नाहींत. त्याला प्रेम, जिव्हाळा, ममत्व वगैरे दैवी भाव लागतात. तेव्हां कोणतीहि फेडरेशन यशस्वी व्हावयाची असेल तर त्याकरितां आफ्रिकेंतील

एक देश, अमेरिकेंतील दुसरा देश, जपानमधला तिसरा देश, आणि हिंदुस्थानांतील किंवा युरोपमधील चवथा देश अन्तर्भूत झाला असें जाहीर करून भागत नाहीं. फेडरेशनच्या घटकांत राष्ट्रीय दृष्टया तरी आपलेपणाची भावना असावी लागते. त्यामुळेंच हे घटक लोखंडासारखे कणखर व दुर्दम्य होतात. हिंदुस्थानच्या नियोजित घटनेमध्यें ह्यांपैकीं कशाचें अस्तित्व आहे व कशाचा अभाव आहे यांची आपण क्रमशः छाननी करूंच.

फेडरेशन अस्तित्वांत यावयास स्वसंरक्षण, व्यापारवृद्धि, राजकीय दृढता आणि आपलेपणाची राष्ट्रीय भावना असावी लागते. ह्यांपैकीं एक किंवा अनेक कारणें जेव्हां संभवतात तेव्हांच फेडरेशनचा जन्म होतो.

फेडरेशनला दोन राज्यसंस्थांची आवश्यकता असते. एक मध्यवर्ती सत्ता व दुसरी स्थानिक प्रांतोप्रांतीं पसरलेलीं राज्यें. राज्य मोठें असल्याशिवाय संयुक्त घटना कोणाची करावयाची ? अंदमानसारखें, किंवा सीलोनसारखें एखादें चिमुकलें बेट असलें तर तेथें फेडरेशन कसें व कोणाचें होणार ? संयुक्त घटनेकरतां लगत अनेक प्रांत असावे लागतात. देशाचा विस्तारहि मोठा असावा लागतो. मध्यवर्ती सत्तेचे व स्थानिक सत्तेचे अधिकार व अधिकारक्षेत्रें हीं नक्कीं ठरवलेलीं असावीं लागतात. मध्यवर्ती व स्थानिक संस्था ह्या पूर्णपणें परस्परांपासून स्वतंत्र असाव्या लागतात. दोघांचे कारभार हे स्वतंत्र व एकमेकांच्या हक्कांवर अतिक्रमण करणारे नसावेत. ही परिस्थिति जर उपलब्ध असेल तरच फेडरेशन हें शुद्ध स्वरूपांत अवतरूं शकतें.

फेडरेशनमध्यें एकाच देशांत दोन संस्था स्वतंत्रपणें अधिकार

गाजवीत असतात.या दोन्ही सत्ता आपापल्या क्षेत्रांत पूर्ण सत्ताधीश असतात. फेडरेशनचें असें द्विविध स्वरूप असल्यामुळें पहिल्याप्रथम प्रत्येक सरकारचे अधिकार कोणते हें ठरवावें लागतें. आपली सत्ता कोठें सुरू होते व कोठें संपतें याची स्पष्ट आंखणी करणें हें फेडरेशनचें पहिलें काम आहे. अशा प्रकारची सत्ताविभागणी जर झाली नाहीं तर एक सत्ता दुसऱ्या सत्तेच्या हक्कांवर आक्रमण करते आणि त्यामुळें संयुक्तघटनेचा कारभार हा घोटाळ्याचा व कमजोर होऊं लागतो. ह्या अधिकारांची बरोबर आंखणी व्हावी म्हणून प्रथम दोघांचीहि घटना ही स्पष्टपणें लिहून ठेवावी लागते. ज्या मूलभूत तत्त्वाप्रमाणें एखाद्या विभागांतील सरकार चालतें, त्या तत्त्वांचा समुच्चय म्हणजेच घटना होय. संयुक्त घटनेप्रमाणें चाललेल्या प्रत्येक राज्यांत तेथील घटना निःसंदिग्धपणें लिहिलेली असावी लागते. फेडरेशन हें दोन प्रकारें अस्तित्वांत येतें. एक तर निरनिराळीं स्वयंशासित राष्ट्रें एकत्र येतात व आपलें मध्यवर्ती सरकार बनवतात किंवा एकसूत्री राज्य हें आपले अधिकार वांटून देऊन छोटया छोटया घटकांना सत्ता देतें. पण फेडरेशन हें वरून येवो किंवा खालून येवो, त्याच्या जन्माच्या वेळीं त्याची पत्रिका स्पष्ट ग्रहांसह मांडावीच लागते.

एकसूत्री राज्यपद्धतींत घटनेच्या स्पष्टीकरणाबाबत अंगचोरपणा केला जातो. रूढी व वहिवाटीनेंहि कांहीं कांहीं गोष्टी सिद्ध होत जातात. मध्यवर्ती सरकार हें फक्त परराष्ट्रीय भानगडीकडे लक्ष देतें आणि स्थानिक सरकार अंतर्गत कारभार पहातात. इंग्लंड व त्यांच्या वसाहती यांचे संबंध वसाहतींना स्वराज्य मिळवण्यापूर्वी अशा प्रकारचे होते.

कित्येक वेळां असेंहि होतें:—रूढीनें अगर वहिवाटीनें पाऊल वाटेचा राजरस्ता होत जातो आणि मध्यवर्ती सत्ता व स्थानिक सत्ता यांचे एके काळीं कायद्यानें निर्बंधित केलेले अधिकार हे निरुपयोगी ठरतात. दोन्ही सत्ता परस्परांविषयीं विश्वास बाळगणाऱ्या असल्यामुळें एकाचें दुसऱ्याच्या सत्तेवर आक्रमण हें हानिकारक न ठरतां उपकारकच ठरते.

पण जेथें मध्यवर्ती सत्तेची व स्थानिक सत्तेची भाऊबंदकी होण्याचा संभव असतो, तेथें मात्र रूढी, परंपरा वगैरेंच्या खुंटीवर भविष्यकाळ टांगून ठेवूं नये. भाऊबंदकीच्या वाटणींत वरवंटे आणि मुसळें उभीं वांटून घेण्याचे हास्यास्पद प्रकार होतात, तसें फार तर करूं नये. पण जें काय वाटावयाचें तें स्पष्टपणें नमूद केलेलें असावें. लिखित घटना हा फेडरेशनचा प्राण आहे असें जरी नसलें तरी हिंदुस्थानसारख्या देशांत फेडरेशनची पद्धति विकास पावत आली नसून तिचें रोपटें प्रयोगाकरतां आमच्या देशांत लावलें जात असल्यामुळें तिला विस्तारशः कागदावर विराजमान करणें जरूर आहे.

फेडरेशनचा अभ्यास केलेले राजकारणी पुरुष सांगतात कीं, घटना लिहिलेली असावी एवढेंच नव्हे तर ती कायम ठशाची असावी. दोन सत्तांच्या भांडणांत बिचाऱ्या प्रजेचा चक्काचूर होऊं नये म्हणून अशी योजना अवश्य असावी. घटनेंत कारणपरत्वें दुरुस्ती ही करावीच लागते. सामान्य कायदे बदलणें, रद्द करणें अगर नवे करणें यांत फारसें भांडण होत नाहीं. पण संयुक्त घटना बदलण्याचा प्रश्न आला कीं, दोन सत्ता परस्परांशीं भांडूं लागतात व फेडरेशनचें पेकाड मोडतें. मध्यवर्ती सत्ता स्थानिक

सत्तेवर आक्रमण करूं पाहते आणि स्थानिक सत्ता मध्यवर्ती सत्तेवर चढाई करूं पहातात. हें संकट टळावें म्हणून संयुक्त घटना ही शक्यतों वर निर्दोष व अविवर्तनीय असावी. तींत बदल करणें झाल्यास तें काम संयुक्त घटनेप्रमाणें अस्तित्वांत येणाऱ्या न्यायाधिशाकडे सोंपवावें. त्यांनीं परस्परांच्या अधिकाराविषयीं वाद उपस्थित झाल्यास त्याचा फैसला करावा आणि त्यांत दुरुस्ती करावयाची असल्यास परस्परांच्या अधिकारक्षेत्रांत संघर्ष येणार नाहीं अशा बेतानें योजनाहि ठरवावी. कधीं कधीं हें काम अगदीं स्वतंत्र अशा पंचांकडेहि सोपवावें. म्हणजे पक्षपातीपणाच्या आरोपाला जागा रहाणार नाहीं. पण कांहीं असलें तरी घटना बदलण्याचे अधिकार हे देशाबाहेरील सत्तेला असूं नयेत.

फेडरेशन यशस्वी व्हावयास आणखी एका गोष्टीची जरुरी आहे असें प्रतिपादन केलें जातें. संयुक्त राज्यघटनेंत दोन कायदेमंडळें असावींत असें सांगण्यांत येतें. एक वरिष्ठ कायदेमंडळ व दुसरें कनिष्ठ. खालच्या कायदेमंडळांत जे प्रतिनिधी यावयाचे ते लोकांनीं मतें देऊन निवडावे;आणि वरिष्ठ कायदेमंडळ हें निरनिराळ्या स्थानिक सरकारांनीं निवडावें. खालचें कायदेमंडळ हेंच सामान्यतः खरें सत्ताधीश असल्यामुळें त्याचे प्रतिनिधी हे प्रत्यक्ष लोकप्रतिनिधी असावेत; प्रतिनिधींचे प्रतिनिधी नसावेत. हिंदुस्थानच्या फेडरेशनमध्यें उलटा प्रकार दिसून येतो.

फेडरेशनमध्यें दोन कायदेमंडळें असण्याचें कारण नेहमींचेंच आहे. मध्यवर्ती सत्ता अत्यंत कार्यक्षम व सनदशीर करावी या उद्देशानें दोन कायदेमंडळें असावींत असें शास्त्रज्ञ सांगतात. वास्तविकपणें वरिष्ठ गृह हें अडगळीसारखेंच ठरतें. प्रांतिक कारभारांत ती

अडचण झाली आहे असें आपल्या देशांतील कारभारावरून दिसून येतें. वरिष्ठ कायदेमंडळाचे प्रतिनिधी हे श्रीमंत वर्गाचे प्रतिनिधी असल्यामुळें त्यांच्यावर लोकांचा विश्वास नसतो. पण खालच्या कायदेमंडळानें पास केलें व वरच्या कायदेमंडळानें फेटाळलें असें बिल अगर बिलें क्वचितच असतात. ज्या देशांत गव्हर्नर, किंवा गव्हर्नरजनरल यांस व्हेटोचे अधिकार असतात, तेथें तर हीं वरिष्ठ कायदेमंडळें अगदीं अनावश्यक आहेत. पण खालच्या गृहानें अविचारीपणा केला तर त्याला पायबंद घालावा म्हणून हें लोढणें निर्माण करण्यांत येतें.

दोन कायदेमंडळांच्या उपयुक्ततेबद्दल व अनुपयुक्ततेबद्दल उभयपक्षीं लिहिलें व बोललें जातें. ज्या देशांत खालच्या गृहांत स्वार्थी, आपल्या प्रांतापुरतेच पहाणारे प्रतिनिधी असतात, त्या देशांत व्यापक दृष्टीच्या व उदार बुद्धीच्या प्रतिनिधींचें जर वरिष्ठ कायदेमंडळ बनविलें तर तें उपकारक होऊं शकतें. फेडरेशनचे जे घटक असतात, त्यांच्यांत जर दुही, स्पर्धा, चढाओढ, व गट बनविण्याची प्रवृत्ति असेल तर फेडरेशन मोडून पडेल. त्याकरतां वरिष्ठ गृह लागतें आणि तें जर प्रांतविशिष्ट विचार न करतां देशाचा विचार करतील तर त्याची उपयुक्तता अनुभवासहि येईल.

वरील विवेचनावरून एकंदर फेडरल राज्यपद्धतीचे दोन मुख्य प्रकार असून त्यांचे पोटप्रकारहि अनेक असूं शकतात हें लक्षांत येईल. फेडरेशनमध्यें जी घटकराज्यें अन्तर्भूत होतात, तीं आपापल्यापुरतीं पूर्णपणें स्वतंत्र असतात. त्यांच्या अन्तर्व्यवस्थेंत मध्यवर्ती सत्तेचा बिलकूल हस्तक्षेप नको असतो. हीं स्वतंत्र राज्यें आपल्या स्थैर्याकरतां व वाढीकरतां एकत्र येतात आणि मध्यवर्ती मंडळ

बनवितात. त्यालाच संयुक्त सरकार असें म्हणतात. कधीं कधीं मध्यवर्ती सरकार हें आपले अधिकार विभागून देऊन छोटीं छोटीं राज्यें निर्माण करतें; त्या राज्यांना स्थानिक कारभारापुरतें स्वातंत्र्यहि देतें. पण हा दुसरा प्रकार फेडरेशनचा खरा द्योतक नाहीं. पहिल्या प्रकारच्या फेडरेशनला त्याचे घटक जन्म देत असल्यामुळें मध्यवर्ती सत्ता ही एका दृष्टीनें पंगू असते. घटकांचें प्रभुत्व मध्यवर्ती सत्तेवर असल्यामुळें, मध्यवर्ती सत्तेला घटकांच्या ओंजळीनें पाणी प्यावें लागतें. पण जेव्हां मध्यवर्ती सत्तेकडून आपल्या अधिकारांची विभागणी होते, आणि घटकराज्यें निर्माण केलीं जातात, तेव्हां त्यांची शेंडी मध्यवर्ती सत्तेच्या हातीं असते. असल्या पद्धतींत मध्यवर्ती सत्ता करील तें प्रमाण अशी स्थिति असते. पण या दोन्ही प्रकारांत संयुक्त राज्यघटनेला वैगुण्यच प्राप्त होतें. मध्यवर्ती सत्तेनें निर्माण केलेलीं घटकराज्यें जेथें नसतात, किंवा घटक राज्यांनीं निर्माण केलेली मध्यवर्ती सत्ता जेथें नसते, तेथें फेडरेशन हें खऱ्या अर्थानें उपयुक्त ठरतें. मध्यवर्ती सत्ता व स्थानिक सत्ता यांचे अधिकार, यांचीं क्षेत्रें, यांची आर्थिक व्यवस्था हीं कायमचीं ठरवून टाकलेलीं असावींत; परस्परांचें परस्परांवर आक्रमण होऊं नये, एकानें दुसऱ्याला वरिष्ठकनिष्ठ या नात्यानें पाहूं नये. ते परस्परांच्या नाशालाहि कारणीभूत होतां कामा नये, आणि उभयतांनीं राष्ट्रीय वृद्धि हें आपलें ध्येय मानावें. हेंच फेडरेशनचें शुद्ध स्वरूप होय.

ज्या पद्धतींत मध्यवर्ती सत्तेला बिलकुल अधिकार नसतात, तिला कॉनफेडरेशन म्हणतात. निदान अमेरिकेंत तरी हा प्रकार होता. ज्या १३ संस्थानांनीं इंग्लंडविरुद्ध बंड केलें त्यांनीं एक

मध्यवर्ती सत्ता निर्माण केली. तिला कॉंग्रेस असें म्हणूं लागले. या कॉंग्रेसमध्यें यावयास व आल्यानंतर जावयास कोणत्याहि संस्थानाला बंदी नसे. या कॉंग्रेसची घटना हीं संस्थानें एकमतानें बदलूं शकत. कॉंग्रेसमध्यें कांहीं ठरलें तर तें या संस्थानांनीं अंमलांत आणलेंच पाहिजे अशी त्यांच्यावर सक्ति नसे. कॉंग्रेसजवळ सैन्यहि नसे व पैसाहि नसे. त्यामुळें त्या कॉंग्रेसला सरकार म्हणतांहि येत नव्हतें. संयुक्त राज्यघटनेच्या पद्धतींत ज्याप्रमाणें दोन शासनसंस्था असतात, त्याप्रमाणें अमेरिकेच्या कॉन्फेडरेशनमध्यें नव्हत्या. खरोखर तेथें एकच खरी संस्था होती. मध्यवर्ती संस्था ही एखाद्या पुराणिका-प्रमाणें धर्मप्रवचनें करणारी संस्था असल्यामुळें अमेरिकेच्या कॉन्फेडरेशनला संयुक्त घटना म्हणतां येत नाहीं. धर्मशाळेंत ज्याप्रमाणें निरनिराळे उतारू उतरतात, त्याप्रमाणें तेथील कॉंग्रेस-मध्यें हीं संस्थानें येत, बसत व जात.

संयुक्त राज्यघटनेच्या वाढीचा इतिहास जर आपण पाहिला तर त्याचे तीन प्रकार दिसतात. स्वतंत्र असणारीं संस्थानें एकत्र येतात व त्यांचा संघ निर्माण होतो; किंवा एकसूत्री राज्यपद्धतींतून ही घटना जन्माला येते, अथवा अमेरिकेसारखी कॉनफेडरेशनमधून संयुक्त घटना उदय पावते. फेडरेशन बनण्यास कारणें कोणतीं, मध्यवर्ती सत्ता व स्थानिक सत्ता यांचे अधिकार काय असावेत, त्यांत बदल करण्याची सत्ता कोणाला असावी वगैरे गोष्टींची चर्चा आपण केली. दोन कायदेमंडळांचें उद्दिष्ट काय,अमेरिकेच्या कॉन्फेडरेशनचें स्वरूप काय होतें वगैरे आपण बघितलें. यापुढें फेडरेशनपासून तोटे काय होतात व फायदे कोणते होऊं शकतात हें पहावयाचें आहे.

---

२

# फेडरेशनचीं वैशिष्ट्यें.

हिंदुस्थानवर लादली जाणारी संयुक्तघटना किती दोषपूर्ण आहे याची कल्पना येण्यास फेडरेशनचा अधिक विचार कर्तव्य आहे. फेडरेशनची पद्धत ही चांगली आहे यांत तर वाद नाहींच. पण तींतही दोष नाहींत असें समजण्याचें कारण नाहीं. पहिला व मोठा दोष म्हणजे एकाच देशांत दोन सरकारांचा अंमल सुरू होतो, हा आहे. ज्या देशांत फेडरेशन सुरू होतें तेथें लोकांना आपल्या प्रांतांतील सरकारचे हुकूम मानावे लागतात व मध्यवर्ती सरकारचेहि हुकूम मानावे लागतात. या दुहेरी हुकूम-बजावणीमुळें केव्हां केव्हां लोकांचा छळ होतो. जेव्हां या दोन सत्ता परस्परविरोधी होतील, तेव्हां तर लोकांना कोणाचें ऐकावें व कोणाचें ऐकूं नये असें झाल्याशिवाय रहाणार नाहीं. ही वेळ केव्हां व कशी येईल ह्याची कल्पना देतां येत नाहीं. लोकांच्या सोईगैरसोईंचा प्रश्न आपण बाजूला ठेवूं; पण प्रांतिक व मध्यवर्ती सरकार यांच्यांत जर लढे लागले तर फारच गंमतीचा प्रकार अनुभवावयास मिळेल. पुष्कळ राजकारणविशारद म्हणतात कीं, प्रांतिक व मध्यवर्ती सत्तेचीं कार्यें व अधिकार यांची स्पष्ट वांटणी करून टाकली म्हणजे झालें. पण मानवी बुद्धीच्या पकडींतून कांहीं कांहीं बाबी निसटण्याचा संभव असतो व त्या वेळीं दोन सत्तेंत भांडणें होऊं लागतात. अमेरिकेंत विवाहाची बाब मध्यवर्ती

न ठेवतां स्थानिक ठेवल्यामुळें फार घोटाळे झाले आहेत. एखाद्या संस्थानांतील नियमाप्रमाणें वधूवरांचें लग्न झालें असलें तरी दुसऱ्या संस्थानांत तेच पतिपत्नी गेले व तेथें लग्नाचे नियम निराळे असले म्हणजे त्यांना पुन: लग्न तरी लावावे लागेल, नाहींतर पतिपत्नींचा संबंध हा व्यभिचारी संबंध ठरून त्यांची संतति अनौरस तरी समजली जाईल. विवाह ही मध्यवर्ती बाब ठरवावी म्हणून अमेरिकेचे लोक सारखे आक्रोश करीत आहेत. एकाच पुरुषाला जर दोन संस्थानांत रहावयाचें असेल तर त्याला दोन लग्नें तरी करावीं लागतात किंवा दोनदां तरी लग्नें करावीं लागत असावींत. मद्यपानबंदीच्या बाबतींत तेथें असाच प्रकार होई. एका संस्थानांत मद्यबंदी तर दुसऱ्या संस्थानांत मद्यपानास परवानगी. मध्यवर्ती सत्तेकडून जर प्रांतांत एकसूत्री धोरण ठेवण्याविषयीं योग्य असें मार्गदर्शकत्व मिळालें नाहीं तर स्थानिक राज्यकारभारांत बजबजपुरी माजते आणि कांहीं प्रांत पुढें जातात व कांहीं मागें पडतात. ज्या देशांत पक्ष अगर जातिविशिष्ट राजकारणें चालतात, तेथें तर कधीं गंमतीचे व कधीं संतापजनक प्रकार आढळून येतात. तेव्हां अनेक प्रांतांच्या एकीकरणास संयुक्त राज्यघटनापद्धति जरी आवश्यक वाटली तरी प्रांताप्रांतांत समान धोरण अगर सलोखा नसेल किंवा परस्परांना मुद्दाम विरोधी असें धोरण स्वीकारावयास प्रोत्साहन दिलें जाईल, तर त्यांच्यांत उच्चनीचता उत्पन्न होईल व लढेहि होतील. स्थानिक सरकारला संपूर्ण स्वातंत्र्य देणें अपरिहार्य असल्यामुळें संयुक्त राज्यघटना नसतांहि ही उच्चनीचता अगर मागासलेपणा व पुढारलेपणा उत्पन्न होतो हें खरें आहे. पण मध्यवर्ती सत्ता व तिचे घटक यांच्यांत मध्यवर्ती सत्तेकडून जर वितुष्ट वाढविलें जाईल तर संयुक्त

राज्यघटनेचा कारभार हा मोडकळीस येईल किंवा हे घटक परस्परांत भांडत राहून राष्ट्रांत अशांततेचें वातावरण कायम ठेवतील. तेव्हां संयुक्त राज्यघटनेंत प्रांताप्रांतांत सलोखा असावा लागतो आणि मध्यवर्ती सत्ता व प्रांत यांच्यांतहि सलोखा असावा लागतो. असा सलोखा नांदेलच अशी खात्री फेडरेशनमध्यें नसते आणि परतंत्र राष्ट्रांत तर प्रांताविरुद्ध प्रांत लढविण्याचे प्रयत्न होत नाहींत, अगर होणार नाहींत हें कोणी सांगूं शकणार नाहीं.

राजनिष्ठा ही एकच असू शकते. पण फेडरेशनमध्यें दोन सरकार असल्यामुळें प्रांतिक सरकारलाहि राजनिष्ठ रहावयाचें व मध्यवर्ती सरकारलाहि राजनिष्ठ रहावयाचें हा कठीण खेळ खेळावा लागतो. कधीं कधीं प्रांतिक राजनिष्ठेपुढें अखिलदेशीय राजनिष्ठा ही कमी पडते, त्यामुळें सगळें राष्ट्र उन्नत होऊं शकत नाहीं.

मध्यवर्ती सत्तेकडून प्रांतांना व प्रांतांकडून मध्यवर्ती सत्तेला अडथळा होण्याचे कसे संभव आहेत हें एकेक उदाहरण घेऊन दाखवतां येईल. त्याचप्रमाणें प्रांत प्रांताविरुद्ध कसें भांडतील हेंहि सोदाहरण पाहूं. स्वदेशी धंद्यांना प्रोत्साहन द्यावयाचें असें स्थानिक घटकांनीं ठरविलें असें समजूं. मध्यवर्ती सत्तेकडे रेल्वेचा कारभार आहे व हे रेल्वे अधिकारी जर स्वदेशीचे पुरस्कर्ते नसतील तर स्वदेशी मालाच्या वहातुकीला ते सवलत देणार नाहींत. आमचे बजेट जमत नाहीं अशी ते कधीं खरी व कधीं खोटी तक्रार सांगतील. प्रांताकडून मध्यवर्ती सत्तेची कशी अडवणूक होऊं शकेल तेंहि आपण पाहूं. परराष्ट्रीय खातें हें मध्यवर्ती सत्तेच्या ताब्यांत असल्यामुळें त्यांनीं एखादें युद्ध पुकारलें अगर परदेशांत युद्ध झालें आणि

स्थानिक संस्थांनीं या युद्धाकरतां माणसें दिलीं नाहींत किंवा युद्धाचे कर्जरोखे खरेदी करण्याकरितां खुषीची सक्ती केली नाहीं तर मध्यवर्ती सत्ता कमकुवत होईल व त्या राष्ट्राचें भवितव्य कठीण होईल.

प्रांताप्रांतांत सलोखा व एक धोरण नसलें तर असाच अनवस्था प्रसंग उद्भवेल. चार प्रांतांत साखर होते असें आपण समजूं. या चार प्रांतांपैकीं, एखाद्या प्रांताला सवलत द्यावयाचें दुसऱ्या एखाद्या प्रांतानें ठरविलें तर बाकीचे तीन प्रांत त्या साखर तयार करणाऱ्या व तेथील साखर विकत घेणाऱ्या प्रांताचे शत्रू बनतील आणि प्रांताप्रांतांत गट बनूं लागतील. हीं उदाहरणें फक्त औद्योगिक स्वरूपाचीं आहेत. जातीय अगर धार्मिक स्वरूपाचे प्रश्न घेतल्यास बरेच अनर्थ माजण्याचा संभव आहे असें आढळून येईल. पण असल्या उदाहरणांमुळें संयुक्त राज्यघटनेचा प्रयोग करूं नये असें मात्र नाहीं.

ज्या देशांत भिन्न भिन्न संस्कृतींचे व भिन्नभिन्न धर्मांचे लोक असतात, त्या देशांत फेडरेशनशिवाय गत्यंतरच नसतें. भिन्नभिन्न संस्कृतीच्या लोकांना आपल्याला स्वतंत्र सत्ता असावी असें वाटत असतें. त्यांत कांहीं अल्पमतवाले असतात व बाकीचे बहुमतवाले असतात. त्यामुळें दोघांचीहि कुचंबणा होते. कानडांत असेंच झालें. तेथें फ्रेंच व इंग्रज हे एकसूत्री राज्यपद्धतीखालीं अनेक वर्षे नांदत होते. पण त्यांच्यांत समतोलपणा राखणें अशक्य होऊं लागलें. हा समतोलपणा राखण्याचे पुष्कळ कृत्रिम प्रयत्न करण्यांत आले. दोन्ही जातींची लोकसंख्या जरी सारखी नव्हती, तरी त्यांना सारखे प्रतिनिधी वांटून दिले होते. त्याचप्रमाणें कोणतें मंत्रिमंडळ असावें या विषयाचा निर्णय फ्रेंच प्रतिनिधींच्या

गटाचीं निराळीं मतें घेऊन ठरवीत. जोंपर्यंत इंग्रज लोक तेथें अल्पसंख्याक होते, तोंवर त्यांना जादा प्रतिनिधित्व मानवलें. पण पुढें त्यांची लोकसंख्या वाढत गेली व ते म्हणूं लागले कीं, आपण अल्पसंख्याक फ्रेंचांचा जुलूम सहन करणार नाहीं. त्यामुळें लोकसंख्येच्या प्रमाणांत त्यांनीं प्रतिनिधींची मागणी केली. इंग्रजांचें कायमचें बहुमत होईल व ते आपल्यावर कायमचें राज्य करतील असें फ्रेंचांना वाटूं लागलें. त्यामुळें आपल्या संस्कृतीचें रक्षण कसें होणार असें त्यांनीं विचारलें. अशा परिस्थितींत फ्रेंचांना एक स्वतंत्र प्रांत द्यावा व तेथें त्यांना संपूर्ण स्वातंत्र्य द्यावें असें ठरूं लागलें. सुदैवानें क्वेबेकमध्यें त्यांचीच वस्ती होती. इंग्रजांना दुसरे प्रांत देण्यांत आले व दोघांच्या हितरक्षणाकरतां मध्यवर्ती सत्ता स्थापण्यांत आली. तेव्हां ज्या देशांत निरनिराळ्या धर्मांचे व संस्कृतींचे लोक असतात, त्यांच्या पूर्ण वाढीकरतां त्यांना अन्तर्गत कारभारांत स्वातंत्र्य देणें आवश्यक असतें. फेडरेशन हें याच-करितां उपयुक्त ठरतें.देश मोठा असला व त्यांत निरनिराळ्या प्रवृत्तीचे व संस्कृतीचे लोक असले म्हणजे त्यांच्या उत्कर्षाकरितां सत्तेची अशी विभागणी करणें भाग पडतें.

संयुक्त राज्यघटनेमध्यें वेगवेगळ्या लोकांचें एकीकरण करण्याची शक्ति आहे. या सर्व घटकांना आपले हितसंबंध सुरक्षित आहेत अशी खात्री वाटूं लागते व ते सुखानें नांदू लागतात. व्यक्तिमात्राची राष्ट्रनिष्ठा ही भिन्न स्वरूपाची असूं शकते. ती व्यक्ति एकाच वेळीं दोन संस्थांची सभासद होऊं शकते व स्वतःचें भिन्नत्व कायम ठेवूनहि एकत्वाची वाढ करूं शकते. जातिनिष्ठा कायम ठेवूनहि एकराष्ट्रीयत्वाची वाढ करणें ही गोष्ट कागदावर लिहावयास जरी सोपी

असली तरी प्रत्यक्ष आचरणांत चांगलीच कसोटी पहाणारी आहे. जीवितासंबंधीं ज्यांचा विशिष्ट दृष्टिकोण आहे, ज्यांची संस्कृति, धर्म, आचारव्यवहार भिन्न आहेत, त्यांना एकत्र आणणें व त्यांच्यामध्यें एकराष्ट्रीयत्व निर्माण करणें हें फेडरेशनला कठीण काम करावें लागतें. अनेकांमध्यें एकत्व स्थापणें हें फेडरेशनचें ध्येय असतें.

बहुमतवाल्यांच्या जुलुमाला संयुक्त राज्यघटनेंत आळा घातला जातो. जर सबंध राष्ट्रांत एकच राज्यसंस्था असेल व तेथें एकाच जातीचें बहुमत असेल, तर अल्पसंख्यांकांना वर तोंड काढण्यास कधींच सांपडणार नाहीं. देशाच्या दृष्टीनें ते अल्पसंख्याक असले तरी प्रांताच्या दृष्टीनें ते ते कोठेंकोठें बहुसंख्याक असूं शकतात. त्यामुळें देशाच्या दृष्टीनें अल्पसंख्यांक पण प्रांताच्या दृष्टीनें बहुसंख्यांक असलेले हे लोक अशी तक्रार करूं शकत नाहींत कीं, आपल्यावर बहुसंख्याकांचा जुलूम होत आहे.

फेडरेशनमध्यें एक फायदा असा असतो कीं,त्याचे घटक लहान लहान असल्यामुळें त्यांना आर्थिक, औद्योगिक, सामाजिक वगैरे बाबतींत प्रयोग करतां येतात. हे प्रयोग अयशस्वी झाले तरी त्यांचे राष्ट्रावर परिणाम होत नाहींत. अवाढव्य देशांत एखादा नवा प्रयोग करणें जवळजवळ अशक्यच असतें. तो प्रयोग करावयाचा ठरविलें तरी त्याकरतां दीर्घ काळ लागतो व कमालीची सावधगिरी घ्यावी लागते. पण सुटसुटीत प्रांतिक गटांत असे प्रयोग सुलभतेनें करतां येतात व ते फसले तरी त्याचे परिणाम फार मोठ्या समुदायाला भोगावे लागत नाहींत.

संयुक्त राज्यघटनेचा विशेष म्हणजे सुटसुटीतपणा. अवाढव्य राज्य असलें कीं, तेथील कारभार तुंबून रहातो. तशी स्थिति फेडरेशनचे घटक लहान असल्यामुळें होत नाहीं. वर्ग लहान असला म्हणजे विद्यार्थी व प्रोफेसर यांचा निकट संबंध येतो व शिक्षणही चांगलें मिळतें. त्याच्या उलट मोठया वर्गाला सार्वजनिक व्याख्यानाचें स्वरूप येतें व शिक्षक आणि शिक्षित यांचा संबंध कधींच येत नाहीं. संयुक्त राज्यघटनेचे घटक हे छोटे छोटे असल्यामुळें तेथें परस्पर परस्परांविषयीं अधिक जागरूक असतात. ह्यापासून फायदे जसे होतात, तसे तोटेंहि होतात. जुलमी कारभार जर तेथें चालू असेल तर दडपशाहीला रान मोकळें सांपडतें आणि लोककल्याणकारक कारभार असला तर वैयक्तिक गाऱ्हाण्यांकडे सुद्धां लक्ष पुरवितां येतें. अफाट राज्यविस्तारांत स्थानिक नोकरशाही नंगा नाच घालूं शकते. लोकांचीं दुःखें सरकारला कधीं कधीं कळणेंच अशक्य होतें. पण राज्य लहान असलें म्हणजे नोकरशाही ही मालकशाही न बनतां फक्त नोकर म्हणून राहूं शकते. लहान घटकामुळें लोकांना राज्यकारभाराचें शिक्षण सुद्धां मिळूं शकतें. अनेक लोकांना प्रतिनिधि म्हणून जातां येतें व लोकांनाहि राज्य आपलें आहे असें वाटूं शकतें. लोकशाहीमध्यें असणारे दोष हे सर्वत्र सारखेच असतात. ते मोठया राज्यांत नसतात व छोटया राज्यांत असतात असें नाहीं. पण छोटें राज्य असलें म्हणजे ढोंगी लांचलुचपती देणारे व घेणारे प्रतिनिधी हुडकून काढतां येतात व त्यांच्यावर नियंत्रणहि घातलें जातें. राज्यकारभाराला शुद्धता येण्याकरतां व लोकशाहीचें शिक्षण मिळण्याकरतां फेडरेशनचा चांगला उपयोग होतो यांत शंका नाहीं. लोकांचे

प्रतिनिधी हे खरे समाजसेवक असतील तर तेथें आदर्श राज्य निर्माण करतां येईल. अशा प्रकारें फेडरेशनमध्यें कांहीं तोटेहि आहेत व कांहीं इष्ट अशा गोष्टीहि आहेत. ज्या ज्या देशांत फेडरे-शन्स आहेत, त्या त्या देशांची प्रगति चांगली झाली आहे व ती झपाटयानें झाली आहे असें इतिहासावरून दिसून येतें.

---

# ३

# कांहीं फेडरेशन्स.

हिंदुस्थानच्या फेडरेशनकडे वळण्यापूर्वी आपण प्रथम जगांतील कांहीं फेडरेशन्सचा थोडक्यांत परिचय करून घेऊं. जगांत एकंदर पांच मोठीं, व चार लहान फेडरेशन्स आहेत आणि रशियांतहि एक फेडरेशन आहे. या सर्व फेडरेशन्समध्यें स्वित्झर्लंडचें फेडरेशन नमुनेदार समजण्यांत येतें. १२९१ मध्यें फक्त तीन डोंगराळ जिल्ह्यांनीं हें फेडरेशन बनविलें. पुढें त्यांत इतर विभाग सामील झाले व आजतागायत तें फेडरेशन चालू राहिलें आहे.

स्वित्झर्लंडच्या फेडरेशनमध्यें मध्यवर्ती सत्तेचीं दोन कायदे-मंडळें आहेत. एकाला नॅशनल कौन्सिल म्हणतात व दुसऱ्याला कौन्सिल ऑफ् स्टेट म्हणतात. नॅशनल कौन्सिलच्या निवडणुका प्रत्यक्ष होतात. २२००० लोकसंख्येला एक प्रतिनिधी हें प्रमाण असतें व प्रतिनिधींच्या संख्येला मर्यादा नाहीं. ह्या निवडणुका प्रमाणशीर पद्धतीनें होतात. २० वर्षांवरील प्रत्येक नागरिकाला मताचा अधिकार असतो. मात्र स्त्रियांना व भिक्षुकांना मताधिकार नाहीं. या कौन्सिलचें आयुष्य चार वर्षें असतें. त्याचा अध्यक्ष व उपाध्यक्ष हा प्रत्येक बैठकीला निराळा असावाच लागतो. सभा-सदांना कांहीं भत्ता मिळतो. हें कायदेमंडळ आपले अधिकारी निवडतें, तह व तडजोडी करतें, परराष्ट्रीय कारभार सांभाळतें,

प्रांताप्रांताचीं भांडणें तोडतें, अंतर्गत सुव्यवस्था राखतें, कैद्यांना माफी देतें, सैन्य ठेवतें, व न्यायनिवाडा करतें.

दोन्ही कायदेमंडळांनीं पास केल्याशिवाय कोणताहि कायदा तेथें अंमलांत येत नाहीं. पण ८ परगण्यांनीं किंवा ३०००० नागरिकांनीं अर्ज केल्यास हे कायदे अंमलांत आणावेत कां आणू नयेत याबद्दल मतगणना करावी लागते. तीन कारणांकरतां दोन्ही गृहांच्या जोडबैठकी होतात. १ फेडरल अधिकारी निवडणें २ गुन्हेगारांना दया दाखवणें ३ अधिकारमर्यादेची भांडणें तोडणें. दोन्ही गृहांना स्वतंत्रपणें कायद्यासंबंधीं ठराव आणतां येतात. खालून येणाऱ्या कायद्यांची छाननी करणें एवढेंच काम वरिष्ठ मंडळाला नसतें. मात्र बजेट हें खालच्या गृहांतच सादर करावें लागतें. जर्मन, फ्रेंच व इटालिअन ह्या तीनहि भाषांना सरकार दरबारीं मान्यता आहे.

वरिष्ठ गृहांतील सभासदांची संख्या ४४ आहे. खालच्या गृहाची संख्या अनियमित असते. कारण लोकसंख्येवर त्या गृहाचें प्रतिनिधित्व अवलंबून असतें. ती संख्या सुमारें १९० आहे. वरच्या कायदेमंडळांत सभासद कसें पाठवावयाचें हें ठरविण्याचें काम प्रत्येक कँटनचें म्हणजे जिल्ह्याचें आहे. जिल्हा केवढाहि असला तरी दोनपेक्षां जास्त प्रतिनिधी त्यांला निवडतां येत नाहींत. ७ जिल्हे आपल्या स्थानिक सरकारतर्फे हे प्रतिनिधी पाठवितात व बाकीच्या जिल्ह्यांतून निवडणुका होतात. या प्रतिनिधींचा भत्ता स्थानिक राज्यसंस्था देतात. त्यांच्यावर अमुकच मत दिलें पाहिजे अशी सक्ति नसते. अध्यक्ष उपाध्यक्षासंबंधीचे सर्व नियम खालच्या गृहाप्रमाणेंच असतात. पण त्याशिवाय आणखी एक बंधन या मंडळावर आहे. दोन लागोपाठच्या बैठकांना एकाच जिल्ह्याचा अध्यक्ष

निवडतां येत नाहीं. ह्या वरिष्ठ गृहामुळें सारखेपणा रहातो अशी लोकांची समज असल्यामुळें लोक तें गृह रद्द करूं देणार नाहींत.

जिल्ह्यांतील छोटीं छोटीं राज्यें ही संयुक्त घटनेचीं घटक आहेत. या जिल्ह्यांतून मध्यवर्ती सत्तेला अमुक कायदे करा, असें लिहून कळविता येतें. मध्यवर्ती कायदेमंडळाला कायदे करण्यापेक्षां कायद्यांची अंमलबजावणीच फार करावी लागते. त्यांच्या कायद्यांवर लोकांचें नियंत्रण कसें असतें तें वर सांगितलेंच आहे. लोकांना नवा कायदा नको असला तर तीन महिन्यांच्या आंत ३०००० सह्या करून अर्ज पाठविला कीं, सगळ्या स्वित्झर्लंडमधील लोकांचीं मतें घेतलीं जातात. या विशिष्ट पद्धतीमुळें तेथें सत्ता लोकांच्या हातीं आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. तेथील वरिष्ठ गृह हें खरोखर वरिष्ठ नाहीं. एक तर त्याचा मतदारसंघ ७ जिल्हे वगळून खालच्या गृहांचाच असतो आणि दुसरें, दोन गृहांत मतभेद झाल्यास वरिष्ठ गृहाचें म्हणणें मान्य करावें असें कोठें सांगितलेलें नाहीं. किंबहुना दोन गृहांत जर भिन्न भिन्न मतें झालीं तर काय करावें याची योजनाहि कायदेपुस्तकांत नाहीं. स्वित्झर्लंडची फेडरेशन नमुनेदार आहे असें म्हणण्यास काय कारणें आहेत हें वरील विवेचनावरून दिसून येईल.

## जर्मन फेडरेशन.

आतां आपण जर्मनीच्या फेडरेशनकडे वळूं. जर्मनीची फेडरेशन कशी जन्म पावली हें पहिल्या भागांत सांगितलेंच आहे.

जर्मनीचे राईशस्टाग हें लोकप्रतिनिधींचें बनलेलें आहे. त्यांची निवडणूक सर्व स्त्रीपुरुषांकडून प्रमाणशीर गुप्त मतदानपद्धतीनें

होते. २० वर्षांवरील प्रत्येकाला मतांचा अधिकार असतो. राईश-स्टागचें आयुष्य चार वर्षांचें असतें. राईशच्या सभासदाला जर्मनींतील सर्व रेल्वेंवर फुकट प्रवास करतां येतो. त्यांना भत्ताहि मिळतो. राईशराट हें दुसरें कायदेमंडळ तेथें आहे. त्याला वरिष्ठ गृह म्हणावयास हरकत नाहीं. जर्मनींतील प्रत्येक संस्थानाचा निदान एक प्रतिनिधी या गृहांत असतो. मोठ्या संस्थानांत ७ लाखाला एक प्रतिनिधी हें प्रमाण असतें. राईशस्टागमध्यें एखादें बिल आणावयाचें असेल तर त्याला प्रथम राईशराटची संमति लागते. ही संमति जर मिळाली नाहीं, तर त्याबद्दलचीं कारणें फक्त नमूद करून राईशस्टागमध्यें बिल आणतां येतें. राईशराटनें एखादें बील पास केलें व जर सरकारनें तें अमान्य केलें तर तें राईशस्टागमध्यें मांडावें लागतें व सरकारला नापसंतीचीं कारणें द्यावीं लागतात.

लोकांना अमुक एक कायदा आपल्याला पाहिजे असें सांगण्याचा अधिकार आहे. जर मतदारांपैकीं एक-दशांश लोकांनीं आपल्याला अमुक कायदा पाहिजे असे लेखी कळविलें तर तो सरकारच्या निवेदनासह राईशस्टागमध्यें मांडावा लागतो. राईशनें तो पास केला तर ठीक, नाहींतर पुनः तो लोकांकडे मान्यतेकरतां पाठवावा लागतो.

राईशस्टाग व राईशराट यांच्यामध्यें एखाद्या बिलाबद्दल दुमत झालें तर तें बिल लोकांच्या संमतीकरतां पाठवावें लागतें. निम्मे मतदार जर त्यावर मतें नोंदतील तरच तें बिल पास किंवा नापास होऊं शकतें.

जर्मनीची राज्यघटना ही कायद्यानें बदलतां येते व हा हक्क दोन्ही गृहांना असतो. मात्र घटना बदलतांना $\frac{2}{3}$ सभासद हजर

असावे लागतात व त्यांच्यापैकीं $\frac{2}{3}$ सभासदांनीं अनुकूल मतें द्यावीं लागतात. लोकांनाहि ही घटना बहुमतानें बदलतां येतें.

जर्मनीची राज्यघटना ही अशाप्रकारें पूर्णपणें लोकसत्ताक आहे. मतदारांना आपल्या बहुमतानें वाटेल ते कायदे करून घेतां येतात. मध्यवर्ती सत्तेच्या हातांत बरीच सत्ता असल्यामुळें कांहींजण त्या घटनेला संयुक्त घटना म्हणावयास तयार नाहींत. संयुक्त घटनेमध्यें येणाऱ्या घटकांचे कायदे बदलण्याची सत्ता मध्यवर्ती कायदेमंडळाच्या हातीं असल्यामुळें जर्मनीची राज्यपद्धत फेडरल नाहीं असें म्हटलें जातें. पण तें बरोबर नाहीं. लोकांच्या हातीं प्रचंड सत्ता असल्यामुळें सारें आक्षेप फोल ठरतात.

जर्मनीच्या राज्यघटनेंत कांहीं विशिष्ट गोष्टी आहेत, त्या पाहिल्या पाहिजेत. जर्मनीचा चॅन्सेलर व मंत्री हे तेथील राईशस्टागचे सभासद नसतात. पण त्यांना तेथें जातां येतें, चर्चेत भाग घेतां येतो व आपली बाजू मांडतां येते. त्याचप्रमाणें स्टेट्सचे प्रतिनिधिसुद्धां राईशमध्यें जाऊं शकतात व आपलें म्हणणें सांगूं शकतात.

जर्मनींत वास्तविकपणें दोन कायदेमंडळें नाहींत. राईशस्टाग हेंच एकटें कायदेमंडळ आहे. अध्यक्ष, राईशराट व लोक यांना विशिष्ट हक्क आहेत. पण ते संरक्षक हक्क आहेत. खरी सत्ता एकट्या राईशस्टागची आहे. राईशचे जवळजवळ ६०० प्रतिनिधी आहेत व हे प्रतिनिधी निरनिराळ्या संस्थानांतून लोकांच्या संख्येप्रमाणें निवडून येतात.

राईशराटला जरी वरिष्ठ मंडळ म्हणतात तरी त्याला इतर देशांत असणारें स्थान अगर महत्त्व नाहीं. या मंडळाचे सभासद हे स्टेटचे प्रतिनिधी असतात व ते जो पक्ष तेथें अधिकारारूढ असेल

त्याप्रमाणें बदलतात. एक संस्थान एकच प्रतिनिधी पाठवील, पण मतें मोजतांना त्या संस्थानाला जितके प्रतिनिधी पाठविण्याचा हक्क असेल तितकीं मतें मोजावीं लागतात. ७ लाखांला एक प्रतिनिधी हें प्रमाण असलें तरी कोणत्याही संस्थानाला एकंदर सभासद-संख्येच्या २/५ पेक्षां जास्त प्रतिनिधी पाठवितां येत नाहींत. प्रशियाची लोकसंख्या ३ कोट ८० लाख आहे. पण त्यांना ५० प्रतिनिधी पाठवितां येत नाहींत. साऱ्या राईशराटचे सभासद ६६ असतात. त्याच्या २/५ म्हणजे २६ सभासद प्रशियाचे घेतले जातात.

राईशराटला बरीच अंमलबजावणीचीं कामें करावयाचीं असतात. पेन्शन, जकाती, पैसे वगैरे बाबतींत त्यांना कांहीं कांहीं कामें वांटून दिलीं आहेत. अधिकाऱ्यांच्या नेमणुका, न्यायनिवाडे वगैरेंबद्दल त्यांच्याकडे कामें असतात. जर्मनींत एक विशिष्ट मंडळ आहे. त्याला नॅशनल एकॉनॉमिक कौन्सिल म्हणतात. हें मंडळ सरकारला सामाजिक व आर्थिक बाबतींत सल्ला देतें. त्यांत ३२६ सभासद असतात व ते निरनिराळ्या व्यवसायांतून निवडले जातात. सरकारहि कांहीं नेमणुका करतें. उद्योगधंदे, आर्थिक प्रश्न वगैरेंत ह्या मंडळाचा सल्ला घेतला जातो.

जर्मनीची राज्यघटना ही अशा प्रकारची आहे. आज हिटलरच्या कारकीर्दींत तिचें प्रातिनिधिक स्वरूप लुप्त झालें आहे व तेथें सुलतानशाही सुरू आहे हें खरें. पण लोकांच्या हातांत राज्यकारभाराचीं सूत्रें असणें, त्यांना कायदे वगैरे करण्याचे अधिकार देणें आणि घटकसंस्थानांना स्वातंत्र्य असणें ह्या बाबी जर्मनीच्या संयुक्त राज्यघटनेंत सांपडतात.

## अमेरिकेची संयुक्त घटना.

फेडरेशनचे कायदे करण्याची सर्व सत्ता अमेरिकेच्या कॉंग्रेसला दिलेली आहे. या कॉंग्रेसचीं दोन मंडळें असतात. एकाला सेनेट व दुसऱ्याला प्रतिनिधिगृह म्हणतात. प्रतिनिधिगृहाची निवडणूक तेथील संस्थानाकडून दर दोन वर्षांनीं होते. हे प्रतिनिधी २५ वर्षे वयाचे, संस्थानांतील रहिवासी व अमेरिकेंत सात वर्षे तरी नागरिक म्हणून रहात असलेले असावे लागतात.

सेनेटगृह हें प्रत्येक संस्थानचे दोन दोन सभासद निवडून बनविलें जातें. त्यांची निवडणूक ६ वर्षांनीं होते. सेनेटर्सचें वय ३० असावें लागतें व ते अमेरिकेंत ९ वर्षे रहात असावें लागतात. संस्थानांत त्यांचे वास्तव्य अवश्य लागते. अमेरिकेच्या संस्थानाचा उपाध्यक्ष हा सेनेटचा अध्यक्ष असतो.

कॉंग्रेसची बैठक डिसेंबरच्या पहिल्या सोमवारीं व्हावी असा शिरस्ता आहे. ही कॉंग्रेसची बैठक म्हणजे दोन सभागृहांची बैठक होय. कर बसविण्याचें बिल हें प्रतिनिधिगृहांत प्रथम मांडावें लागतें. दोन्ही गृहांकडून पास झालेलें बिल अध्यक्षाच्या संमतीकरतां पाठवावें लागतें. त्याची सही झाली कीं, तो कायदा होतो. पण त्यानें सही केली नाहीं कीं, ज्या गृहांत तें बिल पास होतें, त्याकडे फेरविचाराकरतां येतें. फेरविचारांत जर ⅔ सभासदांनीं त्याला मान्यता दिली तर तें पुनः दुसऱ्या गृहांत जातें व तेथेंहि मान्यतेला तितकींच मतें लागतात. मग मात्र त्याला कायद्याचें स्वरूप येतें.

प्रतिनिधिगृह हें खालचें व सेनेट हें वरचें गृह आहे. ह्या दोन्ही गृहांच्या निवडणुका कशा कराव्या हें त्या त्या संस्थानावर

सोंपविलें जातें. अमेरिकेंत निग्रो असल्यामुळें त्यांना मताधिकार मिळूं नये म्हणून कांहीं संस्थानांत शिक्षणविषयक घोटाळ्याची लायकी मतदानाकरतां ठेवली आहे. प्रतिनिधिगृहांत ४३५सभासद असतात व त्यांची वांटणी लोकसंख्येच्या प्रमाणावर केलेली असते. न्यूयॉर्कच्या वांटणीला ४३ सभासद यामुळें आले आहेत. या ४३५ सभासदांशिवाय फेडरल विभाग म्हणून तेथें आहेत. ह्या विभागांतून वरील पद्धतीनेंच प्रतिनिधी पाठविले जातात पण त्यांना मताधिकार नसतो. प्रत्येक संस्थानाला एकेक गव्हर्नर असतो व प्रतिनिधी आपले राजीनामे, गृहाच्या अध्यक्षाकडे न देतां या गव्हर्नर-कडे देतात. या गृहाचा अध्यक्ष हा इतर देशांप्रमाणें पक्षातीत नसतो. तो विशिष्ट पक्षाचा म्हणून स्वतःला म्हणवून घेतो. कांहीं वर्षांपूर्वी या अध्यक्षाच्या हातीं निरनिराळ्या नेमणुका करण्याची सत्ता होती. त्यामुळें तो आपल्या पक्षाच्या लोकांनाच नेमीत असे. पण अलीकडे ही पद्धत बंद झाली आहे. त्या नेमणुका निवडणुकांनीं होतात.

कायदे करण्याची तेथील पद्धत विशेष लक्ष वेधण्यासारखी आहे. सभागृहांतील प्रतिनिधींच्या एकंदर ६० कमिटया आहेत व या कमिटयांकडे निरनिराळे विषय वांटून दिले आहेत. ह्या कमिटयांनीं कायदे करावयाचे असतात, बिलें आणावयाचीं असतात व बाहेरून आलेल्या बिलांची छाननी करावयाची असते. ह्या प्राथमिक प्रक्रियेनंतर बिलाचें वाचन सभागृहापुढें होतें. या योजनेमुळें काम झटपट उरकतें व त्याला पूर्णावस्था येते. पैशाचा पुरवठा करणारी एक कमिटी असते. त्या कमिटीकडे अनेक खात्यांकडून पैशाच्या मागण्या येतात व त्या पुरवाव्या लागतात. सत्तेचें केंद्रीकरण

एखाद्या मंडळाच्या हातीं नसल्यामुळें कधीं पैशाचा पूर लोटतो तर कधीं दुष्काळ पडतो.

प्रतिनिधिगृहाकडे फक्त कायदे करण्याचें काम असतें. त्यांना अध्यक्षांची निवडहि कधींकधीं करावी लागते. अध्यक्षाच्या निवडणुकीकरतां जो मतदारसंघ असतो, त्यांचीं ठराविक मतें पडलीं तरच अध्यक्ष त्याच्याकडून निवडला जातो. नाहींतर पहिल्या तीन उमेदवारांची निवड हें गृह करतें. प्रतिनिधिगृहांतील कमिटया या फार महत्त्वाच्या व सत्ताधिकारी असतात. सेनेट हें प्रतिनिधिगृहापेक्षां जास्त महत्त्वाचें काम करतें. अंमलबजावणीचें काम सेनेट व अध्यक्ष करीत असतो. परराष्ट्रीय घडामोडी, तहनामे वगैरे सेनेटच करते. त्यांच्या हातीं बरीच सत्ता असल्यामुळें कसलेले मुत्सद्दी आयुष्याच्या शेवटीं सेनेटर्स होतात अगर होण्याची महत्त्वाकांक्षा बाळगतात. या सेनेटचे ९६ सभासद असतात. अमेरिकेंतील ४८ संस्थानें प्रत्येकीं दोन असे सेनेटर्स निवडतात. या समानतेमुळें अमेरिकेच्या राज्यघटनेला फेडरेशनचें स्वरूप प्राप्त झालें आहे. हे सेनेटर्स मतदानाबद्दल आपल्या मतदारसंघाला बांधलेले नसतात. या सेनेटगृहाएवढें लहान गृह दुसऱ्या देशांत नाहीं.

अमेरिकेची घटना ही सत्तेच्या विभक्तीकरणावर बसविलेली आहे. त्यामुळें तेथील कॉंग्रेस ही सर्वसत्ताधीश नाहीं. सेनेट हें कार्यकारी स्वरूपाचें आहे पण तेंहि अध्यक्षाच्या अधिकारावर नियंत्रण घालीत असतें. या सेनेटवरहि बरेंच नियंत्रण असतें. त्यामुळें अमेरिकेचा कारभार हा फार बोजड झाला आहे असें म्हणतात. तथापि परस्परांच्या परस्परांवरील नियंत्रणामुळें अन्यायाला फारशी जागा रहात नाहीं.

अशा प्रकारें अमेरिकेंत सत्तेची भरपूर विभागणी केलेली आहे आणि सर्व संस्थानांना समान प्रतिनिधित्व दिलेलें आहे. त्यामुळें अमेरिकेच्या फेडरेशनपासून पुष्कळ देशांनीं आपल्या घटना बनविल्या आहेत.

वसाहतीमध्यें असलेल्या फेडरेशन्सची कल्पना भूमिकेंत दिली आहे. त्याची पुनरुक्ती करण्याची अवश्यकता नाहीं.

कानडाच्या राज्यघटनेवर जशी ब्रिटिशांच्या प्रातिनिधिक संस्थांची छाया पडली आहे तशी ऑस्ट्रेलियाच्या राज्यघटनेवर अमेरिकेच्या फेडरेशनची छाया पडली आहे. त्यामुळें ऑस्ट्रेलियाची राज्यघटना ही अधिक प्रातिनिधिक वाटते. याशिवाय ब्राझिल, व्हेनीझुएला, अर्जेंटाईन आणि मेक्सिको येथेंहि फेडरेशन्स आहेत. पण त्या लहान आहेत. जगांतील मुख्य मुख्य फेडरेशन्सची कल्पना येण्याकरतां वर माहिती दिली आहे. त्यावरून हिंदुस्थानच्या फेडरेशनमध्यें काय आहे व काय असावयास पाहिजे हें आपण अजमावूं शकूं. हिंदुस्थानच्या फेडरेशनमध्यें मुख्यतः स्वातंत्र्य नाहीं,त्यामुळें हिंदी फेडरेशनला नकलीपणा आला आहे. हा स्वातंत्र्याचा अभाव प्रत्येक कलमाकलमांत दृष्टिगोचर होतो. त्यामुळें हिंदी पारतंत्र्य हें जास्तच भेसूर वाटतें.

---

# ४

# फेडरेशनपूर्वी.

हिंदुस्थान हा इंग्रजांच्या पूर्ण मालकीचा देश आहे असें कागदोपत्रीं नमूद करण्यांत आलें आहे. ईस्ट इंडिया कंपनीनें हिंदुस्थानांतील मुलूख जिंकले व ते इंग्लंडच्या मालकीचे झाले. इंग्लंडच्या राजाकडे मोगल बादशहाची सर्व सत्ता गेली आणि येथील संस्थानिक इंग्लंडच्या राजाचे अंकित झाले. या संस्थानिकांबरोबर तह करून, करारनामे करून, त्यांना सनदा देऊन इंग्लंडच्या राजानें त्यांच्यावर आपली सत्ता स्थापन केली.

१८५७ च्या बंडापर्यंत हें मुलूख जिंकण्याचें काम सुरू होतें. लोकांना सनदशीर हक्क मागण्याइतकें धैर्य झालें नव्हतें किंवा त्यांच्यांत जागृतिही झाली नव्हती. पण कॉंग्रेसच्या स्थापनेनंतर राज्यकारभारांत आपल्याला वांटा मिळाला पाहिजे अशी जोरानें मागणी होऊं लागली. महायुद्धाचे ऐन गर्दीत २० ऑगस्ट १९१७ रोजीं बादशहानें एक जाहीरनामा प्रसिद्ध केला व त्यांत म्हटलें कीं, हिंदुस्थान हा ब्रिटिश साम्राज्याचा एक घटक असून त्याला क्रमशः जबाबदारीचें स्वराज्य मिळणें हें त्याचें ध्येय आहे. पुढें त्यावेळचे स्टेट सेक्रेटरी मि. मॉंटेग्यू हे हिंदुस्थानांत आले आणि नंतर १९१९ चा कायदा पास झाला. या कायद्यामुळें प्रांतांत दोहाती राज्यकारभार सुरू झाला व स्टेटसेक्रेटरीची सत्ता या सोपीव खात्यापुरती सैल झाली. १९१९ च्या कायद्यांत हिंदुस्थानला

वसाहतीचा दर्जा द्यावयाचा आहे असा उल्लेख नाहीं. १९२९ सालीं मात्र गव्हर्नर जनरलनें '१९१९ च्या कायद्यांतील प्रस्तावनेचा अर्थ वसाहतींचें स्वराज्यच आहे' असा केला ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे.*

१९१९च्या सुधारणानंतर जालियनवाला बागेंतील अमानुष अत्याचार झाले, खिलाफत प्रकरण पेटलें आणि म. गांधींच्या नेतृत्वाखालीं असहकारितेची चळवळ सुरू झाली. राष्ट्रांत स्वातंत्र्याबद्दल भयंकर आसक्ति उत्पन्न झाली आणि हिंदी माणूस हा असहकारितेच्या चळवळीमुळें दृढनिश्चयी, आत्मविश्वासी, स्वाभिमानी व स्वातंत्र्यप्रिय बनला. त्या वेळीं कायदेमंडळावर बहिष्कार घातला गेला. कॉंग्रेस ही अत्यंत प्रबळ व संघटित अशी संस्था झाली. म.गांधी, पं. मोतिलाल नेहरू, लाला लजपतराय, सी.आर. दास, महंमदअली, जवाहरलाल वगैरेंसारखे नेते हिंदुस्थानला लाभले आणि हिंदुस्थान हा आपल्या प्रखर राष्ट्रीय तेजानें तळपूं लागला. पं. मोतीलाल नेहरूंनीं मध्यवर्ती कायदेमंडळांत आपल्या बुद्धिवैभ-

*' In view of the doubts which have been expressed both in Great Britain and in India regarding the interpretation to be placed on the intentions of the British Government in enacting the statute of 1919, I am authorised on behalf of His Majesty's Government to state clearly that in their judgment, it is implicit in the Declaration of 1917 that the natural issue of India's Constitutional Progress as there contemplated is the attainment of Dominion Status '

**Lord Irwin.**

वानें, मुत्सद्दीपणानें आणि बिनतोड युक्तिवादानें हिंदुस्थानचेंच काय पण परक्यां देशांचे लक्ष आपल्याकडे खेचून घेतलें. म. गांधी हे तर आमच्या चळवळीचा अखंड स्फूर्तीचा तेजस्वी झराच होते. गांधींच्या शब्दावर तेव्हां राजकारणाचीं सारीं सूत्रें हालत होतीं. अहिंसेच्या गांधीप्रणीत तत्त्वज्ञानानें पददलीत हिंदुस्थान जगाच्या कौतुकाचा विषय झाला.

पण असहकारितेच्या चळवळींनंतर हिंदुस्थानांत जातिनिष्ठ विषारी चळवळ सुरू झाली. हिंदुमुसलमानांमध्यें दंगे होऊं लागले, जातिविशिष्ठ संस्था अस्तित्वांत आल्या आणि एकवटलेला हिंदुस्थान दुभंगला. पण ही अंतर्गत अशांतता राजकीय मागण्यांच्या आड येऊं शकली नाहीं. नव्या सुधारणावरील बहिष्कार उठल्यावर कायदेमंडळांतून व बाहेरून राजकीय हक्कासंबंधी नेटानें मागणी होऊं लागली. दहादहा वर्षांनीं हिंदुस्थानच्या परिस्थितीची पहाणी करावी व सुधारणांचे हप्ते द्यावे या १९१९ च्या कायद्यांतील योजनेची अंमलबजावणी करावी याबद्दल आग्रह धरण्यांत आला. शेवटीं लॉर्ड बर्कनहेडनीं १९२७ सालीं पार्लमेंटच्या सभासदांचें एक कमिशन सायमन साहेबांच्या अध्यक्षतेखालीं नेमलें. या कमिशनवर हिंदी लोकांना न घेतल्यामुळें त्यावर बहिष्कार कसा पडला, हिंदुस्थान कसा एकवटला, आणि सायमन साहेब हिरमुसले होऊन कसें गेले याची आठवण करून द्यावयास नको. त्यांनीं केलेल्या शिफारसी शेवटीं रद्दही करण्यांत आल्या. त्याच सुमारास पं. मोतीलाल नेहरू यांच्या अध्यक्षतेखालीं कॉंग्रेसच्या ठरावानुसार एक सर्वपक्षीय परिषद भरविण्यांत आली व तिनें हिंदुस्थानला काय पाहिजे हें प्रसिद्धही केलें. पण पुढें मुसलमानांना

त्यांतील योजना अमान्य झाल्यामुळें १९२९ सालीं नेहरू रिपोर्ट रद्द करण्यांत आला. त्याच वेळीं भरलेल्या लाहोर कॉंग्रेसनें संपूर्ण स्वातंत्र्याच्या ध्येयाची घोषणा केली. त्यानंतर १९३० सालीं कायदेभंगाची चळवळ झाली. ही चळवळ चालू असतांच पहिली गोलमेज परिषद भरली. तेथे म. गांधीशिवाय हिंदुस्थानच्या वतीनें बोलावयास कोणी पुढारी नसल्यामुळें आणि कायदेभंगाच्या चळवळींत सरकारची पिछेहाट झाल्यामुळें गांधी-आयर्विन तहनामा झाला. या तहनाम्यांत गांधींनीं गोलमेज परिषदेला जावें, तेथें स्वातंत्र्याचा प्रश्न चर्चेला घ्यावा, पण फेडरेशनला मान्यता द्यावी असें उभयतांच्या तहनाम्यांत ठरलें. गांधी गोलमेज परिषदेला गेले पण हिंदुमुसलमानांचा प्रश्न न सुटल्यामुळें त्यांना परत यावें लागलें. नोकरशाहीनें यांच्या अनुपस्थितींत गांधी-आयर्विन तहनाम्याच्या चिंधड्या उडवून १९३२ चें रणकुंड पेटवून ठेवलें होतें. कॉंग्रेसचे हजारों कार्यकर्ते पुनः १९३२च्या कायदेभंगांत सामील झाले. त्यानंतर तिसरी गोलमेज परिषद, जॉइंट सिलेक्ट कमिटीच्या बैठका वगैरे होऊन १९३५ चा कायदा हिंदुस्थानवर लादण्यांत आला. त्या कायद्यांतील प्रांतिक राज्यकारभाराला सुरवात झाली असून कॉंग्रेसनें ११ पैकीं ७ प्रांतांत आपली सत्ता स्थापन केली आहे. आतां फेडरेशनचा भाग अंमलांत यावयाचा आहे व तो अंमलांत आला म्हणजे १९३५चा कायदा पूर्णपणें अंमलांत आला असें होणार आहे. कॉंग्रेस ह्या फेडरेशनच्या विरुद्ध आहे व तिनें सालोसाल फेडरेशनशीं आपण झगडणार आहों, असे ठराव केले आहेत. कॉंग्रेसचा फेडरेशनला विरोध कशाकरतां आहे हें समजून घेण्याकरतां फेडरेशनविषयीं पूर्ण कल्पना आली पाहिजे.

फेडरेशन हें अनेक दोषांनीं लडबडलेलें असल्यामुळें आम्हांला तें नको आहे पण त्याहीपेक्षां हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याबद्दल त्यांत पूर्ण बेफिकिरी दाखविली आहे हें कॉंग्रेसच्या विरोधाचें खरें कारण आहे. १९१९ च्या कायद्याप्रमाणें या कायद्यांत आमच्या राजकीय ध्येयाचा उच्चारहि नाहीं. या फेडरेशनपासून आम्हांला काय मिळणार आहे? हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचा प्रश्न त्यामुळें सुटणार आहे काय? राज्यघटना बनविण्याचा अधिकार हिंदी लोकांना देण्यांत आला आहे काय? स्वयंनिर्णयाचें काय होणार? वगैरे प्रश्नांचीं उत्तरें फेडरेशन देऊं शकत नाहीं. त्यामुळेंच कॉंग्रेस फेडरेशनबद्दल असंतुष्ट व विरोधी आहे.

हिंदुस्थानला एकसूत्री राज्यघटना असावी का संयुक्त राज्यघटना असावी हा प्रश्न आम्ही सोडवावयाचा नसून ब्रिटिश पार्लमेंटनें तो सोडविला आहे! नेहरु-रिपोर्टांत फेडरेशनची योजना नव्हती. पण सायमन-कमिशनच्या रिपोर्टांत फेडरेशनचा उल्लेख आहे. सायमन-कमिशनला सुद्धां अखिल हिंदुस्थानांत संयुक्त राज्यघटना ही एक कालांतरानें शक्य होणारी गोष्ट वाटत होती. त्यांनीं संस्थानें वगळून बाकीचा जो ब्रिटिश हिंदुस्थान आहे तेथें फेडरेशन सुरू करावें अशी शिफारस केली होती. ब्रिटिश हिंदुस्थानचें निराळें फेडरेशन व संस्थानांचें निराळें फेडरेशन असावें आणि या दोन फेडरेशन्सचें एकीकरण सावकाश व्हावें, त्याबद्दल घाई करूं नये, असें त्यांनीं म्हटलें होतें. मॉंटेग्यु व लॉर्ड चेम्सफर्ड यांनाहि फेडरेशनचीं स्वप्नें पडत होतीं.

१९३५ चा कायदा होण्यापूर्वी हिंदुस्थानच्या घटनेचा विचार एक सायमन कमिशननें व दुसरा सर्वपक्षीय परिषदेनें केला होता.

या दोघांनीं अखिल भारतीय फेडरेशनबद्दल आतुरता दाखवली नव्हती. तेव्हां ही फेडरेशनची कल्पना कोणी काढली हा प्रश्न शिल्लक उरतो. हिंदुस्थानसरकारनें पार्लमेंटकडे जो खलिता पाठविला होता, त्यांत फेडरेशन नव्हतें. उलट जुनीच एकतंत्री राज्यपद्धत चालू ठेवावी असें त्यांनीं म्हटलें होतें.

१९३० सालीं कायदेभंगाची प्रचंड चळवळ झाल्यामुळें इंग्रजी मुत्सद्यांना हिंदुस्थानला कांहीं तरी हक्क द्यावें लागतील असें वाटू लागलें. पण हिंदुस्थानला मध्यवर्ती सत्तेंत जर हक्क दिले तर त्याला नियंत्रण कसें घालावें हा त्यांच्यापुढें प्रश्न होता. स्वाभाविकपणेंच त्यांना असें वाटलें कीं, संस्थानें व ब्रिटिश हिंदुस्थान यांची मोट बांधली व संस्थानचें जड लोढणें मध्यवर्ती सत्तेच्या गळ्यांत अडकवून दिलें तर हिंदुस्थान बेताल होणार नाहीं. म्हणून त्यांनीं संस्थानिकांना तयार करवून त्यांच्याकडून या योजनेची घोषणा करवली. संस्थानिकांनाहि आपल्या परिस्थितींत बदल पाहिजे होता. लॉर्ड रीडिंग साहेबांनीं १९२६ सालीं हैद्राबादच्या निजामला एक पत्रक पाठवून संस्थानिकांचा व ब्रिटिश सरकारचा दर्जा सारखा नाहीं असें म्हटलें होतें.* या पत्रकामुळें संस्थानिक घाबरले व आपल्याला

---

* The Sovereignty of the British crown is supreme in India and therefore no ruler of an Indian state can justifiably claim to negotiate with the British Government on an equal footing. Its supremacy is not based only on treaties and engagements but exists independently of them.

**Lord Reading.**

संस्थानांतसुद्धां सत्ता गाजवतां येणार नाहीं, असें त्यांना वाटू लागलें. बटलर कमिटीच्या शिफारसीमुळेंहि त्यांचें असमाधान झालेंच होतें. हिंदुस्थान सरकार त्यांच्या हक्क अधिकारांवर आक्रमण करूं लागलें होतें. शिवाय हिंदुस्थानला स्वातंत्र्य मिळालें तर आपलें आसन कितपत स्थिर रहाणार याचीहि त्यांना चिंता वाटू लागली होती. पण संस्थानिक जरी गोलमेज परिषदेकरतां लंडनला गेले तरी फेडरेशनची कल्पना त्यांच्या डोक्यांत नव्हती. कांहींहि करून आपलें स्वतंत्र अस्तित्व, हक्क अधिकारांसह कायम टिकवावें एवढीच त्यांची धडपड होती.

गोलमेज परिषदेला जी सुरवात झाली ती फेडरेशनचा विचार करावा अशा मनःथितींत झाली नाहीं. उलट मध्यवर्ती सत्ता एक-सूत्री करावी व त्याकरतां कांहीं घटना तयार करावी हाच गोलमेज परिषदेपुढें विचार होता. पहिले पांच दिवस अशा विचारांत गेल्यावर सहाव्या दिवशीं एकाएकीं संस्थानिक उठले व आपल्याला अखिल भारतीय फेडरेशन पाहिजे असें म्हणूं लागले. कोणाच्या प्रेरणेनें त्यांनीं ही घोषणा केली हें नक्की सांगतां येत नाहीं. पण ब्रिटिश मुत्सद्दी त्यांच्यामागें होते ही गोष्ट निर्विवाद आहे.

फेडरेशनची ही कल्पना एका मोठ्या प्रागतिक पुढाऱ्यानें मांडली असें म्हणतात. पण त्याचाही प्रेरक ब्रिटिशच असला पाहिजे. संस्थानिकांच्या तोंडून त्यानेंच ही कल्पना वदवली. ब्रिटिश मुत्स-द्यांनीं ही योजना मांडली जातांच तिचा स्वीकार केला. नाटक-सिनेमांतील अद्‌भुत घडामोडीप्रमाणें हा प्रकार झाला. लॉर्ड सँकी म्हणाले, आम्ही मोठ्या संकटांत सांपडलों होतों पण संस्थानिकांनीं

अखिल भारतीय फेडरेशनची घोषणा ऐनवेळीं केल्यामुळें परमेश्वरच आमच्या मदतीला धावून आला असें वाटतें.¶

लॉर्ड रीडिंग साहेब हे हिंदुस्थानला मध्यवर्ती कारभारांत जबाबदारी देऊं नये असें म्हणणारे. पण संस्थानिकांच्या घोषणेमुळें तेहि बदलले आणि म्हणाले, " संस्थानिक जर संयुक्त घटनेंत येत असतील तर मी हिंदुस्थानला कांहीं संरक्षकबंधनांसह जबाबदारीचें स्वराज्य द्यावयास तयार आहे.संस्थानिकांनीं ही घोषणा कशी केली हें मला माहीत नाहीं. पण या घोषणेमुळें मला आश्चर्य वाटलें "* पण लॉर्ड रीडिंग साहेब जे इतके त्याग करावयास तयार झाले ते आपल्या साम्राज्याला जास्त बळकटी येईल या भावनेनें झाले. संस्थानिकांची धोंड ब्रिटिश हिंदुस्थानच्या गळ्यांत घालून दिली म्हणजे कॉंग्रेस ब्रिटिश साम्राज्यापासून फुटून स्वतंत्र होऊं असें कितीहि म्हणाली तरी, संस्थानिकांचे हितसंबंध ब्रिटिश साम्राज्याशीं निगडित होणार असल्यामुळें ते अशा प्रकारची फारकत होऊं देणार नाहींत

¶ It is almost possible to see some Providence in the timely declaration of the Princes in favour of an All India Federation. **Lord Sankey.**

* After that statement made by the Princes, I changed the view I had held and decided that, if there was Federation and the Princes would come in so that there would be union of All India, then I am prepared to give responsible Government subject to certain safeguards....... I know nothing about the genesis of the Princes' declaration. Nothing surprised me more than that declaration of the Princes. No more dramatic announcement was ever made at any conference....... It surprised every body else...

**Lord Reading.**

ही दृष्टि रीडिंगना आली व ते जबाबदारीच्या स्वराज्याला तयार झाले. फेडरेशनमध्यें त्यांना धोका वाटला नाहीं यावरून हें फेडरेशन हिंदुस्थानच्या कल्याणाकरतां दिलें गेलें नाहीं याचीं निराळीं कारणें द्यावयास नकोत. लॉर्ड रीडिंग किंवा लॉर्ड सँकी यांना संस्थानिकांनीं केलेली फेडरेशनची घोषणा स्तिमित करून टाकणारी वाटावी हें न उकलण्यासारखें कोडें आहे. संस्थानिक किंवा हिंदी प्रागतिक पुढारी यांच्याकडून जर अशी योजना निघाली असती तर तिलाही ब्रिटिशांनीं इतक्या तांतडीनें व जणूं काय परमेश्वरच पावला अशा भावनेनें संमति दिली असती असें वाटत नाहीं. या कारस्थानामागें कदाचित् लॉर्ड सँकी किंवा रीडिंग नसतीलही. पण पडद्याच्या मागें फेडरेशनचें हें पात्र रंगवलें जात आहे हें त्यांना खास ठाऊक असलें पाहिजे.

तेव्हां हिंदुस्थान ब्रिटिश साम्राज्यांतून फुटून जाऊं नये म्हणून ही कारवाई केली गेली. या फेडरेशनबद्दल पुढें ब्रिटिश मुत्सद्यांना इतका जिव्हाळा वाटूं लागला कीं, गांधी आयर्विन करारांत भावी स्वराज्याची घटना ही संयुक्तच असली पाहिजे अशाबद्दल एक शर्तीचें वाक्य घातलें गेलें. हिंदुस्थानच्या राज्यघटनेला अखिल भारतीय फेडरेशनचें स्वरूप द्यावें ही जर त्या वेळीं ब्रिटिश मुत्सद्यांना कल्पना आली नसती तर त्यांच्या मुत्सद्देगिरीची व राजकारणशास्त्रपटुत्वाची कींव करावयास लागली असती. कदाचित् असेंहि असण्याचा संभव आहे कीं, सप्रू-जयकरांची गांधी व कॉंग्रेस पुढाऱ्यांबरोबर झालेली तुरुंगांतील शिष्टाई वांया गेल्यामुळें आधींच सहानुभूतिशून्य असलेली ब्रिटिश मुत्सद्यांची मनोवृत्ति अधिक चिडखोर व कडवट झाली असावी व त्यांनीं नव्या राज्यघटनेचा खेळखंडोबा करण्याचा विडा उचलला असावा. पण

कांहींहि असलें तरी फेडरेशनचा अवतार हा हिंदुस्थान-करतां किंवा संस्थानिकांकरतां झाला नसून ब्रिटिश साम्राज्याची पक्कड अधिक घट्ट व चिरस्थाई करण्याकरतां झाला हें अगदीं उघड आहे. मध्यवर्ती राज्यकारभारांत हिंदुस्थानला एका हातानें जबाबदारी दिल्याचें दाखवावयाचें व दुसऱ्या हातानें हिंदुस्थान-भोंवतीं संरक्षकबंधनांचे साखळदंड आवळावयाचे आणि डोक्यावर संस्थानिकांचें ओझें लादावयाचें असा हा प्रयत्न आहे.

फेडरल स्वरूपाची घटना हिंदुस्थानला द्यावयाचें ठरल्यानंतर लागलीच पहिल्या गोलमेजपरिषदेनें एक फेडरल स्ट्रक्चर कमिटी नेमली व त्या उपसमितीला कार्याची योजनाहि आंखून दिली. पहिल्या गोलमेजपरिषदेंत नव्या घटनेचीं चार आधारभूत तत्त्वें निश्चित करण्यांत आलीं. (१) अखिलभारतीय संयुक्त घटना (२) मध्यवर्ती राज्यकारभारांत जबाबदारी (३) पूर्ण प्रांतिक स्वायत्तता (४) हिंदुस्थानच्या हिताकरतां संरक्षक बंधनें. ह्या चारहि मुद्यांचा विचार गोलमेजपरिषदेंत व्हावा असें ठरलें.

फेडरेशनची कल्पना जर खरोखर संस्थानिकांची असती तर संस्थानिकांनीं त्या फेडरेशनमध्यें यावयास इतकी टंगळमंगळ का चालवली असती हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. आज आपणांस काय दिसतें ? फेडरेशनचा सांगाडा तयार होऊन पडला आहे, पण संस्थानिक त्यापासून दूर दूर पळत आहेत. कदाचित् ही घोषणा करतांना त्यांना आपल्या भवितव्याबद्दल निराळी कल्पना असेल आणि त्यांच्या तोंडून फेडरेशन वदविल्यानंतर संस्थानिकांची केविलवाणी स्थिति केली गेली असेल. हिंदुस्थानच्या गळ्यांत ही घोरपड बांधतांना जर संस्थानिक आपल्या हिताबद्दल जागरूक

राहिले नसतील तर त्यांच्या बुद्धिमांद्याबद्दल कींव करावयास पाहिजे व परधार्जिणी वृत्तिबद्दल त्यांचा धिक्कार करावयास पाहिजे. अजूनहि संस्थानिकांत स्वाभिमान असेल व आपली फसवणूक झाली असें त्यांना वाटत असेल तर त्यांनीं फेडरेशनमध्यें येऊ नये. पण ही अपेक्षा व्यर्थ आहे. कारण ज्या शक्तीनें त्यांच्या तोंडून फेडरेशनची घोषणा करवली तीच शक्ति त्यांना फेडरेशनमध्यें खेंचून नेईल.

## गांधी राऊंड टेबलला.

पहिल्या राउंड टेबलनें हिंदुस्थानचा राजकीय प्रश्न अशा रीतीनें सोडवला. पण तेवढयानें ब्रिटिश मुत्सद्यांचें समाधान झालें नाहीं. अल्पसंख्याकांचा प्रश्न त्यांना सोडवावयाचा होता. म. गांधी दुसऱ्या राउंड टेबलला गेले. संस्थानिकांकरवीं जशी पहिल्या राउंड टेबलमध्यें कारवाई करण्यांत आली, तशी दुसऱ्या राउंडटेबलमध्यें मुसलमान व अस्पृश्यांकरवीं आमच्या एकीचें व इभ्रतीचें तारूं फोडून टाकण्यांत आलें. अल्पसंख्याकांचा प्रश्न सोडविल्याशिवाय राज्यघटनेचें तारूं पुढें रेटलेंच जाईना. म. गांधींनीं मुसलमानांना कोरा चेक दिला, आपल्याकडून औदार्याचा अतिरेक केला पण ब्रिटिश मुत्सद्यांच्या पडद्यामागील कारस्थानाला म. गांधीसारखा सरळ व कौटिल्य न जाणणारा पुढारी काय पुरा पडणार ? गांधी जातीय प्रश्नापुढें हात टेकून परत आले.पण ते ब्रिटिशांच्या भुलभुलावणींत सांपडले नाहींत. त्यांनीं आपल्या मागणींत यत्किंचित् कमतरता केली नाहीं. असा ताठर पुढारी ब्रिटिशांना कसा चालावा ? गांधी व कॉंग्रेस तुरुंगांत पडली आणि त्यांच्या तुरुंगवासांत फेडरेशनचें नाटक पुरें करण्यांत आलें.



सर तेजबहादूर सप्रू.



बॅ. जयकर

अल्पसंख्याकांच्या बाबतींत एकी न झाल्यामुळें त्या वेळचे मुख्य प्रधान रम्से मॅकडोनल्ड यांनीं जातीय निवाडयाचा खर्डा १९३२ च्या ऑगस्टमध्यें प्रसिद्ध केला. गांधी व कॉंग्रेस मार्गांतून दूर झाली. फेडरेशनमुळें संस्थानिक खूष झाले, जातीय निवाडयामुळे मुसलमान खूष झाले आतां फक्त ब्रिटिश व्यापारी खूष करण्याचें उरलें होतें. हे खूष करण्याचे प्रयोग सुरू असतां हिंदुस्थानच्या राजकीय स्वातंत्र्याचा प्रश्न मात्र कोणी काढीत नव्हते. किंबहुना हा प्रश्न नेटानें पुढें रेटला जाऊं नये म्हणूनच निरनिराळ्या हितसंबंधी लोकांना बगलेंत मारण्याचे प्रयत्न सुरु होते. सप्रू-जयकर प्रभृति पुढारी हे गर्जना करीत पण एकेरीवर येण्याचें अवसान त्यांच्यांत नव्हतें. त्यामुळें त्यांच्या गर्जना ह्या शरद्-ऋतूंतील गडगडण्याप्रमाणें वांझ ठरल्या.

तिसऱ्या गोलमेज परिषदेंत युरोपियन भांडवलवाल्यांचा प्रश्न सोडविण्यांत आला. त्यांना पाहिजे होती तेवढी संरक्षकबंधनें फेडरेशनवर लादण्यांत आलीं. हिंदी व युरोपिअन व्यापारी यांच्यांत हिंदी कायदेमंडळानें भेदाभेद करूं नये, युरोपिअनांवर जबर जकाती अगर इतर अटी लादूं नयेत, त्यांच्या आयातीला प्रतिबंध नसावा असें या बैठकींत ठरलें. तिसऱ्या गोलमेज परिषदेंत संस्थानिक म्हणूं लागले कीं, फेडरेशनची सारी योजना बाहेर येईपर्यंत तींत यावयाचें किंवा नाहीं हें आम्हीं सांगत नाहीं. शेषाधिकार( Residuary powers ) कोणाकडे असावेत याचीही चर्चा तेथें जोरानें सुरू होती. त्याचप्रमाणें संयुक्त घटनेंतील अर्थव्यवस्था, न्यायदान वगैरेंचा हि योजना तेथें झाली. जॉइंट सिलेक्ट कमिटींत ह्या साऱ्या प्रास्ताविक चर्चांना अखेरचें स्वरूप आलें. त्या कमिटींत हिंदी लोकांना सभासद

म्हणून घेतले नव्हते. फक्त ॲसेसर्स म्हणून घेतले होते हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

जॉईट सिलेक्ट कमिटीपूर्वी नव्या राज्यघटनेचा कच्चा खर्डा ( व्हाइटपेपर ) १९३४ च्या मार्च महिन्यांत प्रसिद्ध झाला. त्यावर बरेंच वादळ उठलें पण कॉंग्रेस पुढारी तुरुंगांत असल्यामुळें त्याविरुद्ध व्हावी तितकी चळवळ झाली नाहीं. व्हाइट पेपरमधील सूचनांतहि जॉइंट सिलेक्ट कमिटीनें सुधारणा केल्या आणि अशा प्रकारें २ ऑगस्ट १९३५ रोजीं हिंदुस्थानचा नवा कायदा पार्लमेंटच्या दोन्हीं गृहांतून बाहेर पडला. हिंदुस्थानला फेडरेशन मिळालें खरें; पण हिंदुस्थानचा दर्जा काय हें या कायद्यानें नमूद केलें नाहीं. त्यामुळें स्वातंत्र्य संपादण्याची चळवळ ही दिवसेंदिवस जोरानें चालणार यांत शंका नाहीं.

हिंदुस्थानचा फेडरेशनला जो विरोध आहे तो संयुक्त राज्यघटना आम्हांला नको याकरतां नाहीं. किंबहुना हिंदुस्थानसारख्या अनेक जाती व संस्कृती असलेल्या विस्तृत देशांत एकतंत्री राज्यव्यवस्थेऐवजीं संयुक्त राज्यघटनाच अधिक यशस्वी ठरेल. पण ही घटना इतर देशांतील संयुक्त घटनेप्रमाणें लोकांनीं बनवलेली नाहीं. ती लोकांच्या इच्छेविरुद्ध त्यांच्यावर लादली आहे. स्वातंत्र्याचा त्यांत मागमूसहि नाहीं. नव्या कायद्याच्या निमित्तानें कांहीं तर साधलें नाहींच, पण हिंदुस्थानच्या राज्यांतून निसर्गसंपत्तीनें नटलेला सुपीक व सधन असा ब्रह्मदेश आमच्यांतून तोडून काढला गेला एवढें खरें.

---

५

# फेडरेशनला विरोध कां ?

हिंदुस्थानवर जी फेडरेशन लादली जाणार आहे तिचे घटक तीन आहेत. पहिला घटक ब्रिटिश हिंदुस्थानांतील ११ प्रांत, दुसरा घटक संस्थानें व तिसरा घटक गव्हर्नर, गव्हर्नर जनरल, ब्रिटिश पार्लमेंट वगैरे खरे सत्ताधारी. हिंदुस्थानामध्यें जी फेडरेशन येणार आहे ती शास्त्रशुद्ध नाहीं. पूर्वीच्या विभागांत सांगितल्याप्रमाणें संयुक्त राज्यघटनेला, त्या घटनेच्या कक्षेंत येणारी स्थानिक राज्यें हीं पूर्णपणें स्वतंत्र असावीं लागतात. त्या घटक राज्यांना परचक्रापासून अगर आर्थिक उत्कर्षाकरतां एकत्र येण्याची आवश्यकता वाटूं लागलेली असावी लागते आणि त्या घटकांनीं आपल्या स्वातंत्र्यांचा कांहीं हिस्सा मध्यवर्ती सत्तेला देण्याची तयारी दाखवावी लागते. राष्ट्रीय ऐक्याच्या वाढीकरतां किंवा आंतरराष्ट्रीय मान्यतेकरतांहि संयुक्त राज्यघटनेची जरुरी असते. राष्ट्राचा विचार होत होत शेवटीं संयुक्त राज्यघटना ही अपरिहार्य होऊन बसते. स्वाभाविकरीत्या झालेली वृक्षाची वाढ आणि कृत्रिम रीत्या उष्णतागृहांत केलेली वृक्षाची वाढ यांत जो फरक आहे तो इतर फेडरेशन्स व हिंदुस्थानची फेडरेशन यांत आहे.

ज्या निरनिराळ्या घटकांची संयुक्त घटना बनवावयाची असते, त्यांच्यांत वर्ण, इतिहास, देश, परंपरा, वगैरे बाबतींत साधर्म्य

लागतें. या घटकांना आपला संघ बनवावा अशी आंच उत्पन्न व्हावी लागते. ह्या घटकांची आपापल्या राज्यांत पूर्ण एकी असते पण संयुक्त राज्यघटना करून त्यांना संघ बनवावयाचा असतो. स्वतःचें स्वातंत्र्य अगर वैशिष्ट्य अबाधित राखून राष्ट्रीय ऐक्यसाधनाकरतां संयुक्त घटना बनविली जाते.* ह्या संयुक्त घटनेच्या द्वारां कांहीं राष्ट्रीय कार्ये करावयाचीं असतात. संयुक्त घटना बनवितांना त्यांतील घटक राज्यें कोणत्या अटींवर आपण एकत्र येऊं इच्छितों हें स्पष्टपणें नमूद करतात. ही संयुक्त घटना कायम स्वरूपाची लागते. कारण तींत बदल करावयाचा म्हणजे ज्या अटींवर घटक राज्यें त्यांत सामील झालीं, त्या अटींत बदल करणें होय. या मूलभूत अटी बदलल्यास कदाचित् तीं तीं राज्यें बिथरावयाचीं व संघटनेची विघटना व्हावयाची. तेव्हां संयुक्त घटना ही बदलणारी नसावी आणि स्थानिक व मध्यवर्ती संस्थेचीं कार्यक्षेत्रें व अधिकार हे विभागलेले असावेत.

अशा प्रकारचें नियंत्रण संयुक्त घटनेवर घातलें जात असल्यामुळें प्रत्यक्ष व्यवहारांत कायदेमंडळावरसुद्धां कायदे करण्याचें काम मर्यादितच पडतें. मूलभूत बदल करावयाचे असतील तर ते मध्यवर्ती

---

There are two requisite conditions for federation. (1) There must be a body of states so closely connected by locality, by history, by race or the like as to be capable of bearing, in the eyes of their inhabitants an impress of common nationality (2) There must be the existence of a very peculiar state of sentiment among the inhabitants of the states which propose to unite. **Prof Dicey.**

सत्तेनें, घटक संस्थांचें मत घेऊनच करावयाचे असतात. ह्या बंधनामुळें संयुक्त कायदेमंडळ हें सर्वांत श्रेष्ठ ठरूं शकत नाहीं. मध्यवर्ती सत्ता व घटक सत्ता यांच्यांत घटनेच्या विवरणाकरतां जर शंका उपस्थित झाल्या तर त्यांचें निवारण कोर्टामार्फत करावयाची योजना संयुक्त घटनेंत अवश्य असते. संयुक्त घटनेचें कायदेमंडळ हें नेहमींच दुर्बल असतें आणि खरी सत्ता घटक संस्थांतच असते. घटक संस्थाच्या संमतिशिवाय फेडरल असेंब्लीला कांहींच उठाव करतां येत नाहीं.

संयुक्त राज्यघटना ही स्वतंत्र घटक राज्याकडून अस्तित्वांत आलेली असो, किंवा मध्यवर्ती सत्तेनें घटकांना संपूर्ण स्वातंत्र्य देऊन निर्माण केलेली असो, तिचे नियम वगैरे सारखेच असतात. हिंदुस्थानांत फेडरेशन यावयाचें आहे, त्याला पुष्कळ मामुली गोष्टी अनुकूल आहेत. देश मोठा आहे, परंपरा, इतिहास, संस्कृति वगैरे बाबतींत बरीचशी समानता आहे. राजकीय व आर्थिक बाबतींत निरनिराळ्या घटकांत सारखेपणा आहे. सर्वच घटक परतंत्र आहेत. हिंदुस्थानच्या संरक्षणाचा प्रश्न हा एकच आहे. पण फरक जर असेल तर ब्रिटिश हिंदुस्थान व संस्थानी हिंदुस्थान यांच्या राजकीय प्रगतींत. संस्थानांतील कारभार हा अद्याप मध्ययुगांतील कारभारापुढें गेलेला नाहीं. तेथील प्रजाहि त्यामुळें मागासलेल्या स्थितींत आहे. संस्थानिक हे आपल्या राज्यापुरतें स्वतंत्र आहेत असें म्हणणेंसुद्धां चूक आहे. त्यांच्यावर आतां बादशहाची सत्ता विराजमान होणार आहे.

इतरत्र जें संयुक्त राज्यघटनापद्धतीचें विवेचन केलें, तें हिंदुस्थानच्या राज्यघटनेला कितपत लागूं पडतें हा प्रश्न आहे. हिंदु-

स्थानचें फेडरेशन हा खरोखर एक जगावेगळा प्रकार आहे. इतर राष्ट्रांत स्वतंत्र स्थानिक संस्थांनीं स्वसंरक्षण किंवा आर्थिक अडचणीकरतां संयुक्त राज्यघटनेची स्थापना केली. हिंदुस्थानपुढें स्वसंरक्षणाचा प्रश्नच नव्हता. आम्हांला आमचें रक्षण करण्याचा अधिकार नाहीं. तो हिंदुस्थानसरकारनें पूर्वींहि आपल्या हातीं ठेवला होता व यानंतरहि ते आपल्या हातीं ठेवणार आहेत. व्यापारवृद्धीला अडचणी आल्या म्हणून फेडरेशन स्थापलें असेंहि नाहीं. कारण जकातीचा व कराचा अधिकार पूर्वींप्रमाणेंच गव्हर्नर जनरलच्या हातीं रहाणार आहे. तेव्हां संयुक्त राज्यघटना बनविण्यास जीं कांहीं निकराचीं कारणें लागतात तीं आमच्याकडे अस्तित्वांत नाहींत. याचा अर्थ असा नव्हे कीं, हिंदी लोकांना हे हक्क नकोत. पण अद्याप आमची चळवळ इतकी प्रभावी झाली नाहीं कीं, ते हक्क आमच्या पदरांत पडावेत व आम्ही स्वतंत्र व्हावें. हिंदुस्थानचें फेडरेशन हें आम्ही मागितलें नव्हतें. तें ब्रिटिश सरकारनें स्वतःच्या बळकटीकरतां स्थापन केलें.

खुद्द जॉइंट सिलेक्ट कमिटीला ह्या फेडरेनशचें समर्थन करतां आलें नाहीं. आम्हाला फेडरेशनशिवाय गत्यंतर नव्हतें म्हणून आम्ही फेडरेशन स्थापलें असें असमर्थनीय समर्थन त्यांनीं केलें आहे. आजपर्यंत सामान्यतः फेडरेशन्स ज्या बनल्या, त्या स्वतंत्र किंवा स्वयंशासित सरकारनीं आपल्या सत्तेपैकीं, कांहीं सत्ता मध्यवर्ती सत्तेला तोडून देऊन बनविल्या आहेत. हिंदुस्थानांतील प्रांत स्वयंशासितहि नाहींत. १९३५ च्या एकाच कायद्यान्वयें प्रांतांना स्वायत्तता द्यावी लागली व त्याचबरोबर त्यांचा संयुक्त राज्यघटनेंत समावेशहि करावा लागला.

अशा प्रकारें हिंदी लोकांच्या मागणीचा अभाव, घटक प्रांतांच्या स्वातंत्र्याचा अभाव, हे दोन मुख्य अभाव हिंदी फेडरेशनमध्यें असल्यामुळें ती धेडगुजरी झाली आहे.

हिंदी फेडरेशनचा तिसरा विशेष म्हणजे घटक राजकीय संस्थांत असणारी विषमता. हिंदी प्रांतांना थोडीफार प्रांतिक स्वायत्तता मिळाली आहे पण संस्थानांत लोकशाही पद्धतीला सुरवातहि नाहीं. संस्थानांत एकट्या संस्थानिकाचा अंमल जारी आहे. या सुलतानी अंमल गाजविणाऱ्या संस्थानिकांनीं नेमलेले प्रतिनिधी ब्रिटिश हिंदुस्थानांतून निवडून गेलेल्या प्रतिनिधींच्या मांडीला मांडी लावून बसणार आहेत. अशा ह्या विषम प्रतिनिधींची संयुक्त घटना, ही सर्वस्वी चुकीची, आक्षेपार्ह व अशास्त्रीय आहे. सुलतान-शाही व लोकशाही कधींही एकत्र नांदूं शकत नाहीं. हिंदी फेड-रेशनचा हा प्रयोग विश्वामित्राच्या सृष्टीप्रमाणें अजब आहे.

हिंदी फेडरेशनचा चवथा विशेष म्हणजे घटनेंत दुरुस्ती कर-ण्याची सत्ता पार्लमेंटचे हातीं आहे, ती फेडरल कायदेमंडळाच्या हातीं नाहीं. हिंदी संयुक्तघटनेचा पांचवा विशेष म्हणजे फेडरेशनमध्यें येणारीं जीं संस्थानें, त्यांना कोणते कायदे लागू करावयाचे हें ठर-विण्याची सत्ता संस्थानिकांनाच आहे. फेडरेशनमध्यें जेव्हां संस्था-निक येतील तेव्हां त्यांच्यापैकीं प्रत्येक संस्थान आपण कोणत्या अटीवर फेडरेशनमध्यें येतो हें मान्यतापत्रकाद्वारें ठरवतील. अशा या चमत्कारिक घटनेमुळें सर्वांना सारखे नियम लागूं करतां यावयाचे नाहींत.

यानंतरचा सहावा विशेष म्हणजे ही संयुक्त घटना बादशहानें अंमलांत आणावयाची आहे. फेडरेशन जें अस्तित्वांत येतें तें स्वयं-

शासित घटकांच्या देवाणघेवाणीनें अंमलांत येतें. आमच्या फेडरेशनमध्यें प्रांतांना तर वाचाच नाहीं. जीं काय बोलणीं चालणीं व्हावयाचीं तीं संस्थानिक व बादशहा यांच्यांत व्हावयाचीं. त्यामुळें हिंदी फेडरेशनला जिवंतपणा नाहीं.

हिंदी फेडरेशनचा सातवा विशेष म्हणजे वरिष्ठ कायदेमंडळांत घटक संस्थांचा विषम दर्जा. इतर फेडरेशन्समध्यें वरिष्ठ सभागृहांत जे प्रतिनिधी येतात ते सर्व घटकांतून सारखी प्रतिनिधींची संख्या घेऊन येत असल्यामुळें सर्व घटकांचा दर्जा सारखा राहतो. लोकसंख्या किंवा देशाचा आकार हें प्रतिनिधित्व देतांना विचारांत घेत नाहींत. अमुक प्रांत लहान म्हणून त्याचे १० प्रतिनिधि व अमुक मोठा म्हणून त्याचे २० असा भेदाभेद करीत नाहींत. खालच्या सभागृहांत जे प्रतिनिधी येतात, ते सर्व घटकांतील लोकांकडून निवडून आलेले असतात. त्यामुळें खालच्या गृहाला एकजिनसीपणा येतो. अशाप्रकारें वरिष्ठ गृहांत समता व खालच्या गृहांत एकसारखेपणा संपादन करण्याचा प्रयत्न असतो. हिंदी फेडरेशनमध्यें यांपैकीं कांहींहि नाहीं. उलट वरिष्ठ गृहांत प्रत्यक्ष निवडणुका ठेवल्या आहेत आणि खालच्या गृहांत अप्रत्यक्ष निवडणुका ठेवल्या आहेत ! या निवडणुकांकरतां जातीय दृष्टीला अत्यंत महत्त्व दिलें आहे. त्यामुळें एकी, समता, राष्ट्रीयता वगैरे गोष्टी साध्य होण्याऐवजीं दुही, विषमता व अराष्ट्रीयत्व निर्माण होण्याची पुरेपूर व्यवस्था हिंदी फेडरेशनमध्यें करून ठेवली आहे.

हिंदी फेडरेशनचा आठवा विशेष म्हणजे प्रांत व मध्यवर्ती सत्ता यांच्या अधिकारांची विभागणी झाल्यावर जे शेषाधिकार उरतात, ते प्रांताकडे किंवा मध्यवर्ती सत्तेकडे न ठेवतां, ग.जनरलनें

ते कोणाकडे द्यावयाचे याचा स्वतःच निर्णय करावयाचा. या योजनेला कोठेंहि पूर्वीचा दाखला नाहीं.

नव्या घटनेचा नववा विशेष म्हणजे संस्थानिकांचे प्रतिनिधी हे स्वतःला लागूं न पडणारे पण ब्रिटिश हिंदुस्थानला लागूं पडणाऱ्या कायद्यावर मत देणार. ब्रिटिश हिंदी प्रतिनिधींना मात्र संस्थान-विषयक कायद्यांत मत देण्याचा अधिकार नाहीं. कर बसविण्याच्या बाबतींत ह्या योजनेचा चांगलाच त्रास होणार आहे.

हिंदी घटनेचा दहावा विशेष म्हणजे ग. जनरलची नेमणूक ही आमच्या हातीं नाहीं, ती ब्रिटिशमंत्रिमंडळाच्या हातीं आहे. इतर फेडरेशन्समध्यें उदाहरणार्थ अमेरिकेंत कार्यकारी मंडळाचा प्रमुख जनतेकडून निवडला जातो आणि कानडा व आस्ट्रेलियांत तेथील मंत्रिमंडळाच्या सल्लयानें ग. जनरल बादशहाकडून नेमला जातो. इतर फेडरेशन्समध्यें ग. जनरल किंवा दुसरा प्रमुख जो असेल त्याला जादा अधिकार बिलकूल नसतात. व्यक्तिशः त्याला तर कांहींच करतां येत नाहीं.

वरील कारणांकरतां हिंदी फेडरेशन ही खरोखर एक अजब चीज आहे असें म्हणणें भाग पडतें. विळा, भोपळा, आवळे, ऊंस वगैरेंची मोट बांधावी तसा हा प्रयत्न आहे. त्यांत ब्रिटिश सरकार-च्या बुद्धिमत्तेची शंका येते.पण त्यांनीं हा बुद्धिपुरस्सर प्रयत्न केला आहे. हातांतून सत्ता तर सोडावयाची नाहीं पण सोडली असें दाखवावयाचें आणि जी सत्ता सोडल्याचा भास करावयाचा तिला इतकीं बंधनें घालावयाचीं कीं, पूर्वीची राजवटच बरी वाटूं लागावी. या अनेक कारणांमुळें हिंदुस्थानांतील प्रत्येक पक्ष फेडरेशनला विरोध करीत आहे.

६

# संयुक्त राज्यघटनेंतील संस्थानें.

हिंदुस्थानांत अनेक वर्षे एकतंत्री सत्ता नांदत होती. मोंगलाईंत काय किंवा मराठशाहींत काय, राजांच्या हातीं सर्व सत्ता असे आणि त्यांनीं नेमलेले सुभेदार व इतर अधिकारी राज्यव्यवस्था चालवीत. इंग्रजांच्या अमदानींत हीच पद्धत सुरू राहिली आणि नोकरशाही प्रबल झाली. हीच नोकरशाही हिंदुस्थानवर राज्य करीत होती असें म्हणावयास हरकत नाहीं.

नव्या कायद्याप्रमाणें प्रांतामध्यें जबाबदारीचें राज्य सुरू झालें आहे. या नव्या कायद्याला प्रस्तावनेदाखल कांहींही जोडलेलें नाहीं. हा कायदा कशाकरतां आहे, हिंदुस्थानच्या राज्यघटनेला काय म्हणावयाचें आणि या राज्यघटनेचा शेवट कशांत होणार आहे या संबंधीं उल्लेख टाळला आहे. १९१९ च्या कायद्याला हेतुवाक्य (Preamble) होतें, तेंच १९३५ च्या कायद्याला जोडल्याचें समजावें असें सांगण्यांत आले. वसाहतीच्या स्वराज्याचा उल्लेख टाळण्यांत ब्रिटिश मुत्सद्यांनीं स्वतःला भविष्यकाळाबद्दल बांधून घेतलें नाहीं. १९१९ च्या कायद्यांत दहा वर्षांनीं तरी राज्यकारभाराची फेरतपासणी होण्याची आशा होती. या कायद्याप्रमाणें फेरतपासणी पाहिजे असेल तर पेंचप्रसंगच निर्माण करावयास पाहिजे व गव्हर्नर किंवा गव्हर्नर यांना हातांत सत्ता घेण्यास भाग पाडलें पाहिजे.

या नव्या घटनेंत इंग्लंडच्या बादशहाच्या सत्तेचें पुनर्वाचन ग्रंथारंभीं करण्यांत आलें आहे. या पुनर्वाचनाचे वेळीं इंग्लंडच्या राजेसाहेबांची सत्ता जरा निराळ्या रीतीनें मांडण्यांत आली आहे. सत्ता तीच पण मांडणी निराळी. १८५८ नंतर इंग्लंडच्या बादशहाचें राज्य जें हिंदुस्थानवर होतें, तें राज्य हिंदुस्थान सरकार चालवीत होतें. नव्या कायद्यांत बादशहांचे जे हक्क अधिकार आहेत ते त्यांनीं खुद्द किंवा ते ज्याला सांगतील त्यांनीं वहिवाटावयाचे आहेत. यापूर्वी जे जे हक्क सेक्रेटरी ऑफ स्टेट, गव्हर्नर जनरल हे स्वतः किंवा कौन्सिलच्या मदतीनें गाजवीत होते, ते राजेसाहेबांकडे सुपुर्द करण्यांत आले आहेत. फेडरेशन व प्रांत यांमध्यें ही सत्ता विभागली जाणार असल्यामुळें तत्पूर्वी ती बादशहांचे हातीं देण्यांत आली आहे.

बादशहाची सर्व सत्ता सेक्रेटरी ऑफ स्टेट हा वहिवाटतो. ग. जनरल व गव्हर्नर्सकडे हिंदुस्थानच्या मुलकी व लष्करी कारभारावर देखरेख, नियंत्रण व मार्गदर्शकत्व एवढेंच दिलें आहे. ग. जनरल व गव्हर्नर्स यांना ही स्वयंभू सत्ता आहे कां ती त्यांना सेक्रेटरी ऑफ स्टेटचे मुनीम म्हणून मिळाली आहे, हा प्रश्न निर्णीत नाहीं.पण फेडरेशन आल्यानंतर मध्यवर्ती सत्तेला आपले अधिकारी सेक्रेटरी ऑफ स्टेटकडूनघेतां येत नाहींत किंवा प्रांतांना आपले अधिकार मध्यवर्ती सत्तेकडून घेतां येत नाहींत.या उभय सत्तांना जे अधिकार मिळतात ते थेट बादशहाकडून मिळावे लागतात. तेव्हां नव्या कायद्याप्रमाणें अधिकारांची पुनर्वाटणी करण्यापूर्वी ते सर्व बादशहाकडे गेले पाहिजेत आणि नंतर कायदा ठरवील त्याप्रमाणें ते अधिकार मध्यवर्ती व प्रांतिक सत्तेला वांटून दिले पाहिजेत.

अशा या कायदेशीर अडचणीच्या संभवामुळें नव्या कायद्यानें सर्व सत्ता, सर्व अधिकार, सर्व स्थावर, जंगम, भूमिगत संपत्ति वगैरे बादशहांना देऊन टाकली, आणि त्याना वाटली तेवढी सत्ता अधिकार वगैरे त्यांनी निरनिराळ्या घटकांच्या स्वाधीन केले. ही सत्ताअधिकार वगैरेंची वाटणी बादशहानें कशी केली हेंच हा कायदा सांगत आहे व त्याकरतां ३२२ कलमें, अनेक परिशिष्टें आज्ञापत्रें, ऑर्डर्स–इन–कौन्सिल वगैरे लिहिलीं गेलीं. फांसावरील माणूस सोडणें, तह करणें वगैरेपर्यंतचे सर्व अधिकार बादशहाचे आहेत.

ब्रिटिश हिंदुस्थान व संस्थानी हिंदुस्थान यांमध्यें राजेसाहेबांच्या हक्कवांटणींत फरक करण्यांत आला आहे. हिंदी संस्थानांवर बादशहाची जी सत्ता आहे ती बादशहानें स्वतः किंवा आपला प्रतिनिधी नेमून अंमलांत आणावयाची आहे. हिंदी हिंदुस्थानमधील सत्ता ही लोकांच्या हातीं कमीअधिक प्रमाणांत जाणार आहे; पण संस्थानी हिंदुस्थानावरील सत्ता ही लोकांना दिली जाणार नसून ती बादशहा किंवा व्हाइसरॉय यांच्याशिवाय कोणाच्याही हातीं जाणार नाहीं.

नव्या कायद्याप्रमाणें जी सत्ता व जीं कामें गव्हर्नर–जनरलवर सोंपविलीं आहेत, तीं करण्याकरतां त्याची नेमणूक बादशहानें करावयाची आहे. तसेंच फेडरेशनच्या कक्षेंत न येणारी संस्थानविषयक कामें करण्याकरितां बादशहा आपला एक प्रतिनिधी नेमणार आहे. गव्हर्नर जनरल व व्हाइसरॉय यांचीं कामें भिन्न असलीं तरीं तीं दोन्हीं एकच व्यक्ती करूं शकेल. अशाप्रकारें व्हाइसरॉय हा संस्थानाक-

करतां आणि गव्हर्नर जनरल हा हिंदी हिंदुस्थानकरतां नेमला जाणार आहे. मात्र संस्थानें ज्या बाबी फेडरेशनमध्यें अंतर्भूत करतील त्यांवर गव्हर्नर जनरलचीच सत्ता राहील.या दोघां-शिवाय कमांडर-इन-चीफची नेमणूक बादशहाकडून व्हावयाची आहे. हा कमांडर-इन-चीफ संस्थानासुद्धां सर्व हिंदुस्थानकरतां आहे.

वास्तविकपणें संस्थानांवर अधिकार गाजविणाराला एक हुद्दा व ब्रिटिश हिंदुस्थानवरील अधिकाऱ्याला दुसरा हुद्दा असें असण्याचें कारण नाहीं. पण संस्थानिक फाजील सावध आहेत म्हणा किंवा भित्रे आहेत म्हणा, अथवा त्यांना आपला संबंध प्रत्यक्ष बादशहाशीं जोडून आपली प्रतिष्ठा राखावयाची म्हणून म्हणा त्यांनीं अट्टाहास केला व आपल्यावरील अधिकाऱ्याला स्वतंत्र नामाभिधान करवून घेतलें. फेडरेशनच्या ताब्यांत हिंदुस्थानचा सारा कारभार गेला तर आपणहि फेडरेशनच्या ताब्यांत जाऊं व आपली सत्ता जाईल अशी त्यांना भीति वाटली. कॉंग्रेसमधील कांहीं लोक संस्थानें नष्ट केलीं पाहिजेत अशा मताचे असल्यामुळें संस्थानिकांनीं आपलें अस्तित्व कायम टिकविण्याचा हा प्रयत्न केला असावा.

१९१९ च्या कायद्याप्रमाणें गव्हर्नर जनरल इन कौन्सिल हा संस्थानांवर देखरेख करीत असे. पण आतां नव्या कायद्याप्रमाणें गव्हर्नर जनरलचें मंत्रिमंडळ हें कायदेमंडळाला जबाबदार रहाणार असल्यामुळें या जबाबदार मंत्रिमंडळाकडे आपला कारभार जातां कामा नये असें संस्थानिकांनीं बजावलें. याकरतां संस्थानांवर जो अधिकार गाजवील त्याला व्हाइसरॉय व संस्थानेतर विभागावर जो अधिकार गाजवील त्याला गव्हर्नर जनरल असे दोन हुद्दे निर्माण करण्यांत आले.

कायदा करणारांनाही तें सोईचें गेलें. कारण प्रत्येक ठिकाणीं व्हाइसरॉय हा शब्द येत गेला असतां, तर तो शब्द फेडरेशनला लागू आहे कां संस्थानाला लागू आहे हें कळणें कठीण झालें असतें.

व्हाइसरॉय हा शब्द मोठासा चांगला आहे असें नाहीं. खरा शब्द बादशहाचा संस्थानविषयक कारभार पहाणारा प्रतिनिधी असा आहे. पण तो लांबलचक शब्दप्रयोग आहे. व्हाइ-सरॉय हा आदरार्थी शब्द आहे. त्याला कायदेकानूंत कोठें अस्तित्व नाहीं. पण जॉइंट सिलेक्ट कमिटी म्हणाली म्हणून तो शब्द ठेवला असें पार्लमेंटांत बटलर यांनीं सांगितलें.

पण संस्थानिकांनीं व्हाइसरॉय मागून घेण्यांत मोठासा शहाण-पणा केला नाहीं. इंग्लंडचा राजा म्हटला कीं, त्याच्या हुद्यांत मंत्रिमंडळ अंतर्भूत होतें. राजाहि सेक्रेटरी ऑफ स्टेटच्या मार्फत कारभार चाल-वितो. तेव्हां कायदेशीररीत्या विचार केला तर व्हाइसरॉयमुळें संस्थां-निकानीं कांहींहि संपादन केलें नाहीं. सर्व हिंदुस्थानची जबाबदारी जोंवर पार्लमेंटवर आहे, तोंवर संस्थानी हिंदुस्थान व ब्रिटिश हिंदुस्थान या भेदाभेदाला अर्थच नाहीं. इंग्लंडच्या बादशहाला व्यक्तिशः जर कांहीं करतां आलें असतें तर प्रश्न वेगळा होता. तेव्हां संस्थानिकांची भीति अगर फाजील सावधगिरी निरर्थक ठरते.

## सर सॅम्युएल होअरचें समर्थन.

हिंदुस्थानला फेडरेशनच कां द्यावयाचें याचीं तीन कारणें सर सॅम्युएल होअर यांनीं दिलीं आहेत. पहिलें कारण असें, हिंदु-स्थानांतील सर्व राजकीय विचारसरणीच्या लोकांना फेडरेशन पसंत

पडलें आहे. म. गांधी, पंडित जवाहरलाल किंवा कॉंग्रेस फेडरेशनला प्रतिकूल नाहीं हें सर सॅम्युएल होअर यांचें म्हणणें बरोबर आहे. कॉंग्रेसला हिंदुस्थानवर लादण्यांत येणारी घटना, ही फेडरेशन नाहीं असें खात्रीपूर्वक वाटतें तो प्रश्न निराळा. प्रांतांना जर स्वायत्तता दिली व त्या सर्व प्रांतांना एका मध्यवर्ती सत्तेंत गोवलें नाहीं तर प्रांत बलिष्ठ होत जातील हें दुसरें कारण.प्रांतांच्या मागें लोकमताचा प्रचंड पाठिंबा रहाणार असल्यामुळें त्यांची शक्ति वाढत जाईल व ते स्वतंत्र होतील;त्यामुळें एका हिंदुस्थानचे अनेक तुकडे पडतील व लहान लहान राज्यें तेथें निर्माण होतील अशी भीती त्यांना वाटली. मध्यवर्ती सत्तेला असें पाठबळ नसल्यामुळें ती हतबल होईल व प्रांत मध्यवर्ती सत्तेचें उत्पन्न स्वतःकडे खेचतील.§असें होण्यांत वास्तविक हिंदुस्थानचें कांहीं नुकसान होणार नाहीं. म. गांधींना खरी प्रांतिक स्वायत्तता पाहिजे होती.पण ती देणें ब्रिटिशांना शक्य नव्हतें. आणि तेंच सर सॅम्युएल होअर सांगत आहेत. ते म्हणतात,ब्रिटिशांचे सर्व हितसंबंध मध्यवर्ती सत्तेंत निगडीत झालेले आहेत. ब्रिटिश व्यापारी, व ब्रिटिश धंदेवाले यांनीं किती तरी पैसा हिंदुस्थानांत गुंतवला आहे ! यांशिवाय ब्रिटिशांचें कर्ज आहे, ब्रिटिश नोकरांचें पेन्शन आहे, या सर्वांना आपल्या पैशाबद्दल जर शाश्वती मिळवून द्यावयाची असेल तर हिंदुस्थानांत फेडरेशन सुरू केलें पाहिजे.

---

§"I think from the British point of view it would be extremely dangerous to leave the centre unreformed and at the mercy of these great autonomous provinces whose chief objective would be to extort more revenues from the unreformed centre." Sir S. Hoare.

हिंदुस्थानच्या मध्यवर्ती सत्तेंत संस्थानिकांनीं यावें, व हिंदुस्थानांत जे ब्रिटिश सत्तेपासून फुटून जाण्याचे वेडे विचार चालू आहेत त्याला पायबंद घालावा असा फेडरेशन देण्यांत सर होअरचा तिसरा हेतू होता. संस्थानिक मध्यवर्ती सत्तेमध्यें आले म्हणजे हिंदुस्थानला स्थैर्य येईल व त्यांना साम्राज्यशाहीबद्दल जें प्रेम आहे त्यामुळें आपली सत्ता अबाधित राहील ही त्यांची कल्पना.*

सर सॅम्युएल होअर संस्थानिकांनाहि फेडरेशन कसें हितप्रद आहे याचें समर्थन करतात. ते म्हणतात, "मी जर संस्थानिक असतों तर मला स्वयंशासित प्रांत माझ्या भोंवतीं वाढत चाललेले आणि मध्यवर्ती सत्ता रोडावत चाललेली खपली नसती. कारण हे प्रांत पैशाच्या बाबतींत मध्यवर्ती सत्तेवर सारखें दडपण आणीत रहातील. संस्थानिकांचें हित अप्रत्यक्ष कर वाढण्यांत नाहीं तें कमी होण्यांत आहे. हे संस्थानिक पुष्कळ अप्रत्यक्ष कर देतात पण कस्टमच्या धोरणावर त्यांची सत्ता नाहीं. तेव्हां प्रांतांची सत्ता वाढणें म्हणजे संस्थानांचा भविष्यकाळ भयप्रद होणें आहे."

सर सॅम्युएल होअर यांनीं दिलेल्या कारणांपैकीं दुसरें कारण हेंच महत्त्वाचें व खरें कारण आहे. त्यांना प्रांतिक कारभार लोकांच्या ताब्यांत देण्यावांचून गत्यंतर नव्हतें. हा कारभार प्रांतांना देतांना त्यांची सूत्रें फेडरेशनच्या तांब्यांत ठेवणें जरूर होतें. नाहींतर प्रांत खरोखरच बलिष्ठ झाले असते. फेडरेशनमध्यें पुनः हिंदी लोकांनीं

* "We should all welcome the entry into central Government of India of a great force of stability and imperial feeling such as is represented by princes."

—**Sir S. Hoare.**

गडबड करूं नये म्हणून हे संस्थानिक त्यांनीं तेथें कोंबले. त्यांनीं फेडरेशनमध्यें यावें म्हणून त्यांना कराची भीति घालण्यात आली. जी करासंबंधीची भीति संस्थानिकांना दाखविली ती ब्रिटिश पार्लमेंटचा विचार करतां हिंदुस्थानला लागू होत नाहीं काय ?पार्लमेंटच्या हातांत आमचें आर्थिक जीवन किती तरी आहे! मग पार्लमेंटांतील ६००-७०० जागांपैकीं, २०० जागा, फेडरेशनमध्यें संस्थानिकांकरतां जितक्या प्रमाणांत राखून ठेवल्या आहेत तितक्या तरी आमच्याकरतां कां राखून ठेवीत नाहींत ?

हिंदुस्थानांत जें फेडरेशन स्थापन व्हावयाचें आहे, तें बादशहानें पार्लमेंट सभांच्या विनंतीवरून जाहीरनामा काढून स्थापन करावयाचें आहे. नव्या कायद्यानें त्याची स्थापना केली नाहीं. हें फेडरेशन स्थापन व्हावयास दोन अटी आहेत. फेडरेशनमध्यें सर्व प्रांत चीफ कमिशनरच्या प्रांतासह समाविष्ठ झाले पाहिजेत आणि हिंदी संस्थानेंहि त्यांत आलीं पाहिजेत. ही हिंदी संस्थानें जेव्हां फेडरेशनमध्यें यावयाचें कबूल करतील तेव्हां फेडरेशन स्थापलें जाईल. पण सर्व संस्थानिक फेडरेशनमध्यें आले तरच फेडरेशन स्थापन होईल असें नाहीं. वरिष्ठ कायदेमंडळांत संस्थानिकांच्या वाट्याला ज्या १०४ जागा देण्यांत आल्या आहेत, त्यांपैकीं निम्या म्हणजे ५२ जागा भरतील इतके संस्थानिक आणि ( किंवा नाहीं ) एकंदर संस्थानी लोकसंख्येपैकीं निम्मी लोकसंख्या असणारीं संस्थानें जेव्हां कबूल होतील तेव्हां हें फेडरेशन जन्म पावणार आहे. संस्थानांतील लोकसंख्या ७, ८९, ८१, ९१२ इतकी आहे. त्यांपैकीं निम्म्या लोकसंख्येचीं संस्थानें आलीं पाहिजेत व त्यांच्या प्रतिनिधींची

संख्या ५२ भरली पाहिजे. या दोन अटी कां घातल्या हें समजून घेतलें पाहिजे. नुसती लोकसंख्येची अट घातली असती तर, हैद्राबाद, म्हैसूर, काश्मीर, ग्वाल्हेर, बडोदें, त्रावणकोर, कोचीन आणि जयपूर या आठ संस्थानांची लोकसंख्या निम्मी असल्यामुळें ते आले म्हणजे फेडरेशन आलें असें झालें असतें. पण आठ संस्थानें आल्यानें संस्थानिकांचें प्रतिनिधित्व पुरें होत नाहीं, म्हणून ५२ जागा भरण्याची अट घातली आहे. हे आठ संस्थानिक फक्त २३ प्रतिनिधी पाठवूं शकतात. ५२ प्रतिनिधी हवे असतील तर इंदूर, भोपाळ, कोल्हापूर, जोधपूर, उदेपूर, पतियाळा, बिकानेर वगैरेसारखीं कांहीं दोनदोन जागा मिळालेलीं मोठीं संस्थानें व लहान लहान संस्थानेंहि त्यात सामील व्हावयास पाहिजेत. एकेक जागा दिलेल्या संस्थानांत अनेक चिल्लर संस्थानांची भरती केली आहे. हिंदुस्थानांतील ११ प्रांतांना संयुक्त घटनेंत यावयाचें आहे किंवा नाहीं हें विचारण्याची भानगडच कायद्यांत नसल्यामुळें हे सर्व प्रांत मुक्या मेंढराप्रमाणें फेडरेशनमध्यें आलेच आहेत असें कायदा धरून चालला आहे. फेडरेशनमध्यें येण्यामुळें संस्थानिकांचें कांहीं अधिकार कापले जाणार असल्यामुळें त्यांची संमति घेणें जरुर आहे असें कायदा करणारांना वाटतें. उलट प्रांतांना फेडरेशनमुळें चार दोन अधिकार अधिकच मिळणार असल्यामुळें त्यांना विचारण्याची जरुरी नाहीं असें ठरविण्यांत आलें आहे. तेव्हां नव्या कायद्यानें ह्या दोन गटांना सांधण्याचा एक आराखडा तयार करून ठेवला आहे. प्रत्यक्ष फेडरेशनची स्थापना केली नाहीं.

हिंदुस्थानांत पूर्वी दहा प्रांत होते. त्यांपैकीं, ब्रम्हदेश आमच्यां-तून तोडून काढला आणि ओरिसा व सिंध हे दोन प्रांत नवे

बनविले. आतां हिंदुस्थानांत मुंबई, मद्रास, बंगाल, पंजाब, संयुक्त प्रांत, वऱ्हाड मध्यप्रांत, बिहार आसाम, ओरिसा, सीमाप्रांत व सिंध असे ११ प्रांत आहेत. यांशिवाय चीफ कमिशनरचे खालील प्रांत हेहि संयुक्त राज्यघटनेंत अंतर्भूत होणार आहेत. दिल्ली, अजमीर-मेरवाडा, कूर्ग, ब्रिटिश बलुचिस्थान, आंदमाननिकोबार बेटें, आणि पंथपिप्लोदा हे कमिशनरचे सहा प्रांत येतात. या सहा प्रांतांत चीफ कमिशनरची सत्ता चालते. वास्तविकपणें हे लहान लहान विभाग स्वतंत्र कां ठेवले आहेत हें कळत नाहीं. राजकीयदृष्ट्या त्या मोक्याच्या जागा आहेत असा पुष्कळ दिवसांचा भ्रम आहे. तो भ्रम नाहींसा होण्या इतकी राजकीय स्थिती खास बदलली आहे. तेव्हां जवळच्या प्रांतांत हे लहान लहान विभाग अन्तर्भूत व्हावयास हवेत व तशी सत्ता नव्या कायद्यांत दिलेली आहे. वऱ्हाड प्रांताची अशीच भानगड आहे. त्याच्यावर मालकी म्हणे निजामची; आणि त्या निजामच्या राजनिष्ठेची शपथ घेतली कीं, तेथील प्रजाजन ब्रिटिश सत्तेखालीं आले.

ब्रह्मदेश जसा हिंदुस्थानपासून तोडून टाकला, त्याप्रमाणें एडन हाहि ब्रिटिशांनीं हिंदुस्थानपासून तोडून आपल्या वसाहतींत समाविष्ट करून घेतला. एडनच्या उत्कर्षाकरतां मुंबई सरकारनें कितीतरी पैसे खर्च केले होते ! एडनप्रमाणें सीलोन हाहि १७९२सालीं मद्रासपासून हिरावून घेतला गेला होता.

## संस्थानें

हिंदुस्थानांतील संस्थानांच्या प्रश्नाकडे यापूर्वी फारसें कोणी लक्ष देत नव्हते. संस्थानिक स्वतःला इंग्लंडच्या बादशहाशीं आपले तह

वगैरे झाले असल्यामुळें आपला व बादशहाचा दर्जा समान आहे असें मानत आले. त्यामुळें कांहींच्या डोक्यांत इतर स्वतंत्र राज्या-प्रमाणें आपले वकील इंग्लंडच्या दरबारीं ठेवावे व त्यांचे वकील आपल्या दरबारीं ठेवून घ्यावें अशा कल्पना येत असत. लॉर्ड कॅनिंगनें १८५८ मध्येंच साऱ्या संस्थानिकांना तुम्ही बादशहाचे अंकित आहां असें सांगून टाकले होतें. पण समतेची कल्पना त्यांच्या डोक्यांतून जाईना. १८६५ पासून ब्रिटिश सरकारनें या संस्थानिकांना त्यांचा दर्जा काय आहे याची जाणिव करून देण्यास सुरवात केली. १८६७ सालीं टोंकच्या नबाबाला पदच्युत केलें; १८७० मध्यें अलवारच्या राजाला गादीवरून काढलें; १८७५ मध्यें बडोदा नरेशांना पदच्युत केलें; १९२१ मध्यें इंदूरच्या राजाला गादी सोडावयास लावलें; तीच पाळी नाभा, अलवार वगैरे राजांवर आली. २७ मार्च १९२६ रोजीं लॉर्ड रीडिंगनें निजामला तर चांगलाच तडाखा लगावला. त्यामुळें संस्थानिक हे ब्रिटिशांच्या अधिराज्याखालीं येत आहेत असें सिद्ध झालें.

पुढें जुलै १९२७ मध्यें बटलर कमिटी नेमली गेली. या कमिटीनें आपला रिपोर्ट १९२९ मध्यें सादर केला. या रिपोर्टानें अधिराज्य (Paramountcy) म्हणजे काय याची व्याख्या सांगण्याचें टाळलें. संस्थानिकांना तह, परंपरा, रूढी वगैरेमुळें कांहीं अधिकार प्राप्त झाले असले तरी तेवढ्यामुळें ते स्वतंत्र ठरत नाहींत. त्यांना जी काय सत्ता मिळाली आहे ती ब्रिटिशांच्या स्वामित्वाखालींच मिळाली आहे. त्यांना जर आपले हक्क कायम टिकवावयाचे असतील तर त्यांना ब्रिटिशांचें अधिराज्य मानलेंच पाहिजे असें बटलर कमिशननें सुनवलें.

बटलर रिपोर्टावर सर्व संस्थानिक क्रुद्ध झाले आणि पुनःआपल्या दर्जाबद्दल भांडूं लागले. ब्रिटिश मुत्सद्दीही इतके वस्ताद आहेत कीं, ते या अधिराज्याची स्पष्ट व्याख्या करीतच नाहींत. त्या ऐवजीं अधिराज्याविषयीं भरपूर विवरण मात्र करतात. सर सॅम्युअल होअर हे अधिकारी नात्यानें सांगतात 'संस्थानासंबंधीचे बादशहाचे जे हक्क त्यांना अधिराज्याचे हक्क म्हणतात.' सॅम्युअल होअरनीं लॉर्ड कॅनिंग व लॉर्ड मिंटो यांची संस्थानिकांच्या दर्जासंबंधीची स्पष्टोक्तीहि त्या वेळीं उद्धृत केली.

हे संस्थानिक आपल्या राज्याचा कारभार कसाहि चालवीत असले व त्या बाबतींत त्यांना तहान्वयें अधिकार प्राप्त झाले असले तरी हिंदुस्थानवर संकट आलें किंवा एखाद्या संस्थानांत बंडाळी माजली तर त्याचें निवारण करण्याची जबाबदारी बादशहावर आहे. संस्थाना संस्थानांना आपसांत करारमदार करतां येत नाहींत किंवा जर्मन जपानबरोबर व्यापारविषयक अगर अन्य बोलणीं करतां येत नाहींत. पोस्ट, तारायंत्रें, नौकानयन, नाणीं किंवा नोटा वगैरे बाबतींतहि त्यांना काय स्वातंत्र्य आहे ? कांहीं संस्थानांच्या रेल्वे आहेत, कांहीं नाणींहि पाडतात, कांहीं पोस्टाचीं तिकिटेंहि छापतात, पण तेवढ्यामुळें त्यांचें पारतंत्र्य कमी होत नाहीं. एक गोष्ट संस्थानिकांच्या तर्फे सांगितली पाहिजे. ईस्ट इंडिया कंपनीनें प्रथम प्रथम संस्थानिकांच्या बरोबर, जे तह केले तें समानतेच्या नात्यानें केले. पण पुढें हें नातें बदलत गेलें आणि संस्थानिक हे ब्रिटिशांचे अंकित झाले. ब्रिटिश सत्तेपुढें संस्थानिकांचे पूर्वीचे तहनामे हे कमकुवत ठरले आणि आज संस्थानिक स्वतःला कितीहि मोठे मानोत, त्यांचा व ब्रिटिश हिंदुस्थानचा दर्जा साम्राज्याच्या दृष्टीनें भिन्न नाहीं.

नव्या कायद्याच्या दृष्टीनें संस्थानिकांचा दर्जा काय रहाणार हा प्रश्न आहे. संस्थानिकांवर संयुक्त घटनेंत येण्याबद्दल बळजबरी केली जाणार नाहीं हें जरी खरें असलें तरी तत्त्व व व्यवहार यांची संगति कधींच लागत नाहीं. व्यवहार हा तत्त्वापेक्षां कधीं कधीं अगदीं विरुद्ध टोकाला गेलेला दिसतो. पार्लमेंटांत भारतमंत्र्यांनीं आपण संस्थानिकांवर सक्ति करीत नाहीं असा निर्वाळा दिला असला तरी सक्ति ही अनेक मवाळ स्वरूपें धारण करून आपला प्रभाव गाजवितेच. कधीं खुषामत, कधीं धाकदपटशा, कधीं प्रलोभन तर कधीं भावी परिणामांचें विश्वरूपदर्शन असे प्रकार ब्रिटिश राजनीतीला पारखे नाहींत. तेव्हां संस्थानिक हे आज ना उद्यां हंसत नाहीं तर तोंडें वेडींवाकडीं करीत या नव्या चक्रव्यूहांत येऊन दाखल झाल्यावांचून रहाणार नाहींत.

फेडरेशन अंमलांत यावयास वरिष्ठ कौन्सिलांत बसूं शकतील असे ५२ प्रतिनिधि व निम्मी लोकसंख्या व्यापली जाईल इतकी संस्थानें आलीं पाहिजेत अशी अट असल्याचें वर सांगितलीच आहे. फेडरेशनमध्यें येणें हें सक्तीचें कां केलें नाहीं हा खरा प्रश्न आहे. त्याचें कारण उघड आहे. पूर्वींचे कांहीं तहनामे आहेत, त्यांची वाट काय लावावयाची हा प्रश्न मुत्सद्यांपुढें होता. सक्ति झाली तर त्या तहनाम्यांना हरताळ फासला जातो. तेव्हां संस्थानिकांनीं आपणहून असें जाहीर करावयाचें आहे कीं, आम्ही अमुक अमुक बाबतीपुरते संयुक्त राज्यघटनेंत यावयास व त्याकरतां इतके इतके हक्क सोडून द्यावयास तयार आहों. या अधिकारांचा त्याग प्रत्येक संस्थानिकानें व्यक्तिशः एका पत्रकाद्वारें करावयाचा आहे. त्याला (Instrument of accession) संमति किंवा मान्यतापत्रक हें नांव

दिलें आहे. हें मान्यतापत्रक त्यानें सादर करून असें सांगावयाचें आहे कीं, बादशहा, गव्हर्नर जनरल, संयुक्त कायदेमंडळ, संयुक्त कोर्ट, किंवा दुसरी एखादी संयुक्त घटनेची सत्ता यांनीं मान्यतापत्रकांत ज्या अटी घातल्या आहेत, त्यांच्या अनुषंगानें माझ्या संस्थानांत हुकमत चालवावी व त्या हुकमतीची जबाबदारीहि माझ्यावरच आहे. संस्थानिकांना स्वतःच्या मृत्युपत्रावर सही करण्याइतकें हें जड वाटत असेल.पण काय करतात बिचारे!प्रजेच्या हक्काच्या बाबतींत मुंगी जाऊं न देणारे हे संस्थानिक या फेडरेशनचा हत्ती शिरकू देण्यास तयार होणार आहेत. प्रजा त्यांच्या विरुद्ध, सरकार त्यांचे अधिकार कापण्यास तयार आणि काँग्रेसही त्यांची सुलतानशाही अमान्य करणारी. हें मान्यतापत्रक देतांना संस्थानिकांनीं असेंहि म्हणावें कीं, फेडरेशन अमुक तारखेच्या आंत अस्तित्वांत आलें तरच त्या पत्रकांतील अटी मजवर बंधनकारक रहाव्या, आणि त्या तारखेनंतर जर फेडरेशन जन्मास येणार असेल तर माझें मान्यतापत्रक रद्द समजलें जावें. ही अट वास्तविकपणें निरर्थक आहे. असें तारखेकडे पाहून कोणता संस्थानिक आपली मान्यता देणार आहे ? पण हा प्रलोभनाचा एक प्रकार आहे. संस्थानिकांच्या कारभारांत हिंदुस्थानला थोडासा कां होईना पण प्रवेश मिळाला आहे ही गोष्ट इतर कांहीं असले तरी स्पष्ट आहे.

या मान्यतापत्रकांत संस्थानिकानें (१) संयुक्त कायदेमंडळाला अमुक अमुक विषयाबाबत माझ्या संस्थानांत कायदे करण्याला अधिकार आहे ही गोष्ट मान्य करतो असें म्हटलें पाहिजे. (२) तसेंच संयुक्त कायदेमंडळाच्या कायदे करण्याच्या सत्तेला, किंवा

संयुक्त सरकारच्या अंमलबजावणीला इतक्या इतक्या मर्यादा आहेत हेंहि त्यांनीं सांगितलें पाहिजे.

कोणत्याहि संस्थानिकाला पुरवणीमान्यतापत्रक मागाहून काढतां येईल व ते बादशहानें मान्य केलें तर आपल्या संस्थानांत फेडरल सत्तेचा किंवा बादशहाचा जो अंमल चालणार असेल तो व्यापक करतां येईल.

मान्यतापत्रक किंवा पुरवणी मान्यतापत्रक हें बादशहाला पसंत पडलें तरच तो तें मान्य करतील. त्याला जर मान्यतापत्रकांतील अटी फेडरेशनच्या योजनेशीं विसंगत आहेत असें वाटले तर तो त्या मान्य करणार नाहीं.

प्रत्येक आज्ञापत्रांत अशी एक अट असेल कीं या कायद्याला जें दुसरें परिशिष्ठ जोडलें आहे त्यांतील बाबी मान्यतापत्रकाला बाध न आणतां पार्लमेंटनें दुरुस्त कराव्या. मात्र ही दुरुस्ती संस्थानिकांनीं आपल्याला मान्य आहे असें पुरवणीपत्रकाच्या द्वारें कळविलें तरच बदललेल्या कायद्यांची संस्थानांत अंमलबजावणी होईल.

फेडरेशन स्थापन झाल्यावर एखाद्या संस्थानानें फेडरेशनमध्यें येण्याची इच्छा प्रदर्शित केली तर गव्हर्नर जनरल ती गोष्ट बादशहांना कळवील; पण फेडरेशन स्थापून वीस वर्षे झाली असली तर फेडरल कायदेमंडळांना ही विनंती करावी लागेल. संस्थानिकांनीं फेडरेशनमध्यें यावयासंबंधी इतक्याच अटी आहेत.

जेव्हां संस्थानिकांच्या हक्कसमर्पणाचा मसुदा प्रथम तयार झाला तेव्हां त्यांत दोन अनिष्ट गोष्टी आहेत असें संस्थानिक म्हणाले.

जुन्या मसुद्याप्रमाणें फेडरेशनचा कायदा संस्थानिकांवर बंधनकारक ठरविला होता पण त्याला कांहीं अपवादादाखल मर्यादा घातल्या होत्या. पण संस्थानिकांना फेडरेशन आपल्यावर बंधनकारक नको असून मान्यतापत्रक बंधनकारक हवें होते. त्यांना मान्यतापत्रकाप्रमाणें आपल्यावर राज्य चालावयास पाहिजे आहे. नवा कायदा ते दुय्यम समजतात आणि अशी भीतीहि व्यक्त करतात कीं, नवा कायदाच जर आमच्यावर राज्य चालवणार असला तर अपवादाचीं छोटीं छोटीं कुंपणें केव्हांच तुडवलीं जातील व आम्ही ब्रिटिश प्रजाजनांच्या रांकेंत येऊन बसूं.

त्यांच्या विरोधाला दुसरें एक कारण होतें. ' आपल्या संस्थानाला व प्रजेला हा कायदा लागू करण्याचें आपण कबूल करतों' असें त्यांनीं पहिल्या मसुद्याप्रमाणें जाहीर करावयाचें होते. संस्थानिकांना प्रजेचा स्वतंत्र उल्लेख असह्य झाला व दिल्ली व मुंबई येथें जमून त्यांनीं आपला संताप व्यक्त केला. पुढें सर सॅम्युअल होअर यांनीं त्या मसुद्यांत दुरुस्ती केली. त्यांनीं मान्यतापत्रकाला प्राधान्य दिलें व प्रजाजनांचा उल्लेख काढून टाकला. आतां संस्थानिक असें म्हणूं शकतील कीं, आम्ही जें मान्यतापत्रक देऊं व त्यांत जेवढया बाबी घालूं तेवढयांचाच अंमल आमच्यावर चालेल.

पण त्यांत एक अडचण उपस्थित झाली. संस्थानें अनेक आहेत व राज्यकारभाराच्या बाबीहि अनेक आहेत. त्यांतील एक संस्थानिक पहिल्या दहा मान्य करील, दुसरा शेवटच्या दहा मान्य करील, तिसरा मधल्या दहा कबूल करील आणि अशाप्रकारें संयुक्त घटनेच्या डोलारा हां हां म्हणतां कोसळून पडेल. संयुक्त घटनेच्या कक्षेंत पन्नास प्रकारचीं निरनिराळीं राज्यें

सुरू होतील. तेव्हां या ५९ बाबींपैकीं प्रत्येक संस्थाननें कमीत-कमी ४८ बाबी मान्य केल्याच पाहिजेत त्याशिवाय फेडरेशन चालणें शक्य नाहीं असें त्यांना बजावलें आहे. एखादा संस्थानिक वाटेल त्या बाबी त्यांत घालूं लागला तर बादशहा त्या अमान्य करील. संयुक्त कायदेमंडळाच्या कक्षेंत येणाऱ्या ५९ विषयांपैकीं वर म्हटल्याप्रमाणें प्रत्येक संस्थाननें ४८ विषय मान्य केलेच पाहि-जेत अशी त्यांना अनुल्लेखित समज देण्यांत आली आहे.

एखाद्या संस्थानिकाला आणखी कांहीं बाबी संयुक्त राज्यघटने-कडे सुपूर्द कराव्यात असें वाटलें तर त्याला पुरवणी मान्यता पत्रक काढून तशी बदल करता येते.मात्र एकदा ज्या बाबीना त्यानें मान्यता दिली असेल त्या त्याला अमान्य करतां येणार नाहींत. फेडरेशनमध्यें येण्याचीं दारें २० वर्षे पर्यंत संस्थानिकांना उघडीं ठेवलीं आहेत. वीस वर्षांनंतर जर एखाद्या संस्थानिकाला फेडरेशनमध्यें येण्याची इच्छा झाली, तर वरिष्ठ व कनिष्ठ कायदे-मंडळानें तसा ठराव केला पाहिजे व नंतर तो ठराव गव्हर्नर जन-रल राजेसाहेबांकडे पाठवतील. मान्यतापत्रक मान्य करणें न करणें, वीस वर्षांनंतर संस्थानिकांना फेडरेशन मध्यें घेणें न घेणें वगैरे गोष्टीना इंग्लंडच्या बादशहांची संमति लागेल. अशा संमति-शिवाय मान्यतापत्र हें अंमलांत येणार नाहीं.

फेडरेशन अंमलांत यावयास कोणत्या कोणत्या गोष्टी अवश्य आहेत याचें आपण समालोचन करूं.

( १ ) ५२ जागा भरतील इतके संस्थानिक व निम्मी संस्थानी वस्ती व्यापली जाईल इतकी संस्थानें फेडरेशनला तयार झालीं पाहिजेत.

( २ ) त्यांच्यापैकीं प्रत्येकानें मान्यतापत्रक दिलें पाहिजे व तें बादशहानें मंजूर केलें पाहिजे.

( ३ ) त्यानंतर पार्लमेंटच्या दोन्हीं गृहांनीं राजेसाहेबांना विनंति केली पाहिजे कीं,आपण अखिल भारतीय संयुक्त राज्यघटना अमुक तारखेपासून सुरूं करा. या कायदेशीर चक्रांतून गेल्यावर फेडरेशन येणार आहे.

संस्थानिकांनीं मान्यतापत्रक लिहून देण्यापूर्वीं आपल्यावर काय जबाबदारी पडते हें पाहिलें पाहिजे.

( १ ) फेडरेशनमध्यें यावयाचें किंवा नाहीं हें संस्थानिकांच्या इच्छेवर अवलंबून आहे; पण फेडरेशनमध्यें एकदां ते आले म्हणजे त्यांना विशिष्ट परिस्थिति निर्माण झाल्याशिवाय बाहेर पडतां यावयाचें नाहीं.ही विशिष्ट परिस्थिति कोणती हे(४)मध्यें दिलें आहे.

( २ ) मान्यतापत्रक जें द्यावयाचे तें स्वतःकरतां द्यावयाचें नसून आपल्या वारसदारांतर्फें, पुत्रपौत्रादिकांतर्फे, गादीवर येणाऱ्या नातलगांतर्फे द्यावयाचे आहे.

( ३ ) मान्यतापत्रक दिल्यावर त्यांनीं आपल्या संस्थानांत संयुक्त राज्यघटनेच्या कायद्यांची अंमलबजावणी करण्याबद्दल स्वतः जबाबदारी घेतली पाहिजे. हे कायदे मान्यता पत्रकांत ज्या बाबी अंतर्भूत केल्या असतील, तेवढ्या पुरतेच असतील.

( ४ ) फेडरेशनमध्यें कांहीं कारणानें पेंचप्रसंग निर्माण झाला आणि गव्हर्नरजनरलनें राज्यघटना तीन वर्षेपर्यंत तहकूब केली; प्रांतांतील स्वयंशासित राज्यें मोडकळीस आलीं आणि ग. जनरल सुलतानशाही गाजवून स्वतः राज्यकारभार चालवूं लागला तर संस्थानिकांना फेरविचारास संधि दिली आहे.

फेडरेशनचें हें विराट स्वरूप पाहून आज संस्थानिक गोंधळून गेले आहेत. आपण काय करावयाला गेलों आणि काय होऊन बसलें याबद्दल त्यांना विषादहि वाटत असेल. ब्रिटिश साम्राज्याच्या विस्तीर्ण वृक्षाखालीं पडलेली फुलें पदरांत गोळा करावींत म्हणून ते शेले आणि दुपेटे सरसावून गेले आणि पदरांत पहावें तों फुलांच्या ऐवजीं निखाराच पडलेला त्यांना दिसला. पहिल्या राउंड टेबलला कोणाच्या सांगीनें त्यांना फेडरेशनचें अपत्य मागण्याची दुर्बुद्धि झाली कोणास ठाऊक; पण तें अपत्य आज त्यांच्या मुळावर आलें आहे व ब्रिटिश हिंदुस्थानलाहि छळत आहे. वर्षभरांत संस्थानिकांचा पहिला उत्साह मावळला. फेडरेशनमध्यें गेल्यानें आपले हक्क किती जाणार, आपल्यावर जबाबदाऱ्या कोणत्या येणार, आपल्या संस्थानांत परक्यांचा कारभार कसा सुरू होणार, तो कारभार सुव्यवस्थितपणें चालविण्याची जबाबदारी आपल्याला कशी पत्करावी लागणार, वगैरेचें सत्यस्वरूप त्यांना आतां दिसूं लागले आहे. मान्यतापत्रक आपण आपल्या हातानें लिहून देणें म्हणजे आपलाच खळगा आपण खणणें आहे याहि गोष्टीचें वैषम्य व दुःख त्यांना होत असावें. स्वतःच्या दौर्बल्याची व पारतंत्र्याची जाणीव होऊन त्यांना पराकाष्ठेचा खेद होत असेल. संस्थानिकांमध्यें एकी नाहीं, प्रजेचा पाठिंबा नाहीं, राष्ट्रीय वृत्तीचा हिंदुस्थान त्यांना थारा देत नाहीं, आणि ब्रिटिश सरकार त्यांचें पूर्व उपकार विसरून आपल्या साम्राज्याच्या स्थैर्याकरतां त्यांचा बळी देण्यास तयार झाला आहे असें करुणास्पद दृश्य संस्थानिकांपुढें उभें आहे. संस्थानिकांच्या मागण्या ह्या समर्थनीय असत्या तर काँग्रेसनें त्यांचा पक्ष अवश्य घेतला असता. आपली झोटिंगपाच्छाई

अबाधित चालू रहावी एवढीच त्यांची इच्छा व त्याकरतां त्यांची सारी धडपड आहे. ब्रिटिश सरकारला तरी हे आपले जुने दोस्त सोडण्याची काय जरुरी आहे ? त्यांना मूठभर इंग्लिश भांडवल-वाल्यांचे व व्यापाऱ्यांचें हित साधावयाचें आहे व हिंदुस्थानच्या नव्या कायद्याला स्थैर्य येण्याकरतां संस्थानिकांचे हे अजस्त्र लोखंडी नांगर टाकावयाचे आहेत.

अशा स्थितींत संस्थानिकांनीं आपसांत एकी करणें, फेडरेशन-मध्यें न येणें व फेडरेशन अस्तित्वांत येऊं न देणें एवढें केलें तर त्यांच्या दृष्टीनें आलेलें संकट टळेल. मान्यतापत्रकावर त्यांनीं सही जर केली नाहीं तर त्यांचा कार्यभाग होईल. हें मान्यतापत्रक काय स्वरूपाचें आहे याचें वर्णन वर केलेंच आहे. पण कायदेशीरदृष्ट्या त्याला काय महत्त्व आहे हें पाहिलें पाहिजे. हें मान्यतापत्रक म्हणजे दोन समान राष्ट्रांतील तह नाहीं.आंतरराष्ट्रीय दृष्ट्या संस्था-निकांना सार्वभौमत्वाचा दर्जा नाहींच. बडोदें, हैद्राबाद, म्हैसूर वगैरे संस्थानें स्वतंत्र म्हणून कोणत्या परक्या राष्ट्राबरोबर तह करूं शकतील ? संस्थानिकांना स्वातंत्र्य नसल्यामुळें त्यांना ब्रिटिश सरकारबरोबर समानतेनें तह करतां येणार नाहीं.मग या मान्यता-पत्रकाचा अर्थ काय ? जे. एच्. मॉर्गन यांनीं हैद्राबाद प्रकरणीं जो गुप्त खलिता पाठविला होता,त्यांत त्यांचें मत सामान्यतः व्यक्त झालें आहे. ‘ मान्यतापत्रक म्हणजे सर्व संस्थानांचे अधिपति जे इंग्लंडचे बादशहा, त्यांच्याकडे कांहीं हक्क व कांहीं सवलतींकरतां केलेला अर्ज होय. ’ संस्थानिकांची विटंबना यापेक्षां जास्त काय होणार ? त्यांना आपण परतंत्र आहों, गुलाम आहों याचें ज्ञान होत नाहीं, हेंच दुर्दैव आहे. मान्यतापत्रक तह नाहीं.मान्यतापत्रक

ह्या एक कायदेशीर दस्तऐवज आहे. तो जर तह असता तर त्याचा अर्थ लावण्याकरतां स्वतंत्र सोय होऊं शकली नसती. पण तो तह नसल्यामुळें त्यासंबंधीं वारंवार उत्पन्न होणाऱ्या शंका व अडचणींचा निर्णय त्रयस्थ न्यायाधीशाकडून करून देणें शक्य आहे.

हें मान्यतापत्रक बादशहांना समर्पण करणें म्हणजे संस्थानिकांनीं आपण फेडरेशनचे घटक झालों असें कबूल करणें आहे. त्याबरोबरच फेडरेशनच्या घटनेला आपण मान्यता देत आहोंत असेंहि संस्थानिक जाहीर करणार आहेत. अशा प्रकारें कायद्याच्या कलमांचा विचार केला तर संस्थानिकांच्या हातीं केवढी प्रचंड सत्ता आली आहे! ते म्हणतील तरच फेडरेशन अस्तित्वांत येईल.

संस्थानांत त्यानंतर दुहेरी राज्यकारभार चालू लागेल. एक संस्थानिकांचा सुलतानशाही कारभार व दुसरा संयुक्त राज्यघटनेचा लोकशाहीवर अधिष्ठित झालेला लोकमतानुवर्ती कारभार. ह्या लोकशाहीच्या कारभारामुळें संस्थानिकांना कांहीं वैषम्य वाटलें तर तेहि आपल्या कारभारांत बदल करतील. लोकशाही व सुलतानशाही यांच्या द्वंद्वयुद्धाला संस्थानांत सुरवात झाल्यावर लोकशाहीचा पराभव होईल ही गोष्ट अशक्य आहे. संस्थानिक जर संयुक्त राज्यघटनेंतील कायद्यांत व्यत्यय आणतील, तर त्याची दखलगिरी ग. जनरल ताबडतोब घेऊन त्यांना वठणीवर आणील.

ह्या दोहाती कारभार संस्थानांत कसकसा रंगणार आहे याची मौज पहावयास सांपडेल. संस्थानिकांनीं आपल्या प्रजेला जर कायदेमंडळ दिलें व राज्यकारभाराची कांहीं जबाबदारी त्यांच्यावर टाकली तर तेथें दोनच्या ऐवजीं तीन प्रकारचें राज्य सुरू होईल. १ संस्थानिकांचें,

२ संस्थानिकांच्या प्रतिनिधींचें, ३ फेडरेशनच्या अधिकाऱ्यांचें. अशा या त्रिविध राज्यपद्धतींत काय काय प्रकार होणार आहेत हें कोण सांगूं शकेल ? पण आज जरी संस्थानांत हे तीन प्रकारचें राज्य चालणार असल्याचें दृश्य दिसत असलें तरी कालांतरानें यामध्यें उभारलेलीं कुंपणें नष्ट होणार आहेत हें प्रगतिपर राजकारणाचें प्रमुख लक्षण आहे. जनतेच्या राजकीय आकांक्षांना कोणते कायदे बंधनें घालूं शकणार? ज्याप्रमाणें ब्रिटिश सरकारनें हें पूर्णपणें लक्षांत ठेवावें कीं, आज ना उद्यां आपल्याला हिंदुस्थानांतून पाय काढून घ्यावा लागणार आहे, त्याचप्रमाणें संस्थानिकांनींहि हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, आपली सत्ता संपण्याचे दिवस आले आहेत. फेडरेशनमध्यें संस्थानिकांचें आगमन म्हणजे त्यांच्या सत्तेला लागलेला प्रचंड सुरुंग आहे. तो फेडरेशनमुळेंच लागणार असें नाहीं. फेडरेशनशिवायहि तो लागल्यावांचून राहिला नसता. संस्थानिकांनीं अधिराज्याच्या नांवाखालीं इंग्लंडच्या बादशहाच्या मागें कितीहि दडण्याचा प्रयत्न केला तरी सायंकाळच्या या सावलीचा त्यांना उपयोग होणार नाहीं. जेथें ब्रिटिशांना आपली शाश्वती वाटत नाहीं, तेथें ते संस्थानिकांना कसला आधार देणार ?दोन पोहणारे बुडूं लागले तर शहाणा पोहणारा आपल्या प्राणाची प्रथम काळजी घेतो. गटांगळ्या खाणाराला तो सावरूं लागला तर दोघेहि रसातळास जातील.

हिंदी जनतेनें उद्यां स्वातंत्र्य प्राप्त करून घेतलें तर संस्थानिकांना जे करारमदार करावे लागतील ते हिंदी जनतेबरोबर करावे लागतील. ब्रिटिश सरकारबरोबर केलेले दीडशें वर्षांपूर्वींचे करारमदार हे निराळ्या परिस्थितींत केले असल्यामुळें त्यांना मान्यता देणें, त्यांत बदल करणें अगर ते अजिबाद रद्द

करणें हें त्या वेळच्या परिस्थितीवर अवलंबून राहील. संस्थानिकांच्या आजच्या बेमुर्वतखोर व चढेल वर्तनाचा तेव्हां विचारच होणार नाहीं इतकी स्थितप्रज्ञता खास कोणांत असणार नाहीं. तेव्हां संस्थानिकांनीं हें पक्कें लक्षांत ठेवावें कीं, यापुढें त्यांना हिंदी प्रजे-बरोबरच नांदावयाचें आहे.भावी स्वातंत्र्यांत संस्थानिकांचा दर्जा काय हें हिंदी प्रजा ठरविणार आहे.स्वतंत्र हिंदुस्थान संस्थानांमध्यें आजच्या सारखी सुलतानशाही कधींच चालू देणार नाहीं. संस्थानिकांना प्रजेचे सेवक म्हणून अल्पवेतनावर काम करावें लागेल. हें भविष्य-काळचें दृश्य असंभाव्य आहे अशी दृष्टीला अंधता येऊं देण्याचें कारण नाहीं. प्रजेच्या हातीं प्रजेचा कारभार देऊन आपणहि प्रजेचे सेवक म्हणून रहाणें हें संस्थानिकांनीं आपल्याला श्रेयस्कर नाहीं काय याचा विचार अवश्य करावा.

संस्थानिकांच्या मागें हें मान्यतापत्रकाचें शुक्लकाष्ट कां लावलें याचें एक कारण वर दिलें आहे. याबद्दल ब्रिटिशांनीं प्रांतावर जशी सक्ति केली तशी संस्थानिकांवर कां केली नाहीं ? एक तर संस्थानिकांनीं अशी इच्छा प्रदर्शित करणें स्वाभाविक होतें कीं, फेडरेशन मध्यें न येणें हें आमच्यावर सोपवावें. आम्ही फेडरेशनचें स्वरूप काय आहे तें पाहूं. आणि आमच्या हक्कांना बाध येत नाहीं अशी आमची खात्री पटली तर आम्ही आपणहून मान्यतापत्रक काढून फेडरेशनमध्यें सामील होऊं ही मागणी मान्य करण्यांत आली. मात्र त्यांच्या तहनाम्यांतील अटी जशाच्या तशाच कायम रहातील या अडवणुकीच्या बुद्धीनें जर संस्थानिकांनीं मान्यतापत्रक सादर केलें तर तें बादशहा अमान्यच करील. याचाच अर्थ असा कीं,पूर्वीच्या तहनाम्याच्या अटी फेडरेशनमध्यें प्रवेश करण्यानें कायम रहाणार नाहींत; त्यांत बदल होणें अपरिहार्य आहे.

दुसरा एक प्रश्न ज्याची वर चर्चा केली आहे तोहि कांहींच्या कल्पनेप्रमाणें विवादविषय होऊं शकेल. फेडरेशनमध्यें आल्यानें संस्थानिकांचे सार्वभौमत्त्वाचे हक्क अल्पप्रमाणांत कां होईना, जातात किंवा नाहीं ? ज्यांचें म्हणणें असें आहे कीं, संस्थानिकांना सार्वभौमत्वाचे हक्कच नाहींत, ते ब्रिटिशांचे केवळ अंकित आहेत, त्यांना जें नाहींच तें जाणार काय असें वाटेल. संस्थानिक हे अंकित आहेत हें खरें आहे पण त्याहि स्थितींत त्यांना संस्थानांत धुमाकूळ घालण्याचे हक्क होतेच कीं नाहीं ? फेडरेशनमध्यें आल्यावर पहिल्या यादींतील ५ म्हणा किंवा ४५ म्हणा विषयांना त्यांनीं संमति दिली कीं, त्यांची तितकी सत्ता संकुचित झाली हें निर्विवाद आहे. संस्थानिक आपणहून जेव्हां बादशाहा, ग. जनरल, फेडरल कोर्ट, फेडरल कायदेमंडळ आणि दुसरी कोणतीहि फेडरल सत्ता यांनीं आपल्या संस्थानांत मान्यतापत्रकांतील बाबींचा कारभार चालवावा असें सांगतात, तेव्हां त्यांची सार्वभौम सत्ता कमी होत नाहीं असें कसें म्हणतां येईल ? हा कारभार फेडरेशनतर्फे संस्थानिकहि चालवूं शकेल हें खरें आहे. पण त्या बाबीवरील सत्ता अगर नियंत्रण फेडरेशनचें आहे यांत शंका नाहीं. * संस्थानिकांनीं

---

*The Federal Government is thus given power in states' territories over subjects for which they have acceded and though the function of the Federal authorities may **ab initio** be exercised by state authorities, control of the Federation over these subjects remains unimpaired ( The Indian Federation by Sir S. A. Khan, Page 35 )

ही कारभाराची जबाबदारी हातीं घेतल्यावर फेडरेशनच्या कायद्याचा त्याना सक्त अंमल करावा लागेल. त्यामुळें फेडरल सरकारची कायदे व अंमलबजावणीची सत्ता संस्थानांत सुरू होईल. या बाबतींत संस्थानिकांनीं जर हयगय केली तर व्हाइसरॉय त्यांना ताळ्यावर आणील. कांहीं कालानंतर कोणत्याहि संस्थानिकाला आपल्या राखीव सत्तेतहि धुमाकूळ घालता येणार नाहीं. अशा प्रकारें नव्या कायद्यामुळें संस्थानिकांच्या सार्वभौम सत्तेला खास ग्रहण लागेल.

आतां या प्रकरणांत एकच विचार राहिला. जे संस्थानिक फेडरेशनमध्यें येणार नाहींत त्यांचें काय?त्यांचा राज्यकारभार जुन्या तहनाम्याच्या धर्तीवर चालत राहील, पण परिस्थितीच अशी घडत येणार आहे कीं, कोणत्याहि संस्थानिकाला संन्यस्त वृत्तीनें रहाणें शक्य होणार नाहीं. त्यांची प्रजा ओरडत राहील, गव्हर्नर जनरलहि त्यांची कानउघाडणी करील,त्यांचे संस्थानिकबंधू त्यांच्यावर दडपण आणतील आणि फेडरेशनच्या प्रपंचांत हे संन्यस्त संस्थानिकहि सामील होतील. ऊंसाच्या चरकांत एखादा ऊंस जाण्याचें नाकारूं लागला म्हणून त्याच्याकडे कोण लक्ष देणार? पार्लमेंटचीं चक्रें जोरानें फिरूं लागलीं म्हणजे सर्व संस्थानिक पटापट मान्यतापत्रकावर सह्या करूं लागतील. पण तो स्वखुषीचा प्रकार होणार नाहीं हें खास.फेडरेशनला विरोध जर होणार असेल तर तो कॉंग्रेस व इतर पक्षांकडूनच होईल आणि ब्रिटिश सरकार जर कोणाला जुमानीत असलें तर तें संस्थानिकांना जुमानीत नसून कॉंग्रेस व इतर फेडरेशनविरोधी पक्षांनाच जुमानत आहे.

---

# ७

# गव्हर्नर जनरल.

आज हिंदुस्थान सरकार हें भारतमंत्र्याला जबाबदार आहे, तें हिंदी कायदेमंडळाला जबाबदार नाहीं. त्यामुळें कायदेमंडळानें कोणतेंहि बिल फेटाळलें तरी तें गव्हर्नर-जनरल आपल्या अधिकारांत पास करूं शकतो. गव्हर्नर जनरलच्या मदतीला एक सहा-जणांचें मंडळ असतें. त्यांत तीन हिंदी सभासद असतात. यांशिवाय कमांडर-इन-चीफ व गव्हर्नर जनरल स्वतः त्या मंडळांत असतो. या मंडळावर अंमलबजावणी करण्याची सर्व जबाबदारी असते. त्यामुळें लोकसत्तात्मक कायदेमंडळाला वादविवादमंडळाचें स्वरूप आलें आहे. त्यांचे ठराव नुसते शिफारसवजा असतात. गव्हर्नर जनरलनें वाटलें तर ते मानावेत नाहींतर ते बाजूला सारावेत. गव्हर्नर-जनरल व त्याचें कार्यकारी मंडळ हें जरी हिंदुस्थानांत वाटेल तें करीत आहेत व तें करणें कायद्याप्रमाणें बरोबरहि असलें, तरी त्यांची नैतिक दृष्ट्या अधोगतीच झाली आहे. पराभवावर पराभव खाऊन कोणतें सरकार प्रतिष्ठित ठरतें? कॉँग्रेस गेल्या १५ वर्षांत तीनदां मध्यवर्ति कायदेमंडळांत होती. या तीनहि वेळां कॉँग्रेसनें सरकारला वर मान काढूं दिली नाहीं. या पराभवामुळें लोकप्रतिनिधींत असंतोष फैलावतो. सरकारचें स्थैर्य कोणावर आधारलेलें असतें? लोकांकडूनच सरकारला सत्ता, स्थैर्य व अधिकार प्राप्त होत असतात. त्यांची पायमल्ली वारंवार होऊं

लागली तर कायदा बदलणें भाग पडतें. कांहीं इंग्रजी मुत्सद्यांनीं बेजबाबदार कायदेमंडळ टिकविणें अशक्य आहे असें पाहिलें व त्यांत दुरुस्ती करावी अशा सूचना केल्या. सायमन रिपोर्टाची बदनामी झाली त्याचें कारण सायमन कमिशननें हिंदुस्थानला जबाबदारीचें स्वराज्य देण्याऐवजीं गव्हर्नर जनरलला येणाऱ्या संकटाला तोंड देण्याकरतां नवे नवे अधिकार बहाल केले हें होय. पण लॉर्ड आयर्विन यांनीं धोरणीपणानें हा रिपोर्ट अमान्य करून हिंदुस्थानला वसाहतीचें स्वराज्य द्यावयाचें ब्रिटिश सरकारचें ध्येय आहे असें जाहीर केलें. पण त्या वेळींसुद्धां जो खलिता हिंदुस्थान सरकारतर्फे गेला, त्यांत जबाबदारीचें स्वराज्य दिलें पाहिजे असें म्हटलें नव्हतें. परंपरेनें अगर रूढीनें ही जबाबदारी लोकसत्तेकडे जाईल असें त्यांत म्हटलें होतें. याशिवाय मध्यवर्ती सत्तेंत जास्त अधिकार लोकांना दिले पाहिजेत असें त्यांत प्रतिपादन केलें होतें.

हिंदुस्थान सरकारनें जबाबदारीच्या राज्यपद्धतीची शिफारस केली नव्हती, सायमन कमिशनहि जबाबदारीच्या विरुद्ध होतें, लॉर्ड रीडिंग व इतर ब्रिटिश मुत्सद्दीहि जबाबदारी देऊं नये असें म्हणत होते. अशा स्थितींत जबाबदारीची घटना कशी झाली याची व्युत्पत्ती मागें दिलीच आहे. पहिल्या गोलमेज परिषदेंत जी संयुक्त घटना बनविण्याकरतां उपसमिति नेमली गेली तिनें हा जबाबदारीचा मुद्दा विशेष जोरानें पुढें मांडला. अर्थात् ब्रिटिशांना तो निराळ्या कारणाकरतां पटला म्हणून त्यांनीं या उपसमितीचें म्हणणें अमान्य केलें नाहीं.

ज्या कांहीं कांहीं विशिष्ट जबाबदाऱ्या गव्हर्नर जनरलवर सोंपविल्या आहेत, त्या वगळून बाकीच्या कारभाराची संयुक्त राज्यघटनेवर



**लॉर्ड आयर्विन** आतां **लॉर्ड हॅलिफॅक्स.** [ १५२

म्हणजेच हिंदी लोकांवर उपसमितीच्या शिफारसीप्रमाणें जबाबदारी टाकण्यांत आली. गव्हर्नर जनरलवर टाकलेली जबाबदारी एवढी प्रचंड आहे कीं, बाकीची जबाबदारी म्हणजे निव्वळ थोतांड आहे. सर्वांत मौज अशी कीं, कायद्यामध्यें या जबाबदारीचा उल्लेख नाहीं. यावर इंग्लंडनें निर्माण केलेल्या कोठल्याहि घटनेंत असा उल्लेख नसतो असें सांगण्यांत येतें. पण ब्रिटिश सरकारनें हिंदुस्थानला थोडी फार जबाबदारी देऊन स्वतःचें समाधान करून घेतलें आहे. जगांतील स्वतंत्र व प्रतिष्ठित राष्ट्रांना ते खास सांगूं शकतील कीं, हिंदुस्थानांत जबाबदारीचें राज्य सुरू आहे. मॉंटेग्यु-चेम्सफर्ड सुधारणांत द्विदल राज्यपद्धति सुरू केली होती ती कोणत्याही प्रांतांत यशस्वी झाली नाहीं. असें असून देखील नव्या कायद्यांतील संयुक्त घटनेंत द्विदल राज्यपद्धती सुरू केली आहे.प्रांतिक राज्यघटनेंत द्विदल राज्यपद्धतीचे जसे धिंडवडे निघाले तसे संयुक्त घटनेंतहि निघाल्यावांचून राहणार नाहींत.

## गव्हर्नर जनरल.

संयुक्त घटनेचा मुख्य सूत्रधार म्हणजे ग. जनरल. त्याचे अधिकार, त्याच्या जबाबदाऱ्या व त्याची सत्ता याचें वर्णन केल्याशिवाय संयुक्त घटनेचें स्वरूप लक्षांत यावयाचें नाहीं.

हा गव्हर्नर जनरल बादशहाकडून नेमला जातो. बादशहाकडून त्याच्या नेमणुकीचा जरी हुकूम सुटतो, तरी कोणाला ही जागा द्यावी हें बादशहा ठरवीत नाहीं. तें ठरविण्याचें काम इंग्लंडचे मुख्य प्रधान करतात. ज्या देशांत वसाहतीचें स्वराज्य आहे, तेथें वसाहतीचे मुख्य मंत्री हें काम करीत असतात. हिंदुस्थानला वसाहतीचा दर्जा प्राप्त झाला नसल्यामुळें आम्हांला हा अधिकार

दिलेला नाहीं. हिंदुस्थानची परिस्थिति मोठी विचित्र आहे असें भासवून हिंदी मुख्य प्रधानाला ही नेमणूक करतां येणार नाहीं असें तिकडील मुत्सद्दी सांगत असतात. पण भावी फेडरेशनच्या मुख्य मंत्र्यानें अमुक गृहस्थाला गव्हर्नर जनरल नेमा असें अवश्य सांगावें आणि हा अधिकार रूढ करावा. एवीतेवीं रूढीचें पुराण नेहमीं आमच्यापुढें ब्रिटिश मुत्सद्दी वाचीत असतात व त्याची थोरवीहि वर्णन करतात. मग जें कायद्यांत नाहीं तें रूढीनें होऊं शकतें ह्या त्यांच्या म्हणण्याचा फोलपणा तरी सिद्ध होईल किंवा आमचा हक्क तरी शाबीत होईल. फेडरेशनमध्येंच कशाला, प्रांतिक राज्यकारभारांत सुद्धां मुख्य मंत्र्यांनीं गव्हर्नरांच्या नेमणुकीचा प्रश्न आमचा आहे असें प्रस्थापित करावें. ओरिसा प्रांतांत एका सिव्हिल सर्व्हंटाला कॉंग्रेसच्या मुख्य मंत्र्यानें गव्हर्नर नेमूं दिलाच नाहीं. हीच परंपरा पुढें चालवावी व कोणता गव्हर्नर आपल्या प्रांतावर नेमला जावा हें प्रांतोप्रांतीच्या मुख्य मंत्र्यांनीं ठरवावें. एखाद्या गव्हर्नरानें जर जादा अधिकाराचा उपयोग केला तर अशा वेळीं पेंचप्रसंग निर्माण करावा व हा हक्क शाबीत करून घ्यावा.

इंग्लंडच्या राजाकडे म्हणजेच मुख्य प्रधानाकडे ही नेमणूक कायद्यानें सोंपविली आहे हें आज तरी खरें आहे. हा गव्हर्नर जनरल जो नेमतात तो इंग्लंडमधील अमुक पक्ष अधिकारारूढ आहे म्हणून त्या पक्षाचा नेमतात असा सांप्रदाय नसल्याचें ब्रिटिश मुत्सद्दी सांगत असतात. पण तें खरें नाहीं.कांहीं व्यक्तींना खूष करण्याचा त्यांत प्रयत्न असतो.कधीं कधीं तेथील उपद्र्व्यापी व्यक्तींना दूर करण्याकरतां ही जागा देतात,पण असें क्वचित् होतें.या गव्हर्नरजनरलला हिंदुस्थानचें ज्ञान असावेंच लागतें असें नाहीं. तेंहि एका

दृष्टीनें ठीक आहे.कारण सिव्हिल सर्व्हंटसारखा एखादा हिंदी तज्ज्ञ नेमला तर तो पूर्वग्रहदूषित व हटकून संकुचित वृत्तीचा असतो. त्यापेक्षां राजकारणाची व्यापक दृष्टि असणारा त्रयस्थ माणूसच जास्त चांगला. या गव्हर्नर जनरलचा पगार व इतर गरजा मिळून त्याला १८ लक्ष रुपये द्यावे लागणार आहेत. नव्या कायद्याप्रमाणें गव्हर्नर जनरल हा व्हाइसरॉय असलाच पाहिजे असा नियम नाहीं. पण दोन्हीं कामें एकाच व्यक्तीनें केलीं तर व्हाइसरॉयचा म्हणून निराळा पगार त्याला मिळूं शकेल.

हा गव्हर्नर जनरल किती प्रबळ आहे याचें एकानें वर्णन केलें आहे. तो म्हणतो ‘ इंग्लंडचा राजा हा राज्य करतो पण त्याच्या हातीं सत्ता नसते;अमेरिकेचा अध्यक्ष सत्ता गाजवितो पण तो राज्य करीत नाहीं; फ्रान्सचा अध्यक्ष सत्ताही गाजवीत नाहीं व राज्यहि करीत नाहीं. पण हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल राज्यहि करतो व सत्ताहि गाजवितो. ’ जगामध्यें हिंदुस्थानच्या गव्हर्नर जनरलइतका सत्ताधारी राज्यकर्ता दुसरा कोणीहि नाहीं.

नव्या घटनेमध्यें ग. जनरलला बादशहाचा प्रतिनिधि म्हणून अवाढव्य सत्ता देण्यांत आली आहे व ती कायद्यानेंच त्याला दिली आहे. पण कायद्यांत नसणारे असेहि कांहीं खास हक्क त्याला बादशाहाकडून मिळालेले आहेत. पदव्या देणें, हिंदी सैन्यांतील कमिशन्स देणें, वगैरे हक्क बजाविण्याची त्याला सत्ता आहे.

संयुक्त राज्यघटनेचे दोन विभाग आहेत. एक कायदा करण्याचा व दुसरा अंमलबजावणीचा.वास्तविक हीं दोन कार्यें स्वतंत्र नाहींत. अंमलबजावणीचा उगम कायदे करणाऱ्या संस्थेपासूनच होतो. पण हिंदुस्थानांत तशी स्थिति नाहीं. इतर फेडरेशन्समध्यें ही प्रथा आहे.

हिंदुस्थानांत अंमलबजावण्याची बादशहाची सत्ता ग. जनरल स्वतः किंवा आपल्या हाताखालील दुय्यम अधिकाऱ्यांमार्फत अंमलांत आणतो. संयुक्त कायदेमंडळाला जी सत्ता ती आपल्या दुय्यम अधिकाऱ्यांना द्यावयास या कलमाचा प्रत्यवाय नाहीं; मात्र जे अधिकार ग. जनरलला दिले आहेत ते संयुक्त कायदेमंडळ दुय्यम अधिकाऱ्यांना देऊं शकणार नाहीं. तसेंच संयुक्त कायदेमंडळाला जे अधिकार विद्यमान हिंदी कायद्यानें कोर्टाला, न्यायाधिशाला किंवा दुसऱ्या अधिकाऱ्यांना किंवा स्थानिक संस्थांना दिले असतील ते ग. जनरलला देतां येणार नाहींत.

फेडरेशनमध्यें अंमलबजावणीचा जो अधिकार आहे तो सर्वव्यापी आहे. हे अंमलबजावणी करणारे अधिकारी म्हणजे ग. जनरल व मंत्रिमंडळ होय. संयुक्त कायदेमंडळाला कायदे करण्याचे असणारे अधिकार, हिंदुस्थानच्या संरक्षणाकरतां करावी लागणारी सैन्याची उभारणी व नियंत्रण, सरहद्दीवरील जमातींच्या विभागांत करार, तह, रूढी वगैरेंमुळें प्राप्त झालेले हक्क या सर्वांवर ही अंमलबजावणी चालू शकते. तसेंच संस्थानामध्यें मान्यतापत्रकानुसार व त्यांत घातलेल्या मर्यादांप्रमाणें संयुक्त घटनेकडे सुपूर्द केलेल्या बाबींवर अंमलबजावणीखातें संयुक्त कायदेमंडळानें केलेल्या कायद्याच्या बाबीपुरतें अधिकार चालवूं शकतें.

या अंमलबजावणी करणाऱ्या मंडळाचे अधिकार प्रांतिक कायदेमंडळापर्यंतहि विशिष्ट प्रसंगीं पोहोंचूं शकतात. कारण देशांत दंगाधोपा झाल्यास अगर सार्वजनिक शांततेचा भंग झाल्यास ग. जनरलला त्यांत हात घालणें जरूर पडतें. पण प्रांतिक कायदेमंडळाला ज्या बाबतींत कायदे करतां येतात त्या बाबींत या मंडळाची

सत्ता चालत नाहीं. अशा प्रकारें अंमलबजावणीखात्याची जबाबदारी ही सरहद्दीवरील टोळ्यांच्या टापूपासून तो प्रांतिक कारभारापर्यंत पसरलेली आहे हें स्पष्ट होतें.

गव्हर्नर-जनरलला फेडरेशनमध्यें चार प्रकारचीं कामें करावीं लागतील. (१) जी विशिष्ट म्हणून राखून ठेवलेलीं खातीं आहेत त्यांचा कारभार सर्वस्वीं त्याला चालवावा लागेल. (२) जीं खातीं लोकांच्या स्वाधीन केलीं आहेत त्यांत विवेचक बुद्धि वापरून अगर स्वतः निर्णय देऊन त्याचा कारभार पहावा लागेल. (३) प्रांतांतील कारभारावर त्याला देखरेख ठेवावी लागेल. याशिवाय (४) व्हाइसरॉय म्हणून जे राजाचे अधिकार आहेत, त्या अधिकारांची अंमलबजावणी त्याला स्वतःलाच करावी लागेल.

गव्हर्नर जनरलकडे जीं खास खातीं सोंपवलीं आहेत तीं चार आहेत. त्यांतील दोन महत्त्वाचीं; एक अगदीं मामुली व एक कमी महत्वाचें आहे. हिंदुस्थानच्या संरक्षणाचा प्रश्न हा लोकनियुक्त प्रतिनिधींकडे वास्तविकपणें जावयास पाहिजे. पण तो ग. जनरलकडे सोंपविला आहे ! हिंदुस्थानचें रक्षण करावयास हिंदी लोक असमर्थ आहेत असें आम्हांला वाटत नाहीं व ब्रिटिश सरकारलाहि वाटत नसावें. पण सैन्याचा ताबा लोकांकडे दिला तर सैनिक हे लोकसत्तेला राजनिष्ठ रहातील,ब्रिटिश सत्तेला रहाणार नाहींत आणि कदाचित् ते ब्रिटिश सत्ता नष्ट करण्यास मदत करतील या भीतीनें हें खातें गव्हर्नर जनरलकडे दिलें आहे. जोंपर्यंत सैन्य ताब्यांत नाहीं, तोंपर्यंत त्या राष्ट्राला स्वराज्य मिळालें आहे असें म्हणतां येत नाहीं, या दृष्टीनें संरक्षणखातें गव्हर्नर-जनरलकडे ठेवून आमच्या पारतंत्र्याचें संरक्षण ब्रिटिश सरकार करीत आहे हें स्पष्ट

आहे. संरक्षणाप्रमाणें परराष्ट्रीय राजकारण हेंहि स्वराज्यांत जनतेच्या हातीं असावें लागतें. सरकारला त्यांतहि धोका वाटतो म्हणून तेंहि गव्हर्नर-जनरलकडे ठेवलें आहे. गव्हर्नर जनरलच्या या अधिकाराला एक अपवाद केला आहे. संयुक्त राज्यघटना व ब्रिटिश साम्राज्यांतील वसाहती यांच्यामधील संबंधाविषयींचे अधिकार गव्हर्नर जनरलला दिले नाहींत. हीं दोन महत्त्वाचीं खातीं गव्हर्नर जनरलकडे ठेवल्यानें हिंदुस्थानला जबाबदारीचें राज्य दिलें आहे असें म्हणतां येत नाहीं. गव्हर्नर जनरलकडे ठेवावयास विशेष हरकत नसणारें खातें म्हणजे धर्मखातें. ख्रिश्चन धर्मानुयायी राज्यकर्त्यांना आपल्या धर्मांतील लोकांच्या धार्मिक अगर नैतिक अभ्युदयाची भीति वाटत असल्यामुळें त्यांनीं हें खातें राखून ठेवलें आहे. त्यालाहि जनतेची हरकत आहे, पण सैन्य आणि परराष्ट्रीय खातें यांचा विचार करतां धर्मखातें अगदीं मामुली आहे. हिंदुस्थानच्या सरहद्दीवर असलेल्या छोटया जमातींच्या टापूंवर गव्हर्नर—जनरलचा खास ताबा ठेवणें अनवश्यक असतांहि गव्हर्नर जनरलच्या हातीं त्यांचें रक्षण व पालन दिलें आहे. हिंदी लोकांना त्यांचें संरक्षण करतां येणार नाहीं असें थोडेंच आहे? पण हिंदुस्थानवर तिकडून स्वारी होईल या भीतीनें ही व्यवस्था केली आहे.अशा प्रकारें तीन महत्त्वाचीं खातीं व एक कमी महत्त्वाचें खातें गव्हर्नर जनरलकडे सोंपविण्यांत आलें आहे. या खात्यांची व्यवस्था करण्याकरतां त्यांनीं जास्तीत जास्त तीन कौन्सिलर्स नेमावें व त्यांचा पगार व नोकरीच्या अटी बादशहांच्या मंत्रिमंडळानें ठरवाव्या असें निर्दिष्ट करण्यांत आलें आहे.

संरक्षण, बाह्यकारभार, (External affairs) धार्मिक बाबी व सरहद्दीवरील टापूची (Tribal areas) व्यवस्था ह्या चार बाबतींत गव्हर्नर जनरलला खास सत्ता दिल्याचें वर सांगितलें. याचें स्वरूप थोडक्यांत सांगणें अवश्य आहे. हिंदुस्थानच्या सैन्याची व्यवस्था, देखरेख वगैरे गव्हर्नर–जनरलवर सोंपविली आहे याबद्दल तक्रारी आहेत. पण हें सैन्य बाहेर देशीं पाठविण्याचा प्रसंग आला तर काय करावें हा एक वादाचा मुद्दा आहे. हिंदुस्थानच्या रक्षणाकरतां बाहेरदेशीं सैन्य पाठवावयाचें असलें तर गव्हर्नर जनरल मंत्र्यांना न विचारतां तें पाठवूं शकेल.पण जर तें सैन्य साम्राज्याच्या कामाकरतां पाठवावयाचें असेल तर त्यांनीं मंत्र्यांचा सल्ला घ्यावा किंवा नाहीं व त्याच्या खर्चाची काय व्यवस्था करावी हा प्रश्न आहे. सर सॅम्युअल होअर म्हणतात, ' साम्राज्याकरतां सैन्य पाठवावयाचें असेल तर मंत्र्यांचा सल्ला घेतला जाईल व खर्चहि साम्राज्यसरकार देईल. '*

सर सॅम्युअल होअर यांचें म्हणणें त्यांतल्या त्यांत न्यायाचें आहे. पण जॉइंट सिलेक्ट कमिटी म्हणते हा खर्च जरी हिंदुस्थानवर पडत नसला तरी त्या खर्चाचा हिस्सा हिंदुस्थाननें देणें

*There is no question about the cost. The cost will not fall upon Indian Revenues at all. In case of that kind the whole cost would fall upon British revenues.... the full cost...I cannot contemplate any single case in which Governor General using troops outside India for purposes other than the defence of India could possibly ignore the view of the Federal ministry.
—Parliamentary debates.

हिंदुस्थानच्या हिताचें आहे.मात्र त्या खर्चाला कायदेमंडळाची मंजुरी घ्यावी म्हणजे झालें. तेव्हां हें खर्चाचें संकट देणगीच्या रूपानें हिंदुस्थानवर येणारच नाहीं असें समजण्याचें कारण नाहीं.*

**बाह्यकारभार**—बाह्य कारभाराचा व संरक्षणाचा निकट संबंध आहे. हें खातें जरी राखीव असलें तरी व्यापारविषयक तह-तडजोडी मंत्रिमंडळाला विचारल्याशिवाय कराव्या असा त्याचा हेतु नाहीं. पण या तडजोडी गव्हर्नर-जनरलच्या नांवानें व्हावयास पाहिजेत, असें पार्लमेंटमध्यें बटलर यांनीं सांगितलें. राष्ट्रसंघावर पाठवावयाचा प्रतिनिधि मंत्रिमंडळाच्या सल्ल्यानेंच जावयाचा आहे. फेडरेशन व वसाहती यांचे संबंध काय असावे हें मंत्रिमंडळाच्या कक्षेंत येतें. तेव्हां बाह्य कारभारांत (१) व्यापारविषयक तडजोडी (२) राष्ट्रसंघाचा प्रतिनिधी व (३) वसाहतीबरोबर संबंध हे तीन प्रश्न मंत्रिमंडळाच्या सल्ल्यानें ठरविण्याची सवलत दिली.

याच ठिकाणीं फेडरेशनच्या दोषांची चर्चा करावयाची नाहीं.पण जातांजातां संरक्षण, परराष्ट्रीय संबंध या बाबीप्रमाणेंच पैसा,नोकऱ्या व्यापारधंदे व रेल्वे या बाबतींत कायद्यानें अलाहिदा तजवीज करून आमच्या जबाबदारीची चाळण करून टाकली आहे हें दृष्टोत्पत्तीस आणणें जरूर आहे.तेव्हां फक्त चार खास खात्यांचा कारभार गव्हर्नर जनरलच्या हातीं देऊन पैशाची तिजोरी मोकळी सोडली

*If therefore the question should arise of offering a contribution from India's revenues in the circumstances we are discussing, we are of opinion that it would need to be ratified by the Federal Legislative. —J. C. Report ( Page 100).

असें समजण्याचें कारण नाहीं. या चार बाबतींत त्यांनीं खास सोय करून ठेवली आहे; पण बाकीच्या मोक्याच्या जागा हिंदुस्थानच्या आर्थिक स्थैर्याच्या सबबीखालीं आपल्याच हातीं ठेवल्या आहेत. सैन्य, पैसा आणि व्यापार या राजकीय शरीरांतील रक्तवाहिन्यांवर आपला प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष ताबा ठेवून आमच्या सहनशक्तीची कसोटी पहाण्याचेंच कायद्यानें ठरविलें आहे.

जीं सोंपीव खातीं आहेत त्यांचा कारभार चालविण्याकरतां ग. जनरलनें जास्तींत जास्त दहा जणांचें मंत्रिमंडळ नेमावें; ह्या मंत्र्यांनीं ग. जनरल साहेबांना मदत व सल्ला (aid and advice) द्यावा असें म्हटलें आहे पण त्याला ज्या गोष्टी विवेचक बुद्धीनें करावयाच्या आहेत त्यांत या मंत्र्यांचा सल्ला घेण्याची जरूरी नाहीं.

नव्या कायद्यामध्यें हिंदुस्थानच्या राज्यकारभाराची सर्व जबाबदारी ग. जनरलवर आहे हें प्रमेय जागोजाग मांडलें आहे. लोकांच्या हातीं जर कांहीं अधिकार दिले असतील तर ते ‘ मदत व सल्ला ’ देण्याचे दिले आहेत. ही मदत व सल्ला ग. जनरलनें स्वीकारलीच पाहिजे असें नाहीं. या बाबतींत म. गांधी व लॉर्ड लिनलिथगो आणि लॉर्ड झेटलंड यांच्यामध्यें झालेला १९३७ सालचा पत्रव्यवहार उद्बोधक आहे. ग.जनरलला प्रांताप्रमाणेंच संयुक्त राज्यघटनेमध्यें मंत्रिमंडळाच्या कारभारांत हात घालतां येतो. त्यांचा कोणता सल्ला मानावयाचा हें त्याच्या विवेचक बुद्धीवर (Discretion) सोंपविलें आहे. म. गांधींचें म्हणणें असें होतें कीं, गव्हर्नर्सनीं हा सल्ला फेटाळतां कामा नये, तो मानलाच पाहिजे. पण ग. जनरल किंवा भारतमंत्री या गोष्टीला कबूल होईनात. ते म्हणाले कीं, मंत्रिमंडळाचा सल्ला नाकारण्याचे प्रसंग येणार

नाहींत व बहुश: तो नाकारला जाणारहि नाहीं. पण तो आम्ही मान्य करूंच असें बंधन घालून घ्यावयास आम्हाला कायद्याप्रमाणें परवानगी नाहीं. या मनोवृत्तीवरून जबाबदारीच्या स्वराज्याचें स्वरूप काय आहे हें लक्षांत येतें.

ग. जनरलच्या जबाबदारीचा इतका बडेजाव कायद्यामध्यें केला आहे कीं, एखाद्या स्त्रीच्या पातिव्रत्याप्रमाणें त्याची जागोजाग जपणूक चाललेली दिसते. कोणत्या बाबतींत ग. जनरलनें आपली विवेचक बुद्धि वापरावी व कोणत्या बाबतींत वैयक्तिक निर्णय द्यावा याविषयीं संशय उत्पन्न झाला तर ग. जनरलचें म्हणणें प्रमाण मानावें; त्याबद्दल प्रश्नहि उत्पन्न होऊं देऊं नये. तेव्हां अमुक बाब ग. जनरलच्या अधिकारक्षेत्रांत येत नाहीं असें मंत्रिमंडळानें सिद्ध केलें तरी ग. जनरलनें तें मानलेंच पाहिजे असें नाहीं.

मंत्र्यांची निवड व नेमणूक करण्याचें काम ग. जनरलचें आहे. ते त्याच्या मर्जीला येईल तितके दिवस अधिकारावर रहातील. कायद्यामध्यें जरी बहुसंख्यांक पक्षाच्या नेत्याला बोलावून त्याला आपलें मंत्रिमंडळ बनविण्यास सांगावें असें नमूद केलें नसलें तरी ग. जनरलला जें आज्ञापत्र दिलें आहे त्यांत जो सदस्य टिकाऊं मताधिक्य संपादूं शकेल, त्याच्या सल्ल्यानें मंत्रिमंडळ नेमावें असें सांगितलें आहे. या मंत्रिमंडळांत शक्यतोंवर संस्थानिकांचे व अल्पसंख्याक वर्गांचे प्रतिनिधि घ्यावेत असें म्हटलें आहे. या मंत्रिमंडळावर सभासदांचा विश्वास असावा आणि मंत्रिमंडळाला नेहमीं सामुदायिक जबाबदारीची जाणीव करून द्यावी असें ग. जनरलला सूचित केलें आहे. मंत्रिमंडळाची नेमणूक ही ग. जनरलनें स्वत:च्या विवेचक बुद्धीनें करावयाची आहे.

Discretion ( विवेचक बुद्धि ) व Individual Judgment (वैयक्तिक निर्णय.)ह्या दोन शब्दांचें स्पष्टीकरण कायद्यांत नाहीं;पण हे दोन शब्द अनेकवेळां वापरण्यांत आले आहेत व त्यांवर बऱ्याच गोष्टी अवलंबून आहेत. Discretion व Individual Judgmentचा अर्थ जो अवांतर पुराव्यावरून प्रतीत होतो तो असाः—गव्हर्नरनें आपली विवेचक बुद्धि वापरावयाची म्हणजे आपल्या मंत्रिमंडळाला न विचारतां एखाद्या प्रश्नाचा निर्णय द्यावयाचा, आणि वैयक्तिक निर्णय (Individual Judgment) म्हणजे मंत्रिमंडळाला ज्या बाबतींत विचारावयास पाहिजे त्या बाबतींत विचारून स्वतःला पटला तर त्यांचा सल्ला मान्य करावयाचा व न पटला तर अमान्य करावयाचा.

गव्हर्नर जनरलकडे चार खातीं स्वतंत्र तोडून दिलीं; पण तेवढ्यानें हिंदुस्थानचा कारभार आपल्या हातीं राहील अशी खात्री वाटेना. त्याकरतां त्यांच्यावर पुढील आठ विषय खास जबाबदारीचे म्हणून सोंपविण्यांत आले आहेत. या प्रश्नांची वासलात त्यानें वैयक्तिक निर्णयानें म्हणजे मंत्रिमंडळाचा सल्ला पटल्यास तो मानून व न पटल्यास अमान्य करून लावावयाची आहे.

## खास जबाबदाऱ्या.

(अ) हिंदुस्थानांत अगर हिंदुस्थानच्या एखाद्या विभागांत शांततेला भीषण धोका असल्यास त्याचें निवारण करणें.

(आ) संयुक्तघटनासरकारचें आर्थिक स्थैर्य व पत यांचें संरक्षण करणें.

(इ) अल्पसंख्याकांचें न्याय्य हक्क सुरक्षित ठेवणें.

(ई) पब्लिक सर्व्हिसमध्यें असलेल्या लोकांना व त्यांच्यावर अवलंबून असणारांना या कायद्यानें अगर या कायद्याखालीं जे हक्क मिळाले असतील अगर ठेवले असतील ते त्यांना मिळवून देणें आणि त्यांच्या न्याय्य हितसंबंधांचें रक्षण करणें.

(उ) ५ व्या भागांतील ३ ऱ्या खंडांत कायदे करण्याच्या बाबींत ज्या कलमांची योजना करण्यांत आली आहे, त्या हेतूचें उद्दिष्ट कायद्याची अंमलबजावणी करतांना साधून देणें. ( व्यापार नोकऱ्यांत भेदाभेद न करणें वगैरे )

(ऊ) युनायटेड किंग्डममधून किंवा ब्रह्मदेशांतून जो माल हिंदुस्थानांत येईल, त्या मालाला निराळ्या रीतीनें मानणें अगर त्यावर दंड आकारणें या गोष्टीस प्रतिबंध.

( ए) हिंदी संस्थानांच्या हक्कांचें रक्षण करणें, आणि त्या संस्थानांच्या अधिपतींच्या हक्कांचें व मानमरातबांचें संरक्षण करणें.

(ऐ) अमुक एका बाबतींत, अमुक एक मार्ग स्वीकारला या सबबीखालीं, ग. जनरलला ज्या बाबतींत विवेचकबुद्धीनें अगर वैयक्तिक निर्णयानें वागावयाचें आहे, त्या बाबतींत, त्याच्या कार्याला प्रतिबंध होईल अगर त्यांत पूर्वग्रहदूषितपणाचा आरोप येईल असें न होऊं देणें.

अशा प्रकारें ग. जनरलवर जबाबदाऱ्या टाकल्या आहेत. या जबाबदाऱ्या दोन प्रकारच्या आहेत. कांहीं सत्तेसंबंधीं व कांहीं कार्यासंबंधीं. संरक्षण, धार्मिक बाबी, बाह्यकारभार यांबद्दल त्याला खास सत्ता दिली आहे. तसेंच त्याच्यावर कांहीं खास कामें सोंपविलीं आहेत तीं अशीं:—

(१) कायदेमंडळ बोलावणें, तें रद्द अगर तहकूब करणें. वरिष्ठ व कनिष्ठ गृहांच्या जोडबैठका बोलावणें.

(२) मंत्री नेमणें व त्यांना बडतर्फ करणें.

(३ ) बिलांना मान्यता देणें; अगर तीं अमान्य करणें; आणि बादशहाच्या संमतीकरतां ठेवून देणें.

(४) कांहीं ठरावांना आगाऊ परवानगी देणें.

(५) ब्रिटिश बलुचिस्थान, अंदमान व निकोबारचा कारभार पहाणें.

एवढया बाबतींत ग. जनरलनें आपल्या (Discretion) विवेचक बुद्धीनें कारभार करावयाचा आहे. या बाबतींत त्यानें मंत्रिमंडळाला विचारण्याचें कायदेशीर प्रयोजन नाहीं. आज्ञापत्रांत त्यानें मंत्र्यांचा व आपल्या सल्लागारांचा सल्ला (Consultation) घ्यावा असें सांगितलें आहे.

दुसरा प्रकार असा. ज्या बाबी मंत्र्यांच्या अधिकारक्षेत्रांतील आहेत, पण ज्याबद्दल ग. जनरलवर खास जबाबदारी टाकली आहे, त्यांत मंत्र्यांचें म्हणणें (View) मानणें न मानणें हें ग. जनरलवर सोंपविलें आहे. वैयक्तिक निर्णयाचा त्यानें या बाबतींत उपयोग करावयाचा आहे.

प्रांतिक गव्हर्नरवरहि अशाच प्रकारच्या खास जबाबदाऱ्या टाकल्या आहेत. पण त्यांपेक्षां गव्हर्नर जनरलच्या जबाबदाऱ्या दोनतीन बाबतींत जास्त आहेत. प्रांताचें अधिकारक्षेत्र मर्यादित असल्यामुळें त्यांच्यावरील खास जबाबदाऱ्या कमी आहेत.

गव्हर्नर–जनरलवर खास जबाबदाऱ्या टाकल्यामुळें जबाबदारीच्या राज्यपद्धतीला बाध येत नाहीं, एवढेंच नव्हे तर त्यांचा उपयोगही राज्यपद्धति यशस्वी करण्याकरतांच होईल असें शुभ्रपत्रिका म्हणतें. (प्यारा २१). या खास जबाबदारीचा उपयोग गव्हर्नर

जनरल उठल्यासुटल्या करीलच असें नाहीं. रोजच्या व्यवहारांत मंत्री व गव्हर्नर जनरल यांच्यांत वितुष्ट येणार नाहीं. पण जर एखाद्या मंत्र्यानें, उदाहरणार्थ अल्पसंख्याकांच्या बाबतींत, अन्याय केला तरच गव्हर्नर-जनरल जादा अधिकारांचा उपयोग करील. पण ह्या अधिकारांचा उपयोग करण्यापूर्वी तो मंत्रिमंडळाच्या बरोबर विचारविनिमय करील असें त्याचें समर्थन केलें आहे.

हें खास जबाबदारीचें खूळ साऱ्या कायद्यांत धिंगाणा घालीत आहे. हिंदुस्थानच्या राजकारणांत असा विषय दाखविणें कठीण जाईल कीं, जो खास जबाबदारीच्या कक्षेंत येणार नाहीं. त्यामुळें मंत्रिमंडळावर या विषयांची जबाबदारी असली तरी गव्हर्नर जनरल वाटेल तेव्हां मंत्रिमंडळाच्या कारभारांत हस्तक्षेप करील व त्यांचा सल्ला न मानतां आपल्या इच्छेप्रमाणें गोष्टी घडवून आणील. या खास जबाबदाऱ्या पार पाडण्याकरतां स्वतंत्र खातें निर्माण केलें नाहीं, त्यामुळें रोजच्या रोज मंत्रिमंडळ व गव्हर्नर जनरल यांच्यामध्यें अधिकारासंबंधीं खटके उडणार नाहींत. पण गव्हर्नर जनरलला जर मंत्रिमंडळाची नापत करावयाची असेल किंवा सारा कारभार हाणून पाडावयाचा असेल तर तो आपल्या अधिकाराचा बडगा उगारून आपला अंमल सुरुं करूं शकेल.

सांगतांना सर्व ब्रिटिश मुत्सद्दी व अधिकारी असें सांगत असतात कीं, खास जबाबदारीचा उपयोग करण्याचे प्रसंग क्वचित् येतात. परस्परांच्या सल्लामसलतीनें सर्व प्रश्न सुटूं शकतात. पण मंत्र्यांचें व ग. जनरलचें जमलें नाहीं, तर त्यानें मंत्र्यांना राजीनामा द्यावयास लावावा किंवा त्यांना बडतर्फ करावें ही म. गांधींनीं केलेली सूचना ग. जनरल किंवा भारतमंत्री स्वीकारूं शकले

नाहींत. त्यांत मंत्र्यांचा अपमान होईलहि; पण ग. जनरलनें जर या मार्गाचा अवलंब केला तर या जबाबदारीमुळें त्याला जे प्रच्छन्न-पणें सुलतान बनविलें आहे, ती त्याची सुलतानी उघडी पडेल आणि लोकमत सरकारविरुद्ध क्षुब्ध होईल. ग. जनरलनें जरी राजीनामा मागितला नाहीं किंवा मंत्र्यांना त्यानें बडतर्फ केलें नाहीं आणि मंत्र्यांच्या डोक्यावर चढून ग.जनरलनें एखादें कृत्य केलें तर कोणता स्वाभिमानी मंत्री आपल्या स्थानाला चिकटून राहील? हा राजिनाम्याचा प्रसंग आल्यास मंत्र्यांनीं आपण कां राजिनामा देतों हें जाहीर करावें असें १९३७ मध्यें सिद्ध झालें. कायद्याप्रमाणें ग. जनरल जरी राजीनामा मागूं शकत नसला तरी तो त्यांना बडतर्फ खास करूं शकतो. पण ग. जनरल व मंत्री यांच्यामध्यें जर हा रस्सी खेचण्याचा खेळ सुरू झाला तर राज्यघटनेचा डोलारा कोलमडून पडेल आणि ग. जनरलची अस्मानीसुलतानी थयथयाट करूं लागेल. याच्या उलट एखादा ग. जनरल शहाणा असेल तर तो, त्याच्यावर जीं चार खातीं सोपविलीं आहेत त्या खात्यांच्या कारभारासाठींहि मंत्रिमंडळाचा सल्ला घेईल. काय-द्यांत ही सल्ला घेण्याची सवड ठेवली नसली तरी आज्ञापत्रकांत तशी सूचना ग. जनरलला देण्यांत आली आहे. अर्थात त्यांचे तो मानणार नाहीं हें वेगळें. पण प्रांतिक कारभारांत द्विदल राज्यपद्ध-तीचे जे धिंडवडे निघाले, त्या पासून त्याला कांहीं धडा घ्यावयाचा असेल तर तो एकदलपद्धति निर्माण करण्याचा प्रयत्न करील. अन्यथा ग. जनरल व मंत्रिमंडळ यांचे सतत खटके उडत रहा-तील व राज्यघटना मोडकळीस येईल.

राउंड टेबल परिषदेला गेलेल्या सदस्यांनीं असें सांगितलें कीं,

सैन्य, परराष्ट्रीय संबंध वगैरेंबद्दल अखेरची जबाबदारी जरी आपण ग. जनरलवर टाकली, तरी ग. जनरल, त्याचे सल्लागार आणि मंत्रिमंडळ यांच्या बैठका होऊं द्याव्या व जें काय ठरवावयाचें तें परस्परांच्या विचारानें ठरवावें. तेव्हां कायद्यांत जरी वरील विषयांकरतां जोडबैठकीला आणि विचारविनिमयाला मान्यता दिली नसली तरी ग. जनरलच्या आज्ञापत्रकांत ( कलम १७ ) त्याला अशी स्पष्ट आज्ञा दिली आहे कीं, त्यानें संयुक्त विचारविनिमयाचा शिरस्ता वाढवावा.* वास्तविकपणें एवढया आडवळणानें जाण्याची पार्लमेंटला काय जरुरी होती? खास जबाबदाऱ्या निराळ्या सांगा, राखीव बाबी सोडून द्या, संस्थानिकांना आणखी निराळ्या रीतीनें वागवा, हे सर्व द्राविडी प्राणायाम करण्याची काय गरज होती? एर्वीतेर्वी ग. जनरलवर हिंदुस्थानची सर्व जबाबदारी कायद्यानें टाकलीच होती, मग राखीव बाबींच्या बद्दल नुसता विचारविनिमय करण्याचा शिरस्ता पाडावा, खास जबाबदारीच्या बाबतींत अवश्यमेव मंत्र्यांचा सल्ला घ्यावा पण तो सल्ला योग्य असल्यास मानावा अगर मानूं नये आणि संस्थानिकांच्या बाबतींत तर मंत्र्यांना विचारूंहि नये असे तीन प्रकार करण्याची काय आवश्यकता होती? याचा अर्थ इतकाच कीं, हिंदुस्थानला स्वरा-

* "Although it is provided in the said act that the Governor--General shall exercise his functions in part in his discretion and in part with the aid and advice of ministers, nevertheless it is our will and pleasure that our Governor General shall encourage the practice of joint consultation between himself, his councillors and his ministers."

ज्याचे हक्क द्यावयाचे नाहींत व त्यांना सारखें झगडत ठेवावयाचें आहे. गव्हर्नर हा गव्हर्नर जनरलला जबाबदार, गव्हर्नर जनरल भारतमंत्र्याला, भारतमंत्री पार्लमेंटला आणि पार्लमेंट ब्रिटिश जनतेला जबाबदार आहे. म्हणजे हिंदुस्थानवर राज्य जें चालूं आहे तें इंग्लंडमधील प्रत्येक मतदाराचें राज्य चालू आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. या जबाबदारीचा आपण थोडक्यांत परामर्ष घेऊं. खास जबाबदारींत पहिलें कलम सार्वजनिक शांततेला धोका असल्यास त्याचें निवारण करणें हें आहे. सार्वजनिक शांत-तेला धोका कशानें येईल याचें स्पष्टीकरण कोठेंहि कायद्यांत नाहीं. तसेंच त्याचा प्रतिबंध कसा करावयाचा हेंहि सांगितलेलें नाहीं. एखाद्या ठिकाणीं हिंदुमुसलमानांचा दंगा झाला, किंवा कामगारांनीं संप पुकारून अस्वस्थ वातावरण निर्माण केलें किंवा शेतकऱ्यांनीं जमीनदारांना खंड देण्याचें नाकारून दंगा केला किंवा हरिजनांनीं मंदिरप्रवेशाकरतां सत्याग्रह केला, तर अशा प्रसंगीं दंगा झाला अगर दंगा होण्याची भीति आहे या सबबीखालीं गव्हर्नर जनरल मंत्र्यांशीं न जमल्यास आपल्या हातीं सत्ता घेऊं शकेल काय ? प्रांतिक कारभारांत असे प्रसंग वारंवार येतील व एखादा गव्हर्नर मंत्र्यांच्या कामांत उत्तम प्रकारें विघ्न आणूं शकेल. हा प्रतिबंध करण्यास त्याला ऑर्डिनन्ससारखे तांतडीचे उपाय योजावे लागतील. तेवढयानें भागलें नाहीं तर पोलिसखातें हातीं घ्यावें लागेल आणि गव्हर्नर जनरलवर ही पाळी आली तर लष्करहि बोलवावें लागेल. हे प्रसंग क्वचित् येतील असें म्हणून या अधिकाराकडे दुर्लक्ष करणें ठीक नाहीं.

त्याचप्रमाणें अल्पसंख्यांक वर्गांचे न्याय्य हक्क रक्षण करण्याची

जी जबाबदारी गव्हर्नर जनरलवर टाकली आहे तीहि अशीच चमत्कारिक आहे. अल्पसंख्यांक वर्ग याची कोठेंहि व्याख्या नाहीं. तसेंच न्याय्य हक्क म्हणजे काय हेंहि कोठें सांगितलें नाहीं. त्यामुळें गव्हर्नर जनरल किंवा गव्हर्नर यांना वाटतील ते न्याय्य हक्क व तो ठरवील ते अल्पसंख्यांक वर्ग. सर होअर म्हणतात, " अल्पसंख्यांकांचें रक्षण करतांना गव्हर्नर जनरलकडून बहुमताचा निर्णय फेटाळून दिला गेला तर प्रातिनिधिक सरकार राज्यच करूं शकणार नाहीं. त्यामुळें जबाबदारीच्या ऐवजीं बेजबाबदारी वाढेल. अल्पसंख्यांक जाती म्हटल्या म्हणजे आमच्या डोळ्यांपुढें सहा जाती आहेत व त्यांशिवाय ज्या मागासलेल्या व ज्यांचें प्रतिनिधित्व प्रभावी होत नाहीं अशा जाती आहेत. जॉ. सि. क. नें याबद्दल ज्या शिफारसी केल्या आहेत त्याच आम्ही पाळणार आहों. ती कमिटी म्हणते, ' अल्पसंख्यांक या शब्दाची कायदेशीर व्याख्या देणें हिताचें होणार नाहीं. त्यामुळें ज्यांना गव्हर्नर जनरलच्या खास जबाबदारीखालीं संरक्षण द्यावयाचें त्याची मर्यादा संकुचित होईल. आमच्या डोळ्यांपुढें अल्पसंख्यांक वर्ग म्हणजे राजकीय अल्पसंख्यांक वर्ग ही कल्पना नाहीं. पण हा अर्थ आज्ञापत्रकांत स्पष्ट करावा अशी आमची शिफारस आहे. तसेंच सामाजिक किंवा आर्थिक सुधारणांत जो बहुसंख्यांकांचा ठराव असेल त्यांत अल्पसंख्यांकांचा विरोध आहे म्हणून गव्हर्नर ढवळाढवळ करणार नाहीं. " ह्या अल्पसंख्यांक जाती म्हणजे १ मुसलमान २ हरिजन ३ शीख ४ अँग्लो-इंडियन ५ ख्रिश्चन व ६ युरोपिअन ह्या होत.

आर्थिक बाबींची जबाबदारी ग. जनरलवर टाकून हिंदुस्थानच्या

दारिद्र्याचा विमाच उतरला आहे असें वाटतें. हिंदी लोक पैशाचे व्यवहारहि नीटपणें करूं शकत नाहींत काय ? आम्हाला आमच्या देशाची पत कशी राहील याची चिंता नाहीं काय ? पण ब्रिटिश सरकारला त्याची तितकीशी भीति वाटत नसावी. सोळा अठरा पेन्सांचा भाव ठरविणें, नाण्यांचा गोंधळ घालणें, कर्ज काढणें वगैरे गोष्टी त्यांना आपल्या हातीं ठेवल्याशिवाय इंग्लंडचें हित कसें साधतां येईल ?

व्यापाराच्या बाबतींतहि आम्हाला असेंच कुचंबत ठेवलें आहे. हिंदुस्थानचा आर्थिक उत्कर्ष हा व्यापारावर अवलंबून आहे. त्याकरतां देशी धंदे निघाले पाहिजेत आणि त्याबरोबरच विलायतेंतून येणारा माल बंद पडला पाहिजे. पण या कायद्यानें आम्हाला ब्रिटिश मालावर जबर जकात बसवितां येणार नाहीं; किंवा ज्या सवलती विलायती व्यापाऱ्यांना अगर मालाला आम्हीं देणार नाहीं त्या आमच्या मालाला घेतां येणार नाहींत. ब्रिटिश मालावर कायद्यानें बहिष्कार घातला, तर ग. जनरल तो घालूं देणार नाहीं. ब्रम्हदेशाला जो ब्रिटिशांबरोबर घुसडला आहे तो ब्रम्ही लोकांच्या प्रेमामुळें नाहीं. तेथील तेल हें प्रामुख्यानें ब्रिटिशांच्या ताब्यांत आहे. तेव्हां इतर देशांच्या तेलाला सवलती दिल्यास यांचा व्यापार मरतो. शिवाय ब्रह्मदेश वेगळा करण्यांत ब्रिटिशांचा उद्देश त्या देशांत नवे उद्योगधंदे काढण्याचा असल्यामुळें, त्या उद्योगधंद्यांना आमची बाधा होऊं नये याकरतां ही खबरदारी घेतली आहे. सरकारी नोकरांनाहि असेंच अभय दिलें आहे. हे नोकर ब्रिटिश सरकारचे आधारस्तंभ असल्यामुळें त्यांची काळजी वहाणें अपरिहार्य आहे. पण

बसायाला घोडा द्यावयाचा व त्याचा लगाम स्वाराच्या हातांत न ठेवतां मोतद्दाराच्या हातांत ठेवावयाचा त्यापैकींच हा प्रकार आहे. नोकर जर मंत्र्यांच्या ताब्यांत रहाणार नाहींत तर राज्यकारभारांत बजबजपुरी माजेल आणि नोकरवर्ग शेफारून मंत्र्यांना बेजार करून टाकील.

अशा प्रकारें राज्यकारभाराचीं जीं प्रमुख अंगें, १ शांततासंरक्षण २ आर्थिक ताबा ३ व्यापारधंद्यांत पूर्ण स्वातंत्र्य आणि ४ नोकरवर्गावर अखत्यारी हीं चारहि ग. जनरलच्या खास ताब्यांत ठेवलीं आहेत. ग. जनरल मंत्र्यांचा त्या बाबतींत सल्ला घेईल पण तो इच्छेनुरूप मान्य अगर अमान्य करील.

या प्रकारांशिवाय आणखी एक ग. जनरलच्या अधिकाराचा प्रकार आहे. त्यांत ग. जनरलनें कोणाचा सल्लाहि घेण्याची जरूरी नाहीं. तो आपल्या विवेचक बुद्धीनें वाटेल तें करूं शकतो. अशा विषयांपैकीं, कांहीं महत्त्वाच्या विषयांचा उल्लेख येथें करूं. १ मंत्र्यांची नेमणुक व बडतर्फी २ कायदेमंडळाच्या बैठकी बोलावणें व विसर्जन करणें ३ कायदेमंडळाच्या कारभाराबाबत नियम करणें. ४ ऑर्डिनन्सेस काढणें. ५ ग. जनरलचें कायदे करणें. ६ भयग्रस्त परिस्थिति आहे असें जाहीर करणें. ७ राज्यघटना थोपवून स्वतःकडे अधिकार घेणें. ८ चीफ कमिशनर्स नेमणें. ९ रिझर्व्ह बँकेचे गव्हर्नर्स वगैरे नेमणें १० रेल्वेच्या कारभारावर नियंत्रण ठेवणें, वगैरे बाबींत ग. जनरलला विवेचक बुद्धीनें फैसला करण्यास अखत्यार दिला आहे.

ग. जनरलला हें आज्ञापत्र राजेसाहेबांकडून दिलें जाणार आहे. तें भारतमंत्री पार्लमेंटपुढें ठेवतो व त्यावर चर्चा वगैरे न होतां तें

दिलें जातें. या आज्ञापत्रांत नव्या राज्यघटनेंतील अधिकारांची कोणत्या रीतीनें वहिवाट करावी हें सांगितलेलें आहे. त्याचप्रमाणें ग. जनरलला असेंहि सांगितलेलें आहे कीं, त्यानें मंत्रिमंडळाच्या बरोबर सलोख्याचे संबंध ठेवावेत व राज्याच्या विभक्त अधिकार-क्षेत्रांत होणारे संघर्ष टाळण्याची प्रथा पाडावी. या आज्ञापत्रकामुळें नवे अधिकार प्राप्त होत नाहींत किंवा गव्हर्नर, ग. जनरलवर तो अमुक रीतीनें वागला नाहीं म्हणून कोर्टांत इलाजहि करतां येत नाहींत. या आज्ञापत्रकांत एकंदर ३१ कलमें आहेत. अत्यंत असंतुष्ट अशा हिंदी प्रतिनिधींचें थोडेसें समाधान करावें असा प्रयत्न या आज्ञापत्रकांत केला आहे व त्यामुळें या आज्ञा-पत्रकाला महत्त्व आलें आहे. पण तेवढ्यानें प्रगतिपर राष्ट्रीय वृत्तीच्या जनतेचें समाधान होणें शक्य नाहीं. अशा आज्ञापत्रकामुळें काय-द्याचा ताठरपणा जरा ढिला होतो आणि वहिवाटीमुळें नव्या नव्या सुधारणा होऊं शकतात असें कानडा वगैरेचें उदाहरण देऊन ब्रिटिश मुत्सद्दी सांगतात.*

* Instrument of instruction किंवा आज्ञापत्र हें शब्दार्थावरून आज्ञापत्र नाहीं. कायद्याचीं निरनिराळीं जीं कलमें आहेत, तीं ग. जनरलला समजावीं म्हणून त्याला हें पत्र देत असत. तसेंच कायद्याचा अंमल कसा करावा हेंहि या सूचनापत्रकावरून त्याला कळत असे. आज्ञापत्र, सूचनापत्र किंवा बोधपत्रक अगर साधन असा त्याचा अर्थ आहे. पण सूचनापत्रक किंवा बोध-पत्रकात आज्ञा आहे म्हणून तो शब्द वापरला आहे.

Instrument of Instructions is in reality the key to the understanding and working of the Act. Following Dominion constitutions the Act vests the executive power of the Federation in the Governor General but his constitutional obligation to be guided by the ministers and to be responsible to the legislature is expressly laid down by the Instrument.

[ Govt. of India Act 1935 page 33 by Rajgopal Aiyangar ]

## आज्ञापत्रक.

या आज्ञापत्रकाच्या प्रारंभीं ग. जनरलनें राज्यकारभार उत्कृष्ट प्रकारें चालवावा, धार्मिक सहिष्णुता वाढवावी, निरनिराळ्या जातींच्या व ध्येयांच्या जनतेंत सद्भावना व सहकार्य यांची वृद्धि करावी आणि नैतिक, आर्थिक व सामाजिक कल्याणाकरतां झटावें असें सांगितलें आहे.

त्यानंतर ग. जनरलनें मंत्रिमंडळ कसें निवडावें याबद्दल सूचना केली आहे. ज्याच्या मागें कायदेमंडळांत स्थिर रहाणारें बहुमत असेल अशा गृहस्थाच्या सल्ल्यानें कायदेमंडळाचा सामुदायिक विश्वास संपादन करणारे मंत्रिमंडळ निवडावें. मंत्रिमंडळांत संयुक्त घटनेंत येणाऱ्या संस्थानांचे आणि प्रमुख अल्पसंख्यांक वर्गांचे प्रतिनिधी शक्यतोंवर असावेत. या मंत्र्यांमध्यें संयुक्त जबाबदारीची जाणीव निर्माण करावी.

त्यानंतर विवेचक बुद्धि कोठें वापरावी, वैयक्तिक निर्णय कोठें द्यावेत याबद्दल सूचना दिल्या आहेत.

फेडरेशनमध्यें जी अंमलबजावणीची सत्ता आहे, ती अंमलांत आणतांना, ग. जनरलनें आपल्याला कायद्याप्रमाणें प्राप्त झालेल्या अधिकारांचा उपयोग जो करावयाचा तो मंत्र्यांच्या सल्ल्यानें करावयाचा आहे. हा सल्ला जर त्याच्यावर सोंपविलेल्या खास जबाबदारीच्या आड येत असेल तर तो त्यानें मानूं नये. या खास जबाबदाऱ्यांशिवाय ग. जनरलला कांहीं कामें ( functions ) करावयास कायद्यानें सांगितलें आहे. त्या कार्यांच्या आड जर हा सल्ला येत असेल तर तो त्यानें मानूं नये. त्याच्या विवेचक बुद्धीवर ज्या बाबी सोंपविल्या आहेत, त्या बाबी त्यानें स्वतःच निकालांत काढवयाच्या असल्यामुळें त्यानें मंत्रिमंडळाशीं विचार

विनिमयहि करूं नये. मंत्रिमंडळावर ज्या जबाबदाऱ्या टाकल्या आहेत, त्या त्यांनीं टाळूं नयेत व ग. जनरलच्या खास जबाबदाऱ्यावर त्यांना विसंबण्याचा प्रसंग येऊं नये, अशा रीतीनें त्यांनीं आपला कारभार चालवावा असें निर्दिष्ट केलें आहे.

या कलमाच्या स्पष्टीकरणार्थ आपण खालील उदाहरणें घेऊं. लष्कर, परराष्ट्रीय राजकारण वगैरे चार कार्यें ग. जनरलकडे सोपविलीं आहेत. तसेंच आठ खास जबाबदाऱ्या त्याच्यावर आहेत. या दोन्ही क्षेत्रांत त्यानें मंत्र्यांचा सल्ला घ्यावा पण स्वतःच्या मताप्रमाणें वागावें. पण मंत्री नेमणें, सभागृह बरखास्त करणें वगैरें बाबतींत त्यानें विवेचक बुद्धि वापरावयाची असल्यामुळे त्यानें मंत्र्यांना विचारूं नये असें सांगितलें आहे. ग. जनरलनें स्वतः निर्णय देणें अगर विवेचक बुद्धीनें कांहीं गोष्टी करणें यालाहि अर्थ आहे. तो ह्या गोष्टी करतांना स्टेट सेक्रेटरीला म्हणजे पार्लमेंटला जबाबदार असतो. त्याच्या संमतीशिवाय ग. जनरल कांहीं करूं शकत नाहीं आणि हीच गोष्ट या बंधनानें अभिप्रेत आहे.

ग. जनरलवर आर्थिक स्थैर्याची खास जबाबदारी आहे. त्यानें या बाबतींत काय करावें हें आज्ञापत्रांत सांगितलें आहे. जगाच्या बाजारांत हिंदुस्थानची पत कमी होतां कामा नये आणि हिंदुस्थानांत आर्थिक व्यवहार पार पाडतांना व्यत्यय येतां कामा नये अशा रीतीनें ग. जनरलला दक्षता बाळगली पाहिजे.

अल्पसंख्यांकांच्या बाबतींत त्याला यानंतर सूचना दिल्या आहेत. फेडरेशन अंमलांत आल्यामुळें एखाद्या अल्पसंख्यांक वर्गाचा त्यावर अद्याप पूर्ण विश्वास बसला नसेल, त्यांना आपल्यावर जुलूम होईल अगर आपल्याकडे दुर्लक्ष होईल अशी भीति वाटत असेल

तर त्यांच्या न्याय्य हक्कांचें रक्षण ग. जनरलनें करावयाचें आहे. पण अमुक एका प्रश्नांत बहुसंख्यांकांच्या पेक्षां आपलें मत भिन्न आहे या सबबीखालीं, त्याचें रक्षण ग. जनरल करूं शकणार नाहीं. फेडरेशन अस्तित्वांत येण्यापूर्वी नोकऱ्यांमध्यें ज्या निर-निराळ्या जातींचें प्रमाण ठरलें होतें तें धोरण बदलूं नये. मात्र जर ग. जनरलला असें वाटलें कीं, हें धोरण त्या त्या वर्गाच्या किंवा जनतेच्या हिताच्या दृष्टीनें बदलणें जरूर आहे तर त्यानें त्यांत बदल करावा.

सरकारी नोकरांच्या हक्कांचें संरक्षण करणें, युनायटेड् किंगडम् मधील व्यापाऱ्यांना निराळ्या रीतीनें न वागविणें, हिंदी संस्थानि-कांचे हक्क रक्षण करणें वगैरे बाबतींत ग. जनरलनें खास जबाब-दारीखालीं दक्षता घ्यावी असें त्याला सुचविलें आहे.

ग. जनरलवर लष्कर, परराष्ट्रीय राजकारण वगैरे ज्या गोष्टी सोंपविल्या आहेत, त्या बाबतींत कायद्यांत नसलें तरी, ग. जन-रलनें मंत्रिमंडळाची व सल्लागारमंडळाची बैठक करावी व त्यांचें म्हणणें ऐकून घ्यावें असें पुढें सूचित केलें आहे.

लष्करचा ताबा हा ग. जनरलकडे ठेवूं नये अशाबद्दल राउंड टेबल परिषदा आणि जॉइंट सिलेक्ट कमिटी यांच्यापुढें केलेलें रुदन अरण्यरुदन ठरलें. या खात्याकरतां जो सल्लागार नेमावयाचा आहे तो हिंदी असावा असाहि आग्रह हिंदी प्रतिनिधींनीं धरला. पण ब्रिटिश सभासदांनीं यांपैकीं एकहि गोष्ट मान्य केली नाहीं. हिंदु-स्थानांत गोरें लष्कर कमी करावें, सैन्याचें हिंदीकरण करावें अशा मागण्याहि करण्यांत आल्या होत्या. त्याला थोडेसें उत्तर आज्ञा-पत्रकांत दिलें आहे. याबद्दल त्यांनीं ग. जनरलला तीन गोष्टी

करावयास सांगितलें आहे. (१) हिंदुस्थानच्या संरक्षणाची जबाबदारी जास्त जास्त हिंदी लोकांकडे गेली पाहिजे हें त्यानें लक्षांत ठेवावें. ( २ ) हिंदी लष्करावर हिंदी अधिकाऱ्यांची जेव्हां नेमणूक करावयाची असेल तेव्हां त्यानें मंत्र्यांचें मत अजमावावें.( ३ )हिंदुस्थानच्या बाहेर जेव्हां हिंदी लष्कर पाठवावयाचें असेल तेव्हांहि त्यानें मंत्र्यांचें मत घ्यावें. त्याबरोबरच कमांडर-इन-चीफचें मतहि घ्यावें व तें भारतमंत्र्याला कळवावें असें सांगितलें आहे. पण सैन्याच्या खर्चाचें काय ? आज्ञापत्रक म्हणतें ' लष्करी खात्याच्या खर्चाचा कारभार ग. जनरलनें आपल्या विवेचक बुद्धीनें चालवावा. पण ग. जनरलनें अर्थसचिवाचा सल्ला बजेट सादर केलें जाण्यापूर्वी घ्यावा '. या योजनेमुळें तर हिंदुस्थानच्या स्वराज्याचें राहोंच, पण जबाबदार राज्यपद्धतीचे चांगलेच वाभाडे काढले आहेत. असल्या या अर्धवट जबाबदारीच्या फार्सीपेक्षां ग. जनरलनें एकतंत्री सत्ता गाजविणें काय वाईट तें कळत नाहीं. अर्थमंत्र्याची निष्कारण अडगळ ठेवण्यापेक्षां एखादी चिरगुटाची सहाफुटी बाहुली अर्थमंत्री म्हणून ठेवली तर तितकेंच काम भागेल. पण ब्रिटिश सरकारला दिली हीच सवलत जास्त दिली असें वाटतें.

यापुढें संयुक्त सरकार, प्रांत व संस्थानें यांचे संबंध कसे असावेत याविषयीं सूचना केल्या आहेत.

या तिघांचा एकत्र विचारविनिमय घडवून आणण्याच्या पद्धतीला उत्तेजन द्यावें असें गव्हर्नर जनरल साहेबांना सांगितलें आहे.

शेवटीं ग. जनरल यांना असें आज्ञापिलें आहे कीं, त्यांनीं त्यांच्यावर जो हा विश्वास टाकला आहे, तो अशा रीतीनें उपयो-

गांत आणावा कीं, त्यामुळें हिंदुस्थान व ग्रेट ब्रिटन यांच्यामधील साम्राज्यांतर्गत भागीदारी वृद्धिंगत होईल आणि त्याचा शेवट हिंदुस्थानला आमच्या डोमिनिअन्समध्यें योग्य स्थान मिळण्यांत होईल. या शेवटच्या कलमानें बरेच पक्षी मारण्याचा प्रयत्न केला आहे. नव्या कायद्याला प्राक्कथन नाहीं असें जे म्हणतात त्यांना हें कलम उत्तर आहे. हिंदुस्थाननें ब्रिटिश साम्राज्यांत राहिलें पाहिजे हें दुसरें सांगितलें आहे. डोमिनिअन या शब्दाचा उपयोग केल्यामुळें आशाळवंतांना डोमिनिअन स्टेटसचीं स्वप्नें पडूं लागावींत अशीहि युक्ति योजली आहे. डोमिनिअन्समध्यें वेस्टमिनिस्टर स्टॅटयूटप्रमाणें आम्हाला दर्जा मिळणार आहे, कां आमच्या करतां नवा दर्जा तयार होणार आहे याचा उल्लेख खुबीनें टाळला आहे. चर्चिल-प्रभृतींनीं हिंदुस्थानला वेस्टमिनिस्टर कायद्याप्रमाणें डोमिनिअन्सचा दर्जा देऊं नये असें घसा फोडून सांगितलें होतें, हें आम्ही विसरणें शक्य नाहीं. तेव्हां या कलमांत मधाचें बोट लावून सरकारनें बोटचेप्या हिंदी लोकांनाहि खूष केलें आहे आणि भांडखोर ब्रिटि-शांनाहि खूष केलें आहे. आपल्या लोकांना त्यांनीं सांगितलें आहे कीं, हिंदुस्थानला डोमिनिअन स्टेटस देण्याचें आम्ही कुठें कबूल केलें आहे? आणि हिंदी लोकांना सांगितलें आहे कीं, सरतेशेवटीं तुम्हांला वसाहतींमध्यें योग्य स्थान म्हणजे वसाहतींचा दर्जा मिळणार आहे. तेव्हां नव्या सुधारणा तुम्हीं टाकल्या तर तुमचेंच नुकसान होणार आहे.

गव्हर्नर जनरलला जें आज्ञापत्रक दिलें आहे त्याचें स्वरूप आपण पाहिलें. आतां त्याला आणखी काय सत्ता दिल्या आहेत तें आपण पाहूं.

ग. जनरलनें एक आर्थिक बाबतींत सल्ला देणारा सल्लागार नेमावा ( may appoint ). तो नेमावा याचा अर्थ जरी नेमलाच पाहिजे असा नाहीं, तरी या सल्लागारानें जीं महत्त्वाचीं कामें करावयाचीं आहेत, त्याचा विचार करतां तो नेमल्यावांचून गत्यंतरच नाहीं. कदाचित् दोन खात्यांना मिळून एक अधिकारीहि नेमण्याची त्याला सवड असल्यामुळें स्वतंत्र आर्थिक सल्लागार नेमलाच पाहिजे अशी त्याच्यावर सक्ति नसावी. या सल्लागारानें ग. जनरलला त्याच्यावर जी खास आर्थिक जबाबदारी सोंपविली आहे, त्याबद्दल सल्ला द्यावयाचा आहे. याच सल्लागारानें मंत्रिमंडळानें आर्थिक बाबतींत सल्ला विचारल्यास ( शब्दप्रयोग ध्यानांत ठेवण्यासारखा आहे ) सल्ला द्यावयाचा आहे. त्याचा पगार, नेमणूक, बढतर्फी, त्याचा नोकरवर्ग वगैरेंबद्दल ग. जनरलचे अधिकार प्रश्नातीत आहेत. पण इतका कठोर कायदा केल्यावर त्याला थोडेसें रुपेरी वेष्टन घातलें आहे. पहिला आर्थिक सल्लागार ग. जनरलनें स्वतः नेमावा; नंतरचे मात्र मंत्र्यांचा सल्ला घेऊन नेमावयाचे आहेत.

आर्थिक सल्लागार नेमला. आतां कायदेशीर सल्लागार नेमावयाचा राहिला. तो गव्हर्नरनें नेमलाच पाहिजे ( shall appoint ). त्याचा दर्जा फेडरल कोर्टाच्या न्यायाधिशाचा जो दर्जा असेल तो असला पाहिजे. त्याचें काम मंत्रिमंडळाला कायदेशीर सल्ला देण्याचें आहे. त्याचा पगार वगैरे ग. जनरलनें ठरवावयाचा आहे. त्याची नेमणूक, पगार, बडतर्फी ग. जनरलनें व्यक्तिशः निर्णय देऊन म्हणजे मंत्र्यांचा सल्ला पटल्यास त्याप्रमाणें आणि न पटल्यास स्वतःच्या इच्छेप्रमाणें करावयाची आहे. निदान मंत्रिमंडळाला विचारल्या-

शिवाय अॅडव्होकेट-जनरल नेमतां येत नाहीं एवढें निश्चित आहे. ग. जनरल अॅ. जनरलला जें काम सांगेल तें त्यानें करावयाचें आहे. तो कायदेमंडळांत जाऊन भाषण करूं शकेल, कोर्टामध्यें खटले चालवूं शकेल; थोडक्यांत जेथें त्याला ग. जनरल जा म्हणून सांगेल तेथें त्याला जावें लागेल.

हिंदुस्थानच्या संयुक्त राज्यघटनेंतील सर्व अंमलबजावणी ग. जनरलच्या नांवानें व्हावयाची आहे. संयुक्त कायदेमंडळाचे नियम वगैरे त्यानेंच स्वतः करावयाचे आहेत. निरनिराळ्या खात्यांची मंत्र्यामध्यें विभागणी करण्याचें काम त्याच्याकडे सोंपविलें आहे.

मंत्र्यांनीं व सेक्रेटरींनीं ग. जनरलच्या कानावर फेडरेशनच्या कामासंबंधींची नियमांत असलेली माहिती घालावयाची आहे. विशेषतः मंत्र्यांनीं ग. जनरलच्या नजरेस त्याच्या खास जबाबदारीचे कोणते प्रश्न आहेत हे घालावयाचे आहेत. त्याचप्रमाणें सेक्रेटरीनें ग. जनरलचें व मंत्र्यांचें लक्ष ग. जनरलच्या खास जबाबदारीकडे वेधावयाचें आहे. यासंबंधीचा व्यवहार ग. जनरल हा मंत्र्यांचा सल्ला घेऊन विवेचक बुद्धीनें करील.

मंत्री व कायदेशीर सल्लागार यांच्यांत यामुळें भांडणें लागण्याचा संभव आहे.मंत्री म्हणतील अमुक एक प्रश्न ग.जनरलच्या कक्षेंत येत नाहीं. उलट सेक्रेटरी सांगेल तो ग.जनरलच्या कक्षेंत येतो. सेक्रेटरीला जी ही सत्ता दिली आहे, ती त्रासदायक आहे.*

* सेक्रेटरीला जी ही सत्ता दिली आहे, त्याबद्दल डॉ. कीथ म्हणतातः— ‘This involves the grave inconvenience of placing the secretaries of the department, in the position of compelling ministers to submit to the Governor General issues which the minister may regard as within his sphere.’

अशा प्रकारें ग. जनरलचें कार्यक्षेत्र व अधिकारक्षेत्र, केवढें मोठें आहे याचें आपण पर्यालोचन केलें. त्यावरून संयुक्त घटनेंत द्विदल राज्यपद्धति सुरू होणार हें स्पष्ट दिसतें. ग. जनरलची सत्ता ही सर्वव्यापी आहे. कायद्यांत जरी खोडसाळ ठरलेल्या द्विदल राज्यपद्धतीचें नांव घेतलें नाहीं, तरी तें नांव टाकून बाकी सर्व व्यवस्था द्विदलच आहे.

संयुक्त कायदेमंडळांत जी प्रतिनिधींची वांटणी केली आहे, ती अशी आहे कीं, कॉंग्रेससारख्या राजकीय संस्थेला तेथें बहुमत कधींच मिळूं नये. मंत्रिमंडळांत अल्पसंख्याक व संस्थानिकांचे प्रतिनिधी अंतर्भूत करावयाचे म्हटले म्हणजे एक बेबंद मंत्रिमंडळ तयार होईल. इतकेंहि करून शेवटीं हातीं काय लागणार? चलन, हुंडणावळ, वगैरे बाबी ग. जनरलच्या हातांत देऊन आणि रिझर्व्ह बँक व रेल्वे बोर्ड हे दोन तट उभारून हिंदी जनतेचा कोंडमारा केला आहे. लष्करी खातें तर गव्हर्नरचें खास क्रीडोद्यान बनविलें आहे. एकंदर बजेटचा विचार करतां ८० टक्के बजेट ग. जनरलच्या हातीं दिलें आहे. बाकीच्या २० टक्क्यांत कोणता फडणीस काय पराक्रम गाजवील हें सांगणेंच नको. या सर्व आपत्तींवर संस्थानिकांच्या प्रतिनिधींचें करट वाढल्यामुळें नव्या राज्यघटनेचा नवेपणा जाऊन जुन्यापेक्षांहि ती जुनी वाटूं लागली आहे.

जगांतील कोणतेंहि राष्ट्र असली राज्यघटना एक क्षणभर टिकूं देणार नाहीं. कॉंग्रेस जो फेडरेशनला विरोध करीत आहे तो याच अनेक कारणांकरतां आहे.

---

८

# संयुक्त कायदेमंडळ

संयुक्त कायदेमंडळाचा कारभार दोन गृहांमार्फत चालवयाचा आहे. एकाला कौन्सिल ऑफ स्टेट व दुसऱ्याला हौस ऑफ ॲसेंब्ली म्हणजे फेडरल असेंब्ली असें नांव आहे. वरिष्ठ गृहांत १५६ ब्रिटिश हिंदुस्थानचे आणि जास्तींत जास्त १०४ संस्थानचे प्रतिनिधी बसणार आहेत. फेडरल ॲसेंब्लींत ब्रिटिश हिंदुस्थानचे २५० आणि जास्तींत जास्त १२५ संस्थानचे प्रतिनिधी बसणार आहेत. कौन्सिल ऑफ स्टेट हें कायमचें चालणारें गृह आहे. दर तीन वर्षांनीं त्यांतील ⅓ सभासद निवृत्त होणार आहेत. ॲसेंब्लीची मुदत ५ वर्षांची ठेवण्यांत आली आहे.

पहिल्या गोलमेज परिषदेंत खालच्या गृहांत २५० व वरच्या गृहांत १०० ते १५० सभासद असावेत असें ठरलें होतें. दुसऱ्या रा. टे. मध्यें खालच्या गृहांत ३०० व वरच्या गृहांत २०० सभासद ठरले होते. लॉर्ड लोथियनच्या मतदारसंघकमिटीनें ४५० संख्या खालच्या गृहाकरतां नियुक्त केली होती. श्वेतपत्रिकेंत ३७५ खालच्या व २६० वरच्या गृहांकरतां सांगितले होते व तीच संख्या कायम करण्यांत आली. दोन्ही गोलमेज परिषदा व व्हाइट पेपर, यांनीं खालच्या गृहांत प्रत्यक्ष ( Direct ) निवडणुकीचा पुरस्कार केला होता. पण जॉइंट सिलेक्ट कमिटीनें दोन्ही गृहांत

अप्रत्यक्ष निवडणुका व्हाव्यात असें सांगितलें. पार्लमेंटांत जेव्हां प्रश्न निघाला, तेव्हां त्यावर खूप वादळ झालें आणि तडजोडीनें असें ठरलें कीं, खालच्या गृहांत अप्रत्यक्ष व वरच्या गृहांत प्रत्यक्ष निवडणुका कराव्यात.

कॉक्स नांवाचे सभासद पार्लमेंटांत म्हणाले:—

' व्हाइट पेपर मध्यें व गोलमेज परिषदेंत निराळी योजना होती. तें सर्व गेलें. मूळचें वरिष्ठ गृह कनिष्ठ झालें. आणि मूळच्या कनिष्ठ गृहांत आतां संस्थानिक आणि प्रांताच्या वरिष्ठ गृहांतील प्रतिनिधी येणार. प्रतिगामी वृत्ति ही दुहेरी गादीवर बसली ! ' पण फेडरल असेंब्लीकरतां प्रांतांतील वरिष्ठ गृहाच्या सभासदांना मत देण्याचा अधिकार नाहीं.

संख्येबद्दल, निवडणुकीच्या पद्धतीबद्दल, पुष्कळ आक्षेप घेण्यासारखे आहेत. वरिष्ठ सभागृहांत प्रत्यक्ष निवडणुका करण्याचा मनसुबा हा फेडरेशनच्या मूलभूत कल्पनेवर आघात करणारा आहे. फेडरेशनमध्यें जे जे घटक असतात, त्यांना प्रतिनिधित्व मिळावें आणि प्रत्येक घटकांतून त्या घटकाच्या क्षेत्रफळाचा विचार न करतां सारखे प्रतिनिधी घ्यावे असा फेडरेशनमध्यें सर्वमान्य शिरस्ता आहे. आमच्याकडे उलटा प्रकार आहे व त्याचें कारणहि उघड आहे. वरिष्ठ कौन्सिलांत जनतेचें बहुमत होऊं नये म्हणून सारी धडपड चाललेली दिसते. या कौन्सिलच्या मतदानाचा हक्क फार श्रीमंतांना देण्यांत येणार असल्यामुळें तेथें गरीब व मध्यम वर्गाचें प्रतिनिधी निवडून येणें शक्य नाहीं. कौन्सिल व असेंब्लीची जोडबैठक झाली तर त्या बैठकींत कौन्सिलच्या प्रतिनिधींनीं काँग्रेसच्या बाजूला आपलीं मतें देण्याची शक्यताहि सरकारला टाळावयाची आहे. एवढी

सावधगिरी घेण्याचें एक कारण असें दिसतें कीं, ज्या संस्थानिकांच्या बळावर सरकार सर्व कारभार आपल्या हातीं ठेवणार आहे ते सर्व संस्थानिक फेडरेशनमध्यें आले नाहींत तर काय करा ? ब्रिटिश हिंदुस्थानचे १५०, संस्थानांचे ५२ व गव्हर्नर जनलरनें नॉमिनेट केलेले ६ असे कमीतकमी २०८ जणांचें स्टेट कौन्सिल होऊं शकतें. २०८ सभासदांत काँग्रेसपक्षाला १०५ सभासद मिळाले म्हणजे त्यांची बहुसंख्या होईल. ही बहुसंख्या होणें न होणें हें मतदारसंघाच्या घडणीवर अवलंबून आहे. अप्रत्यक्ष निवडणुकांत हा संभव खास होता असें जरी म्हणतां येत नसलें तरी शक्यता होती एवढें खरें. पण फेडरेशनचें असें भूत करण्याऐवजीं सरकारला ५२ संस्थानिक प्रतिनिधींऐवजीं ७८ म्हणजे $\frac{3}{4}$ सभासदांची अट घालतां आली असती. कौन्सिलमध्यें काँग्रेसचें बहुमत होऊं नयेच; पण तेथील काँग्रेसविरोधी बहुमत हें असेंब्लीला जोडबैठकींत मारक व्हावें एवढी त्यांत दूरदृष्टि आहे.

संस्थानिकांना कौन्सिलमध्यें काय किंवा असेंब्लींत काय जें भरमसाट प्रतिनिधित्व दिलें आहे त्याला कशाचा आधार आहे ? हिंदुस्थानची एकंदर लोकसंख्या (ब्रह्मदेश वगळून) ३३$\frac{1}{2}$ कोटी आहे. त्यांपैकीं २५ कोटी ब्रिटिश इंडियांत व ८ कोटी संस्थानांत आहेत. संख्येच्या प्रमाणांत जर संस्थानिकांना प्रतिनिधित्व दिलें असतें तर वरिष्ठ कौन्सिलांत २६० पैकीं ६५ जागा त्यांच्या वाटयाला आल्या असत्या आणि असेंब्लींत ३७५ पैकीं, ९४ जागा आल्या असत्या. त्याऐवजीं संस्थानिकांना अनुक्रमें १०४ व १२५ जागा दिल्या आहेत. युरोपिअन, अँग्लो-इंडियन व ख्रिश्चन यांना त्यांच्या लोकसंख्येच्यापेक्षां अशाच जास्त जागा दिल्या आहेत.

यांत एकच धोरण ठेवलें आहे. हिंदुस्थानच्या प्रगतीच्या आड ह्या मोठाल्या दरडी उभ्या केल्या आहेत. वरिष्ठ कौन्सि-लांत संस्थानिकांना शेंकडा ४० जागा आणि असेंब्लींत शेंकडा ३३ $\frac{1}{3}$ जागा देऊन वरिष्ठ कौन्सिलला अधिकच सवलत दिली आहे. संस्थानें काय ब्रिटिश हिंदुस्थानपेक्षां अधिक श्रीमंत आहेत? कां त्यांचे पैसे आमच्याकडे अधिक येणार आहेत? कां संस्थानिक राजकीय दृष्टया आमच्यापेक्षां अधिक पुढारलेले आहेत? संस्थानां-तून कराचें उत्पन्न फक्त १० टक्के येणार आहे आणि त्यांची संपत्ति उद्योगधंद्यांच्या मागासलेपणामुळें आमच्यापेक्षां कमी आहे. राजकारणांत तर त्यांना अद्याप अनेक शतकांची मजल गाठाव-याची आहे. तेव्हां हें फाजील प्रतिनिधित्व ब्रिटिश साम्राज्यशाहीचें हस्तक होण्याकरतां त्यांच्या गळ्यांत बांधलें आहे.

मुसलमानांना शेंकडा $\frac{1}{3}$ अधिक जागा दिली कीं, कॉंग्रेसच्या नांवानें गहजब करणारे लोक हा संस्थानिकांच्या प्रतिनिधित्वाचा उंट कसा पचवूं शकतात हें एक आश्चर्य आहे! फेडरेशन कां नको ह्याचें एक व प्रमुख कारण म्हणजे संस्थानिकांना—त्यांच्या प्रजेला नव्हे—दिलेलें प्रमाणाबाहेर प्रतिनिधित्व आहे.

अद्यापपर्यंत कौन्सिलचें मतदार कोणाला होतां येईल हें ठरलें नसलें तरी त्या गृहाचे मतदार फारच थोडे म्हणजे जवळ जवळ १ ते १॥ लाख होतील. आणि त्याच्या उलट प्रांतिक मतदार-संघांत एकूण ३ कोटी ६० लाख मतदार आहेत. तेव्हां लोकांचें खरें प्रतिनिधिमंडळ खालचें सभागृह आहे, वरचें नाहीं. त्यांना मात्र अप्रत्यक्ष निवडणुका ठेवल्या आहेत. ज्या संस्थेंत निवडणुका होतात, ती संस्था कायम नसते. इंग्लंडचें हौस ऑफ लॉर्डस् हें

कायमचें आहे व त्यांतील सभासद वंशपरंपरेनें त्यांत बसतात. पण हिंदुस्थानच्या स्टेट कौन्सिलला असें चिरस्थायी स्वरूप देणें अन्यायाचें आहे.त्यांतील ⅓ सभासद तीन वर्षांनीं,⅓ सहा वर्षांनीं व ⅓ नऊ वर्षांनीं निवृत्त व्हावयाचे आहेत.कोणी केव्हां निवृत्त व्हावयाचे याची आंखणीहि कायद्यानें करून टाकली आहे. प्रांतिक गव्हर्नरवर ज्याप्रमाणें प्रांतांतील कौन्सिल सभासदांच्या निवृत्तीची योजना सोपवली आहे तशी गव्हर्नर जनरलवर सोपविण्यांत आली नाहीं.मद्रास, बिहार, व मध्यप्रांत यांचे कांहीं व आसामचे सर्व सभासद सहा वर्षेंपर्यंत रहावयाचे आहेत;वायव्य प्रांताचे ९वर्षें रहावयाचे आहेत. मुंबई,बंगाल,संयुक्तप्रांत यांचे कांहीं तीन वर्षे, कांहीं सहा वर्षें व कांहीं नऊ वर्षें रहावयाचे आहेत. सिंधचे पहिल्या तीन वर्षांत खलास व्हावयाचे आहेत आणि पंजाबचे सहा वर्षांत खलास व्हावयाचे आहेत. ही योजना कोणत्या तत्त्वावर केली आहे हें कळत नाहीं. पण त्यांत धोरण खास आहे व तें प्रांताच्या मागासलेपणावर अगर पुढारलेपणावर अवलंबून आहे. तथापि प्रांतोप्रांतीं जसा वरिष्ठ कौन्सिलनीं सरकारला दगा दिला तसा ह्याहि योजनेंत दगा दिला जाणारच नाहीं असें कोणी सांगावें ?

कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें ब्रिटिश हिंदुस्थानांतील ११ प्रांत, संस्थानें व चीफ कमिशनरचे विभाग यांना प्रतिनिधित्व दिलें आहे. फक्त अंदमाननिकोबार व पंथ पिपलोदा एवढ्या दोन विभागांना प्रतिनिधित्व दिलें नाहीं. गव्हर्नर-जनरलला ज्या सहा जागा नेमावयाच्या आहेत, त्यांत या दोन विभागांतील प्रतिनिधी घ्यावेत अशीहि योजना नाहीं.

कौन्सिल ऑफ स्टेटकरतां ज्या निरनिराळ्या जातींच्या लोकांना

उमेदवार म्हणून रहावयाचें त्या सर्व जातींच्या उमेदवाराचें नांव मतदारसंघांत असलेंच पाहिजे ही अट नाहीं. कारण ब्रिटिश बलुचिस्थानांत असा अमीर एखादाच सांपडावयाचा. तेव्हां ब्रिटिश बलुचिस्थान त्यांतून वगळलें व त्यांचा प्रतिनिधि पुढें ठरेल त्याप्रमाणें निवडून द्यावा असें म्हटलें आहे. ख्रिश्चन, युरोपिअन, अँग्लो-इंडियन यांचें प्रतिनिधी कौंसिल ऑफ स्टेटचे मतदार असलेच पाहिजेत असें नाहीं. त्यांच्या निवडणुका प्रांतिक अँसेंब्ली व कौन्सिलच्या सभासदांमार्फत व्हावयाच्या आहेत. म्हणजे या निवडणुका अप्रत्यक्ष होणार.

हरिजन प्रतिनिधी प्रत्यक्ष निवडावयाचे नसून त्यांचीहि निवडणूक अप्रत्यक्ष होणार आहे. प्रांतिक अँसेंब्ली व वरिष्ठगृहांत जे सभासद असतील त्यांनीं हरिजन सभासद निवडून द्यावयाचे आहेत. स्त्रियांच्या बाबतींतहि असाच अपवाद केला आहे. स्टेट कौन्सिलमध्यें ज्या स्त्रिया जावयाच्या त्यांची निवडणूक प्रांताच्या सभागृहानें अगर सभागृहांनीं करावयाची आहे. ही निवडणूक पुरुष व स्त्रियांनीं मिळून करावयाची आहे.अशा प्रकारें कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें निवडणुकीचें बाबतींत फारच गमतीचे घोटाळे केले आहेत. एकीकडे जातवारी सांभाळावयाची, दुसरीकडे प्रांतवारी सांभाळावयाची, तिसरीकडे हुकमी बहुमत करावयाचें. अशा अनेक व्यवधानांत ब्रिटिश मुत्सद्यांची चांगली ओढाताण झाली आहे. लोकशाही व जबाबदारी यांचे धिंडवडे यापेक्षां अधिक कोण काढूं शकेल ? जे नियम अँग्ल-इंडियन, ख्रिश्चन व युरोपिअन यांच्याकरतां केले, ते शीखांच्या करतां का केले नाहींत ? तेव्हां कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें प्रत्यक्ष निवडणुका आहेत, अप्रत्यक्ष निवडणुका आहेत, मतदानाची

लायकी सोईप्रमाणें कमीअधिक केलेली आहे. कांहीं विभागांना वगळलें आहे. फेडरेशनचें मूलभूत तत्त्व तर त्यामुळें गारद झालेंच आहे. खालील कोष्टकांत हे निवडणुकीचे प्रकार दाखविले आहेत.

## कौन्सिल ऑफ् स्टेट

| संघ व संख्या | उमेद्वार | मतदारसंघ | प्रत्यक्ष का अप्रत्यक्ष |
|---|---|---|---|
| सर्वसामान्य (७५) | मतदारसंघांतील मतदार | प्रांतीवरील कर देणारा वगैरेंचा | प्रत्यक्ष |
| अँग्लो-इंडियन्स, ख्रिश्चन्स व युरोपिअन (१०) | लायकी मागाहून ठरविण्यांत येईल | प्रांतिक असेंब्ली व कौन्सिल सभासद (त्या जातीचे) | अप्रत्यक्ष |
| हरिजन (६) | मतदारसंघांतील मतदार | प्रांतिक असेंब्ली व कौन्सिलचे हरिजन सभासद | अप्रत्यक्ष |
| स्त्रिया (६) | मतदारसंघांतील मतदार | असेंब्ली व प्रांतिक कौन्सिलांतीलपुरुष व स्त्रीसभासद | अप्रत्यक्ष |
| ब्रिटिश बलुचिस्थान (१ मुसलमान) | मागाहून | मागाहून | मागाहून |
| मुसलमान (४८) | मतदारसंघांतील मतदार | प्रांतीवरील कर देणारा वगैरेंचा | प्रत्यक्ष |
| शीख (४) | मतदारसंघांतील सभासद | प्रांतीवरील कर देणारा वगैरेंचा | प्रत्यक्ष |

या कौन्सिल निवडणुकींत हरिजनांनीं हरिजन उमेद्वार निवडावयाचा आहे, स्पृश्य व अस्पृश्यांनीं निवडावयाचा नाहीं हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. येरवडा-करार यांत मोडला आहे. येरवडा-करारांत सर्व निवडणुका संयुक्त मतदारसंघामार्फत व्हाव्यात असें म्हटलें आहे.

'Representation of the depressed classes in the Central Legislature shall likewise be on the principle of joint electorate and reserved seats by the method of primary election in the manner provided for in clause 2 above for their representation in the provincial Legislatures. [ Yerawada Pact, section 3 ]

येरवडाकराराचा हा भंग केला आहे व त्याकडे जबाबदार व्यक्तींनीं लक्ष देणें जरूर आहे.

## फेडरल असेंब्ली.

या कायदेमंडळांत एकूण ब्रिटिश हिंदुस्थानचे २५० प्रतिनिधी व संस्थानचे १२५ प्रतिनिधी बसावयाचे आहेत हें वर दिलेंच आहे. ब्रिटिश हिंदुस्थानला ज्या २५० जागा दिल्या आहेत, त्या जातवारीच्या तत्त्वावर दिल्या असल्यामुळें त्यांत निरनिराळ्या जातींचे मतदारसंघ निर्माण झाले आहेत. धंद्याच्या रक्षणाकरतांहि मालक, मजूर, जमीनदार या वर्गांना प्रतिनिधित्व दिलें आहे. या कायदेमंडळांत येणारे सर्व सभासद प्रांतिक असेंब्लीमार्फत म्हणजे अप्रत्यक्ष निवडणुकांनीं येणार असल्यामुळें वरिष्ठ कौन्सिलाप्रमाणें येथें प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष अशा वैकल्पिक निवडणुकांचा गोंधळ घातला नाहीं. यांतील कांहीं निवडणुका प्रमाणशीर म्हणजे क्रमदेय पद्धतीनें होणार आहेत. (Single transferable ).त्याला अपवाद कोणते व इतर अदलाबदली काय आहेत हें आपण पाहूं. सर्वसामान्य जागा आणि मुसलमान व शीख यांच्या निवडणुका,त्या त्या वर्गाचे व जातीचे प्रांतिक असेंब्लींत मतदारसंघ बनवून क्रमदेय एकमतदानपद्धतीनें, करावयाच्या आहेत.

वायव्य सरहद्दप्रांतांत शीखांना ३ जागा आहेत, तसेंच मागासलेल्या क्षेत्रांतील लहानलहान जातींकरतां निरनिराळ्या जागा प्रांतांत वांटलेल्या आहेत. पण वायव्य सरहद्दप्रांतांत फेडरल असेंब्लीकरतां शीखांना जागा नाहीं आणि मागासलेल्या जातींकरतां-हि जागा ठेवल्या नाहींत. त्या सभासदांचा अंतर्भाव सर्वसामान्य प्रतिनिधींत केला आहे.

त्यानंतरचा प्रश्न हरिजनांचा येतो. येरवडा-कराराप्रमाणें हरि-जनांना राखीव जागा आहेत पण स्वतंत्र मतदारसंघ नाहींत. तेव्हां त्यांची फेडरल असेंब्लींत निवडणूक कशी करावयाची हा प्रश्न उद्भवतो. त्याकरतां प्रांतिक निवडणुकीकडे वळलें पाहिजे. प्रांतांत हरिजनांच्या प्राथमिक निवडणुका होतात व फक्त हरिजन मतदार एका जागेकरतां चौघांना शेवटच्या निवडणुकीकरतां निवडून देतात. या चौघांपैकीं एकाची निवड हरिजन व स्पृश्य हिंदु यांचा संयुक्त मतदारसंघ करतो. फेडरल असेंब्लींतहि प्राथमिक निवडणूक ठेवली आहे. ती अशीः—मागील प्रांतिक निवडणुकींत एका जागे-करतां जे जास्तींत जास्त उमेदवार हरिजनांनीं निवडून दिले असतील अशा सर्वांचा (उदाहरणार्थ मुंबई प्रांतांत १५ जागा आहेत, त्यांकरतां ६० जणांचा ) एक प्राथमिक मतदारसंघ बनवावयाचा. या मतदारसंघानें असेंब्लीकरतां जितक्या हरिजनांना जागा अस-तील, त्या प्रत्येक जागेकरितां चार जण निवडून द्यावयाचे व या चारांपैकीं एकाची निवड प्रांतिक कायदेमंडळाचे स्पृश्य व हरिजन सभासदांनीं करावयाची. मुंबईतर्फे फेडरल असेंब्लींत २ हरिजन जावयाचे आहेत. तेव्हां या जास्तींत जास्त ६० जणांच्या मतदार-संघानें ८ उमेदवार निवडून द्यावयाचे व या ८ जणांतून २ सभा-

सद प्रांतिकच्या स्पृश्य व हरिजन आमदारांनीं निवडावयाचे. ही ८ सभासदांची निवड क्रमदेयपद्धतीनें करावी असें सांगितलें नाहीं.

यानंतर स्त्रियांची निवडणूक. हिंदुस्थानांतून एकंदर ९ स्त्रिया संयुक्त असेंब्लींत पाठवावयाच्या आहेत. या ९ जागांपैकीं, २ मुसलमान व १ ख्रिश्चन स्त्रीकरतां जागा राखून ठेवल्या आहेत. या ९ जागा कशा भरावयाच्या? सबंध हिंदुस्थानांतील प्रांतिक कायदेमंडळांत एकंदर ४१ स्त्रिया आहेत. त्यांचा एक मतदारसंघ बनवावयाचा व या मतदारसंघानें ९ जागा भरून काढावयाच्या. क्रमदेय मतदानपद्धतीचा नियमांत उल्लेख नाहीं. तसेंच मुसलमान ख्रिश्चन स्त्रियांची कशी निवड करावयाची हेंहि ठरावयाचें आहे. अँग्लो-इंडियन, युरोपिअन व ख्रिश्चन्स यांच्या निवडणुकांकरतां सबंध हिंदुस्थानांत प्रत्येक जातीच्या प्रांतिक सभासदांचा असा एक मतदारसंघ बनवावयाचा व त्यांनीं आपले सभासद निवडून पाठवावयाचे. मद्रासला ज्या हिंदी ख्रिस्ती सभासदांकरतां दोन जागा आहेत, त्यांची निवड क्रमदेयपद्धतीनें करावयाची आहे. बाकी सर्व ठिकाणीं एकेकच जागा तिन्ही जातींकरतां आहे. म्हणून क्रमदेय पद्धतीचा प्रश्नच उद्भवत नाहीं.

यानंतर उद्योगधंद्याच्या लोकांकरतां ११ जागा ठेवल्या आहेत. त्यांची निवड चेंबर ऑफ कॉमर्स व तत्सम संस्थांनीं मागाहून प्रसिद्ध होणाऱ्या नियमान्वयें करावयाची आहे. जमीनदाराच्या जागेचाहि निर्णय नंतर होणार आहे. मजूरांच्या प्रतिनिधींची मागाहून वासलात लागणार आहे.

आतां प्रश्न उरतो तो चीफ कमिशनरच्या विभागांतून कसे प्रतिनिधी पाठवावयाचे याचा. यांपैकीं कूर्गनें आपल्या कायदेमंडळा-

तर्फे आपला प्रतिनिधि पाठवावयाचा आहे. बाकीच्या विभागाचा निर्णय मागाहून होणार आहे.

या असेंब्लीच्या सभासदत्वाकरतां कोणाला उभें रहातां येतें? जो प्रांताच्या असेंब्लीचा सभासद होऊं शकतो म्हणजे जो असेंब्लीचा मतदार आहे म्हणजे जो महिना मुंबई शिवाय इतर शहरांत १॥ रुपया घरभाडें भरतो किंवा ज्याचें ७५० रु. किंमतीचें घर आहे किंवा जो मॅट्रिक पास आहे किंवा ज्याची ८ रु. साऱ्याची जमीन आहे किंवा ज्या हरिजनाला अथवा स्त्रीला लिहितां वाचतां येतें त्याला फेडरल असेंब्लीच्या सभासदत्वाकरतां उभे रहातां येतें. मजूर, जमीनदार, उद्योगधंदे वगैरेकरतां लायकीचे नियम मागाहून जाहीर होणार आहेत.

प्रांतिक वरिष्ठ कायदेमंडळांतील सभासदांना फेडरल असेंब्लीच्या निवडणुका अप्रत्यक्ष असूनहि त्यांत भाग घ्यावयास सवड नाहीं हें विशेष आहे. फेडरल कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें, अँग्लो--इंडियन, युरोपिअन, हिंदी ख्रिश्चन व हरिजन यांचे जे छोटे छोटे जातीय मतदारसंघ बनणार आहेत त्यांत त्यांना मताधिकार आहेत. पण प्रांताच्या वरिष्ठ कौन्सिलांत नॉमिनेशनमध्यें एखादा ख्रिश्चन किंवा मुसलमान आला तर त्याला हा मताधिकार असतां कामा नये.

## संस्थानें व त्यांचे प्रतिनिधी.

संस्थानांच्या लहानमोठेपणाप्रमाणें एकंदर संस्थानांचे १७ गट केले आहेत. त्यांपैकीं १६ गटांत ७७ संस्थानांचा निर्देश केला आहे, व त्यांना वरच्या सभागृहाकरतां १०२ व खालच्या सभागृहाकरतां १२० सभासद दिले आहेत. १७ व्या विभागाला

अनुक्रमें २ व ५ जागा दिल्या आहेत.या विभागांत उरलेलीं संस्थानें आहेत व त्यांची स्वतंत्र वांटणी केली आहे. कौन्सिल व असेंब्ली सभासदांच्या जागांची वांटणी करतांना संस्थानासंस्थानांत खूप भांडणें झालीं. शेवटीं तो प्रश्न बादशहाच्या हुकुमानें सुटला. वरिष्ठ कौन्सिलाकरतां जी जागांची वांटणी केली आहे, तींत संस्थानांना किती तोफांची सलामी आहे, त्या संस्थानचें महत्त्व म्हणजे राजनिष्ठा कोणत्या प्रकारची आहे याचा विचार करून जागा ठरविण्यांत आल्या. पण असेंब्लीच्या जागा वांटतांना संस्थानची लोकसंख्याच फक्त विचारांत घेतली आहे असें सांगण्यांत आलें. तथापि त्याहि बाबतींत फारसा काटेकोरपणा केलेला दिसत नाहीं. ३ लक्ष ४२ हजार वस्तीच्या कलात-संस्थानला एक प्रतिनिधि आणि २४ लक्ष ४३ हजार वस्तीच्या बडोद्याला ३ प्रतिनिधी दिले आहेत. यावरून लोकसंख्येचें प्रमाण हें परिमाण मानलेलें दिसत नाहीं. हे प्रतिनिधी संस्थानिकांनीं नेमावयाचे आहेत. संस्थानिक स्वतःचीहि नेमणूक करूं शकतो.ब्रिटिश हिंदी प्रजाजन किंवा संस्थानी प्रजाजन यांचीहि पाठवणी दोन्ही सभागृहांत संस्थानिकांना करतां येते.

ह्या प्रतिनिधींत हिंदु इतके अगर मुसलमान इतके असावेत असें बंधन घातलें नाहीं. त्यामुळें हैद्राबादसारखा संस्थानिक तेथें बहुसंख्याक प्रजा हिंदूंची असूनहि सारे मुसलमान प्रतिनिधी पाठवूं शकेल आणि काश्मीरांत त्याच्या उलट प्रकार होईल. या सर्व भावी प्रतिनिधींची जातवारी काढली तर मुसलमान ⅓ भरूं शकत नाहींत हें बॅ. जीनाप्रभृति मुस्लीमलीगच्या अधिकाऱ्यांना ठाऊक आहे. म्हणून ते या फेडरेशनला विरोध करीत आहेत. संस्थानांत जातवारी नाहीं हें कोण म्हणूं शकेल? पण ब्रिटिश हिंदुस्थानांत जात-

वारीच्या पिशाच्चानें जो धुमाकूळ घातला आहे त्याचा संचार नव्या कायद्यानें संस्थानांत घातला नाहीं हें ठीक आहे. पण संस्थानिकांच्या प्रतिनिधीला जातच नसते. साम्राज्यशाहीचा पुरस्कार हीच त्याची जात.ब्रिटिश सरकारनें धर्मावर अधिष्ठित झालेल्या जाती संस्थानांपुरत्या अमान्य केल्या असून आर्थिक व राजकीय हितसंबंध समान असणारांची ही नवी जात निर्माण केली आहे. ही नवी जात हिंदुमुसलमानांप्रमाणें जन्मजात आहे. जे संस्थानिकाच्या कुळांत जन्मले त्या सर्वांची एकच जात आहे. संस्थानिकांनीं आपले प्रतिनिधि कसें पाठवावें याबद्दल ब्रिटिश सरकारला कधींच चिंता वाटली नाहीं. संस्थानिकांनीं कोणालाहि नेमला तरी तो जातो कुठें ? ब्रिटिश साम्राज्यशाहीचा तो पुरस्कर्ताच असणार. असले हे १२५ स्थाणू असेंब्लींत येऊन बसल्यामुळें ब्रिटिशांचें राज्य टिकूं शकेल पण आमच्या स्वातंत्र्याचा काल दुरावत जाईल. या १२५ जणांच्या अस्तित्वामुळें असेंब्लींत कॉंग्रेस आपलें बहुमत कधींच करूं शकणार नाहीं.

फेडरेशनचें अत्यंत घातुक स्वरूप जर कोणतें असेल तर संस्थानिकांना दिलेला हा १२५ सभासद नेमण्याचा अधिकार. लोकशाहीच्या तत्त्वानुसार असेंब्लीच्या निवडणुका व्हावयाच्या असल्या तर अप्रत्यक्ष निवडणुका ब्रिटिश हिंदुस्थानांतून नष्ट केल्या पाहिजेत. जी मतदानाची लायकी ब्रिटिश हिंदी प्रजेला ठेवली आहे, तीच संस्थानी प्रजेला ठेवावी. अशा पद्धतीनें जर निवडणुका झाल्या व कायदेमंडळ बनविण्यांत आलें तर प्रगतिपर राजकीय पक्षाला कांहीं कार्य करतां येईल. संस्थानिकांच्या हक्करक्षणापेक्षां संस्थांनी प्रजेच्या हक्करक्षणाचा प्रश्न हा जिव्हाळ्याचा व मूलभूत आहे. ज्या राज्य-

घटनेंत संस्थानी प्रजेच्याबद्दल एक शब्दही लिहिला नाहीं, ती घटना मान्य करणें म्हणजे संस्थानिकांनीं प्रजाद्रोह करणें आहे.

जोंवर हिंदुस्थानांत राज्यक्रांति झाली नाहीं, तोंवर संस्थानिकांचे हक्क व हितसंबंध हे अधिष्ठात्री सत्ता (Paramount power) संभाळील. तेव्हां त्यांना आपलें काय होईल याची काळजी करण्याचें कारण नाहीं. पण संस्थानी प्रजेचे मात्र संस्थानिक हित करूं शकत नाहींत. ते नुसतीच सुलतानशाही गाजवतात. तेव्हां फेडरेशनमध्यें संस्थानी प्रजेला आपलीं दुःखें मांडण्याकरतां जेवढ्या बाबी संस्थानिक आपल्या मान्यतापत्रकाद्वारां फेडरेशनला समर्पण करतील, तेवढ्या बाबींत—पूर्ण प्रतिनिधित्व दिलें पाहिजे. त्यांच्यांत पुनः राखीव-सोपीव, हिंदु-मुसलमान असे भेद करूं नयेत. कॉंग्रेसनें फेडरेशनसंबंधी जो मुख्य आक्षेप घेतला आहे तो या संस्थानी प्रतिनिधीसंबंधी आहे.

संस्थानिकांमार्फत जे प्रतिनिधी यावयाचे ते आपल्या कारभारांत ब्रिटिश हिंदी प्रतिनिधींना ढवळाढवळ करूं देणार नाहींत. उलट हे शिष्ट मात्र आमच्या कारभारांत आपली धोंड टाकून अनर्थ करूं शकतील. ते आपल्या अस्तित्वामुळें कार्यकारी व कायदेकारी अशा दोन्ही बाबतींत त्रास देतील. पक्षांच्या संघटनेवरहि ते परिणाम करतील. मद्रासला दंगा झाला तर काय करावें हें काश्मीरचा संस्थानिक सांगूं शकेल; पण म्हैसूरला गोळीबार झाला तर कर्नाटकचा प्रतिनिधी तोंड उघडूं शकणार नाहीं. संस्थानिकांनीं आपण ब्रिटिश हिंदुस्थानच्या कारभारांत ढवळाढवळ करणार नाहीं असें तोंडानें सांगितलें आहे. पण कायद्यांत तशी योजना करा असें म्हटलें असतां ते उलटून पडले. मंत्रिमंडळाच्या घडणीमध्यें ह्या

संस्थानिकांना स्थान असल्यामुळें, जो पुढारी त्यांना जागा देईल, त्याच्या बाजूला हा लोंढा लोटेल. तेव्हां असेंब्लीमध्यें ह्या १२५ जणांचा पक्ष हा एकजीव, संघटित असा पक्ष कायद्यानेंच निर्माण केला आहे. तो सभागृहांतील बहुमत टिकवूं शकेल किंवा उलथूं शकेल. मात्र त्यांच्यामागें शिस्तीचा अगर भीतीचा आसूड पाहिजे.

राउंड टेबल परिषदेला गेलेल्या हिंदी प्रतिनिधींनीं संस्थानी प्रतिनिधींना ब्रिटिश हिंदुस्थानच्या प्रश्नावर मत देण्याचा अधिकार असूं नये असें प्रतिपादन केलें होतें. कोणता प्रश्न ब्रिटिश हिंदुस्थानचा आहे हें असेंब्लीच्या अध्यक्षानें ठरवावें, ब्रिटिश हिंदुस्थानच्या प्रश्नाबाबद अविश्वासाचा ठराव आला तर संस्थानी प्रतिनिधींनीं पाहिजे तर मत द्यावें, कारण त्या मंत्रिमंडळाचा उपसर्ग त्यांनाहि पोंहोचतो अशाहि सूचना केल्या होत्या. पण जॉइंट सिलेक्ट कमिटीनें असा निर्बंध कायद्यांत घालूं नये, रूढीनें त्याला मान्यता मिळूं द्यावी असें सांगितलें. इंग्लंडच्या पार्लमेंटांत स्कॉटिश किंवा आयरिश प्रतिनिधी असेंच रूढीनें इंग्लंडच्या प्रश्नाबाबद सहसा मत देत नाहींत असाहि निर्वाळा जॉइंट सिलेक्ट कमिटीनें दिला. अशा प्रकारें ही जखम भरून न निघतां चिघळतच राहिली आहे.

फेडरल ॲसेंब्लीचा पाया हा राष्ट्रीय पाया नाहीं. त्यांत निरनिराळ्या जातींना स्वतंत्र मतदारसंघ देऊन हिंदुस्थानांत जातिनिष्ठला डोक्यावर घेतलें आहे. संयुक्त मतदारसंघाकरतां कॉंग्रेसचे पुढारी अत्यंत आतुर असतां हा संघ अजून बनत नाहीं. हरिजन व स्पृश्य हिंदु यांच्यांतहि अशीच दुफळी पाडण्याचा प्रयत्न होत होता. पण तो प्रयत्न म. गांधींनीं १९३२ सालीं प्राणांतिक उपा-

साचा अवलंब करून हाणून पाडला. येरवड्याचा करार हें त्याचेंच दृश्य स्वरूप आहे. पण महात्माजी जें हरिजनाकरतां करूं शकलें तें ते मुसलमान-शिखांच्या बाबतींत करूं शकले नाहींत. दुसऱ्या राउंडटेबलमध्यें ते मुसलमानांना कोरा चेक द्यावयास तयार झाले असतां तेथील ब्रिटिश मुत्सद्यांनीं एकी होऊं दिली नाहीं. त्यानंतर एकीचे प्रयत्न बरेच झाले पण ते फलद्रूप झाले नाहींत. अलाहाबादला जातीय निवाडा प्रसिद्ध झाल्यावर असाच एक प्रयत्न चालू होता. पण दशांश आणि पंचमांश जागांच्याकरतां घासाघीस चालू असतां, जसें लिलांवांत वर्तन करावें तसें सर सॅम्युएल होअरनीं वर्तन केलें आणि मध्यवर्ती कायदेमंडळांत मुसलमानांस पाहिजे होत्या तितक्या जागा देऊन ही तडजोड उधळून लावली.

जातीय निवाड्यांत आपसांतील तडजोडीला वाव ठेवली आहे. येरवडाकरारानें जसा हरिजनांचा प्रश्न बदलून घेतला तसा आणखी एखादा सर्वमान्य प्रयत्न यशस्वी झाला तर जातीय निवाडा बदलूं शकेल. तोंवर फेडरेशनमधील जातवारी ही तशीच रहाणार आहे. या व इतर कारणांमुळें फेडरेशनचें मूळचें भयानक व घातुक स्वरूप अधिक भयानक व अधिक घातुक झालें आहे. जातिनिष्ठेच्या रुळांवरून बेदरकारपणें चाललेली ही राजकारणाची गाडी राष्ट्रीयत्वाच्या रुळांवर आल्यावांचून हिंदुस्थानचें भवितव्य बदलणार नाहीं. दोन जाती स्वतंत्र नांदत राहून स्वातंत्र्य मिळतहि नाहीं व मिळालें तरी तें टिकत नाहीं.

---

१

# कायदेमंडळाचा कारभार.

कायदेमंडळें कशीं बनविण्यांत आलीं आहेत हें पाहिल्यावर त्यांच्या कारभाराकडे आपण लक्ष दिलें पाहिजे.

फेडरेशनची स्थापना केल्याचें राजेसाहेबांनीं जाहीर केल्यावर ते जाहीर करतील त्या दिवसाच्या आंत दोन्ही सभागृहांची बैठक भरेल. वर्षांतून एकदां तरी सभागृहांची बैठक भरली पाहिजेत; आणि एक बैठक भरल्यापासून दुसरी बैठक भरेपर्यंत १२ महिन्यांवर काळ लोटतां कामा नये.*

बैठक भरविण्याचे, खालसा करण्याचे, पुढें ढकलण्याचे संपूण अधिकार गव्हर्नर जनरल साहेबांना दिले आहेत.

दोन्ही कायदेमंडळांत मंत्री, गव्हर्नर जनरलचे सल्लागार आणि ॲडव्होकेट जनरल यांना बसण्यास व भाषण करण्यास परवानगी आहे. मंत्रिपदावर कोणाचीहि नेमणूक करतां येतें, मात्र ६ महि-

*इंग्लंडच्या पार्लमेंटला दर वर्षाला बैठक झाली पाहिजे ही रूढी लागू आहे. कायदा नाहीं. १९१९ च्या कायद्यांत ही वार्षिक सभेची कायदेशीर योजना नव्हती. वार्षिक सभेचें हें बंधन ऑस्ट्रेलिया व कानडा या वसाहतींच्या कायदेपुस्तकांतून हिंदुस्थानला लावलें आहे. एकाद्या गव्हर्नर जनरलनें जर हा नियम पाळला नाहीं तर त्याच्यावर फिर्याद करतां येत नाहीं. फक्त बादशहाकडे अपील करतां येतें. बैठकी बोलावणें, रद्द करणें वगैरे शब्दप्रयोगहि ऑस्ट्रेलियाच्या घटनेवरून घेतले आहेत. पण तेथें गव्हर्नर जनरल हा या गोष्टी करतांना मंत्र्यांच्या सल्ल्याप्रमाणें चालतो. हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल हा स्वतःचा मुखत्यार आहे.

न्यांच्या आंत त्याला निवडून यावें लागतें. मात्र त्यांना मतांचा अधिकार नाहीं. कौन्सिलच्या प्रमुखाला ‘ प्रेसिडेंट ’ व उपप्रमुखाला ‘ डेप्युटी प्रेसिडेंट’ म्हणावयाचें आहे. तसेंच असेंब्लीच्या प्रमुखाला ‘स्पीकर’ व उपप्रमुखाला ‘डेप्युटी स्पीकर’ अशी संज्ञा दिली आहे.

प्रेसिडेंट, डे. प्रेसिडेंट, स्पीकर, डे. स्पीकर यांनीं राजीनामा दिला, किंवा कौन्सिलचे प्रेसिडेंट, डे. प्रेसिडेंट यांची सभासदत्वाची मुदत संपली म्हणजे त्यांचें अधिकारपदहि जातें. पण त्यांना जर ठरावानें काढून टाकावयाचें असेल तर १४ दिवसांची नोटीस लागते. हा ठराव पास होण्यास कौन्सिल किंवा असेंब्लींत जेवढे सभासद त्या सभेला हजर असतील, त्यांच्या बहुमतानें प्रेसिडेंट वगैरेंना काढून टाकतां येत नाहीं. कौन्सिल किंवा असेंब्लीच्या सभासदांची संख्या २५० व ३७५ आहे; त्या सभेला १०० व १५० चे लोक हजर आहेत असें आपण समजूं. या १००-१५० पैकीं ९० किंवा १४० जणांनीं अनुक्रमें जर अध्यक्ष वगैरे विरुद्ध मतें दिलीं तरी त्यांची जागा जात नाहीं. १२६ व १८८ इतकीं म्हणजे एकूण सभासदांच्यापकीं निम्याहून अधिक कमीतकमी मतें पडलीं तरच त्यांना काढतां येतें. मग त्या सभेला कितीका सभासद हजर असेनात. प्रांतांच्या अध्यक्षांना हाच नियम लागू आहे. पण असेंब्लींत किंवा कौन्सिलांत सर्व जागा भरल्या नसल्या तर एकूण भरलेल्या जागांत जर बहुमत मिळालें तरच अध्यक्ष जातो. असेंब्लीचा जो स्पीकर असतो तो असेंब्ली बरखास्त झाली तरी जाऊं शकत नाहीं. नव्या असेंब्लीची पहिली बैठक झाल्यावर त्याची जागा संपते.

त्यांचा पगार ठरविण्याचें काम असेंब्लीचें आहे. कायद्यानें हा पगार ठरेपर्यंत गव्हर्नरनें त्याची तरतूद करावयाची आहे. समसमान मतें पडलीं तरच या दोन्ही अध्यक्षांना मत देण्याचा अधिकार आहे.*

सभा सुरू होण्यास सभागृहांत एकंदर सभासदांच्यापैकीं कमींतकमी $\frac{1}{6}$ सभासद लागतात पण जर $\frac{1}{6}$ सभासद नसले तर झालेलें काम बेकायदा ठरत नाहीं. $\frac{1}{6}$ सभासद सभागृहांत नाहींत असें आढळल्यास अध्यक्ष, प्रमुख किंवा जो अध्यक्षाच्या जागेवर असेल त्यानें $\frac{1}{6}$ संख्या होईपर्यंत काम थांबवावें किंवा सभा तह-कूब करावी. हिंदुस्थानांत $\frac{1}{6}$ संख्या नसली व कोणाचें लक्ष तिकडे गेलें नाहीं तर सभा चालूं शकते. आस्ट्रेलियांत व कानडांत गणपूर्ति-शिवाय सभाच सुरू होऊं शकत नाहीं. तशी सभा सुरूं केली तर झालेलें काम बेकायदा ठरतें. सभासदांना राजनिष्ठेची शपथ घ्यावी लागते. शपथ घेतली नाहीं तर तो सभासद होत नाहीं. एखादा सभासद बैठक चालू असतां लागोपाठ ६० दिवस सभागृहाच्या परवानगीवांचून सुटीचे दिवस सोडून गैरहजर राहिला तर त्याची जागा रद्द होते.

सरकारी पगारी नोकर, वेडा, ठरविलेला नादार, दोन वर्षां-वर शिक्षा झालेला असला तर अशा मतदाराला निवडणुकीस उभे रहातां येत नाहीं. दोन वर्षें शिक्षा होऊन ५ वर्षें लोटलीं असलीं तर ही अट लागू होत नाहीं. गव्हर्नर जनरल आपल्या अधिकारांत ही मुदत कमीहि करूं शकतो. निवडणुकीच्या बाबतींत जर एखाद्यानें

*आस्ट्रेलिया व कानडांत अध्यक्षांना वरिष्ठ गृहांत पहिलें मत देतां येतें; जादा मत देतां येत नाहीं. सारखीं मतें पडलीं तर ठराव रद्द होतो. पण खालच्या गृहांत त्यांना जादा मताचा अधिकार हिंदुस्थानप्रमाणें आहे.

लांचलुचपतीसारखे प्रकार केलें असल्याचें कोर्टांत शाबीद झालें असेल तरहि त्याचें सभासदत्व जातें. काळेपाण्याची किंवा फौजदारी गुन्ह्याची शिक्षा भोगत असलेल्या गृहस्थाला निवडणुकीस उभे रहातां येत नाहीं. राजकीय गुन्हेगारांनाहि हे नियम लागू आहेत.

शिक्षा झालेल्या गृहस्थाला निवडणुकीस कां उभे राहूं देऊं नये याबद्दल पार्लमेंटांत फार वादळ झालें. चर्चिलसाहेबांनीं या बंधनाविरुद्ध तक्रार केली. 'गुन्हा केला, शिक्षा भोगली, मनुष्य शुद्ध झाला' असें ते म्हणाले. 'ज्याप्रमाणें शिक्षा होईपर्यंत मनुष्य निरपराधी असतो. त्याप्रमाणें शिक्षा भोगून झाल्यावर तो पूर्वीप्रमाणें शुद्ध होतो!' सर ऐझॅक फुट म्हणाले 'हिंदुस्थानांत राजकीय चळवळीकरतां अनेकांना शिक्षा झाली असेल. आपण त्यांचें राजकीय व आर्थिक दुर्भिक्ष्य दूर केलें तर त्यांना शिक्षा होणार नाहींत. आम्ही तुरुंगाला महत्त्व देत नाहीं. आपल्या देशांत जर हा नियम लावला असतां तर जॉन बर्न्स, जॉन विल्कीन्स, मुख्य प्रधान सर रॉबर्ट वॉलपोल, पार्लमेंटांत ज्याचा आपण एके दिवशीं पुतळा उभारूं असें सर जॉन एलिएट, जॉन हॅमडन व ॲपोसल पॉल यांना निवडणुकीला उभे रहातां आलें नसतें.'' यावर सॉलिसिटर जनरलनीं सांगितलें कीं,'हिंदुस्थानांत हे नियम जारी आहेत आणि आम्ही ग. जनरलला ही नालायकी दूर करण्याची परवानगी दिली आहे. राजकीय कैदी व इतर गुन्हेगार यांतहि फेरफार करणें कठिण आहे.'

१९१९ च्या कायद्यांत नालायकीला ६ महिने शिक्षा पुरेशी होती; पुढें १९२५ मध्यें ती १ वर्ष करण्यांत आली. नव्या काय-

यांत ती दोन वर्षे केली गेली. श्री.शरच्चंद्र बोस हे अटकेंत होते व त्यांना शिक्षा झाली नव्हती त्यामुळें ते निवडणुकीला उभे राहूं शकले. नव्या कायद्यांत नुसती अटक ही नालायकी ठरणार नाहीं. तसेंच एखाद्याला अटक झाली असेल व तो जामीनावर निवडणुकीच्या दिवशीं खुला असेल तर त्याला निवडणूक लढवतां येतें, मात्र दोन वर्षांची शिक्षा त्याला जर झाली तर त्याची जागा जाते. निवडणुकीच्या दिवशीं जर एखादा शिक्षा भोगत असला मग ती शिक्षा २ वर्षांपेक्षां कमी असली तरी त्याला उभें रहातां येत नाहीं.

एखादा उमेदवार वर वर्णिलेल्या शिक्षेमुळें नालायक ठरला तर त्याची जागा तीन महिने रद्द होत नाहीं. ही जागा तीन महिने मोकळी ठेवण्याचा उद्देश दुसराहि आहे. त्यानें या काळांत अपील दाखल करावयाचें आहे. हें अपील दाखल केलें तर त्या अपिलाचा निकाल लागेपर्यंत त्याचें सभासदत्व रद्द होत नाहीं. पण त्या सभासदाला या काळांत सभागृहांत बसतां किंवा मत देतां येत नाहीं. त्याच्या सभासदत्वाचें फक्त रक्षण केलें आहे. ६० दिवसांच्या गैरहजिरीचा नियम येथें लागू पडणार नाहीं असा निष्कर्ष निघतो. ही सक्तीची गैरहजिरी आहे.

अशा प्रकारें नालायकीचे दोन प्रकार आहेत. ज्यांना काळ्या पाण्याची शिक्षा झाली असेल किंवा फौजदारी शिक्षा झाली असेल त्यांना निवडणुकीस उभेंच रहातां येत नाहीं. पण सरकारी नोकर, वेडा, नादार, वगैरे लोक जर नजरचुकीनें उभे राहिले तर त्यांना आपली जागा नालायकी सिद्ध झाल्यास रिकामी करावी लागते. बॅ. विठ्ठल नथू पाटील यांचें सभासदत्व रद्द झाल्याचें उदाहरण या बाबतींत विचारणीय आहे. ते सरकारी वकील होते, पण पूर्ण-

पणें सरकारी नोकर नव्हते. कॉंग्रेसच्या नव्या राजवटींत सरकारी वकीलावरील नालायकीचा शिक्का दूर झाला नाहीं; उलट तो मान्य केला गेला. त्यामुळें बॅ. पाटील यांची जागा गेली.

सरकारी नोकरांना सभासद राहतां येत नाहीं असें जे वर सांगितलें आहे, त्याला दोन अपवाद आहेत. एक मंत्री व दुसरे संस्थानांत नोकरीवर असणारे व आपले नोकरीवर हक्क कायम ठेवणारे ब्रिटिश हिंदुस्थानांतील सरकारी नोकर. लायक नसणारे अगर नालायक ठरविलेले सभासद जर बैठकीला हजर राहिले तर त्यांना दररोज ५०० रु. दंड होतो.

असेंब्ली व कौन्सिलांतील सभासदांना आपल्या प्रतिनिधित्वामुळें कांहीं खास अधिकार मिळाले आहेत. त्यांना सभागृहापुढें वाटेल तें बोलतां येतें. त्यांच्या भाषणाकरतां मग तें कितीहि कठोर असलें तरी त्यांच्यावर फिर्याद करतां येत नाहीं. सभासदांना एकमेकांवर वैयक्तिक आरोप करतां येत नाहींत. तसेच गलिच्छ शब्दप्रयोग करतां येत नाहींत. बादशहा, ग. जनरल, गव्हर्नर्स, कोर्ट वगैरेंच्या वर्तणुकीबद्दल राजद्रोही बेअब्रूकारक शब्द उच्चारतां येत नाहींत.* मात्र सभासदांनीं कसेंहि मत दिलें असलें तरी त्याला कोर्टापुढें खेचतां यत नाहीं.

सध्यांच्या कायद्यांत कलम २८ पोटनियम २ मध्यें असेंब्ली-सभासदांना कोणकोणते हक्क असावेत ते वेळोवेळीं असेंब्लीनें कायदा करून ठरवावें असें म्हटलें आहे. सभासदांना सभा किंवा कमिटीची सभा चालू असतां दिवाणी गुन्ह्याकरतां अटक करूं नये अशी सवलत होती, पण ती काढून घेण्यांत आली आहे.

* वृत्तपत्रांनीं जर हीं भाषणें प्रसिद्ध केलीं, तर त्यांना संरक्षण दिलेलें नाहीं. त्यांच्यावर खटला होऊं शकतो. असा एक खटला झालाहि होता.

असेंब्ली म्हणजे कोर्ट नाहीं व असेंब्ली कोणाला शिक्षा अगर दंड करूं शकत नाहीं. फक्त कायदेमंडळाचे नियम अगर शिस्त मोडणारांचें सभासदत्व रद्द करणें आणि तें रद्द झालें असतां तेथें बसणाराला ५०० रु.रोज दंड करणें वगैरे अधिकार त्यांना आहेत. ॲडव्होकेट जनरल व ग.जनरलचे सल्लागार यांनाहि कायदेमंडळाच्या सभासदांना ज्या सवलती दिल्या आहेत, त्या दिलेल्या आहेत.

एखाद्या सभासदानें अध्यक्षाची किंवा दुसऱ्या एखाद्या सभासदाची बेअदबी केली, तर कायदेमंडळाला त्याला शिक्षा करतां येऊं नये हें ठीक आहे. पण त्याकरतां बाहेर कोर्टांत फिर्याद लावतां येतें किंवा नाहीं, हा प्रश्न आहे.तशी फिर्याद लावतां येणार नाहीं, कारण ज्या कारणाकरतां अशा फिर्यादी लावतां येतात, त्याची रूपरेषा कलम२८,पोटकलम (४) मध्यें दिली आहे. या पोटकलमांत जर एखाद्यानें कायदेमंडळाच्या कमिटीपुढें साक्ष देण्याचें किंवा कागदपत्र हजर करण्याचें नाकारलें तरच त्याच्यावर कोर्टांत इलाज होऊं शकतो; असें म्हटलें आहे. या साक्षींत किंवा कागदपुराव्यांत गुप्त गोष्टी असतील त्या प्रकट करण्याचें सरकारी नोकर नाकारूं शकतील. तसेंच माजी अगर विद्यमान सरकारी नोकर हे हजर रहाण्याचे बाबतींत ग. जनरल वैयक्तिक निर्णयाप्रमाणें जे नियम करील त्यानें बांधले जातील. वरील बंधनें जमेस धरून फेडरल असेंब्लीनें नियम करावयाचे आहेत. तेव्हां बेअदबीबद्दल कोर्टांत फिर्याद होऊं शकत नाहीं.ही गोष्ट ज्या शेवटीं याद्या दिल्या आहेत, त्यावरूनहि सिद्ध होते. तेव्हां कायदेमंडळाला कोणत्याहि कोर्टाला अशा बेअदबीबद्दल खटला चालविण्याची सत्ता देतां येत नाहीं.ऑस्ट्रेलिया व कानडांत सभासदांचे जे हक्क आहेत, ते इंग्लिश पार्लमेंटच्या सभासदांसारखे आहेत.कांहीं काळ ऑस्ट्रेलियामध्यें अध्यक्ष हा एखाद्या सभासदाला

बेअदबी करतां कोर्टानें शिक्षा करावी असें फर्मावूं शके. कांहींना त्याकरतां तुरुंगांतहि जावें लागलें. पण आतां ही शिक्षा होत नाहीं.

आतांपर्यंत मध्यवर्ती असेंब्लीच्या सभासदांना भत्ता मिळे, पगार मिळत नसे. यापुढें त्यांना पगार व भत्ता मिळणार आहे व तो त्या त्या सभागृहानें ठरवावयाचा आहे. तो ठरेपर्यंत जुन्या जमान्या-प्रमाणें त्यांना भत्ता मिळत राहील.

## कायदेमंडळाची कार्यपद्धति.

पैशाचें बिल हें खालच्या कायदेमंडळांत मांडावें लागतें. हिंदुस्थानच्या राज्यघटनेचें वैशिष्ट्य काय आहे असा प्रश्न जर उपस्थित झाला, तर दोन्ही सभागृहांना दिलेले समान अधिकार असें सांगतां येईल. फक्त दोन्ही गृहांत जर विषमता असली तर पैशाच्या बिलांच्या बाबतींत. पैसापुरवठ्याचीं बिलें वरील गृहांत मांडतां येत नाहींत. पण वरिष्ठ गृहांची संमति मिळाल्याशिवाय पैशाचीं बिलें पास होत नाहींत. यावरून त्या गृहाला याहि बाबतींत अधिकार नाहींत असें म्हणतां येत नाहीं. याबद्दल वसाहतींमध्यें काय प्रकार आहे तो पाहूं.

वसाहतींमध्यें वरिष्ठ गृहांना कर बसविणें किंवा इतर भार लोकांवर टाकणें याबद्दल मोकळीक नाहीं. आस्ट्रेलिया, कानडा, व दक्षिण आफ्रिका या तीनहि वसाहतींत वरिष्ठ सभागृहांनीं कर बसविण्या-च्या बाबतींत किंवा सरकारला लागणारा खर्च मंजूर करण्याच्या बाबतींत कायद्यांत दुरुस्त्या करूं नये असें सांगितलें आहे.*

---

*The senate may not amend any proposed law, so as to increase any proposed charge or burden upon the people. –Commonwealth of Australia.

The senate may not amend any Bill so far as it imposes taxation or appropriates revenues or moneys for the service of the Government.–Union of South Africa.

हौस ऑफ कॉमन्समध्यें या विषयावर बोलतांना मेजर नॅथन म्हणाले, 'सेक्रेटरी ऑफ स्टेट सांगतात कीं, या बिलाचा अंतिम हेतु हिंदुस्थानला वसाहतींचें स्वराज्य देण्याचा आहे. मग हिंदुस्थानला आपल्या आर्थिक व्यवहाराच्या यंत्रावर वसाहतींना जसा ताबा दिला आहे, तसा द्यावयास नको काय ?'' पण हिंदुस्थानला हा ताबा मिळाला नाहीं. वरिष्ठ कौन्सिलल्लाहि त्यांत हात शिरकावयास सवड ठेवली आहे. बाकी वरिष्ठ कौन्सिल काय, किंवा कनिष्ठ कौन्सिल काय, दोन्ही गृहांत संस्थानिकांना भरमसाट जागा देऊन लोकशाही तत्त्वाला पायबंद घातला आहे. अशा प्रकारें दोन्ही गृहांना सारखी सत्ता दिली आहे.*

पैशाशिवाय इतर बिलें खालीं अगर वर मांडलीं तरी चालतात. कोणतेंहि बिल दोन्ही गृहांनीं पास केल्याशिवाय तें पास झालें असें म्हणतां येत नाहीं.एका गृहानें एक बिल पास केलें व दुसऱ्या गृहानें तें फेटाळून दिलें;किंवा उपसूचनांच्या बाबतींत दोन्ही गृहांचें एकमत झालें नाहीं अथवा एका गृहाकडून पास झालेलें बिल दुसऱ्या गृहानें

* प्रांतांतील वरिष्ठ गृहांना, खालच्या गृहाइतक्या सत्ता नाहींत. हीं वरिष्ठ गृहें निव्वळ खोळंबा करण्याकरतां आहेत. घाईनें किंवा अविचारानें केलेल्या गोष्टींना आवरून धरावें एवढाच या गृहाचा उपयोग आहे. या गृहांचा व फेडरेशनमधील वरिष्ठ गृहांचा तीन बाबतींत भिन्नपणा आहे.

(१) सभासदसंख्या-प्रांतामध्यें वरिष्ठ व कनिष्ठ सभासदांचें प्रमाण एकपंचमांश ते एकषष्ठांश पडतें. मुंबई ३० : १७५, फेडरेशनमध्यें २५० : ३७५ असें म्हणजे २ : ३ आहे.

(२) प्रांतिक वरिष्ठ गृहामध्यें जन्म पावलेल्या बिलाला तें खालच्या गृहानें फेटाळलें तर जोडबैठक नाहीं.

(३) प्रांतिक पैशाच्या मागण्या फक्त खालच्या गृहांत आणतां येतात.

ग. जनरलकडे मान्यतेकरतां पाठविलें नाहीं तर ग. जनरलला दोन्ही गृहांची एकत्र बैठक बोलवावी लागेल. त्या बैठकींत बहुमतानें ठरेल तें त्या बिलाचें भाग्य समजावें. या जोडबैठकीचें अध्यक्षस्थान वरिष्ठ कौन्सिलच्या अध्यक्षाकडे जातें. ग. जनरलनें एखाद्या बिलाला मान्यता दिली तरी तें बिल १२ महिन्यांच्या आंत राजेसाहेबांकडून शिक्कामोर्तब होऊन यावें लागतें. याशिवाय त्या बिलाला कायद्याचें स्वरूप येत नाहीं.

कोणतेंहि बिल पास केव्हां होतें, नापास केव्हां होतें व केव्हां रद्द होतें याची विस्तरशः चर्चा कायद्यांत केली आहे.

१ पैशाशिवाय कोणतेंहि बिल खालच्या किंवा वरच्या गृहांत मांडतां येतें.

२ बिल पास व्हावयास तें दोन्ही गृहांनीं पास करावें लागतें.

३ त्यांत दुरुस्त्या करावयाच्या असतील तर त्या उभय गृहांना मान्य कराव्या लागतात.

४ कायदेमंडळाची बैठक तहकूब झाल्यामुळें बिल रद्द (lapse) होत नाहीं.

५ कौन्सिल आफ स्टेटपुढें आणलेलें बिल फेडरल असेंब्ली बरखास्त झाल्यामुळें रद्द होत नाहीं पण—

६ फेडरल असेंब्लीनें पास करून एखादें बिल जर कौन्सिलकडे पाठविले व तें पास झालें नसलें तर तें बिल असेंब्ली बरखास्त झाल्यास रद्द होतें. त्याला कांहीं अपवाद आहेत. ते पुढें येतील.

### संयुक्त बैठका केव्हां भरवाव्या.

१ एका गृहानें बिल पास केलें व दुसऱ्या गृहानें तें नापास केलें तर जोडबैठक बोलवावी. किंवा

२ बिलामध्यें सुचविलेल्या दुरुस्त्यांबाबत दोन्ही गृहांचें एकमत झालें नाहीं तर जोडबैठक बोलवावी. किंवा

३ एका गृहानें दुसऱ्या गृहाकडे एखादें बिल पाठवून सहा महिने होऊन गेले असतील आणि तें जर गव्हर्नर जनरलच्या संमतिकरतां पाठविलें नसेल तर जोडबैठक बोलविली जाईल.याला एक अपवाद आहे. दरम्यानच्या काळांत असेंब्ली बरखास्त झाली असेल तर बिल रद्द होतें व जोडबैठक बोलावतां येत नाहीं.

वरील १, २ व ३ लाहि अपवाद आहे.जर गव्हर्नर-जनरलला असें वाटलें कीं, तें बिल पैशाबद्दल आहे किंवा ज्या गोष्टी त्याला विवेचक बुद्धीनें किंवा वैयक्तिक निर्णयानें करावयास कायद्यानें सांगितलें आहे, त्याला बाध आणणारें हें बिल आहे तर गव्हर्नर जनरल तें बिल पाठवून सहा महिने झाले किंवा नाहीं; दुरुस्त्याबद्दल उभय गृहांचें एकमत होतें किंवा नाहीं; दुसऱ्या गृहानें तें नापास केलें आहे किंवा नाहीं याचा विचार न करतां जोडबैठक बोलवील.मात्र त्याची अशी खात्री झाली असली पाहिजे कीं,तें बिल त्याच्याकडे पाठविण्यास निष्कारण दिरंगाई केली जात आहे.

ग. जनरलनें ही जोडबैठक जाहीर केल्यावर त्या बिलाची चर्चा कुठल्याहि गृहापुढें होतां कामा नये. ग. जनरलनें या जोडबैठकीचा जाहीरनामा प्रसिद्ध केल्याला सहा महिने होऊन गेले म्हणजे कायदेमंडळाच्या पुढच्या बैठकीचे वेळीं ही संयुक्त सभा भरेल.

पण जर तें बिल पैसा किंवा विवेचक बुद्धी वगैरेंवर नमूद केलेल्या विषयाबद्दल असेल तर त्यानें जोडबैठकीकरतां सहा

महिन्यानंतरचा मुहूर्त पाहूं नये, त्यानें वाटेल त्या तारखेला सभा बोलवावी.

या जोडबैठकीच्या संबंधीं जीं पोटकलमें आहेत त्यांत ग. जनरलला विवेचक बुद्धी वापरावयास सांगितलें आहे.

जोडबैठकींत बहुमतानें होणारा निर्णय तोच अखेरचा निर्णय. त्यांत दुरुस्त्या वगैरे काय करावयाच्या असतील त्या कराव्या. पण दुरुस्त्या कोणत्या करतां येणार नाहींत हेंहि सांगितलें आहे.

एका गृहानें एखादें बिल उपसूचनांसह पास केलें व दुसऱ्या गृहाकडे पाठविलें आणि दुसऱ्या गृहानें उपसूचना अमान्य करून परत तें बिल जेथून आलें तेथें पाठविलें असेल तर जोडबैठकींत उपसूचना आणतां येणार नाहींत. फक्त उशीर झाल्यामुळें कांहीं दुरुस्त्या कराव्या लागल्या तर तेवढ्यापुरत्या उपसूचना आणतां येतील. त्याचप्रमाणें बिलांतील विषयाला लागू असतील अशाच उपसूचना आणतां येतील. पण कोणत्या उपसूचना मान्य करावयाच्या हे अध्यक्ष ठरवील.

गव्हर्नर जनरलनें जोडबैठक जाहीर केल्यानंतर जर असेंब्ली बरखास्त झाली तर बिल रद्द होत नाहीं.

## गव्हर्नर जनरल व राजा यांची मान्यता.

दोन्ही गृहांकडून पास झालेल्या बिलाला गव्हर्नर जनरल आपल्या विवेचक बुद्धीनें राजाच्यातर्फें मान्यता देईल किंवा तें अमान्य करील किंवा तो राजाच्या मर्जीनुसार संमति मिळण्याकरतां तें ठेवून घेईल.

गव्हर्नर जनरलला एखाद्या बिलांत, त्या बिलाच्या उपसूचनांत

किंवा कलमांत कांहीं कमीजास्त व्हावयास पाहिजे असेल तर त्यानें उभय गृहांकडे आपला विनंतिवजा खलिता पाठवावा. असा खलिता आल्यास उभय गृहांनीं त्याचा फेरविचार करावा.

जें बिल गव्हर्नर जनरलनें राजाच्या मर्जीनुसार त्यांच्याकडे मान्यतेकरतां पाठविलें असेल तें मान्य होऊन आलें असें १२ महिन्यांच्या आंत गव्हर्नर जनरलनें जाहीरनामा काढून कळविल्याशिवाय त्या बिलाचा कायदा होणार नाहीं.

गव्हर्नर जनरलनें एखाद्या बिलाला मान्यता दिली असली तरी राजाला तें बिल १२ महिन्यांच्या आंत अमान्य करतां येतें. (असा कपिलाषष्ठीचा योग कधीं येणार नाहीं; कदाचित् हिंदी गव्हर्नर जनरल आल्यावर येईल ). ही अमान्यता गव्हर्नर जनरलनें तावडतोब जाहीर केली पाहिजे.

गव्हर्नर जनरलला आपल्या अधिकारांत एखादें बिल फेटाळून लावण्याची जी व्हेटोची सत्ता दिली आहे,ती हिंदुस्थानप्रमाणें इतर वसाहतींत होती. पण वेस्टमिनिस्टर स्टॅटयूटनंतर ही सत्ता संपली आहे. १९१९ च्या कायद्यामध्यें व्हेटोची व सर्टिफिकेशनची जी सत्ता गव्हर्नर जनरलला होती, ती त्यानें बऱ्याच वेळां वापरली. त्याला कारणेंहि तशींच होतीं. बेजबाबदार राज्यपद्धतीविरुद्ध नापसंती व्यक्त करण्यास सरकारतर्फे आलेलीं बिलें फेटाळून लावणें एवढें एकच साधन असतें. व्हेटोची सत्ता उपयोगांत आणण्याचे कमीत कमी प्रसंग आणणें हें ग. जनरलच्या स्वतःच्या व घटनेच्या इभ्रतीकरतां जरूर असतें. म्हणून नव्या कायद्यांत एखादें बिल किंवा त्यांतील कांहीं कलमें किंवा दुरुस्त्या त्याला

नापसंत पडल्या तर त्यानें तें बिल फेरविचाराकरतां पाठवावें असें म्हटलें आहे.त्याबरोबर त्यानें आवश्यक दुरुस्त्याहि सुचवावयाच्या आहेत. फेरविचाराकरतां बिल पाठविण्याचा उद्देश वरवर स्तुत्य असला तरी दरम्यानच्या काळांत त्यांना सभासदांत दुफळी करतां येते व व्हेटोची आपत्ति टाळतां येते.

राजाच्या संमतीकरतां ग. जनरलनें कोणतीं बिलें राखून ठेवावीं याची यादी आज्ञापत्रकाच्या १३ व्या कलमांत दिली आहे:—

(अ) ब्रिटिश हिंदुस्थानला लागू पडणाऱ्या पार्लमेंटच्या कोणत्याहि कायद्याविरुद्ध हिंदी बिल असल्यास तें राजाकरतां ठेवावें.

(ब) जर एखाद्या बिलानें प्रांतिक कोर्टांची सत्ता कमी होत असेल तर तें राजाकरतां ठेवावें.

(क) ब्रिटिश व्यापारी, नोकर, धंदेवाईक वगैरेंच्या हिताला बाधक असणारें अमुक बिल आहे कीं काय अशी शंका ग.जनरलला आल्यास त्यानें तें राजाच्या संमतीकरतां राखून ठेवावें. त्याचप्रमाणें २९९ कलमामध्यें खाजगी व्यक्तींची मिळकत काढून न घेण्याबद्दल जी योजना आहे, त्याविरुद्ध असणारें बिल राजाकरतां राखून ठेवावयाचें आहे.

(ड) प्रांतानें जर एखादें बिल पास केलें व ग. जनरलच्या संमतिकरतां पाठविलें व त्या बिलामुळें जर कायमधारापद्धती ( परमनंट सेटलमेंट ) बदलत असेल तर तें बिल राजाकरतां ठेवावें.

राजाला जीं हीं बिलें फेटाळण्याची सत्ता दिली आहे त्याविरुद्ध फार तक्रारी करण्यांत आल्या. पण सर सॅम्युएल होअर म्हणाले, 'राजाची ही सत्ता काढून घेतली म्हणजे त्याचें राजेपण काय राहिलें? सर्व कायदेमंडळें राजसत्तेच्या मानानें दुय्यम आहेत. तेव्हां त्यांच्या-

वर सत्ता चालविण्याकरतां राजाचे अधिकार अबाधित राहिले पाहिजेत. ब्रिटिश साम्राज्यांत ही सत्ता आहे व ती हिंदुस्थानांत राहिली पाहिजेच ' अशा प्रकारें एखादें बिल पास होण्यास अनेक चाळण्यांच्या राशी उभारल्या आहेत व जें बिल कायद्यांत रूपांतर पावेल तें मोक्षाला गेलें असें म्हणावें लागेल.

## पैशाचें बिल.

दरवर्षी ग. जनरल दोन्ही सभागृहांपुढें जमा व खर्चाचा तक्ता ठेवावयास लावील. या अंदाजपत्रकांत दोन खर्च स्वतंत्रपणें दाखविले जातील. एकाला ' फेडरेशनच्या जमेवर लादलेला खर्च ' असें म्हटलें जाईल व दुसऱ्याला इतर खर्च भागविण्याकरतां लागणाऱ्या रकमा असें म्हटलें जाईल. या दोन खर्चांच्या भानगडी काय आहेत त्या आपण पाहूं.

फेडरेशनवर जो खर्च लादला जाईल त्यांत खालील बाबी येतील:—

( १ ) ग. जनरलचा पगार आणि भत्ता, तसेंच त्याच्या ऑफिसचा खर्च.

( २ ) कर्ज, कर्जफेड, व्याज व सिंकिंग फंड, कर्ज उभारण्याकरतां होणारा खर्च वगैरे.

( ३ ) मंत्री, ग. जनरलचे सल्लागार, आर्थिक सल्लागार, ॲडव्होकेट जनरल, चीफ कमिशनर्स, व आर्थिक सल्लागाराचा नोकर वर्ग, या सर्वांचा पगार व भत्ता.

( ४ ) फेडरल कोर्टाच्या न्यायाधिशांचा किंवा त्यांच्या संबंधीचा पगार, भत्ता व पेन्शन. तसेंच हायकोर्टाच्या न्यायाधिशांचें पेन्शन.

( ५ ) संरक्षण, धार्मिक बाबी, परराष्ट्रीय संबंध, सरहद्दीवरील टोळ्यांच्या मुलखाची राज्यव्यवस्था या बाबतींत ग. जनरलला जीं

कामें करावयाचीं आहेत त्यांचा खर्च. धर्मखात्याचा खर्च,पेन्शनचा खर्च सोडून सालीना ४२ लाखांवर जातां कामा नये.

( ६ ) बादशहावर संस्थानिकासंबंधीं जीं जीं कामें या कायद्यानें सोपवलीं आहेत त्यांचा खर्च.

( ७ ) प्रांतांतील जो भाग वगळलेला म्हणून ठरवला असेल, त्या भागाच्या राज्यकारभाराचा खर्च.

( ८ ) कोर्ट किंवा लवाद यांच्या निवाडयाप्रमाणें द्याव्या लागणाऱ्या रकमा.

( ९ ) या कायद्यानें किंवा संयुक्त राज्यघटनेच्या असेंब्लीनें जो कायदा केला असेल त्यानें, जो खर्च फेडरेशनवर लादला जाईल तो.संस्थानांना द्यावयाच्या रकमा, ब्रम्हदेश वेगळा झाल्यामुळें दोन्ही देशांच्या नाण्यांची जी व्यवस्था करावयाची त्याबद्दल द्यावें लागणारे पैसे; प्रांताला कर्जादाखल द्यावयाच्या रकमा; ऑडिटर–जनरलचा पगार वगैरे बाबी या सदरांत येतात. अमुक एक खर्चाची बाब कोणत्या सदरांत पडते हें ठरविण्याचा अधिकार ग. जनरलचा आहे व तो त्याच्या विवेचक बुद्धीवर अवलंबून आहे. वरील सर्व कलमांमध्यें ज्या खर्चाच्या बाबी निर्दिष्ट केल्या आहेत,त्यावर कायदेमंडळाला मतें देण्याचा अधिकार नाहीं. त्यांनीं भाषणें करून तोंडाची वाफ वाटेल तेवढी दवडावी. १ व ६ म्हणजे ग. जनरलचा पगार आणि बादशहाला द्यावयाचा खर्च यांवर चर्चाहि करण्यास परवानगी नाहीं. एकंदर बजेटापैकीं, शेंकडा ८० टक्के बजेट असें आहे कीं, त्यावर मतेंहि देतां येत नाहींत.

ग. जनरलवर विशिष्ट गोष्टींची जबाबदारी टाकली म्हणजे त्याच्या खर्चाचीहि तरतूद करून द्यावयास हवी. निर्बंध खर्चाची सोय

झाल्याखेरीज कोणता अधिकारी कार्याची जबाबदारी घेईल असें ब्रि. मुत्सद्दी विचारतात. मंत्र्यांच्या पगाराबद्दल मतें देण्याचा हक्क नष्ट करून एक गोष्ट साधण्यांत आली आहे. त्याच्या कार्याबद्दल नापसंती दर्शवावयाची असली म्हणजे त्याला १ रुपया पगार देण्याचा ठराव आणीत असत. पण यापुढें मंत्र्यांना ती धास्ती वाटण्याचें कारण नाहीं. त्यांच्यावर निंदाव्यंजक ठराव येईल पण तो सरळ येईल. पगारकपातीच्या रूपानें येणार नाहीं. इतर वसाहतींत मंत्र्याचा पगार असा राखीव ठेवला नाहीं.

८० टक्के बजेटांतील रकमांवर मतेंच देण्याचा अधिकार नसल्यामुळें अमुक एक बजेट पास केलें अगर अमुक फेटाळलें याचा अर्थ २० टक्क्यांमध्यें उलथापालथ केली एवढाच होतो. या २० टक्क्यांपैकीं कांहीं रकमा फेटाळल्या, व त्या गव्हर्नर जनरलनें आपल्या जबाबदारीच्या आड येतात असें म्हटलें म्हणजे तो पुनः त्या कायम करूं शकतो.

बजेट रकमांबद्दल थोडासा आणखी खुलासा होणें जरूर आहे.ग. जनरलचा पगार, बादशहांचा संस्थानविषयक कारभारासंबंधीं खर्च व इतर खास जबाबदारीच्या बाबी सोडल्यास बाकीच्या मागण्यांपैकीं कोणतीहि मागणी नाकारतां येते किंवा तींत अमुक कपात करावी असें सुचवितां येतें. जर एखादी मागणी खालच्या गृहानें संबंधची सबंध फेटाळली तर ती ग. जनरलच्या खास परवानगीशिवाय कौन्सिल ऑफ स्टेटकडे पाठवितां येत नाहीं. पण एखाद्या मागणींतील कांहीं रक्कम कापली असली, तर त्या कापलेल्या रकमेपुरती कौन्सिल ऑफ स्टेटकडे मागणी करतां येते. पण कोण-

त्याहि मागणीकरतां कौन्सिल ऑफ स्टेटकडे गेलें तरी मूळच्या रकमेपेक्षां अधिक मागणी करतां येत नाहीं.

कोणत्याहि मागणीबदल दोन गृहांमध्यें जर मतभेद झाला तर ग. जनरलनें दोन्ही गृहांची संयुक्त बैठक बोलवावी व त्यांत जें बहुमतानें ठरेल तो दोन्ही गृहांचा मिळून निर्णय मानण्यांत यावा असें म्हटलें आहे.

हा बहुमतानें झालेला ठराव मूळ मागणीला अनुसरून असला तर ठीकच. पण तो ठराव पूर्ण प्रतिकूल असला किंवा त्यांत कांहीं रक्कम कापली असली तर गव्हर्नर जनरल आपल्यावर ज्या खास जबाबदाऱ्या टाकल्या आहेत त्याला ही रक्कमकपात अगर संपूर्ण नाकारणी बाधक होणार आहे असें प्रमाणपत्रकाद्वारें (authentication) निवेदन करून त्या त्या रकमा अंदाजपत्रकांत घालील. अर्थात् ती कपात अगर नाकारणी खरोखरच बाधक व्हावयास पाहिजे हें सांगणें नको. नंतर हें गव्हर्नर जनरलकडून आलेलें अंदाजपत्रक फक्त दोन्ही गृहांसमोर मांडलें म्हणजे झालें. त्यावर चर्चेला किंवा मतदानाला परवानगी नाहीं.

ही अंदाजपत्रक सादर करण्याची रीत जरा नवी आहे. त्यांत लक्षांत ठेवण्यासारखे मुद्दे खालील आहेतः—

(१) गव्हर्नर जनरलवर खास जबाबदारीचे म्हणून जे विषय निर्दिष्ट केले आहेत त्यांवर मतें देण्यास परवानगी नाहीं. पण त्यांवर चर्चा करतां येते.

(२) गव्हर्नर जनरलचा पगार वगैरे आणि बादशहाकडे सोपविलेली संस्थानविषयक देखरेखीचा खर्च या दोन बाबींवर चर्चा करतां येत नाहीं.

(३) हे दोन विषय शेकडा ८० टक्के बजेट व्यापून टाकतात.

(४) कोणतीहि खर्चाची मागणी गव्हर्नर जनरलच्या शिफारसी-शिवाय दुसऱ्या कोणालाही मांडतां येत नाहीं.

खासगी व्यक्तींना कर बसविण्याची बिलें आणूं देणें असंमत आहे व तें योग्य आहे.

(५) २० टक्क्यांमध्यें ज्या मागण्या आहेत, त्याहि बाबतींत सभासदांना स्वातंत्र्य आहे असें समजण्याचें कारण नाहीं.

(६) या २० टक्क्यांपैकीं एखादी मागणी असेंब्लीनें नामंजूर केली किंवा तींत कपात केली तर गव्हर्नर जनरलच्या सांगण्या-प्रमाणें ती वरिष्ठ कायदेमंडळापुढें मांडतां येते. या दोहोंत फरक आहे तो असा:—एखाद्या मागणींत कपात केली असली तर कापलेली रक्कम कौन्सिल ऑफ स्टेटकडे मागतां येते. पण एखादी मागणी संबंधची सबंध फेटाळली असली तर ती दोन्ही गृहांच्या जोडबैठकी-पुढें मांडावी लागते. अर्थात् या सर्व क्रियांमध्यें गव्हर्नर जनरलचा हात सारखा फिरत असतो. त्याच्या परवानगीवांचून बजेटचें पानहि हालत नाहीं.

(७) दोन्ही गृहांच्यामध्यें जर एखाद्या मागणीबद्दल मतभेद झाला तर संयुक्त बैठक बोलवावी असें म्हटलें आहे. हे मतभेदाचे प्रसंग दोनच असूं शकतील. असेंब्लीनें कपात केलेली मागणी कौन्सिलनें जर मंजूर केली तर दोन गृहांमध्यें मतभेद झाला असें म्हणून गव्हर्नर जनरल संयुक्त बैठक बोलावील. त्या बैठकीनें मूळची मागणी मंजूर केली तर ठीकच आणि जर कपात केलेली मागणी मंजूर केली तर गव्हर्नर जनरल आपल्यावर सोंपविलेल्या जबाबदारीला व्यत्यय येतो असें म्हणून मूळची बिनकपातीची रक्कम मंजूर करील. आपण

अशी कल्पना करूं कीं, असेंब्लीनें एखाद्या मागणींत कपात केली. कौन्सिलनेंहि तसेंच मत दिलें, तर दोन्ही गृहांत मतभेद झाला असें होत नाहीं. म्हणून संयुक्त बैठक बोलवावी लागत नाहीं. पण असेंब्लीनें मंजूर केलेल्या मागणींत कौन्सिल कपात करूं शकतें व जोडबैठक घ्यावी लागते. संयुक्त बैठक न बोलवितांहि गव्हर्नर जनरल मूळ मागणी मंजूर करील, कपात केलेल्या मागणीबद्दल हें झालें.

(८) आतां सबंध मागणी असेंब्लीनें फेटाळली तर ती कौन्सिलकडे पाठविलीच पाहिजे असें नाहीं. आणि कौन्सिलकडे पाठविली नाहीं म्हणजे दोन गृहांत मतभेद होण्याची शक्यताही निर्माण होत नाहीं. हा मतभेद असल्याशिवाय संयुक्त बैठक बोलावतां येत नाहीं. त्यामुळें एखादी मागणी असेंब्लीनें फेटाळली म्हणजे ती सरळ गव्हर्नर जनरल आपल्या जबावदारीच्या समर्थनाखालीं मंजूर करूं शकेल. कौन्सिलकडे पाठविली तरी त्याचा शेवटीं परिणाम तोच होईल. कौन्सिलनेंहि ती अमान्य केली तर गव्हर्नर जनरल दोन्ही गृहांचें म्हणणें धुडकावून ती मंजूर करील. कौन्सिलनें मान्य केली तर दोन गृहांत मतभेद झाला म्हणून जोडबैठक भरवावी लागेल व तिचा निर्णय अस्तिपक्षी झाला किंवा नास्तिपक्षी झाला तरी गव्हर्नर जनरल आपल्या जबाबदारीच्या नांवाखालीं ती कायम करील.

(९) बजेट हें दोन्ही गृहांपुढें एकदम सादर करावें असें म्हटलें आहे. त्यावर वरील निर्बंध पाळून वक्तृत्वहि करतां येतें. पण जेव्हां मागण्याला मंजुरी घेण्याची वेळ येते तेव्हां वरिष्ठ कौन्सिलला, असेंब्लीच्या अगोदर अगर बरोबर मंजूरीला मागण्या घेतां येत नाहींत. असेंब्लीनें मंजूरी दिलेल्या मागण्या बिनतक्रार कौन्सिलकडे

जातात.पण नामंजूर केलेल्या मागण्या ग. जनरलच्या परवानगी-शिवाय वर जाऊं शकत नाहींत.

( १० ) ग. जनरलनें प्रमाणभूत मानलेल्या खर्चाचा खर्डा दोन्ही गृहांपुढें ठेवावा लागतो. त्यावर मतदान अगर भाषण होत नाहीं.

लोकांवर सोंपविलेल्या मर्यादित खर्चाच्या अधिकारक्षेत्रांतहि ग. जनरल कसा धुमाकूळ घालू शकतो हें यावरून दिसून येतें. जोडबैठकींत साम्राज्यशाहीचें प्रचंड बहुमत होणार असल्यामुळें ग. जनरलवर कटु कर्तव्याचे प्रसंग थोडेच येतील. पुरवणी अंदाज-पत्रकालाहि हेच नियम लागू आहेत.

पैशाच्या पुरवठ्याविषयीं जीं बिलें आणावयाचीं त्यांना ग. जन-रलची शिफारस लागणार आहे. तीं बिलें वरिष्ठ कायदेमंडळांत आणूं नयेत असा प्रतिबंध घातला आहे. एखादा कर बसविणें अगर वाढविणें, कर्ज उभारणें, फेडरल सरकारनें हमी स्वीकारणें, घेतलेल्या किंवा घ्यावयाच्या आर्थिक बोजाबद्दल कायद्यांत दुरुस्ती करणें किंवा एखादा खर्च हा फेडरेशनवर लादलेला खर्च आहे (Charged on the Revenue)असें जाहीर करणें वगैरे गोष्टींना ग. जनरलची शिफारस लागते.*एखादें बिल पास झाल्यास फेडरेशनवर

* खर्चाच्या बाबतींत संयुक्त राज्यघटनेंतील कायदेमंडळाचे हातपाय इतके बांधून टाकल्यामुळें जबाबदारीचें स्वराज्य हें अत्यत संकुचित होतें. या आरोपाला जॉइंट सिलेक्ट कमिटीनें उत्तर दिलें आहे तें असें:–' या आरोपांत अर्थ नाहीं. इंग्लंडमध्यें सुद्धां पुष्कळ खर्चाच्या बाबीवर पार्लमेंटमध्यें मतें घेत नाहींत.' पण हें म्हणणें चूक आहे. कारण इंग्लंडमध्यें कन्सॉलिडेटेड फंड चार्ज म्हणून जो आहे त्यावर मतें देतां येत नाहींत व त्यांत पार्लमेंट कपात करूं शकत नाहीं असें नाहीं. स्वतंत्र इंग्लंड व परतंत्र हिंदुस्थान यांची तुलना कशी होईल ?

खर्चाचा बोजा पडेल असें असल्यास त्या बिलाला ग. जनरलची शिफारस लागेल.

## सर्वसाधारण कार्यपद्धति.

संयुक्त कायदेमंडळाच्या प्रत्येक सभागृहानें आपला कारभार कसा चालवावा व आपल्या कामकाजाची पद्धत कशी असावी ह्यासंबंधीं नियम बनवावेत. प्रत्येक कायद्याच्या कलमाप्रमाणें याहि नियमाला अपवाद आहेतच.

ग. जनरलनें खालील बाबीसंबंधीं जे नियम करावयाचे ते अध्यक्ष व प्रमुख यांच्याशीं चर्चा करून करावेत. अर्थात् अखेरचा शब्द ग. जनरलचाच असेल. त्या बाबी खालील आहेत:—

( १ ) ग. जनरलला त्याच्यावर सोंपविलेल्या कांहीं बाबींबद्दल विवेचक बुद्धि वापरावी लागते अगर वैयक्तिक निर्णय द्यावा लागतो. अशा बाबींबद्दल कायदेमंडळाच्या कामाकाजाची पद्धति काय असावी व तें कोणत्या प्रकारें चालवावें याबद्दल ग. जनरल नियम करूं शकतो.

( २ ) आर्थिक प्रश्नांचा ठराविक वेळेच्या आंत निकाल करणें.

( ३ ) हिंदी संस्थानांबद्दल चर्चा करणें अगर प्रश्न विचारणें याला तो बंदी करूं शकतो. मात्र जर संयुक्त कायदेमंडळाला त्या संस्थानाबद्दल कायदा करण्याचा अधिकार असेल आणि जर ग. जनरलला असें पटलें असेल कीं, त्या संस्थानविषयक बाबींमुळें संयुक्त कायदेमंडळाच्या हिताला अगर ब्रिटिश प्रजाजनाला बाध येत आहे, तर ग. जनरलची संमति घेऊन त्याबद्दल चर्चा करतां येईल किंवा प्रश्न विचारतां येईल.

खालील प्रश्नांची ग. जनरलच्या संमतिशिवाय चर्चा करतां येत नाहीं.

( १ ) बादशहा किंवा ग. जनरल आणि परकें राज्य किंवा संस्थान यांच्यामधील संबंधाविषयीं चर्चा करतां येणार नाहीं किंवा प्रश्न विचारतां येणार नाहीं.

( २ ) सरहद्दीलगतच्या टापूमधील टोळ्यांबद्दल कसलीहि गोष्ट किंवा वगळलेला टापूचा राज्यकारभार याच्याबद्दल वाद-विवाद व प्रश्न यांना बंदी .फक्त टोळयांच्या जमाखर्चाची चर्चा करतां येते.

( ३ ) प्रांतिक कारभाराच्या बाबतींत ग. जनरलनें आपल्या विवेचक बुद्धीनुसार जर एखादा हुकूम बजावला असेल तर त्यावर चर्चा अगर प्रश्न याला बंदी.

( ४ ) संस्थानिक व त्यांच्या कुटुंबांतील एखाद्या व्यक्तीच्या खासगी वर्तनाबद्दल प्रश्न अगर चर्चा करतां येत नाहीं. या बाबी-बद्दल जर ग. जनरलनें केलेला नियम कायदेमंडळाच्या निय-माशीं विसंगत असेल तर ग. जनरलचा नियमच प्रभावी होईल.

संयुक्त कायदेमंडळाच्या दोन गृहांच्या जोडबैठकी व दळणवळण यांच्याबद्दलचे नियम गव्हर्नर जनरलनें त्या गृहांच्या प्रमुखांच्या सल्ल्यानें करावयाचे आहेत. हे नियम वरील बंधनांनीं मर्यादित होतील. पण नवे नियम होईपर्यंत जुने नियम गव्हर्नर जनरलच्या योग्य फेरफारांसह अंमलांत रहातील. जोडबैठकीचा अध्यक्ष वरिष्ठ गृहाचा अध्यक्षच राहील.

अशा प्रकारचे हे नियम आहेत. संस्थानांबद्दल जीं नियंत्रणें घातलीं आहेत तीं अन्याय्य आहेत. संस्थानिकांनीं आपल्या राज्यांत

वाटेल तो धुमाकूळ घालावा. त्याबद्दल संयुक्त कायदेमंडळाला प्रश्नहि विचारतां येऊं नये ही घटना अजब आहे. उलट संस्थानिकांच्या तोंडाला ब्रिटिश हिंदुस्थानची चौकशी करण्यास कुलूप घातलें नाहीं. या अजब घटनेचें समर्थन करतांना बटलरसाहेब पार्लमेंटांत सांगतात, "अहो, आमच्या पार्लमेंटांत काय असे घोटाळे नाहींत ? स्कॉटिश सभासद आमच्यांत बसतात व ते जी माहिती आम्हांला देतात, त्यावर आम्ही मतें देतों. उलट तेहि तसेंच करतात. तेव्हां संस्थानांबद्दल हे घोटाळे असेच राहूं देण्याशिवाय गत्यंतर नाहीं. त्या बाबतींत नियम करूं नका. रूढीनें व परंपरेनें सर्व गोष्टी होऊं द्या." स्कॉटलंडचें उदाहरण हिंदुस्थानांतील संस्थानिकांना बिलकूल लागूं पडत नाहीं. कारण परस्पर परस्परांविषयीं प्रश्न विचारतात व चर्चाहि करतात. येथें तशी सवलत कुठें आहे ?

सर सॅम्युअल होअर यांनींहि गव्हर्नर जनरलला संस्थानिकविषयक चर्चाबंदीची जी सत्ता दिली आहे त्याचें समर्थन केलें. ते म्हणतात, 'संयुक्त राज्यघटनेचा जो मंत्री असेल त्याच्या हातांत कायदा व सुव्यवस्था हें खातें कसें येईल ? तें तर प्रांतिक खातें आहे. तेव्हां प्रांताचीं कायदा व सुव्यवस्था हीं खातीं प्रांताकडे आहेत; आणि संस्थानांतील कायदा व सुव्यवस्था संस्थानाकडे आहेत. तेव्हां या उभय घटकांच्या अंतर्गत व्यवस्थेचे प्रश्न संयुक्त घटनेंत कसें अंतर्भूत करतां येतील ? ब्रिटिश हिंदी प्रजेला संस्थानांत उपद्रव झाला तर तेवढ्यापुरती गव्हर्नर जनरल परवानगी देऊं शकेल.'

कायद्याप्रमाणें सर सॅम्युएल साहेबांचें समर्थन बिनतोड आहे यांत शंका नाहीं. म्हणूनच अशा बेजबाबदार संस्थानांचें व जबाबदार प्रांतांचें संयुक्तीकरण करूं नये असा आक्रोश केला जात आहे.

संयुक्त कायदेमंडळाचा कारभार इंग्रजींत चालावयाचा आहे. पण जर एखाद्याला मुळींच इंग्रजी येत नसेल अगर चांगलें येत नसेल तर त्याला दुसऱ्या भाषेंत भाषणें करतां येतील.

फेडरल कोर्ट किंवा हायकोर्टाच्या न्यायाधिशाचें काम करीत असतां घडलेल्या न्यायाधिशांच्या वर्तनाबद्दल कायदेमंडळांत चर्चा करण्यास परवानगी नाहीं. त्याचप्रमाणें ग. जनरलच्या शांतता-संरक्षणाच्या किंवा शांततेला धोका आणणाऱ्या प्रतिबंधाच्या खास जबाबदारीला विघातक असें एकादें बिल अगर दुरुस्ती आली असेल अगर येण्याचा संभव असेल तर ग. जनरल त्यावर चर्चा होऊं देणार नाहीं.

कायदेमंडळाच्या कारभाराबाबत जर कांहीं अव्यवस्थितपणा झाला असेल तर त्याबद्दल कोर्टांत दाद मागतां यावयाची नाहीं. तसेंच नियमपालनाची किंवा व्यवस्था ठेवण्याची जबाबदारी ज्या अधिकाऱ्यावर किंवा असेंब्लीच्या सभासदावर टाकली असेल त्याच्यावरसुद्धां कायदेशीर इलाज करतां येणार नाहीं.

कायदेमंडळाचीं कामें दोन प्रकारांचीं असतात. एक अंतर्गत व दुसरें बहिर्गत. अंतर्गत कामें हीं कायदेमंडळाच्या नियमाप्रमाणें व्हावयाचीं असतात. पण बहिर्गत कामें ही घटनाकायद्याप्रमाणें चालावयाचीं आहेत. तेव्हां अंतर्गत कामांमध्यें कांहीं गैरशिस्त प्रकार अथवा कांहीं चुक झाल्यास तें प्रकरण कोर्टाकडे जाऊं नये किंवा त्यामुळें सारें काम बेकायदा ठरूं नये असें सांगितलें आहे. पण ग. जनरलनें बोलवावयाची बैठक, जर सभासदांनीं किंवा मंत्र्यांनीं बोलावली तर ती बैठक बेकायदा ठरते व झालेलें कामहि निकालांत निघतें. कार्यपद्धतींत कांहीं गैरशिस्त प्रकार घडतात ते असेः--एखादी सभा

भलत्याच ठिकाणीं भरणें, अनधिकारी अध्यक्ष होणें, वादविवादांतील नियंत्रणें सक्तीनें पाळलीं न जाणें, किंवा ज्याला सभासदत्वाचे हक्क असून हजर रहाण्याचे किंवा मत देण्याचे अधिकार नाहींत अशा गृहस्थानें मत देणें. हे गैरशिस्त प्रकार आहेत पण त्यामुळें झालेलें काम बेकायदा ठरत नाहीं. अॅ० जनरल किंवा आर्थिक सल्लागार, अध्यक्ष किंवा प्रमुख यांनीं मतें दिलीं व एखादें बिल पास झालें तर काय ? या कलमामध्यें असे गैरशिस्त प्रकार झाले असले तरी तें बिल पास झालें असें मानण्यास सांगितलें आहे, निदान कलमाचा तसा अर्थ होतो.

## ग. जनरलचे कायदे करण्याविषयींचे अधिकार.

ग. जनरलवर खास जबाबदाऱ्या टाकल्यानंतर त्याला जादा अधिकार दिलेच पाहिजेत. या अधिकारांशिवाय तो आपल्या जबाबदाऱ्या कशा पार पाडणार ? त्याकरतां त्याला सुप्रसिद्ध आर्डिनन्सेस काढण्याची व ग. जनरलचे अॅक्टस करण्याची परवानगी दिली आहे. हे ऑर्डिनन्सेस् केव्हां काढतां येतात, व गव्हर्नर जनरलचे कायदे केव्हां करतां येतात तें आपण पाहूं.

### पहिला प्रकार

ज्या वेळीं कायदेमंडळ बसलेलें नसेल व ग. जनरलला तावडतोब उपाय योजणें जरूर आहे असें वाटेल तेव्हां त्यानें परिस्थित्यनुरूप ऑर्डिनन्सेस काढावे. हे ऑर्डिनन्सेस काढतांना त्यानें वैयक्तिक निर्णय घ्यावयाचा आहे. हा निर्णय कोणत्या आधारावर घ्यावयाचा ?

जीं बिलें कायदेमंडळांत येऊं देण्याकरतां गव्हर्नर जनरलची आगाऊ संमति घेणें अवश्य असतें, अशा धर्तीवर जर एखादा

ऑर्डिनन्स काढणें गव्हर्नर जनरलला अवश्य वाटलें तर त्यानें मंत्रिमंडळाचा सल्ला घेऊन व तो पटल्यास मान्य करून अगर न पटल्यास अमान्य करून हा ऑर्डिनन्स काढावा. हा वटहुकूम जारी करण्यापूर्वी त्याला राजाकडून संमति मिळवावी लागेल. ही संमति मिळवण्याची जरूरी काय ? कारण या ऑर्डिनन्सचें विशिष्ट बिलाशीं असणारें साम्य. जीं बिलें राजानें आपल्या मर्जीनुरूप मान्य करावयाचीं असतात, त्या बिलांतील आशयाप्रमाणें ऑर्डिनन्समध्यें आशय असेल तर त्याला राजाची मंजुरी लागेल.

गव्हर्नर जनरलच्या आगाऊ परवानगीशिवाय जीं बिलें कायदेमंडळापुढें मांडतां येणार नाहींत त्यांची यादी फार मोठी होईल. त्यांचा नामनिर्देश जागोजागीं केला आहे. १०८ कलमांत त्यांतील कांहीं बाबी निवेदन केल्या आहेत.

ग. जनरल जो ऑर्डिनन्स काढणार असेल, त्याला कायदेमंडळापुढें येणाऱ्या तद्विषयक बिलाइतकाच कायदेशीरपणा आहे हें गृहीत धरलें आहे. या बिलाला परवानगी देतांना ज्याप्रमाणें तो मंत्र्यांचा सल्ला विचारतो, तसा सल्ला हा ऑर्डिनन्स काढतांनाहि त्यानें विचारावा. तो मानणें न मानणें त्याच्या मर्जीवर राहील.

या ऑर्डिनन्सला कायद्याचें स्वरूप देण्याचा प्रयत्न केला असल्यामुळें दुसरें अशाच प्रकारचें बिल त्यानें जसें आवश्यकतेप्रमाणें राजमान्यतेकरतां पाठविलें असतें, तसेंच हा ऑर्डिनन्सहि राजमान्यतेकरतां पाठवावा असें म्हटलें आहे. ही राजमान्यता मिळाल्याशिवाय बिल जारी होत नाहीं. पद्धत तीच, फक्त ऑर्डिनन्स व बिलांत फरक इतकाच कीं, बिल सभासदांपुढें चर्चेला येतें

आणि ऑर्डिनन्स चर्चेला येत नाहीं. तो सभागृहानें पास केला असें समजून त्याची अंमलबजावणी होऊं लागते.

ह्या आर्डिनन्सला थोडीशी मुरड घातली आहे. बैठक चालू नसतांना तो जारी केलेला असतो त्यामुळें ज्या वेळीं कायदेमंडळ भरेल त्या वेळीं तो कायदेमंडळापुढें मांडावयाचा असतो आणि कायदेमंडळ भरल्यापासून सहा आठवडयांत तो रद्द ठरतो; किंवा सहा आठवडयांपूर्वी दोन्ही गृहांनीं तो फेटाळून लावला तरी तो रद्द ठरतो. या ऑर्डिनन्सचें जीवित बैठकीपासून सहा आठवडे-पर्यंत असतें. पण बैठक केव्हां भरवावी हें ग. जनरल स्वतःच ठरवीत असल्यामुळें असे आर्डिनन्सेस् जास्तींत जास्त १ वर्ष व सहा आठवडेपर्यंत राहूं शकतील. कारण एक वर्षपर्यंत बैठक भरवली नाहीं तरी चालूं शकतें. रिक्विझिशन-सभेची अमुक इतक्या सभा-सदांनीं केलेली मागणी—देण्याला कायद्यांत परवानगीच नाहीं. ज्याप्रमाणें राजा या नव्या कायद्यान्वयें एखादा कायदा अंमलांत आणण्याचें नाकारूं शकतो तसें तो ह्या ऑर्डिनन्सला परवानगी नाकारूं शकतो किंवा गव्हर्नर वाटेल तेव्हां तो परत घेऊं शकतो. हा ऑर्डिनन्स जर कायदेमंडळाच्या कायदे करण्याच्या अधिकाराचें अतिक्रमण करणारा असेल तर आपोआप रद्द ठरतो.

ऑर्डिनन्सचा हा पहिला प्रकार झाला. हा दुसऱ्याच्या अधि-कारांत शिरून गोंधळ घालणारा प्रकार आहे.

जॉइंट सिलेक्ट कमिटीनें ह्या जातीचा वटहुकूम ग. जनरलला मंत्रिमंडळाच्या सल्याप्रमाणें काढावा लागेल असें म्हटलें आहे. मंत्र्यांना स्वतः वटहुकूम काढण्याची सत्ता नाहीं. पण त्यांना जर विशिष्ट परिस्थितींत वटहुकूम काढण्याची जरूरी वाटली तर त्यांच्या

सोईकरतां ग. जनरलला हे वटहुकूम काढण्याची सत्ता दिली आहे. हे वटहुकूम मंत्र्यांच्या अधिकारक्षेत्रांतील बाबीबद्दल आहेत. पण मंत्रिमंडळाच्या सोईकरतां केलेल्या या तजवीजींचा दुरुपयोग करण्याची शक्यता त्यांत नाहीं असें नाहीं. मंत्रिमंडळाच्या क्षेत्रांत ग. जनरल वटहुकूम काढूं शकेल, मंत्र्यांनीं अशा हुकुमाची जरूरी नाहीं असें म्हटलें तरी तो ते लोकांवर लादूं शकेल आणि ६ आठवड्यांची मुदत १ वर्षापर्यंत लाववूं शकेल.

## दुसरा प्रकार

ग. जनरलवर या कायद्यानें ज्या खास जबाबदाऱ्या टाकल्या आहेत, त्या पार पाडण्याकरतां त्याला विवेचक बुद्धीनें अगर वैयक्तिक निर्णयानें कामें करणें भाग पडेल. अशा कामांकरतां जर एखादी तांतडीची योजना करण्यासारखी परिस्थिति निर्माण झाली आहे असें त्याला वाटलें तर त्याला ऑर्डिनन्स काढतां येतो. ह्या ऑर्डिनन्सचें जीवित जातींस्त जास्त सहा महिने असतें. पण त्याला पुनः जीवदान देऊन तें जीवित आणखी सहा महिने पर्यंत नव्या ऑर्डिनन्सनें वाढवितां येतें. हा ऑर्डिनन्स कायदेमंडळापुढें ठेवण्याची जरूरी नाहीं. पण त्याचा कायदेमंडळाच्या कायद्याइतकाच प्रभाव व परिणामक्षमता आहे. त्यामुळें अशा वटहुकुमांना इतर कायद्यांप्रमाणें राजमान्यता घ्यावी लागते. तो जर वर्षभर लांबवावयाचा असेल तर पहिल्या सहामाहीनंतर तो तात्काळ पार्लमेंटपुढें ठेवण्याकरतां भारतमंत्र्याकडे पाठवावा लागतो. ग. जनरलला तो केव्हांहि परत घेण्यास परवानगी आहे. हा ऑर्डिनन्स काढतांना त्यानें मंत्र्यांना विचारण्याची जरूरी नाहीं.

या वटहुकुमांत फेडरल कायदेमंडळाच्या कक्षेंत न येणाऱ्या कांहीं गोष्टी असतील तर तो रद्द ठरेल. स्वतःच्या क्षेत्रांत व मंत्र्याच्या क्षेत्रांत काय काय अधिकार दिले आहेत याचे दोन प्रकार आपण पाहिले. आतां तिसरा प्रकार आपण पाहूं.

### तिसरा प्रकार

या तिसऱ्या प्रकाराला ग. जनरलचे कायदे असें नांव आहे. ग. जनरलला जर आपल्यावर सोंपविलेला कारभार समाधान-कारक रीतीनें पार पाडावयास एखादा कायदा हातांत असावा असें वाटलें तर त्यानें दोन्ही कायदेमंडळांला तसा संदेश पाठवावा आणि अमुक परिस्थितीमुळें आपल्याला हा कायदा करणें आवश्यक आहे असें कळवावें. ह्या संदेशांत त्यानें (अ) ज्या बिलामध्यें अवश्य असणारीं सर्व कलमें अंतर्भूत केलीं असतील असें बिल ग. जनरलचा कायदा म्हणून आपण अंमलांत आणीत आहों असें सांगावें किंवा (ब) त्या कायद्याचा मसुदा पाठवावा.

त्यानें जर कायदाच करून टाकला तर कायदेमंडळाचें तोंड बंद होतें. पण त्यानें जर मसुदा पाठविला असला तर त्याला एक महिना थांबावयाचें असतें. या एक महिन्यांत त्याला कायद्याला दुरुस्त्या जोडतां येतात आणि कायदेमंडळांना त्यावर भाषणें करतां येतात. ग. जनरलनें कायदेमंडळाच्या भाषणाचा विचार करावा. महिना उलटून गेल्यार त्या खर्डयाला कायद्याचें स्वरूप येतें असें म्हटलें आहे. हा ग. जनरलचा कायदा भारत-मंत्र्याकडे पाठवावयाचा असतो व त्यानें तो पार्लमेंटपुढें ठेवाव-याचा असतो. ह्या कायद्यांतील कलमांची अंमलबजावणी त्यानें विवेचक बुद्धीनें करावयाची आहे.

ऑर्डिनन्सचे दोन प्रकार व ग. जनरलच्या कायद्याचे दोन प्रकार आपण पाहिले. पहिल्या प्रकारचा ऑर्डिनन्स कायदेमंडळाची बैठक भरल्यापासून सहा आठवडेच राहूं शकतो, दुसऱ्या प्रकारचा जास्तींत जास्त वर्षभर राहूं शकतो. पहिला ऑर्डिनन्स हा ग. जनरलच्या खास जबाबदारीच्या बाहेरचा असल्यामुळें तो अल्पायु आहे. दुसरा त्याच्या खास जबाबदारीच्या बाबतींतला असल्यामुळें तो वर्षभर राहू शकतो.ऑर्डिनन्स व ग.जनरलचे कायदे यांत फरक आहे तो असा. गव्हर्नर जनरलचे कायदे कायमचे डोक्यावर बसतात पण ऑर्डिनन्सेस वर्षावर राहूं शकत नाहींत. हा कालाचा फरक सोडल्यास दोहोंमध्यें परिणामाच्या दृष्टीनें कांहींच अंतर नाहीं.

गव्हर्नर जनरलच्या कायद्यांत दोन प्रकार आहेत. पहिल्या प्रकारांत हा कायदा ठाकठीक होऊन व नटूनसजून बाहेर येतो. कारखान्यांतून एखादा माल पेटींत बंद करून वर लेबल वगैरे चिकटवून गिऱ्हाइकांच्या हातांत देण्यालायक स्थितींत जसा यावा तसा पहिल्या प्रकारचा कायदा आहे. दुसऱ्या प्रकारांत मालाला पूर्णावस्था आलेली नसते. तो गिऱ्हाइकांच्या पदरांत टाकावयाचाच असतो;पण त्याला मालाविषयीं पसंतीनापसंती बोलून दाखवायला सवड दिलेली असते. हें झाल्यावर मग तो कायदा तयार होतो.

ज्या वेळीं या गव्हर्नर जनरलच्या कायद्यांची चर्चा गोलमेज परिषदेंत झाली, त्या वेळीं गव्हर्नर जनरलच्या कायद्यांचा परिणाम काय होईल याकडे लक्ष वेधण्यांत आलें. गव्हर्नर जनरलनें महिन्याच्या आंत आपला मसुदा कायदेमंडळाकडे पाठविला व तो कायदेमंडळानें फेटाळला तरीही त्यांना न जुमानतां जर गव्हर्नर जनरलनें कायदा केला तर मंत्रिमंडळाला राजीनामा द्यावा लागेल; निदान

स्वाभिमानी मंत्रिमंडळ असा अपमान सहन करणार नाहीं असें सांगण्यांत आलें. पण हें संकट जमेस धरूनच वरील मसुद्यांचें कलम जोडण्यांत आलें आहे.

या वटहुकुमासंबंधींचा तक्ता एका लेखकानें तयार केला आहे तो येथें देऊं.




## घटना मोडली तर पुढें काय ?

घटनेप्रमाणें राज्यकारभार चालणें अशक्य आहे असें जर परिस्थितीवरून गव्हर्नर जनरलला वाटलें तर तो एक जाहीरनामा काढील. त्या जाहीरनाम्यांत ज्या बाबींचा उल्लेख केला असेल त्या बाबींची आपण स्वतःच्या विवेचक बुद्धीनें अंमलबजावणी करूं असें तो म्हणेल. ही अंमलबजावणी करण्यास त्याला सत्ता लागते.संयुक्त कायदेमंडळाला जी सत्ता आहे, ती सत्ता पूर्णतः अगर अंशतः तो आपल्या हातांत घेईल. याच जाहीरनाम्यांत घटनेचीं अमुक कलमें अगर सबंधची सबंध घटना आपण तात्पुरती रद्द (suspend) केली आहे असें तो पुकारील. त्याचप्रमाणें ह्या जाहीरनाम्याच्या

अंमलबजावणीकरतां जरूर त्या योजनाहि तो करूं शकेल. फक्त त्याला फेडरल कोर्टाच्या सत्तेंत हात घालण्याची परवानगी नाहीं.

घटनाभंगामुळें काढावा लागणारा जाहीरनामा त्याला वाटेल तेव्हां परत घेतां येतो किंवा त्यांत बदल करतां येतो. हा जाहीर-नामा भारतमंत्र्याकडे पाठवावा लागतो व तो पार्लमेंटच्या दोन्ही गृहांपुढें मांडावा लागतो. या जाहीरनाम्याची प्राथमिक मुदत सहा महिने असते. जर ही मुदत वाढवली नाहीं तर जाहीरनामा रद्द ठरतो. पण जर हा जाहीरनामा अधिक काळपर्यंत लांबवावयाचा असला तर पार्लमेंटला ठराव करावा लागतो. या ठरावान्वयें तो बारा महिने अंमलांत राहूं शकतो. ज्या ज्या वेळीं ही मुदत वाढवावयाची असते, त्या त्या वेळीं पार्लमेंटला असा ठराव करावा लागेल. पण अनंत कालपर्यंत ग. जनरलला पार्लमेंटच्या सहाय्यानें राज्य करतां यावयाचें नाहीं.

ह्या जाहीरनाम्यानें तीन वर्षेपर्यंत जास्तींत जास्त राज्य करतां येतें. त्यानंतर पुनः संयुक्त घटनेच्या कायद्याप्रमाणें कारभार चाल-वावा लागेल. या तीन वर्षांत पार्लमेंटनें जर कायद्यांत कांहीं दुरुस्त्या केल्या तर त्या अन्वयें राज्य चालेल. पण घटनेप्रमाणें राज्य करणें अशक्य होतें म्हणून तर जाहीरनामा काढावा लागतो.*

* सर सॅम्युएल होअर म्हणालेः—हिंदुस्थानच्या दृष्टीनें तीन वर्षांवर हा सुलतानशाही चालू देणें अशक्य आहे. संस्थानाच्या दृष्टीनेंहि तसें करणें गैर आहे. कारण त्यांनीं फेडरेशन ही कायम टिकणारी संस्था आहे म्हणून त्या क्षेत्रांत कांहीं सवलती दिल्या आहेत ( made certain concessions in federal field ) तेव्हां ही संस्था संकटाकरतां मोडणें व त्यांनीं दिलेल्या सत्तेचा फेडरल सरकारच्या बाहेर उपयोग करणें रास्त नाहीं. तेव्हां तीन

[ पुढें पहा.

तेव्हां तीन वर्षांत ग. जनरलनें धुमाकूळ घालून जर प्रगतिपर राजकारण चालविणाऱ्या पक्षाचें कंबरडें मोडलें असेल व त्यांना वठणीवर आणलें असेल तर ते बिचारे शरण येऊन ग. जनरलची सत्ता मानतील. पण दडपशाहीचा विजय होत नसतो. तीन वर्षांनंतर सुरळीत राज्यकारभार चालावयाचा असेल तर पार्लमेंटाला कायद्यांत दुरुस्ती करावी लागेल. ही दुरुस्ती समाधानकारक झाली तरच राज्य चालूं शकेल. नाहींतर पुनः घटनेचा गाडा रुतून पडेल. ही दुरुस्ती करतांना संस्थानिकांच्या मान्यतापत्रकाला बाधक होईल असें कांहीं करावयाचें नाहीं.

या जाहीरनाम्यानें चालविलेल्या राज्यकारभाराच्या मुदतींत ग. जनरलनें जर कांहीं कायदे केले असतील तर ते जाहीरनामा रद्द झाल्यावर दोन वर्षे अंमलांत राहतील. ते कायदे कायदेमंडळाला रद्द करतां येतात, अगर त्यांत सुधारणा करतां येते. कायदेमंडळानें ते रद्द केले नाहींत तरच ते दोन वर्षें चालू राहातात.

नवा कायदा सुधारून घ्यावयाचा असेल तर ग. जनरलला

---

वर्षांनंतर हिंदुस्थानांत राज्यच उरलें नाहीं, असें होऊं नये. तीन वर्षांनंतर आपण पुनः कायद्याकडे परत येऊं व ४५ कलमाशिवाय (जाहीरनाम्यानें राज्य) बाकीच्या कलमांप्रमाणें राज्य चालवूं. पार्लमेंटनें जुनीच घटना नांदवावयाची कां दुरुस्तीचा कायदा करावयाचा हें ठरवावें. 'At the end of the three years it is not as if we are left with no Government of India at all, we then revert to the Provisions of this Act except S. 45 and Parliament would have to choose between reverting to the Provisions of this Act or Passing an Amending Act.'

(Sir Samuel Hoare -Par. Debates.)

तीन वर्षें राज्य करूं देण्याचाच एक मार्ग शिल्लक आहे. मॉंटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणांमध्यें दिलेली दहा वर्षांनीं राज्यकारभाराचें निरीक्षण करणारीं वचनें नव्या कायद्यांत नाहींत. तेव्हां घटना सुधारावयाची असेल तर ग. जनरलला राज्यकारभार हातांत घ्यावयास भाग पाडणें जरूर होऊन बसेल.

१९३७ सालीं कॉंग्रेस व म. गांधी यांनीं जी आश्वासनाची मागणी केली होती, ती न दिल्यामुळें पेंचप्रसंग निर्माण झाला होता व गव्हर्नरला ९३ कलमाचा उपयोग करण्याची वेळ आली होती. तसे प्रसंग फेडरेशनमध्यें येणार आहेत. अशा प्रसंगीं ग. जनरलला ४५ कलमाचा उपयोग करणें आवश्यक होऊन बसेल. तेव्हां ४५ कलम हें दिसावयास जरी अरेरावीचें दिसतें तरी शेवटीं तें उपकारकच ठरणार आहे. आमच्या दृष्टीनें हा विचार झाला. पण कायदे करणारांनीं हिंदुस्थानच्या स्वातंत्र्योन्मुख जनतेशीं वागतांना कांहीं तरी विचार करावयास पाहिजे होता. क्रमाक्रमानें त्यांनीं नव्या राज्यघटनेला ग्रासून कसें टाकलें आहे हें पहाण्यासारखें आहे. प्रथम सहा आठवडे टिकणारे मंत्रिमंडळाच्या सत्तेंत ढवळाढवळ करणारे ऑर्डिनन्सेस काढण्याची सत्ता दिली, नंतर सहा महिन्यांपासून १ वर्षापर्यंत ग. जनरलच्या खास जबाबदारींत ऑर्डिनन्स काढण्याची परवानगी दिली; नंतर ग. जनरलला स्वतःचे कायदे करण्याची मुखत्यारी दिली; त्यानंतर पार्लमेंटच्या परवानगीनें तीन वर्षे ग. जनरलला सर्व अगर कांहीं राज्यकारभार हातीं घेण्याचा अधिकार दिला. असले बेकायदेशीर कायदे हिंदुस्थानशिवाय इतरत्र क्वचितच सांपडतील. याला जबाबदारीचें स्वराज्य म्हणावयाच्या ऐवजीं पूर्ण बेजबाबदारीचें स्वराज्य म्हणणें

जास्त सयुक्तिक ठरेल. ज्या देशांत जबाबदारीचें राज्य असतें तेथें राष्ट्राच्या भवितव्याला मंत्रिमंडळ हें जबाबदार असतें. हिंदुस्थानचें मंत्रिमंडळ म्हणजे ब्रिटिश मुत्सद्यांनीं तयार केलेला नकली शोभेचा दागिना आहे. एकदां निवडणुका झाल्या आणि मतदारांनीं प्रतिनिधि निवडून दिले म्हणजे पुढची सर्व व्यवस्था या मंत्रिमंडळाकडे जावयास पाहिजे. हिंदुस्थानांत उलटा प्रकार आहे. ज्या ग. जनरलचा व हिंदी मतदारांचा कांहीं संबंध नाहीं, तोच कायद्यानें सर्व सत्ताधीश करून ठेवला आहे.

गव्हर्नर-जनरलच्या पेंचप्रसंगविषयक जाहीरनाम्याला हें अखेरचें स्वरूप देण्यास कोणकोणत्या व्यक्ती व संस्था यांनीं आपली पुण्याई खर्च केली त्याची थोडी हकीकत शेवटीं निवेदन करणें जरूर आहे. गव्हर्नर जनरलनें जाहीरनामा काढल्यावर तो सहा महिने अंमलांत रहावा व पार्लमेंटनें फार तर ती मुदत आणखी सहा महिन्यांनीं वाढवावी असें सर सॅम्युअल होअर यांचें म्हणणें होतें. पण सर ऑस्टिन चेंबरलेननें ती मुदत वर्षावर नेली. त्यांना सहा महिने फार लवकर संपतात असें वाटलें.

तीन वर्षे जाहीरनाम्यानें राज्य चालविल्यावर पुनः संयुक्त घटनेप्रमाणें राज्य चालवावें; मात्र पार्लमेंटानें त्यांत जरूर तर दुरुस्त्या कराव्या असें म्हटलें आहे. याचा अर्थ काय असा पार्लमेंटांत प्रश्न निघाला असतां सर डोनाल्ड सोमरवेल म्हणाले, 'सर हेन्री पेजक्रॉफ्ट ( हे हिंदुस्थानला हक्क देण्याला कट्टे विरोधक होते ) यांनीं तीन वर्षांनंतर तीच परिस्थिति राहील अशी जी भीति व्यक्त केली आहे ती निरर्थक आहे. कारण तीन वर्षांनंतर पार्लमेंट अशी कायद्यांत दुरुस्ती करील कीं ज्यामुळें राज्य बिनधोक चालूं शकेल.'

याचा अर्थ फार भयंकर आहे. तीन वर्षांनंतर पार्लमेंट दिलेली पै-पावआणा सत्ता काढून घेईल, किंवा तिच्यावर अधिक बंधनें घालूं शकेल. त्या वेळीं जशा प्रकारची स्थिति असेल तशा प्रकारें पार्लमेंटांत दुरुस्तीबिल येईल. सर सॅम्युएल होअर म्हणाले, 'आपण त्या वेळीं फक्त एककलमी बिल आणूं व त्याची एका दिवसांत तीनहि वाचनें करूं.' याचा अर्थ दिलेली सत्ता काढून घेऊं एवढाच होतो. पण जर चळवळीचा जोर वाढला तर सर सॅम्युअल होअर किंवा पेजक्रॉफ्ट किंवा चर्चिल यांचीं सारीं मनोराज्यें धुळीस मिळतील आणि त्यांच्या किंवा त्यांच्या सहकाऱ्यांच्या हातांना निराळींच बिलें करावीं लागतील.

पण ब्रिटिश हिंदुस्थान व पार्लमेंट यांच्या ओढाताणींत आपलें काय होणार अशी संस्थानिकांना भीति वाटली. ते म्हणाले, 'आम्ही फेडरेशनमध्यें जे आलों तें हिंदुस्थानला जबाबदारीचें स्वराज्य मिळणार म्हणून आलों. या जबाबदारीच्या राज्याचा कांहीं भाग आम्हाला उपलब्ध होईल अशी आमची कल्पना. पण तुमच्या फेडरेशनचा शेवट जर ग. जनरलच्या हातीं सत्ता जाण्यांत होत असेल तर आमचें काय? आम्ही आमच्या सत्तेपैकीं, कांहीं भाग फेडरेशनला म्हणजे लोकसत्तात्मक जबाबदार राज्यपद्धतीला देऊन टाकावा आणि ग. जनरलनें हाहि भाग स्वतःच उपभोगावा यांत आमची फसवणूक होणार आहे. तेव्हां तीन वर्षांनंतर जेव्हां कायद्यांत दुरुस्ती होईल तेव्हां आम्हालाहि फेरविचाराकरतां सवड मिळावी. वर्षानुवर्षे जाहीरनाम्यानें राज्य चालविणें म्हणजे मामुली राज्यकारभार करणें नव्हे. तीन वर्षें फार तर ग. जनरल जाहीरनाम्यानें राज्य चालवील. त्यानंतर त्याला कदाचित् पार्लमेंट तसेंच

राज्य चालविण्याची बिनमुदत सत्ता देईल. पण या ओढाताणींत आमचा जीव गुदमरेल, हुकुमशाहीचा राज्यकारभार हा मामुली राज्यकारभार होणार असेल तर आमच्या मानेभोवतीं मान्यता-पत्रकाचें दावें कां ?'' संस्थानिकांची ही तक्रार न्याय्य होती. फेडरेशनचा पाया उखडून टाकणारी दुरुस्ती जर कायद्यांत केली गेली तर संस्थानिक व ब्रिटिश सरकार यांच्यांतील करार संपणें अवश्य आहे. अखेरीस होयनाहीं करतां संस्थानिकांना त्या परिस्थितींत हा संबंध टिकवावा कां नाहीं याचा विचार करण्यास सवड दिली आहे. तीन वर्षेपर्यंत ग. जनरलनें जाहीरनाम्यानें राज्य चालविल्यावर जर देशांतील वातावरण निवळलें तर मामुली राज्यकारभार सुरू होईल व संस्थानिक फेडरेशनमध्यें राहतील. पण जर या मुदतीनंतर वातावरण अधिक गढूळ झालें व फेडरेशनमध्यें पार्लमेंटानें मूलभूत फरक केलें तर संस्थानिक फेडरेशनमधून आपलें अंग काढून घेऊं शकतील.

पार्लमेंटच्या कायदादुरुस्तीचे दोन पर्याय संभवूं शकतील. एक तर ती दुरुस्ती जास्त प्रतिगामी होईल किंवा लोकमताच्या दाबामुळें त्यांना अधिक हक्क द्यावे लागतील. पण या दोन पर्यायांपैकीं, कोणताहि पर्याय असला तरी संस्थानिक फेडरेशनमधून फुटूं शकतील. ही सवलत अत्यंत महत्त्वाची आहे व राजकारणाचा अभ्यास करणारांनीं लक्षांत ठेवण्यासारखी आहे. फेडरेशनमधून फुटण्याचा अधिकार या विशिष्ट परिस्थितींत संस्थानिकांना दिला गेला आहे.

# १०

# प्रांतिक राज्यकारभार.

नव्या घटनेनुसार प्रांतिक राज्यकारभार ता. १ एप्रिल १९३७ रोजीं सुरू झाला. काँग्रेसनें आवश्यक आश्वासनांच्या अभावीं जुलैच्या मध्यापर्यंत हा कारभार हातीं घेतला नव्हता. पण जेव्हां राज्यकारभार हातीं घेतला तेव्हां स्पष्ट शब्दांत जरी गव्हर्नरनीं मंत्र्यांच्या कारभारांत ढवळाढवळ न करण्याचीं आश्वासनें दिलीं नव्हतीं, तरी त्यांनीं कारभारांत व्यत्यय आणणार नाहीं, मित्रत्वाचा सल्ला देऊं, असें सांगितलें होतें. मंत्र्यांना राजीनामा देण्यापूर्वी गव्हर्नरचें व आपलें कोणत्या बाबतींत बिनसलें हें जाहीर करण्याची मुभा दिल्यामुळें मंत्री जर राजीनामे देऊन बाहेर येतील तर आपले हात अधिक बळकट करूनच येतील हें सिद्ध झालें. अशा प्रकारें मध्यंतरींचा साडेतीन महिन्यांचा काळ जरी संशयग्रस्त वातावरणांत गेला तरी त्यामुळें प्रांतिक कारभारांत मंत्र्यांचें प्रभुत्व अप्रतिहत रीतीनें संस्थापित झालें.

प्रांताची घटना ही बरीचशी फेडरेशनच्या घटनेवरच आधारलेली आहे, हें घटनेचें पर्यालोचन केलें असतां आढळून येईल. फेडरेशनमध्यें व्यापक क्षेत्र असल्यामुळें ग. जनरलचे अधिकार अधिक व्यापक आहेत. शिवाय फेडरेशनमध्यें मंत्र्यांच्या हातीं प्रांताशीं तुलना करतां फारशी सत्ताहि नाहीं. परराष्ट्रीय राजकारण, सैन्य वगैरे बाबी प्रांतांत नसतात. संस्थानिकांचाहि संबंध

प्रांतिक घटनेशीं येत नाहीं. या बाबी वगळल्या म्हणजे बाकीचा सांगाडा फेडरेशनशीं बराचसा जमणारा आहे असें दिसून येईल. गव्हर्नर जनरल व गव्हर्नर यांचे पगार, त्यांच्यावरील खास जबाबदाऱ्या, त्यांच्या विवेचक बुद्धीचे व स्वतः निर्णय देण्याचे प्रकार, ऑर्डिनन्स व स्वतःचे कायदे करण्याचे अधिकार, राज्यघटना मोडली असतां योजावयाचे उपाय यांत तर तंतोतंत साम्य आढळतें. मंत्रिमंडळाची नेमणूक, कायदेमंडळांचें आवाहन व विसर्जन, कायद्यांना होकार किंवा नकार देणें, स्वतःवर सोंपविलेल्या जबाबदारीची आर्थिक दृष्टया तरतूद करून घेणें, कायदेमंडळाच्या कारभाराचे नियम करणें वगैरे बाबतींत प्रांतिक व संयुक्त राज्यघटना यांत साम्य आहे. सभासदांच्या हक्काबद्दल, पगाराबद्दल, सभासदत्व रद्द होण्याबद्दल, रजेबद्दल, लायकीनालायकीबद्दल, दोन्ही सभागृहांत फरक दिसत नाहीं. प्रांतिक व संयुक्त घटनेंत जर फरक असला तर तो फारच थोडा आहे. संयुक्त कायदेमंडळांतील वरिष्ठ गृहाला, एक बजेटाची बाब वगळल्यास जवळजवळ सारखेच अधिकार आहेत. पण प्रांतांतील वरिष्ठ सभागृहें हीं निव्वळ शोभेचीं आहेत. त्यांचे अधिकार फारच मर्यादित आहेत. त्यांचें मुख्य काम म्हणजे खालच्या गृहाकडून येणाऱ्या बिलांची तपासणी करणें व शक्यतोंवर एखादा कायदा पास होण्याला विलंब लावणें हें आहे. याच्या उलट प्रांतिक असेंब्लीला जितके अधिकार दिले आहेत तितकें फेडरल असेंब्लीला दिले नाहींत. तेथें गव्हर्नरजनरलची सत्ता फारच व्यापक आहे.

पोलिस व अत्याचारी गुन्हे या बाबतींत गव्हर्नरला भरपूर सत्ता दिली आहे.(१)हत्यारी व साध्या पोलिसांच्या बाबतींत गव्ह-

नरला नियमांत व हुकुमांत दुरुस्ती करण्याची सत्ता दिली आहे.(२) सरकार उलथून पाडण्याकरतां जे दहशतवाल्यांकडून किंवा इतरांकडून अत्याचार होतील त्यांच्या नियंत्रणाची गव्हर्नरला पूर्ण सत्ता दिली आहे. (३)अत्याचारी लोकांच्या गुप्त कटाची माहिती पोलिसखात्यांतील किंवा दुसऱ्या सरकारी खात्यांतील लोकांनीं एकमेकांना देऊं नये अशाबद्दल नियम करण्याचा गव्हर्नरला खास अधिकार दिला आहे. या तीन कलमांपैकीं, पहिल्या कलमाच्या बाबतींत त्यानें वैयक्तिक निर्णय करावयाचा आहे व बाकीच्या बाबतींत विवेचक बुद्धी वापरावयाची आहे. ह्या अधिकारांशिवाय सार्वजनिक शांततेला धोका आला असतां काय करावें याची खास जबाबदारी त्याच्यावर आहे ती वेगळीच. पोलिसाच्या बाबतींत निराळी सत्ता पोलिसांच्या शिष्टमंडळांनीं केलेल्या मागण्यामुळे देण्यांत आलें. जॉइंट सिलेक्ट कमिटीपुढें गव्हर्नरला जास्तींत जास्त अधिकार पोलिस खात्यांत द्यावे असें सांगण्यांत आलें, तशा प्रकारचे अधिकारदान नव्या कायद्यानें केलें आहे. त्यामुळें ज्या मंत्र्यांच्या ताब्यांत पोलिसखातें असेल त्याची मोठी केविलवाणी स्थिति होईल. तो नांवाचा पोलिसखात्याचा मुख्य राहील पण खरी सत्ता गव्हर्नरच्या हातीं असेल. त्यामुळें कांहीं गृहमंत्र्यांनीं पोलिसांची कितीहि पाठ थोपटली तरी पोलिसांना आपलें भवितव्य गव्हर्नरच्या हातीं आहे हें ठाऊक असल्यामुळें ते मंत्र्यांशीं तुटकपणेंच वागतील.ते गव्हर्नरशीं जितकें राजनिष्ठ रहातील तितकें मंत्र्याशीं रहाणार नाहींत. लष्करी खात्याची जशी सर्व जबाबदारी राखीव म्हणून गव्हर्नर जनरलवर सोपविली आहे, तशी पोलिसखात्याची जबाबदारी थोडया कमी

प्रमाणांत गव्हर्नरवर सोपवली आहे. नव्या कायद्यांतील प्रांतिक स्वायत्ततेंत पोलिसखात्यावर मंत्र्यांचें पूर्ण नियंत्रण नसल्यामुळें ही स्वायत्तता निव्वळ नांवाची आहे असें म्हणण्यावांचून गत्यंतर नाहीं.

राउंडटेबलला गेलेल्या हिंदी प्रतिनिधींनीं स्वायत्ततेंतील हा मोठा अधिकार हिरावून घेतल्याबद्दल लक्षहि वेधलें. त्यांना वाटलें कीं, आपल्या तक्रारीचा परिणाम होईल व या सत्तेला वेसण घातली जाईल. पण त्यांची फसगत झाली; आणि कायद्यांत जेव्हां हे पोलिसखात्यावरील अनिर्बंध अधिकार त्यांनीं पाहिलें तेव्हां त्यांचा भ्रमनिरास झाला. पण इंग्लंडमधील कट्टर साम्राज्यवाद्याचा पहिला प्रयत्न असा होता कीं, पोलिसखातें हें मंत्र्याच्या हातीं मुळीं देऊंच नये. जॉइंट सिलेक्ट कमिटीनें अशी शिफारस केली कीं, पोलिसांच्या-बद्दल जे नियम असतील ते गव्हर्नरच्या संमतिशिवाय बदलूं नयेत. सर माल्कम हेले यांनीं आपल्या साक्षींत असें सांगितलें कीं, पोलिस मॅन्युअल व गव्हर्नरचे त्याविषयींचे नियम या दोहोंत निराळे-पणा राखणें जरूर आहे. त्यांच्या म्हणण्याप्रमाणें गव्हर्नरच्या मंजुरीनें कांहीं नियम केले जातील व कांहीं पोलिसखात्याच्या मुख्याकडून सरकारच्या पसंतीनें नियम केले जातील. कायद्यानें या दोन्ही गोष्टी तत्त्वतः साधल्या आहेत. पोलिसांची शिस्त व अन्तर्व्यवस्था ही कायम टिकवण्याकरतां म्हणजेच त्यांचें पूर्ण सहकार्य, त्यांची राज-निष्ठा गव्हर्नरला उपलब्ध करून देण्याकरतां हे प्रयत्न झाले व त्यांत पोलिसांच्या शिष्टमंडळाला यश आलें.

गुप्तपोलिस खातें हें मध्यवर्ती सत्तेकडे सोंपवावें अशाबद्दलहि प्रयत्न करण्यांत आले. पण ते सिद्धीस गेले नाहींत. त्यामुळें प्रांताचें पोलिसखातें निर्बल झालें असतें. गुप्त पोलिसखातें हें प्रांतिक खातें

रहाणार आहे व त्याचा संबंध मध्यवर्ती गुप्तपोलिस खात्याशीं पूर्ववत् टिकणार आहे.

नव्या कायद्यांत धार्मिक बाबी किंवा धार्मिक आचार, रूढी वगैरेंबद्दल कायदे करण्यास प्रत्यवाय नाहीं. १९१९ च्या कायद्यांत असे कायदे करण्यास ग. जनरलची आगाऊ परवानगी लागे. ह्या विषयाची चर्चा तिसऱ्या गोलमेज परिषदेंत झाली. तेथें दोन पंथ होते. सुधारणावादी पंथाचें असें म्हणणें होतें कीं, धार्मिक कायदे करण्याची प्रांताला परवानगी असावी व १९१९ च्या कायद्यांतील निर्बंध हा नव्या कायद्यांत दाखल करूं नये. उलट पुराणवादी गटाचें असें म्हणणें पडलें कीं, आमच्या धर्मांत ढवळाढवळ करण्यास जर बाडग्या लोकांना प्रत्यवाय करावयाचा असेल तर जुना नियम कायम ठेवावा. व्हाइट पेपरमध्यें हें कलम ठेवलें होतें पण जॉइंट सिलेक्ट कमिटीनें तें फेटाळलें. सिलेक्ट कमिटीचें म्हणणें असें कीं, बालविवाहप्रतिबंधक किंवा अस्पृश्यतानिवारण यांसारखे प्रश्न प्रांतानें घ्यावयास हरकत नसावी. या प्रश्नासंबंधीं बिलें आलीं व गव्हर्नरला वाटलें कीं, त्यामुळें अशांतता माजण्याचा संभव आहे तर त्यानें आपल्या खास जबाबदारीचा आसूड उगारावा म्हणजे झालें.

प्रांतांची सध्यांची रचना ही अत्यंत सदोष आहे हें सर्वांना ठाऊक आहे. इंग्रजांनीं जसजसे देश जिंकले तसतसे त्यांचे प्रांत केले. भाषा, परंपरा, इतिहास वगैरेंचा विचार न करतां त्यांनीं प्रांत बनविले. मुंबई प्रांतांत सिंध, गुजराथ, महाराष्ट्र व कर्नाटक हे चार भिन्नभाषीय विभाग कोंबण्यांत कोणती दृष्टि होती ?

हिंदुस्थानची राष्ट्रीयदृष्ट्या वाढ होण्यास एकाच भाषेच्या संस्कृतीच्या लोकांचे निराळे प्रांत होणें जरूर आहे. आंध्र व कर्नाटक हे आपले प्रांत निराळे करावेत असें म्हणत आहेत. सिंध, आसाम व ओरिसा हे जर स्वतंत्र होऊं शकतात, तर इतर प्रांतांना स्वतंत्र कां होतां येऊं नये? मुसलमान म्हणतात या प्रांतिक पुनर्घटनेंत आमचें बहुमत असणारे प्रांत जर अल्पमतवाले झाले तर आम्हांला खपणार नाहीं. सरकार म्हणतें आर्थिक दृष्ट्या हे प्रांत स्वावलंबी होणार नाहींत,त्यांचा बोजा इतर प्रांतांवर किंवा मध्यवर्ती सत्तेवर पडेल. इतर संस्था म्हणतात—प्रत्येक प्रांताच्या वाढीला पूर्ण वाव मिळावा म्हणून भाषावार प्रांतरचना तत्त्वतः आम्हांला मान्य आहे. या बाबतींत अधिक प्रयत्न झाले पाहिजेत व भाषावार प्रांतरचना केली गेली पाहिजे.

प्रांतिक स्वायत्ततेंतील गुणदोषांची चर्चा थोडक्यांत वर केली आहे.त्यांतील विद्यमान दोष विस्तारशः अनेकांनीं दाखविलेच आहेत. मुख्य दोष गव्हर्नरची खास जबाबदारीच्या बाबतींत असणारी अनिर्बंध सत्ता हा आहे. ती जेव्हां जाईल व गव्हर्नर जेव्हां लोकसत्तात्मक प्रतिनिधिमंडळाचा अंकित होईल तेव्हांच खरी प्रांतिक स्वायत्तता मिळाली असें होईल.

प्रांतिक घटना व संयुक्त घटना यांच्या योजनेंतील बहुतेक सर्व कलमें शब्दशः सारखीं आहेत. त्यामुळें प्रांतिक घटनेची चर्चा करून पुनरुक्ति करण्याची जरूरी नाहीं.तेव्हां या ठिकाणीं कोणत्या प्रांतिक घटनाकलमाचें कोणत्या फेडरल घटनाकलमाशीं साम्य आहे ते दाखविलें आहे.

| प्रांतिक घटना कलम | संयुक्त घटना कलम | प्रांतिक कलम | संयुक्त संयुक्त |
|---|---|---|---|
| ४९ | ७ | ७१ | २८ |
| ५० | ९ | ७२ | २९ |
| ५१ | १० | ७३ | ३० |
| ५२ | १२ | ७४ | ३१ |
| ५३ | १३ | ७५ | ३२ |
| ५४ | १४ | ७६ | ३२ |
| ५५ | १६ | ७७ | ३२ |
| ५९ | १७ | ७८ | ३३ |
| ६० | १८ | ७९ | ३४ |
| ६१ | १८ | ८० | ३५ |
| ६२ | १९ | ८१ | ३६ |
| ६३ | २० | ८२ | ३७ |
| ६४ | २१ | ८४ | ३८ |
| ६५ | २२ | ८५ | ३९ |
| ६६ | २३ | ८६ | ४० |
| ६७ | २४ | ८७ | ४१ |
| ६८ | २५ | ८८ | ४२ |
| ६९ | २६ | ८९ | ४३ |
| ७० | २७ | ९० | ४४ |
| | | ९३ | ४५ |

प्रांतिक घटनेंत असलेली पण संयुक्त घटनेंत नसलेली अशी फक्त ६ च कलमें आहेत:–५६,५७,५८,८३,९१,९२. यांपैकीं ५६, ५७,५८ हीं कलमें पोलिसांबद्दल आहेत. ८३ कलम अँग्लो-इंडियन व युरोपिअनांच्या शिक्षणाकरतां देण्याबदल आहे

व ९१,९२ हीं कलमें वगळलेल्या व अंशतः वगळलेल्या टापूबद्दल आहेत.

प्रांतिक व संयुक्त घटनेंत साम्य आहे याचा अर्थ प्रांतामध्यें जितकी स्वायत्तता मिळाली आहे तितकी संयुक्त घटनेंत मिळाली आहे असें समजण्याचें कारण नाहीं. एकतर प्रांताचें क्षेत्र मर्यादित असतें. दुसरें प्रांताचा संबंध बाहेरील जगाशीं नसतो. तिसरें सैन्य, परराष्ट्रीय संबंध, ह्या बाबी प्रांताशीं संलग्न नसतात. चवथें संस्थानें हीं प्रांताशीं जोडलेलीं नाहींत. पांचवें जकात, नाणीं, हुंडणावळ, कर वगैरेचा संबंध प्रांताशीं नाहीं. सहावें रेल्वेवरील ताब्याचा प्रश्न प्रांताच्या बाबतींत उद्भवत नाहीं, सातवें अखिल भारतीय नोकऱ्या, पेन्शन, कर्जें वगैरे प्रश्न जितके अखिल हिंदुस्थानचे आहेत तितके प्रांताचे नाहींत. आठवें खाणी, शास्त्रीय संशोधन, वगैरेचा प्रांतांशीं निकटचा संबंध नाहीं. नववें जहाजाच्या वाहतुकीचें नियंत्रण, व्यापारविषयक धोरण, उद्योगधंदे वगैरे प्रश्न अखिलभारतीय आहेत. दहावें अखिल भारतीय कोर्टें, तह, करारनामे वगैरे बाबी प्रांताशीं संबद्ध नसतात. या कारणानें प्रांताची स्वायत्तता ही मर्यादित असते. फेडरेशनला इतकें महत्त्व असल्यामुळें तेथें संस्थानांना बहुमत मिळूं नये अशी कायदेशीर व्यवस्था करण्यांत आली आहे.

या व इतर कारणांमुळें फेडरेशनमध्यें प्रांताइतकी जबाबदारी व स्वायत्तता नाहीं, म्हणून फेडरेशनला विरोध आहे.

---

## ११

# चीफ कमिशनरचे प्रांत.

चीफ कमिशनरचे प्रांत ६ आहेत. १ दिल्ली, २ अजमीर-मेरवाडा, ३ कूर्ग, ४ अंदमान व निकोबार बेटें, ५ बलुचिस्थान, ६ पंथ-पिपलोदा. ह्या सहा प्रांतांचा राज्यकारभार ग. जनरल चीफ कमिशनरच्या मार्फत चालविणार आहे. हे सहा प्रांत अद्याप स्वतंत्र कां ठेवले आहेत तें समजत नाहीं. त्यांत कांहीं राजकीय डाव आहे असें म्हणतात. दिल्ली हें राजधानीचें शहर असल्यामुळें ती प्रांताच्या ताब्यांत दिली तर आपली प्रतिष्ठा जाईल असें वाटत असावें. बलुचिस्थान हें सरहद्दीवर असल्यामुळें ते प्रांताच्या ताब्यांत देतां येत नाहीं. कारण एखाद्या प्रांतानें पलिकडच्या इराण-अफगाणिस्थानशीं संगनमत केलें तर काय करा अशी भीति सरकारला वाटत असावी. अंदमान व निकोबार बेटें काळ्यापाण्या-करतां व समुद्रांत असल्यामुळें ग. जनरलनें स्वतःच्या हातांत ठेवलीं आहेत. अजमीर-मेरवाडा कोठल्याहि प्रांतापासून अत्यंत दूर असल्यामुळें चीफ कमिशनरच्या ताब्यांत दिला आहे. पंथपिपलोदा हा नवीनच प्रांत केला आहे. एडन असाच स्वतंत्र ठेवतां ठेवतां नव्या कायद्यानें तो हिंदुस्थानपासून हिरावून घेतला. दुसऱ्या सरहद्दीवरील प्रांतांची अशीच वासलात लागणार नाहीं असें कोणी म्हणावें ? ब्रह्मदेश, सीलोन व एडन या तीन विभागांना हिंदुस्थान मुकला एवढें खरें.

या विभागांना फेडरेशनमध्यें (अंदमान व पंथपिपलोदा वगळून) एकेक (दिल्ली दोन) प्रतिनिधि पाठविण्याचा अधिकार दिला असल्यामुळें ते फेडरेशनमध्यें येतात. त्यांच्या प्रतिनिधींची निवड कशी व्हावयाची हें अद्याप ठरावयाचें आहे. फक्त कूर्ग प्रांतांत जे कायदेमंडळ आहे तें तसेंच चालू रहाणार असल्यामुळें या कायदेमंडळाला आपला प्रतिनिधि पाठविण्याची परवानगी दिली आहे. इतर प्रांतांना कायदेमंडळें कां दिलीं नाहींत याचें कारण कोण सांगू शकेल! निदान या प्रांताचे प्रतिनिधि फेडरेशनमध्यें जात असतां जवळच्या प्रांतिक कायदेमंडळांत कां नसावेत व ग. जनरलऐवजीं गव्हर्नरची सत्ता त्यावर कां नसावी हें एक गूढ आहे. ग. जनरल इतका गव्हर्नरवर विश्वास नाहीं असें यावरून दिसतें. या प्रांतांना प्रतिनिधिमंडळें नसल्यामुळें त्यांचा कारभार संस्थानिकांच्या कारभाराप्रमाणें एकतंत्री आहे. संस्थानांत संस्थानिक प्रमुख असतो तर या प्रांतांत चीफ कमिशनर प्रमुख आहे. या प्रांतांतील जनतेनें आपल्याला जवळच्या प्रांतांना जोडा अशी तरी चळवळ करावी किंवा स्वतःचें स्वतंत्र स्वयंशासित राज्य असावें म्हणून तरी प्रयत्न करावा.

ब्रिटिश बलुचिस्थानला सरकार एकंदर फार जपतें असें दिसतें. कारण तेथील राज्यकारभाराचें नियंत्रण गव्हर्नर जनरल स्वतः करणार आहेत. फेडरल असेंब्लीनें पास केलेला कोणता कायदा अगर त्या कायद्यांतील कोणतीं कलमें बलुचिस्थानला लावावयाचीं हें ग. जनरल स्वतःच्या विवेचक बुद्धीनें ठरवील. तेथील शांतता व सुव्यवस्थेकरतां ग. जनरल स्वतःच नियम करील. बलुचिस्थानप्रमाणें अंदमानच्याहि शांततेकरतां व सुव्यवस्थेकरतां नियम करण्याची सत्ता ग. जनरलला दिली आहे.

कूर्ग प्रांताचें कायदेमंडळ आहे तसेंच अस्तित्वांत रहाणार आहे. कर वसूल करणें व खर्च करणें ही सत्ता त्याला दिली आहे.

अशा प्रकारची चीफ कमिशनरच्या प्रांताची विल्हेवाट लावण्यांत आली आहे. ह्या प्रांतांना हात लावण्याची लोकप्रतिनिधींना परवानगी नाहीं.

हे चीफ कमिशनरचे प्रांत संयुक्त राज्याचे घटक आहेत. त्या प्रांतांवर फेडरेशनची प्रत्यक्ष सत्ता चालणार आहे. फक्त अंदमान-निकोबार व बलुचिस्थान हे दोन प्रांत ग. जनरलकडे राखून ठेवले आहेत.ते फेडरल मंत्र्यांच्या ताब्यांत जाणार नाहींत. चीफ कमिशनरच्या ताब्यांतील हे प्रांत गव्हर्नरच्या ताब्यांत जाण्यास कायद्यानें सवड ठेवली आहे. या सर्व प्रांतांची थोडक्यांत हकिगत अशीः—

**पंथपिपलोदाः**—मध्य हिंदुस्थानांत माळवा प्रांतांत हा १९ चौरस मैलांचा लहानसा टापू आहे. आतांपर्यंत ह्या टापूवर माळव्याचा पोलिटिकल एजंट देखरेख करीत असे. पंथपिपलोदा हा ब्रिटिश प्रदेश आहे. पंडित आडनांवाचा दक्षिणी ब्राम्हण हा छोटा संस्थानिक म्हणून तेथें नांदत आहे.या पंडितांना तेथें मालकी हक्क नाहींत. त्यांना पोलिटिकल एजंटकडून नक्त नेमणूक आहे. या भागांतील लोकसंख्या ४००० आहे व या भागाचा वसूल फक्त १५००० रु. आहे. या १५००० रु. च्या छोटया विभागाला चीफ कमिशनरच्या प्रांताचा दर्जा दिला जाणें हें खरोखर आश्चर्य आहे.

**अजमीर-मेरवाडाः**—वर सांगितल्याप्रमाणें हा प्रांत कोठल्याहि प्रांतापासून दूर आहे. हा प्रांत चहूंकडून संस्थानांनीं वेढलेला आहे. राजपुतान्यांतील संस्थानांचा एजंट हाच कमिशनर

म्हणून तेथें १८७१ पासून कारभार पहातो. १९१९च्या कायद्या-प्रमाणें या प्रांतानें एक सभासद असेंब्लीकरतां निवडून पाठविला. नव्या कायद्याप्रमाणें या प्रांताला उभय गृहांकरतां एकेक सभासद निवडण्याची सत्ता दिली आहे.

**दिल्ली**:—१९१२ पासून हा स्वतंत्र प्रांत करण्यांत आला. शेडयूल डिस्ट्रिक्टचा कायदा दिल्लीला लागू नाहीं. त्याचें अंदाज-पत्रक हें मध्यवर्ती अंदाजपत्रकांत अंतर्भूत होतें. दिल्ली हा खरोखर पंजाबमध्यें मोडतो. लाहोर हायकोर्टाची न्यायदानाच्या बाबतींत या प्रांतावर सत्ता चालते. नव्या कायद्याप्रमाणें दिल्लीला वरिष्ठ कायदेमंडळाकरतां १ जागा व असेंब्लीकरतां दोन ( १ हिंदु व १ मुसलमान ) आहेत.

**ब्रिटिश बलुचिस्थान**:—फेडरेशनची सत्ता ब्रिटिश बलुचि-स्थानावर आहे. पण फेडरेशनचे कायदे या प्रांताला किंवा कांहीं विभागांना लागू करावयाची सत्ता ग. जनरलला दिली आहे. त्या कायद्यांत कमीजास्त करण्याचा अधिकार ग. जनरलला आहे. ब्रिटिश बलुचिस्थानच्या सुखसोईकरतां कायदे (regulations) करण्याचा अधिकार ग. जनरलला दिला आहे. अर्थात् त्यावर राजाची सत्ता आहे.

ब्रिटिश बलुचिस्थानचे दोन विभाग केले आहेत. ट्रायबल एरि-याज् ( टोळ्यांचा टापू ) ह्या विभागावर फेडरेशनचा अंमल चालणार नाहीं. फक्त ग. जनरलचा चालेल. दुसरा चीफ कमि-शनरचा विभाग. यावर फेडरेशनची सत्ता वर दिलेला अपवाद जमेस धरून चालेल.बलुचिस्थान हा ब्रिटिश हद्दीला जोडून आहे. तेथें जिरग्याची पद्धत चालू आहे, वगैरे कारणांकरतां हिंदुस्थानच्या

संरक्षणाची विशेष तरतूद करावयास पाहिजे म्हणून त्याला ट्रायबल एरियाच्या कक्षेंत अंतर्भूत केलें.

**अंदमान व निकोबार**:—बंगालच्या उपसागरांत ही काळ्या-पाण्याची वसाहत पोर्टब्लेअरमध्यें आहे. १९२१ सालीं ही वसाहत कैद्यांकरतां बंद करण्यांत आली. पण अलीकडे तेथें स्वर्ग निर्माण झाला आहे असें सांगून ती पुनः सुरू केली आहे. १८७८ मध्यें या विभागाला १८७४ चा डिस्ट्रिक्ट शेडयूल ॲक्ट लावला. तेथें चीफ कमिशनरची सत्ता चालते.

**कूर्ग**:—१८३४ मध्यें हें संस्थान खालसा करून ब्रिटिश मुलखाला जोडलें गेलें. त्याला पुढें १८७४ चा शेडयूल डिस्ट्रिक्टचा कायदा लावण्यांत आला. १८७०व १९१५चे ग. इंडिया ॲक्टा' प्रमाणें तेथें कायदेशीर अंमल सुरू झाला. १९१९ च्या सुधारणांचे वेळीं कूर्गला मद्रास प्रांतांत सामील होण्याबद्दल विचारणा केली. पण लोकांच्या प्रतिनिधींची सभा भरून त्यांनीं आपल्याला स्वतंत्र कौन्सिल असावें असा आग्रह धरला. १९२३ च्या आक्टोबरमध्यें याला लेजिस्लेटिव्ह कौन्सिल दिलें. या कौन्सिलांत १५ निवडलेले व पांच नेमलेले सभासद तेव्हां ठरविले. या कौन्सिलची सत्ता फार मर्यादित आहे. १८९२ व १९०९ च्या कायद्याप्रमाणें या कौन्सिलचे अधिकार आहेत. अंदाजपत्रकाचे ठराव शिफारसवजा असतात. बिलांना ग. जनरलची पूर्व मंजुरी लागते. म्हैसूरचा रेसिडेंट हा या प्रांताचा पदसिद्ध(Ex-officio)कमिशनर आहे.नव्या कायद्यांत कूर्गच्या कौन्सिलला एक सभासद फेडरल असेंब्लीकरतां निवडण्याची परवानगी दिली आहे.वरिष्ठ कौन्सिलकरतांहि एक जागा त्याला दिली आहे.

या सहा प्रांतांपैकीं, कूर्ग, दिल्ली, अजमीर–मेरवाडा या तीन प्रांतांत स्वायत्ततेकरतां अगर प्रांतांत अंतर्भूत होण्याकरतां चळवळ सुरू आहे. कूर्ग प्रांत कर्नाटकमध्यें सामील करावा असा ठराव श्री. गंगाधरराव देशपांडे यांनीं हरिपुरा कॉंग्रेसमध्यें मांडला होता व तो पास झाला. दिल्ली प्रांतांतहि स्वायत्ततेबद्दल चळवळ चालू आहे. अजमीर-मेरवाडयाची मागणी आपणांस संयुक्त प्रांताला जोडण्याबद्दल सुरू आहे. ब्रिटिश बलुचिस्थानांत जवळजवळ लष्करी अंमल सुरू आहे. तेथील प्रजा त्रस्त झाली असून सिंधला आपला प्रांत जोडा अशी त्यांची मागणी आहे. अंदमान-निकोबार जरी ब्रह्मदेशाच्या जवळ असले तरी ते हिंदुस्थानचे आहेत व ते बंगालला जोडले पाहिजेत. पंथपिपलोदा हा तर खडयाएवढा लहान प्रांत आहे. तो मध्यप्रांताला जोडला पाहिजे.

अशा प्रकारें हे सर्व चीफ कमिशनरचे प्रांत स्वतंत्र न ठेवतां ११ प्रांतांपैकीं कोणत्या तरी प्रांतांत समाविष्ट केले पाहिजेत. त्याशिवाय हिंदुस्थानांत सारखा अंमल सुरू होणार नाहीं.

---

# १२

# कायदेमंडळाची सत्ता व सत्तेची विभागणी.

हिंदुस्थानला जी काय सत्ता नव्या कायद्यानें दिली आहे, त्याची विभागणी कशी करावयाची हा प्रश्न इंग्लंडमध्यें जमलेल्या प्रतिनिधींपुढें प्रामुख्यानें होता. प्रांताकडे कोणते प्रश्न द्यावयाचे व मध्यवर्ती सत्तेकडे कोणते प्रश्न ठेवावयाचे याबद्दल बरीच भवति-न-भवति झाली. १९१९च्या कायद्यांत अशा प्रकारची काटेकोर अधिकारविभागणी नव्हती. एखादी प्रांतिक बाब म्हणून ठरली असली तरी मध्यवर्ती सत्ता त्या बाबतींत कायदा करूं शकत असे आणि एखादी बाब मध्यवर्ती म्हणून ठरली असली व तिचा संबंध प्रांताशीं असला तर प्रांत त्या बाबतींत कायदा करूं शके. ग. जनरल आपल्या कौंसिलच्या मदतीनें या दोन्ही भिन्न भिन्न कायदेमंडळांच्या कायद्यांना सूत्रबद्धता व समानता आणण्याचा व त्यांच्यांत भांडणें होऊं न देण्याचा प्रयत्न करी. पण नव्या कायद्यामुळें प्रांतांना बरेच अधिकार मिळणार असल्यामुळें दोघांमध्यें काटेकोर वांटणी करून टाकली पाहिजे असें राउंड टेबलला गेलेले प्रतिनिधी प्रतिपादन करूं लागले. फेडरेशनची उभारणी ही मूलतः अधिकारांच्या सक्त विभागणीवर व्हावी लागते. तशा प्रकारची विभागणी जर केली गेली नाहीं तर प्रांत व मध्य-

वर्ती सत्ता यांच्यांत भांडणें होतात व शेवटीं तें प्रकरण कोर्टाकडे निर्णयाकरतां जातें.

हिंदुस्थानच्या सत्तेची ही विभागणी करतांना कायदे करणारांच्या पुढें कानडा व ऑस्ट्रेलियाची घटना होती. कानडाची फेडरेशन ही अमेरिकेंतील सिव्हिल वॉरनंतर जन्मास आली. त्यांना मध्यवर्ती सत्तेचा बडगा असह्य झाला होता.त्यामुळें कानडाची घटना करतांना त्यांनीं प्रांत व मध्यवर्ती डोमिनिअन यांना स्वतंत्र अधिकार देऊन टाकले. जे अधिकार प्रांतांना स्पष्टपणें दिले नव्हते ते मध्यवर्ती सत्तेकडे जात. ऑस्ट्रेलियाची सत्ताविभागणी निराळ्या परिस्थितींत झाली. ऑस्ट्रेलिया हा स्वातंत्र्याचे सर्व अधिकार उपभोगत होता. तो सुरक्षित ठिकाणीं बसला असल्यामुळें परचक्राची भीतिहि त्याला त्यावेळीं वाटत नव्हती. पण आर्थिक धोरणांत समानता नसल्यामुळें त्याला फेडरेशन बनवावें लागलें. हें फेडरेशन बनवितांना त्यानें मध्यवर्ती सत्तेला खूप अधिकार दिले आणि असें प्रतिपादन केलें कीं, ह्या अधिकारामुळेंच फेडरेशन जगेल. ऑस्ट्रेलियानें आपलें हें फेडरेशन अमेरिकेच्या धर्तीवर उठवलें.त्यांच्या घटनेंत मध्यवर्ती सत्ता व घटक राज्यें यांना सारखीच सत्ता आहे. दोघांच्या कायद्यांत जेव्हां तेढ पडते तेव्हां मध्यवर्ती सत्तेचा कायदा प्रभावी ठरतो. त्यांनीं कांहीं थोडया बाबी संपूर्णपणें मध्यवर्ती सत्तेला दिल्या आहेत. पण बाकीच्या सर्व प्रांतांना देऊन टाकल्या आहेत.

हिंदुस्थानची घटना ही ऑस्ट्रेलिया व कानडाच्या घटनांचें मिश्रण आहे. कानडाप्रमाणें मध्यवर्ती व प्रांतिक सत्तेची यादी त्यांत आहे;पण कानडाप्रमाणें शेषाधिकार मध्यवर्ती सत्तेला दिले नाहींत. ऑस्ट्रेलियाच्या घटनेंत समाईक सत्ता निर्दिष्ट केली आहे व दोघांच्या

तेढीचे वेळीं काय करावें हेंहि सांगितलें आहे; हिंदुस्थाननें हीच पद्धत उचलली आहे. पण ऑस्ट्रेलियाप्रमाणें प्रांतांना शेषाधिकार दिले नाहींत.

हिंदुस्थानच्या राज्यघटनेंतील सत्तेची विभागणी फार परिश्रमपूर्वक व काटेतोलपणानें केलेली आहे. समाईक सत्तेंतील बाबी शक्य तितक्या कमी ठेवल्या आहेत. हिंदुस्थानांतील लोकांकडे सोपविलेल्या सत्तेच्या तीन याद्या केल्या आहेत. पहिल्या यादींत मध्यवर्ती अगर संयुक्त घटना कायदेमंडळाकडे ज्या बाबी सोपविल्या आहेत त्यांची विल्हेवारी दिली आहे. दुसऱ्या यादींत प्रांताच्या वांट्याला काय दिलें तें क्रमवार सांगितलें आहे आणि तिसऱ्या यादींत प्रांत व फेडरेशन यांनीं समाईकांत कोणकोणतीं खातीं वहिवाटावयाची याची यादी दिली आहे. पहिल्या यादींत ५९, दुसरींत ५४ व तिसरींत दोन्ही भाग मिळून ३६ असे एकूण १४९ विषय दिले आहेत.

ही अधिकारांची विभागणी फेडरेशनच्या तत्त्वाप्रमाणें व्हावयास पाहिजे यांत तर वाद नाहींच. सायमन कमिशननें जेव्हां हा वांटणीचा प्रश्न विचारांत घेतला, तेव्हां त्यांनें एकच यादी असावी व ग. जनरलनें आपल्या अधिकारांत त्याची वांटणी करावी असें सांगितलें. त्यांनें या समाईक पद्धतीची फार स्तुति केली. पण फेडरेशन अंमलांत आणावें असें त्याचें म्हणणें नसल्यामुळें त्याची स्तुति तेव्हां शोभून दिसली असेल. पण फेडरेशनमध्यें सायमन योजना एका महिन्यांत कोसळून पडली असती.

सर सॅम्युएल होअर हेहि एकाच समाईक यादीचे पुरस्कर्ते होते. फेडरेशनच्या घटनेंत होअर साहेबांचें तर्कशास्त्र किती शुद्ध ठरलें असतें तो प्रश्न अलाहिदा. पण जर एकत्र यादी केली असती, तर

प्रांत व मध्यवर्ती सत्ता वादीप्रतिवादी बनून फेडरल कोर्टांत भांडत बसले असते. होअरसाहेब म्हणतात, एक यादी असती तर मला आनंद झाला असता.पण हिंदुस्थानांत हिंदु व मुसलमान आहेत.ते विलायतेंत इतके भांडले कीं, अशी समाईक यादी ठेवणें म्हणजे पुढील यादवीची तरतूद करून ठेवणें झालें असतें. हिंदु म्हणत कीं, सत्तेचा बहुतांश मध्यवर्ती सत्तेकडे ठेवावा, मुसलमान म्हणत कीं, प्रमुख सत्ता प्रांताला देऊन टाकावी. हा आग्रह धरण्याचें कारण उघड होतें. मुसलमानांना वाटे कीं, प्रांतामध्यें-निदान कांहीं प्रांतांमध्यें-आपलें बहुमत होणार तेव्हां प्रांताला सत्तेचे सर्वाधिकार मिळाले म्हणजे आपली सत्ता प्रांतावर पूर्णपणें स्थापित होईल. मध्यवर्ती सत्तेंत हिंदूंचें मताधिक्य होणार असल्यामुळें त्यांच्या हातीं सर्वाधिकार जातां कामा नये असें त्यांचें म्हणणें होतें. विशेषतः ज्यांना शेषाधिकार म्हणतात (Residuary powers)ते प्रांताकडे असावेत याकरतां हिंदूंचा काय किंवा मुसलमानांचा काय आग्रह चालू होता.प्रांत, मध्यवर्ती सत्ता व समाईक सत्ता यांच्यांत अधिकार वांटून टाकल्यानंतर असे कांहीं बुद्धीला कल्पना करतां न येणारे अधिकार रहातात,त्यांना शेषाधिकार म्हणतात.ह्या अधिकारांकरतां हिंदुमुसलमानांत भांडणें झाल्यामुळें दोघांचे वाटे शक्य तितके पृथक् केले गेले. होअर साहेब म्हणतात इतकी पृथक् वाटणी केली तरी प्रांत व संयुक्त घटना यांच्यांत भांडणें होतील व तीं कोर्टांत जातील*

*We find that we have already exhausted the ordinary activities of Government in these three lists. I agree with my Hon. friends that it means Complications. I believe that it also means the possibility of increased litigation. I very much regret that it is so.
Sir. S. Hoare.

या भांडणांना ग. जनरल प्रत्यक्ष .अगर अप्रत्यक्ष कारणीभूत न होवो म्हणजे झालें.

पण शेषाधिकाराचें काय झालें हें आपण पाहिलें पाहिजे. कायद्यानें हे शेषाधिकार प्रांताला दिले नाहींत व मध्यवर्ती सत्तेलाहि दिले नाहींत. दोघांच्या भांडणांत तिसऱ्याचें जसें फावतें, त्याप्रमाणें हे शेषाधिकार शेवटीं ग. जनरलला देण्यांत आले. त्यानें आपल्या विवेचक बुद्धीनें त्यांची फेरवांटणी प्रांत किंवा मध्यवर्ती सत्ता यांच्यांत करावयाची आहे.

या वांटणींत संस्थानांचा प्रश्न कसा सोडवला तें पाहिलें पाहिजे. पहिल्या यादींत जे ५९ विषय आहेत, त्यांपैकीं, आपणांस किती लागू करावयाचे हें संस्थानिकांनीं मान्यतापत्रकाद्वारें सांगावयाचें आहे. तेवढे विषय संस्थानिकांना लागू आहेत. बाकीच्या दोन याद्यांशीं त्यांचा संबंध नाहीं. याशिवाय जे शेषाधिकार राहतात ते संस्थानिकांचेच आहेत. तेव्हां त्यांच्यांत व फेडरेशनमध्यें भांडण्याचे प्रसंग येणार नाहींत.

ही सत्तेची विभागणी झाली खरी; पण तिची अंमलबजावणी करतांना ज्या अडचणी उद्‌भवण्याचा संभव आहे त्याची तरतूदहि कायद्यानें करून ठेवली आहे. फेडरेशनला पहिल्या व तिसऱ्या यादीप्रमाणें साऱ्या हिंदुस्थानला किंवा एखाद्या विभागाला लागू पडतील असे कायदे करण्याचा अधिकार आहे. तसेंच प्रांताला दुसऱ्या व तिसऱ्या यादीप्रमाणें कायदे करण्याचा अधिकार आहे. मध्यवर्ती सत्तेला प्रांतिक यादींतील विषयासंबंधींहि कायदे करण्याचा अधिकार आहे. मात्र ते कायदे प्रांताला लागू

करतां यावयाचे नाहींत. चीफ कमिशनरच्या प्रांताला लागू करतां येतील. संयुक्त राज्यघटनेच्या कायद्यांतून ब्रिटिश प्रजाजन व हिंदुस्थानांत स्थायिक झालेले ब्रिटिश प्रजानन सुटूं शकत नाहींत. त्यांच्याकरतां निराळा कायदा नाहीं. बादशहाचे नोकर, हिंदुस्थानांत किंवा फेडरेशनमध्यें आलेल्या संस्थानांत नोंदलेलीं जहाजें व विमानें आणि जहाजांचे व विमानांचे नोकर तसेंच हिंदुस्थानांत उभारलेलें सैन्य, नाविक किंवा वैमानिक दलांचे नोकर यांनाहि संयुक्त घटनेचा कायदा लागूं आहे. संस्थानिकांनीं जेवढया विषयापुरतें फेडरेशनचें आधिपत्य आपल्या पत्रकाद्वारां मान्य केलें असेल, तेवढ्या विषयांत फेडरेशनचे कायदे हे संस्थानी प्रजाजनांनाहि लागूं आहेत, मग ते प्रजाजन कोठेंहि राहोत.

ह्या कलमामध्यें संयुक्त व प्रांतिक कायदेमंडळाच्या भौगोलिक क्षेत्राचा तसेंच त्या क्षेत्रांत येणाऱ्या गटांचा निर्देश केला आहे. फेडरेशनचे कायदे ब्रिटिश हिंदुस्थान व सामील संस्थानांना लागूं पडतात व प्रांताचे प्रांतांना लागूं पडतात असें सांगितलें. पण त्यालाहि अपवाद आहेत. वगळलेल्या व अंशतः वगळलेल्या भागांना प्रांताचे कायदे आपोआप लागूं होत नाहींत, तसेंच टोळ्यांच्या टापूंना फेडरेशनचे कायदे लागूं होत नाहींत.

ब्रिटिश हिंदुस्थान याचीहि व्याख्या वास्तविक व्हावयास पाहिजे. जेथें जमीन संपते तेथेंच ब्रिटिश हिंदुस्थान संपतो असें वास्तविक कां असावें ? हिंदुस्थानच्या किनाऱ्यापासून किती मैलांपर्यंतचा समुद्र ब्रिटिश हिंदुस्थानचा हेंहि ठरलें पाहिजे. पण पाण्याची वांटणी अगर व्याख्या केलेली नाहीं. एका खटल्यांत किनाऱ्यापासून एक लीगपर्यंत हिंदुस्थानची सत्ता आहे असें ठरलें होतें. १८७८च्या टेरि-

टोरिअल्स वॉटर ॲक्टमध्यें हीच मर्यादा दिली होती. पण ती लादलेली आहे, तडजोडीनें अगर मान्यतेनें ठरलेली नाहीं. हा विषय अनुषंगानें आला.

कायदेमंडळाला कायदे करण्याची जी सत्ता दिली जाते,ती अनिर्बंध असावी लागते. आपल्या हद्दींत कोणाला येऊं द्यावयाचें, आपल्या हद्दींत कोणावर जादा कर बसवावयाचे वगैरे सत्ता कायदेमंडळाला असावयास पाहिजे. जेथें वसाहतींना स्वराज्य दिलें आहे तेथें हीं सत्ता दिली आहे. जकात बसविण्याची सत्ता ही सुद्धां त्या सरकारला हवी. जकात चुकविणाऱ्या जहाजांना अटक करण्याची सत्ता सुद्धां त्यांत अंतर्भूत झाली पाहिजे. कानडा वगैरे वसाहतींना हे अधिकार मिळाले.

हिंदुस्थानांतील प्रांतांना आपल्या भौगोलिक क्षेत्राबाहेरील प्रदेशासंबंधीं कायदे करण्याची सत्ता नाहीं. पण ती सत्ता संयुक्त सरकारला आहे हें वर विवेचिलें आहे. हिंदुस्थानांत किंवा सामील संस्थानांत नोंदविलेलीं जीं जहाजें व विमानांचे काफिले आणि त्यांवरील लोक यांना फेडरेशनचा कायदा लागू केला आहे; त्याला इतिहास आहे व तो गंमतीचा आहे.

ऑस्ट्रेलियांत तो प्रकार घडला. ऑस्ट्रेलियांत रहाणाऱ्या कांहीं श्रीमंत लोकांनीं आपल्या जहाजाच्या कंपनीचे स्थापनापत्रकावर कलकत्त्याला सह्या केल्या. मर्चंट शिपिंग ॲक्टचा फायदा मिळावा हा त्यांत हेतु होता. पुढें या कंपनींतील नोकरांनीं आपला पगार, कामाचे तास वगैरेंबद्दल अधिकाऱ्यांवर फिर्याद केली. पण कंपनीचे स्थापनापत्रकावर कलकत्त्याला सह्या झाल्या असल्यामुळें ऑस्ट्रेलिया-

च्या सरकारच्या अधिकारक्षेत्रांत ही बाब येत नाहीं असें कोर्टानें ठरवून तो दावा काढून टाकला. पुढें त्यांनीं कलकत्त्याला दावा लावला कां नाहीं माहीत नाहीं. ही कंपनी मेलबोर्नला नोंदवली होती हेंहि सांगणें जरूर आहे.

हिंदुस्थानच्या बाबतींत ही भीति नाहीं. हिंदुस्थानांत जहाज-कंपनी नोंदवली असलीं आणि जगांतील कोठल्याही समुद्रांत तिची जहाजें भटकत असली तरी तीं जहाजें व त्या जहाजांवरील माणसें फेडरेशनच्या कायद्यानें बद्ध झालीं आहेत. यालाच एक्स्ट्रा टेरिटोरिअल लेजिस्लेशन ( भौगोलिक मर्यादेच्या बाहेर असलेली कायद्याची सत्ता ) म्हणतात.

## फेडरेशनचे कायदे.

फेडरेशनला संस्थानासंबंधीं कायदे करतां येतात. तीं संस्थानें फेडरेशनमध्यें सामील व्हावीं लागतात व पहिल्या यादींतील अमुक विषयासंबंधीं फेडरेशननें कायदे करावेत असें त्यांनीं सांगावें लागतें.

वर फेडरेशनला प्रांतासंबंधीं कायदे करतां यावयाचे नाहींत असें सांगितलें पण त्याला एक अपवाद आहे व तो फार महत्त्वाचा आहे. ग. जनरलनें जर जाहिरनामा काढून असें पुकारलें कीं, युद्धामुळें किंवा अंतर्गत बंडाळीमुळें हिंदुस्थानवर संकट येण्याचा संभव आहे तर संयुक्त राज्यघटनेला प्रांताच्या यादींत जे विषय आहेत त्या विषयासंबंधीं सुद्धां ग. जनरलच्या मंजुरीनें कायदे करण्याचा अधिकार दिला आहे. संयुक्त राज्यघटनेला हा जो अधिकार दिला आहे, तो युद्ध किंवा बंडाळी थांबविण्यास प्रत्यक्ष उपयोगी पडेल असा अधिकार दिलेला नाहीं. सैन्याची हालचाल करणें, रेल्वेचा ताबा देणें, पोलिसांची कुमक पाठविणें वगैरे प्रत्यक्ष बंडाळी थांबविण्याकरतां जे अधिकार असावे लागतात ते संयुक्त घटनेंतील

१७

कायदेमंडळाला दिले नाहींत. ह्या अधिकारान्वयें रेल्वे पोलिस, सामान्य पोलिस, तुरुंग वगैरेंवर जो प्रांताच्या मंत्र्यांचा ताबा आहे तो काढून घेतला जाईल, किंवा कराच्या बाबतींत ढवळाढवळ केली जाईल. ग. जनरलच्या हातांत अशा प्रसंगीं अमल चालविण्याची जी सत्ता दिली आहे ती केवढी तरी व्यापक आहे. पण संयुक्त घटनेच्या हातांतील सत्ता ही फक्त प्रांताचे अधिकार काढून घेणारी आहे. प्रांतिक बाबतींत कायदे करण्याचा अधिकार फेडरल असेंब्लीला न देतां ग. जनरलला दिला असतां तर हें नाटक करण्याची जरूरी नव्हती. पण तशी सत्ता ग. जनरलला नाहीं असेंहि समजण्याचें कारण नाहीं. लोकांच्या संमतीनें आम्ही हे कायदे करतों असें दाखविण्याचा ढोंगीपणा या युक्तींत आहे. यापलीकडे राष्ट्रीय संकटाचे वेळीं संयुक्त कायदेमंडळाला दिलेल्या या कायदे करण्याच्या अधिकाराचा दुसरा अर्थ नाहीं. प्रांतानें पाहिजे तर असा कायदा करावा, त्याला आमची हरकत नाहीं असेंहि या कलमांत म्हटलें आहे. पण प्रांतानें केलेल्या एतद्विषयक कायद्याचें एखादें कलम फेडरेशननें केलेल्या कायद्याला विरोधी असेल, तर फेडरेशनचा कायदा हाच प्रभावी ठरेल, प्रांताचा कायदा निरर्थक मानला जाईल. एक संकटकालीन जाहीरनामा दुसऱ्या जाहीरनाम्यानें परत घेतला जाऊं शकतो व तो पार्लमेंटपुढें भारतमंत्र्यातर्फे मांडला जावा लागतो. संकटाची घोषणा ही सहा महिन्यांनीं रद्द होते. पण जर पार्लमेंटच्या दोन्हीं गृहांनीं सहा महिन्यांच्या आंत ठराव करून घोषणा मान्य केली तर ती रद्द होत नाहीं. संकट जाहीर झाल्यावर जे कायदे संयुक्त कायदेमंडळांनीं संकटाच्या जाहीरनाम्यामुळें केलें असतील ते जाहीरनामा परत घेतल्यानंतर सहा महिनेपर्यंत अस्ति-

त्वांत रहातील. या सहा महिन्यांत जर कांहीं गोष्टी केल्या असतील अगर करावयाच्या राहिल्या असतील तर त्याची अंमलबजावणी चालू राहील. नेहमीचा नियम असा आहे कीं, तात्पुरते कायदे रद्द झाल्यावर, त्या कायद्याच्या आधारानें खटले वगैरे करतां येत नाहींत आणि खटले जर भरले असले तर ते मुदत संपतांच तसेंच सोडून द्यावे लागतात. अशीं उदाहरणें पूर्वी घडलीं आहेत. पण या तजविजीमुळें कायद्याची मुदत संपली तरी खटले चालूच रहातील किंवा तीं मुदत संपण्यापूर्वी जर गुन्हे केले असतील तर नवे खटलेही भरतां येतील. अशा प्रकारचे हें संकटकालीन जाहीरनाम्याचें स्वरूप आहे. ग. जनरलला ऑर्डिनन्स काढण्याचें व स्वतःचे कायदे करण्याचे दिलेले अधिकार आणि संयुक्त घटनेंतील कायदेमंडळाला संकटकालीन कायदे करण्याचे दिलेले अधिकार यांत किती तरी फरक आहे. वास्तविकपणें हे सर्व अधिकार ग. जनरलला न देतां कायदेमंडळालाच द्यावयास पाहिजेत. तरच जबाबदारीची राज्यपद्धति सुरू झाली असें म्हणतां येईल. कायदेभंगाच्या दिवसांत आपण प्रांतिक व मध्यवर्ती कायदेमंडळाकडून ग. जनरलनें पास करून घेतलेले कायदे पाहिले आहेत. त्याचीच आठवण ह्या कायदे करण्याच्या सत्तेमुळें होते. ग. जनरलला आपण लोकांच्या संमतीनें राज्य करतों असें दाखवावयाचें असतें. त्याचेंच प्रत्यंतर या कलमामुळें येतें. फेडरेशनचा अंमल सुरू होण्यापूर्वीची जी १९१९ची घटना नांदत आहे तिचा हा अवशेष आहे.

व्हाइटपेपरमध्यें संयुक्त कायदेमंडळाला हे कायदे करण्याचा अधिकार आहे असें कलम घातलें नव्हतें. फेडरेशनला कोणते

कायदे करतां येतात याबद्दल जी यादी दिली होती, तींत पहिली बाब ही होती. ( The common defence of India in time of an Emergency declared by the Governor General. ) असा त्यांत उल्लेख होता.

संयुक्त सरकारचा हा जो कायदा केला जाईल त्यांत ऑर्डिनन्स व ग. जनरलच्या कायद्याचा समावेश होतो असें ३११(६) कलमावरून सिद्ध होतें.

दोन किंवा अधिक प्रांतांना जर असें वाटलें कीं, प्रांतिक यादींतील एखाद्या विषयासंबंधींची व्यवस्था फेडरल कायदेमंडळानें करावी, तर ते प्रांत दोन्ही कायदेगृहांचा तसा ठराव करून फेडरल कायदेमंडळाला तो अधिकार देऊं शकतील. हा कायदा फेडरल कायदेमंडळानें पास करणें पूर्ण कायदेशीर आहे. त्या कायद्यांत दुरुस्ती करणें अगर तो रद्द करणें हे प्रांताच्या कायदेमंडळाला करतां येईल.

या कलमाची जरुरी दोनतीन कारणांमुळें लागेल. पब्लिक सर्व्हिस कमिशन हे दोन प्रांतांकरतां या कलमामुळें नेमतां येईल. शेतकीसंशोधन, जंगलसुधारणा, आरोग्य वगैरे बाबी या दोन किंवा अधिक प्रांतांना समान असतात. तेव्हां अशा समाईक प्रश्नांची सोय या कलमानें केली आहे. शेषाधिकाराची विल्हेवाट काय लावावयाची याची वर चर्चा केलीच आहे. त्याचप्रमाणें आणखी दोन प्रश्न शिल्लक उरतात. एक नेव्हल डिसिप्लिन ॲक्ट आणि दुसरा ताहसंबंधींचा. आरमार, आरमारावरील अधिकारी वगैरेंच्या नियंत्रणासंबंधीचा जो कायदा आहे, तो फेडरल कायदेमंडळानें हिंदुस्थानांतील आरमारी दलांना लावावा. त्या कायद्यांत

हिंदुस्थानच्या परिस्थितीप्रमाणें थोडा फेरफार करण्याची सत्ता कायदे-मंडळाला आहे. पण त्या कायद्यांत आमूलाग्र फरक करण्याची सत्ता मात्र फेडरल कायदेमंडळाला दिलेली नाहीं.

संयुक्त कायदेमंडळाच्या यादींत 'तहनामे व करार यांची अंमलबजावणी' अशी एक बाब दिली आहे. पण या बाबीचा अर्थ प्रांत किंवा फेडरेटेड स्टेटमध्यें हे तहनामे व करार यांच्या अंमल-बजावणीसंबंधीं संयुक्त सरकारला कायदे करतां येतात असा नाहीं. प्रांतांत जर तहासंबंधीं कायदा करावयाचा असला तर तेथील कायदेमंडळांची व संस्थानांत करावयाचा असला तर संस्थानिकांची आगाऊ संमति घ्यावी लागेल.

फेडरल यादींत तह-करारासंबंधीं बाब असल्याकारणानें जर फेडरेशननें तेवढ्यापुरता कायदा केलेला असेल तर तो फेडरल कायदेमंडळाला रद्द करतां येतो. तसेंच त्या कराराची किंवा तहाची मुदत संपतांच प्रांत किंवा संस्थान यांनाहि कायदा करून फेडरेशनचा कायदा रद्द करतां येतो.

वर जो विशिष्ट बाबीपुरता अपवाद सांगितला आहे, तो सर्वच कायद्यांना लागू पडणार नाहीं. फेडरल यादी किंवा समायिक यादी यांत जे कांहीं विषय घातले असतील अगर घातले जातील त्यासंबंधींचे प्रांतांना किंवा सामील संस्थानांना लागू पडणारे कायदे करण्याचा फेडरेशनला अधिकार आहे तो हिरावून घेतला नाहीं.

तहनाम्यासंबंधीं जो वर अपवाद सांगितला, त्याला देशोदेशीं निरनिराळे आधार सांपडतात. अमेरिकेंत अध्यक्षानें जर एखादा तह केला तर तो घटनेंतील एक कायदा समजला जातो. इंग्लंडमध्यें हा तह म्हणजे एक करार समजतात व तो कायदेमंडळानें पास

केल्याशिवाय कायद्याचें स्वरूप पावत नाहीं. इंग्लंडसारख्या एकतंत्री राज्यपद्धतींत तहाला कायदेशीर स्वरूप देणें सोपें असतें, पण जेथें फेडरेशन्स आहेत, तेथें तो तह त्यांतील घटकांकडून कायद्याच्या रूपानें मान्य करून घ्यावा लागतो. हिंदुस्थानांत प्रांतिक गव्हर्नर्स व संस्थानिक यांची आगाऊ परवानगी असली म्हणजे ह्या कायद्याचीं द्वारें मुक्त होऊं शकतात.

वर ज्या तीन याद्यांचा परामर्ष घेतला, त्या (१) संयुक्त राज्यघटनेच्या कक्षेंतील (२) प्रांताच्या कक्षेंतील व (३) उभयतांच्या कक्षेंतील अशा तीन प्रकारच्या आहेत. तिसऱ्या यादीमुळें पुष्कळ वेळां एका सत्तेचें दुसऱ्या सत्तेवर आक्रमण होण्याचा संभव आहे. कित्येक वेळां त्यांत विरोध किंवा विसंगतीहि होणें शक्य आहे. अशा प्रकारचे प्रसंग उद्भवले असतां काय करावें याची तजवीज कायद्यामध्यें केली आहे.

प्रांतानें प्रांताच्या यादींतील कायदे करावेत व फेडरेशननें फेडरेशनविषयक कायदे करावेत हें सरळ आहे. पण तिसऱ्या म्हणजे समायिक यादींतील कायदे दोन्ही कायदेमंडळांना करण्याचा अधिकार असल्यामुळें त्यांत घोटाळे माजूं शकतील. ते घोटाळे टाळण्याचा प्रयत्न खालील प्रकारें केला आहे. फेडरल कायदेमंडळाला समायिक यादींतील एखाद्या विषयासंबंधी कायदे करण्याचा जो अधिकार आहे त्या अधिकारान्वयें त्यांनीं जर एखादा कायदा केला तर त्या कायद्यांतील कांहीं बाबी किंवा विद्यमान हिंदी कायद्यांतील बाबी या जर प्रांतिक कायद्याच्या बाबीशीं विरोधी असतील तर प्रांताचा कायदा न चालतां फेडरेशनचा तद्विषयक कायदा ह्याच प्रमाण मानण्यांत येईल. मग हा फेडरेशनचा कायदा किंवा

विद्यमान हिंदी कायदा हा प्रांतानें केलेल्या तद्विषयक कायद्याच्या पूर्वी पास झालेला असो किंवा नंतर पास होवो.

तसेंच जर एखादा समाईक विषयाबाबतचा प्रांतिक कायदा हा अगोदर केलेल्या फेडरल कायद्याशीं किंवा विद्यमान हिंदी कायद्याशीं विरोधी असेल व त्या प्रांतिक कायद्याला जर ग. जनरल व बादशहा यांची संमति मिळाली असेल तर प्रांताच्या कायद्याची सरशी होईल व फेडरल कायद्याची पिछेहाट होईल. तथापि फेडरल कायदेमंडळाला त्या बाबीसंबंधीं ग. जनरलच्या आगाऊ मंजुरीनें अधिक कायदे करण्याचा अधिकार राहील.

संस्थानिकांनीं संयुक्त घटनेला ज्या विषयाबद्दल मान्यता दिली असेल, त्याविषयासंबंधीं संस्थानिकांचे जे कायदे असतील, ते जर फेडरेशनच्या त्या विषयाच्या कायद्याशीं विरोधी असतील तर संस्थानिकांचा कायदा न चालतां फेडरेशनचा कायदा चालेल.

इतक्या कायद्यांच्या वेष्टनांनीं जरी समाईक यादी बांधली गेली असली तरी भांडणाचे अनेक प्रसंग उद्भवतील व कोर्टाची मदत वेळोवेळीं अधिकारांच्या निर्णयार्थ घ्यावी लागेल.

## कायदे करण्याच्या सत्तेला निर्बंध.

ग. जनरलच्या खास परवानगीवांचून कोणतीं बिलें अगर कायदे-दुरुस्त्या फेडरल असेंब्लीला करतां येणार नाहींत तें आतां आपण पाहूं. ही परवानगी देणें अगर नाकारणें हें सर्वस्वीं त्याच्या विवेचक बुद्धीवर सोपविलें आहे. जर एखादें बिल किंवा एखादी कायद्याची दुरुस्तीः—

(१) ब्रिटिश हिंदुस्थानला लागू असणारा पार्लमेंटचा कायदा रद्द करीत असेल, त्यांत दुरुस्ती करीत असेल किंवा विरोधी असेल,

किंवा (२) एखादें बिल किंवा दुरुस्ती गव्हर्नर व ग.जनरलचा कायदा अथवा दोघांनीं स्वतंत्रपणें काढलेले ऑर्डिनन्स रद्द अगर दुरुस्त करीत असेल किंवा त्याला विरोधी असेल,

किंवा (३) गव्हर्नर जनरलच्या विवेचक बुद्धीनें करावयाच्या गोष्टींना बाध आणणारें असेल,

किंवा (४) पोलिसफौजेसंबंधीचा कायदा रद्द, दुरुस्त करीत असेल अगर त्याला बाध आणीत असेल,

किंवा (५) युरोपिअन ब्रिटिश प्रजाजनांच्या संबंधीं फौजदारी खटल्यांतील 'प्रोसीजर'ला बाध आणीत असेल,

किंवा (६) ब्रिटिश हिंदुस्थानांत न रहाणाऱ्या लोकांवर, ब्रिटिश हिंदुस्थानांत रहाणाऱ्या लोकांपेक्षां अधिक कर बसवीत असेल किंवा बिन ब्रिटिश इंडियन कंपन्यांवर ब्रिटिश इंडियन कंपन्यांपेक्षां अधिक कर बसवीत असेल.

किंवा (७) युनायटेड किंगडममध्यें (म्हणजे इंग्लंड, स्कॉटलंड व उत्तर आयर्लंडमध्यें ) ज्या उत्पन्नावर कर बसविला असेल किंवा बसण्यासारख्या असेल, त्या उत्पन्नावर कराची सूट(Relief) देण्यास बाधा करणारा कोणताहि कायदा करीत असेल तर अशा सर्व बिलांना व दुरुस्त्यांना ग. जनरलची पूर्व मंजुरी लागेल.

या सात निषिद्ध बाबींपैकीं. १,२,३व५ या बाबींत (गव्हर्नरच्या-संबंधी उल्लेख वगळून ) ग. जनरलच्या परवानगीवांचून संयुक्त कायदेमंडळाप्रमाणेंच प्रांतिक कायदेमंडळांतहि बिल आणतां येणार नाहीं. तसेंच गव्हर्नरच्या कायद्यांत किंवा ऑर्डिनन्समध्यें आणि पोलिसांच्या कायद्यांमध्यें रद्दी दुरुस्ती वगैरे करावयाची असेल तर गव्हर्नरची परवानगी लागेल.

ग. जनरलनें किंवा गव्हर्नरनें एखाद्या बिलाला परवानगी दिली म्हणून तो तीं बिलें पास झाल्यावर नामंजूर करूं शकत नाहीं असें नाहीं. तसेंच एखाद्या बिलाला पूर्व संमति नव्हती एवढ्याकरितां पास झालेलें एखादें बिल जर गव्हर्नर, गव्हर्नर जनरल किंवा बादशहा यांनीं आपापल्या अखत्याराप्रमाणें मान्य केलें तर पूर्वसंमति नाहीं म्हणून तें रद्द ठरत नाहीं. त्याचा कायदा होतो. शेवटीं कोणत्याहि कायदेमंडळाला बादशहा, त्यांचें कुटुंब व राजघराणें व त्यांचे हक्क, गादीवर येणें याबद्दल कायदे करतां येत नाहींत असें सांगितलें आहे. आर्मी ॲक्ट, वैमानिक कायदा, नाविक कायदा वगैरेबद्दलहि कायदे करण्यास बंदी आहे. पार्लमेंटच्या हिंदुस्थानविषयक कायदेकर्तृत्वाला बाध आणील असा कोणताहि कायदा हिंदी कायदेमंडळाला करतां येणार नाहीं. याशिवाय हिंदी कायदेमंडळांत आणखी कोणते कायदे करतां येणार नाहींत तेंहि सांगितलें आहे. जर या कायद्यांत कांहीं अपवाद केले असतील तर ते सोडून (१) १९३५ च्या कायद्यांतील कोणत्याहि बाबतींतील दुरुस्ती करणें (२) ऑर्डर इन कौन्सिल म्हणजे पार्लमेंटच्या फर्मानांत दुरुस्ती करणें (३) सेक्रेटरी ऑफ स्टेट, ग. जनरल किंवा गव्हर्नर्स यांनीं या कायद्याला अनुसरून विवेचक बुद्धीनें किंवा वैयक्तिक निर्णयानें जे नियम केले असतील त्यांत दुरुस्ती करणें, यासंबंधीं कायदे करतां येणार नाहींत. तसेंच या कायद्यांत खास परवानगी दिली असेल तेवढी सोडून राजाला जो कोणत्याहि कोर्टाच्या निर्णयावर अपील करण्यास परवानगी देण्याचा खास हक्क आहे तो बाधित होईल असा कायदा करण्याचा कायदेमंडळांना अधिकार नाहीं.

हें निषिद्ध कायद्याचें स्वरूप इतकें उग्र आहे कीं, त्याच्या मेसूर-पणांत जबाबदारीचें रोपटें कसें जगूं शकेल याचीच शंका येते.

ग. जनरल किंवा गव्हर्नर्स यांच्या परवानगीवांचून अमुक बिलें आणूं नयेत असे जे निषेध कायद्यानें सांगितले आहेत त्याचा अर्थ काय ? ग. जनरल व गव्हर्नर्स यांनीं कोणत्या बिलांना परवानगी द्यावी आणि कोणत्या बिलाला परवानगी नाकारावी याबद्दल त्यांना तरी मार्गदर्शक होणारें कांहीं सांगितलें आहे काय ? पार्लमेंटांत याबद्दल चर्चा करतांना ॲटर्नी–जनरल म्हणाले, ' पार्लमेंटच्या कायद्यासंबंधीं तीन पर्याय संभवूं शकतात. पहिला मार्ग म्हणजे आहे त्यांत बिलकूल बदल होऊं द्यावयाचा नाहीं. याचा अर्थ असा कीं, पार्लमेंटच्या कायद्याला विरोधी अस-णारा कोणताहि कायदा करणें अशक्य करून टाकणें व केल्यास तो निरर्थक ठरविणें. दुसरा मार्ग म्हणजे वसाहतींना वेस्टमिनिस्ट-रच्या कायद्याप्रमाणें पार्लमेंटाच्या कायद्यांत ज्याप्रमाणें वाटेल तो बदल करतां येतो तसा करूं देणें. आम्हांला हे दोन्ही मार्ग पसंत नाहींत.पूर्ण बंदी आणि पूर्ण स्वातंत्र्य हे आम्ही दोन्ही नापसंत करतों. आम्ही तिसरा म्हणजे मधला मार्ग घेतो. आम्ही कांहीं विषय घेऊन त्यावर हिंदी कायदेमंडळाची सत्ता चालणार नाहीं असें ठरवून टाकणार ! ' कोणत्या बाबतींत कायदे करतांच येणार नाहींत,त्यांचा उल्लेख वर केला आहे. बादशहा, त्याचें कुटुंब, सैन्य, आरमार, विमानविषयक कायदे,तसेंच नवा कायदा दुरुस्त करण्याचे कायदे वगैरे बाबींना हातच लावतां येणार नाहीं. बाकी जे प्रश्न उरतात, त्यासंबंधी कायदे करूं द्यावयाचे किंवा नाहीं हें गव्हर्नर जनरल व

गव्हर्नर्स ठरवतील म्हणूनच त्यांची आगाऊ परवानगी घ्यावी असें म्हटलें आहे.

आज्ञापत्रकांत ग. जनरलला पार्लमेंटचे हिंदुस्थानविषयक जे कायदे असतील त्याला विरोधी असणारे कायदे करणारें बिल आलें तर तें अमान्य करावें असें सांगितलें आहे आणि ग. जनरलनें एखाद्या अशा बिलाला परवानगी दिली तर राजेसाहेबांनीं ती योग्य का अयोग्य हें स्वतःच्या बुद्धीनें ठरवावें असें सांगितलें आहे.

शेवटची सत्ता ब्रिटिश मंत्रिमंडळाच्या हातीं असल्यामुळें तुम्ही भिऊं नका, असें ॲटर्नी जनरलनें आपल्या भाईंना अभय दिलें आहे. पार्लमेंटचें वर्चस्व अबाधित ठेवण्याचा हा प्रयत्न कायद्याचा विचार केला तर अयोग्य आहे असें कोण म्हणूं शकेल ? कारण निर-निराळे देश इंग्लंडनें जिंकले, संपादन केले, किंवा लुबाडले; पण संपत्ति कोणत्या मार्गानें आली तिचें मूळ जसें पाहूं नये म्हणतात, त्याप्रमाणें निरनिराळे देश कसेंहि त्यांनीं मिळविले असले तरी त्यांचें स्वामित्व पार्लमेंटकडे आहे व पार्लमेंटची सत्ता त्या देशावर आहे. बिचारा हिंदुस्थान देश हा वसाहतीइतकाहि पुढें सरसावला नाहीं तेव्हां पार्लमेंटचे कायदे उधळून लावण्याइतकी सत्ता हिंदुस्थानला दिली जाणें हें स्वप्नच होतें. त्यामुळें हिंदुस्थानला घटनादुरुस्ती-सारखा साधा हक्कहि मिळाला नाहीं तर आश्चर्य नाहीं. घटनेंत दुरुस्ती हवी असेल तर पार्लमेंटचे पाय धरावे लागतील. पार्लमेंटची ही सत्ता हिंदुस्थानांत जें फेडरेशन येऊं पहात आहे त्यांतील सर्व घटकांवर चालणार नाहीं. हिंदुस्थानांतील संस्थानें हीं पार्लमेंटच्या सार्वभौमत्वाखालीं येत नाहींत. हिंदुस्थानची घटना बदलण्याचा ठराव जर पार्लमेंटनें केला तर तो संस्थानांना लागूं पडेलच असें

नाहीं. त्यांच्या संमतीचा एक अडसर कायद्यानें घालून ठेवला आहे. या संमतीच्या अडचणीमुळें पार्लमेंटनें सुद्धां आपली सत्ता बाह्यतः तरी मर्यादित केली आहे.

हिंदी कायदेमंडळांना राजेसाहेबांची जी पॅरामौंटसीची सत्ता आहे तिला हात लावतां येत नाहीं. तसेंच १९०२ चा फॉरिन ज्युरिसडिक्शनच्या कायद्यालाहि स्पर्श करतां येणार नाहीं.

जेथें वसाहतींना स्वराज्य मिळालें आहे, तेथें घटनेंत बदल करण्याला त्यांना सत्ता दिली आहे. १८६५ चा हा कलोनिअल व्हॅलिडिटि कायदा करतांना त्यांतून हिंदुस्थान वगळला आहे. कारण हिंदुस्थान ही कॉलनी नाहीं !

घटना बदलण्याची सत्ता ऑस्ट्रेलियाला देतांना एवढेंच सांगितलें गेलें कीं, पार्लमेंटच्या कायद्याप्रमाणें ती बदलावयास हवी. सर्व घटकांच्या कायदेमंडळांत निखालस बहुमत (एकंदर सभासद असतील त्यांच्यापैकीं निम्यापेक्षां जास्त—हजर सभासद नव्हेत—) असेल तर ही घटना बदलतां येईल व ती अंमलांत आणण्यापूर्वी रेफरेंडम्—मतदारांची अनुमति—घ्यावयास लागेल. कानडा या बाबतींत बराच मागें आहे. तेथें मध्यवर्ती सत्ता व घटक सत्ता यांची कार्यक्षेत्रें इतकीं सक्त रीतीनें तोडलीं आहेत कीं, घटना बदलण्याची सत्ता कोणाला द्यावी याबद्दल निर्णय करणें कठीण आहे. म्हणून लहानसहान बाबतींतसुद्धां त्यांना पार्लमेंटकडे धावावें लागतें. वेस्टमिनिस्टर कायद्यानेंहि त्यांना हात दिला नाहीं. पण कानडांतील प्रांतांना मात्र घटना दुरुस्ती करण्याची सत्ता दिली आहे. फक्त ले. गव्हर्नरच्या ऑफिसला त्यांना हात लावतां येत नाहीं.

हिंदुस्थानांत जी सत्तेची वांटणी केली, ती कानडा कायद्याच्या धर्तीवर केली. त्यामुळें अन्तर्गत घटनेंतील दुरुस्ती कोणतेंहि कायदेमंडळ एकटें किंवा सर्व कायदेमंडळें एकवटून करूं शकत नाहींत. मात्र किरकोळ दुरुस्त्या करण्याची सत्ता त्यांना नाहीं असें नाहीं.

व्हाइटपेपरनें असें म्हटलें होतें कीं, ठराविक मर्यादेंत कायदेमंडळांना घटनादुरुस्तीची सत्ता द्यावी. पण जॉइंट सिलेक्ट कमिटीनें ही सूचना धुडकावली. ही कमिटी म्हणते, 'अशा पुष्कळ बाबी आहेत कीं, ज्या मध्यवर्ती किंवा प्रांतिक कायदेमंडळांना कालांतरानें दुरुस्त करतां येतील. पण व्यावहारिक राजकारणाचा विचार करतां आतांच त्यांना तशी सत्ता देणें गैर मुत्सद्देगिरीचें आहे. ही सत्ता देण्यापूर्वी किती जणांच्या तरी हितसंबंधाचा व किती गोष्टींचा आपल्याला विचार करावा लागेल ! संस्थानें व प्रांत, अल्पसंख्यांक व बहुसंख्यांक, या सर्वांचा परस्परांवर काय परिणाम होईल याचाहि विचार करावा लागेल. त्यांच्यांत समतोलपणा ठेवणें जरूर आहे. पण घटना बदलण्याची ही सत्ता फेडरेशन व तिचे घटक यांना न दिल्यामुळें घटनेंत दोष रहातो हें खरें असो वा नसो, हा प्रश्न निकडीचा नाहीं. आपण जर ही सत्ता देऊन टाकली तर सुरवातीलाच घोटाळे माजतील. पण आपण अशी एक योजना आखावी, किंवा ऑर्डर इन कौन्सिलमार्फत ती पुकारावी कीं, जीमुळें कायदेमंडळांत कितीजण असावेत, ते कोणाचे बनवावे, मतदानाचा हक्क कोणाला द्यावा यासंबंधीं दुरुस्त्या कायदेमंडळांना करतां याव्यात.' ३०८ कलमांत त्याची योजना दिली आहे. श्री. जयकरांनीं ही योजना सुचविली व ती 'जयकर्स प्रोसीजर' म्हणून समाविष्ट केली गेली.

अशा प्रकारें पार्लमेंटला हिंदुस्थानविषयकघटना कायदे करण्याची सुपारी देऊन टाकून फेडरेशनच्या मूलभूत तत्त्वाला नख लावण्यांत आलें आहे. घटनादुरुस्तीची सत्ता ही संयुक्त घटनेच्या घटकांना किंवा फेडरेशनला असावयास पाहिजे. ती पार्लमेंटनेंच आपल्या हातीं ठेवली आहे. कांहीं कांहीं बाबतींत तर इतकी कडक बंधनें घातलीं आहेत कीं, कायदे करणाऱ्या सभासदांचें तोंड व हातपाय बांधले जावेत. कांहीं बिलांना गव्हर्नरची आगाऊ संमति घ्यावी लागते तर कांहीं बिलें मुळीं आणतांच येत नाहींत. ही जबाबदारीच्या राज्य-पद्धतीची व फेडरेशनची थट्टा आहे व हिंदुस्थानचें शोकपूर्ण विडंबन आहे.

ग. जनरल व गव्हर्नर यांच्या हातीं कांहीं बिलें पास झालीं तरी तीं नामंजूर करण्याची म्हणजे व्हेटोची सत्ता दिली आहे. अशा प्रकारें कांहीं बिलें मुळीं आणतांच येत नाहींत, कांहीं बिलें आणा-वयाचीं असतील तर त्यांना ग. जनरल व गव्हर्नर यांची परवानगी लागते. याहि दिव्यांतून सुटलेली व पास झालेलीं बिलें गव्हर्नर, ग. जनरल व बादशहा फेटाळून देऊं शकतात. याशिवाय युरो-पिअन लोकांना जांवयांसारखें वागविलें आहे तें वेगळेंच. त्यांच्या हक्कांना बाध येणारें बिल आणतांच येणार नाहीं. या सर्व प्रति-बंधांचा अर्थ इतकाच कीं, हिंदुस्थानला कायदे करण्याचा जो अधिकार आहे तोहि अत्यंत थोडा, मर्यादित व अनेक बंधनांनीं युक्त असा आहे.

असा एक प्रयत्न विलायतेंत चालला होता कीं, वर जी प्रांत व संयुक्त घटना यांच्या विषयाची समाईक यादी दिली आहे ती शक्य तितकी कमी करावी. त्यामुळें उभय सत्तांमध्यें उद्भवणारी

भांडणें टळतील. हिंदुस्थानांत ज्या दोन जाती आहेत, त्यांपैकीं एकीला प्रांताच्या वांट्याला जितकी सत्ता येईल ततकी पाहिजे आहे; पण अद्याप ही यादी आखूड झाली नाहीं.

डॉ. शफत अहमदखान यांनीं आपल्या पुस्तकांत आणखी एक मुद्दा काढला आहे, तिकडेहि आपलें लक्ष जाणें जरूर आहे. तें म्हणतात संस्थानिकांनीं पॅरामाऊंट सत्तेला ज्या विषयासंबंधीं अधिकार दिले आहेत, त्या विषयावर मालकी कोणाची ह्या प्रश्नाचें उत्तर कायद्यांत दिलें नाहीं. उदाहरण म्हणून त्यांनीं असें सांगितलें आहे. रेल्वेकरतां संस्थानिकांनीं कांहीं जमीनी हिंदुस्थानसरकारला दिल्या.आतां प्रश्न असा येतो कीं, संस्थानिकांनीं ज्या जमिनींचें अधिकारक्षेत्र सरकारला वहिवाटावयास दिलें त्या जमिनींवरचे मालकी हक्क कोणाचे ? वहिवाटीकरतां दिलेले हक्क व मालकी हक्क यांच्या मर्यादा कोणत्या ? संस्थानिकांनीं हा प्रश्न आपल्या मान्यतापत्रकाचे वेळीं उपस्थित केला पाहिजे.

## अधिराज्याची व्याख्या नाहीं.

सबंध कायद्यांत 'पॅरामौंटसी' म्हणजे काय याची व्याख्या केली नाहीं. उलट ती व्याख्या करावयाची नाहीं असा निश्चय दिसतो. सर सॅम्युअल होअर म्हणाले कीं, जर ही व्याख्या करून टाकली तर संस्थानावरील आमची अधिराज्याची मर्यादा खुंटलीच. त्या ऐवजीं आम्हांला पॅरामौंटसीच्या नांवाखालीं अधिक क्षेत्र व्यापावयास सांपडलें तर हवें आहे. त्याला व्याख्येमुळें नियंत्रण घातलें जाईल. बटलर कमिटीनेंहि ही व्याख्या केली नाहीं.

संस्थानिकांच्या अरेरावी वृत्तीमुळें त्यांची कींव करूं नये असें वाटत असलें तरी ब्रिटिश सरकारनीं फेडरेशनच्या निमित्तानें त्यांना चांगलें फसवलें यांत शंका नाहीं. संस्थानिक ज्या अनेक कारणां-

करतां फेडरेशनची तळी एकदम उचलते झाले, त्यांपैकीं एक कारण म्हणजे पोलिटिकल एजंटस्, रेसिडेंटस् व इतर अधिकारी यांचा सासूबाईपणा कमी होईल ही त्यांना वांटणारी आशा. सात वर्षें-पर्यंत संस्थानिकांनीं अविश्रांत परिश्रम केले; पण हें खातें कांहीं त्यांच्या डोक्यावरचें सुटत नाहीं. आतां व्हाइसरॉयच्या प्रत्यक्ष देखरेखीखालीं हें खातें चालू रहाणारच आहे. या खात्यामध्यें १९३३ अखेर १०८ अधिकारी होते. ते निव्वळ संस्थानांवरच अंमल गाजविण्याकरतां नेमले जातात असें नाहीं. अफगाणिस्थान, नेपाळ, काशगर, इराण व इराणी आखात, बलुचिस्थान, सरहद्द प्रांत वगैरे ठिकाणीं जे वकील नेमले जातात ते या खात्यामार्फतच. संस्थानिकांना आतां त्रास होणार आहे तो विशेष स्वरूपाचा होणार आहे. त्यांनीं आपल्या सत्तेचा कांहीं भाग फेडरेशनला देऊन टाकून त्यावर ग. जनरल व संयुक्त कायदेमंडळ यांचा अंमल सुरू करून घेतला. त्यांनीं ज्या बाबी आपल्या हातांत म्हणून ठेवल्या त्यांवर रेसिडेंटची सारखी करडी नजर रहाणार. जर पॅरा-मौंटसीची व्याख्या ठरली असती व इतक्या इतक्या बाबतींत संस्थानिकांना स्वातंत्र्य आहे असें ठरलें असतें, तर संस्थानिकांना आपण राजे आहों असें वाटलें असतें; पण ही व्याख्या ठरली नसल्यामुळें रेसिडेंट किंवा पोलिटिकल एजंट कोणत्या राजकुमारीशीं संस्थानिकानें लग्न करावें या प्रश्नापासून तो संस्थानांत होणाऱ्या बंडाळीपर्यंत लक्ष घालूं शकेल. बिचारे संस्थानिक या एजंटापुढें नेहमींच चळचळां कांपत असल्यामुळें त्यांचा चांगलाच कोंडमारा होणार आहे. अशा प्रकारें संस्थानिकांनीं पॅरामौंटसीकरतां आपलें कांहीं स्वातंत्र्य बादशहाला दिलें व फेडरेशनकरतां कांहीं स्वातंत्र्य हिंदी

सरकारला दिलें आणि हे नुसते राजे म्हणूनच राहिले. त्यांना असे वाटत होतें कीं, पोलिटिकल खात्यांत सनदशीर राज्यकारभार सुरू होईल. म्हणजेच ते एखाद्या मंत्र्याच्या ताब्यांत जाऊन त्यांचा छळ थांबेल. पण बिचाऱ्यांची पूर्ण निराशा व सपशेल फसगत होऊन पोलिटिकल खातें होतें तसेंच कायम राहिलें.

याचा एक परिणाम होणार आहे तो असा. संस्थानिकांच्या पुढें यानंतर दोन विकल्प रहातील. त्यांची सत्ता जाणार यांत तर वादच नाहीं. ही सत्ता एक तर त्यांना ब्रिटिश सरकारला देऊन टाकावी लागेल किंवा आपल्या प्रजेच्या हातांत या सत्तेचें संक्रमण करावें लागेल. संस्थानिक शहाणे असतील तर ते काळाचा ओघ पाहून प्रजेला शासनाचे हक्क देतील. आणि दुर्दैवानें त्यांना जर प्रजेवर सूड उगवण्याची बुद्धीच झाली तर प्रजेशीं ते जास्त जास्त फटकून वागतील आणि साम्राज्यसरकारच्या जास्त जास्त आहारीं जातील. फेडरेशनमुळें कांहीं बाबींत संस्थानी प्रजा व हिंदी प्रजा यांना समान कायदे लागू होणार आहेत. आतांपर्यंत हिंदी प्रजा व संस्थानी प्रजा यांच्यांत कमी दळणवळण नव्हतें. पण आतां एकाच कायद्याखालीं दोघेहि प्रजाजन येणार असल्यामुळें त्यांच्या चळवळीला अधिक अवकाश मिळणार आहे. हिंदी प्रजा व संस्थानी प्रजा यांची जशी एक फळी निर्माण होईल तशी संस्थानिक व ब्रिटिश साम्राज्यशाही यांची फळी निर्माण होईल. या दोन शासक व शास्ते यांचे लढे पुढील काळांत होणें असंभवनीय नाहीं. फेडरेशनमध्यें संस्थानिकांना भरमसाट जागा देऊन त्यांचें फेडरेशनमध्यें हितसंबंध निर्माण केले आहेत. हें फेडरेशन संस्थानिकांचें माहेरघर होणार असल्यामुळें त्यांत आपल्या प्रजेला प्रतिनिधित्व न मिळणें हें संस्थानिकांच्या हिताचें आहे असें ब्रिटिश मुत्सद्दी त्यांना सांगत आले असले पाहिजेत. तेव्हां प्रांतिक सत्ता जरी लोकांच्या ताब्यांत

दिली असली तरी फेडरल सत्ता संस्थानिकांच्या व आर्थिक हितसंबंधीं लोकांच्या ताब्यांत दिली आहे. त्यामुळें ती सत्ता जास्त जास्त लोकहितविरोधी व साम्राज्यशाहीची पुरस्कर्ती अशी होत जाणार आहे. या सत्तेभोंवतीं संस्थानिकांना बांधून ठेवणें हेंच ब्रिटिश राजनीतीचें यशस्वी राजकारण आहे. ब्रिटिश मुत्सद्यांनीं अगदीं मामुली अगर निरुपद्रवी सत्तेचा कांहीं भाग संस्थानिकांपासून घेऊन त्यांना फेडरल कायदेमंडळांत प्रमाणबाह्य प्रतिनिधित्वाची देणगी दिली. आतां संस्थानिकांनीं फेडरेशन टिकवलें तरच त्यांचे अष्टाधिकार टिकतील अशी परिस्थिति निर्माण केली आहे. अशाप्रकारें संस्थानिकांच्या करवीं हिंदी लोकांच्या राजकीय आकांक्षा गारद करण्याचा हा डाव फेडरेशनच्या निमित्तानें खेळला जात आहे. यापुढें संस्थानिकांना ब्रिटिश सत्तेशीं जास्त जास्त संलग्न होण्यावांचून गत्यंतरच नाहीं. कॉंग्रेसचे पुढारी फेडरेशनविरुद्ध जे अनेक आक्षेप काढतात, त्यांतील प्रमुख आक्षेप संस्थानी प्रजेला न मिळालेल्या प्रतिनिधित्वाबद्दल आहे. पण संस्थानी प्रजेला प्रतिनिधित्व मिळणें म्हणजे ब्रिटिशांच्या सात वर्षांच्या कारस्थानाचा धुव्वा उडविणें आहे. यांत कॉंग्रेस यशस्वी झाली तर पुढील यशहि तिला मिळवितां येईल. पण या मूलभूत गोष्टींतच जर ब्रिटिश मुत्सद्दी हटवादी राहिले तर फेडरेशन स्वीकारण्याचा विचार करणेंहि चूक ठरेल. अशा परिस्थितींत फेडरेशनला आपल्या मान्यतापत्रकाद्वारें कबूली देणें किती अयोग्य होणार आहे याचा संस्थानिकांनीं विचार करावा. हिंदुस्थानच्या हिताचे शत्रू बनून ते ब्रिटिश साम्राज्य कांहीं दिवस जगवूं शकतील पण ती अंतकाल लांबवण्याची मूर्ख युक्ति आहे. त्यांचें जीवित जर खरें उपयुक्त व्हावयाचें असेल तर त्यांनीं फेडरेशनमध्यें जातां कामा नये.

---

# १३
# भेदाभेदप्रतिबंधक योजना

हिंदुस्थानच्या राज्यघटनेचा पट विणतांना विवेचक बुद्धि व वैयक्तिक निर्णय, यांचे आडवेउभे धागे घातले आहेत, खास जबाबदारीची जरतारी किनार त्याला लावली आहे आणि राखीव बाबींचा लफ्फेदार पदरहि बनवला आहे. या पटाच्या ज्या कुरळ्या कापल्या जातील तेवढ्या लोकांच्या पदरांत पडणार आहेत. ही विवेचक बुद्धि म्हणजे लोकांना फसविण्याची एक सुंदर युक्ति आहे. तिचा विस्तार व व्याप किती आहे हें ठिकठिकाणीं दाखविलें आहे. पण या विवेचक बुद्धीवर एक खंड लिहून नव्या कायद्यानें ब्रिटिश लोकांच्या हक्काचें भरभक्कम संरक्षण केलें आहे.

ब्रिटिश लोकांना म्हणे अशी भीति वाटली कीं, हिंदुस्थानला फेडरेशनमुळें स्वातंत्र्य मिळणार आहे व हें स्वातंत्र्य मिळालें म्हणजे आपल्याला हिंदुस्थानांत मज्जाव होईल, आपल्या व्यापारावर जादा कर बसवतील, आपला व्यापार मारून टाकतील. ह्या कांगावखोरपणा करून त्यांनीं आपले हक्क चांगले व्यवस्थित करून घेतले आहेत व हे हक्क खुद्द गव्हर्नर्स व ग.जनरल साहेब आपल्या विवेचक बुद्धीनें बजावणार आहेत. त्या हक्कांची थोडक्यांत रूपरेषा खालीं दिली आहे.

कोणत्याहि ब्रिटिश प्रजाजनाला हिंदुस्थानांत यावयास प्रतिबंध नसावा. त्याच्या प्रवासाला, व्यापाराला, इस्टेट करण्याला,

नोकरीला, मिळकतीची खरेदीविक्री करण्याला किंवा डॉक्टरी-वकिली-सारखे धंदे करण्याला वंश, वर्ण, भाषा, जन्म, वास्तव्य वगैरे कारणांमुळें मनाई नसावी. यांपैकीं एखादी व्यक्ति अनिष्ट असली तर तसा प्रतिबंध करतां येतो. बंडाळीच्या काळांत हे नियम तहकूब करण्याचा गव्हर्नर किंवा ग. जनरल यांना अधिकार आहे. मात्र हिंदुस्थानांत रहात असलेल्या ब्रिटिश प्रजाजनाला युनायटेड् किंगडम-मध्यें तशाच सवलती तशाच परिस्थितींत मिळत असाव्यात. युनायटेड किंग्डममध्यें त्याला जर अशा सवलती नसतील, तर हिंदुस्थाननें त्या सवलती ब्रिटिश प्रजाजनाला देण्याचें कारण नाहीं. विशिष्ट प्रसंगीं एखाद्याला प्रतिबंध करण्याचे जे नियम केले जातील ते दोघांनाहि पाळावे लागतील. राज्य उलथून पाडण्याचे अत्याचारी प्रयत्न अगर चळवळी करणाऱ्या ब्रिटिश प्रजाजनांना बंदीहि करतां येईल.

डॉ. कीथ म्हणतात, "These provisions are certainly liable to be regarded as oppressive and unfair!" ह्या तजविजी जुलमी व गैरवाजवी आहेत असें समजलें जाण्याचा खास संभव आहे. वसाहतींत रहाणाऱ्या लोकांच्या विरुद्ध भेदा-भेददर्शक नियम करतां येतील हें एक दैवच म्हणावयाचें!

कर बसविण्याच्या बाबतींतसुद्धां असेच परस्परावलंबी कायदे केले आहेत. युनायटेड किंग्डममध्यें किंवा ब्रह्मदेशांत रहाणाऱ्या व्यक्तीवर भेदाभेद करणारे कर बसवूं नयेत. तसेंच तेथें स्थापन झालेल्या अगर स्थापन होणाऱ्या कंपन्यांवर निराळे कर बसवूं नयेत. कंपन्या कोठें निघाल्या, त्यांचें रजिस्टर्ड ऑफिस कोठें असावें, त्यांचें भांडवल कोणत्या चलनांत असावें किंवा त्या कंप-न्यांचे डायरेक्टर्स, नोकर, एजंट, भागीदार कोणत्या जातीचे,

धर्माचे, वंशाचे, भाषेचे असावें वगैरेसंबंधी नियम जर हिंदी कायदेमंडळानें केलें तर ते नियम युनायटेड किंग्डम अगर ब्रह्मदेशमध्यें स्थापन झालेल्या अगर स्थापन होणाऱ्या कंपन्यांनीं पाळलेले आहेत असें समजावें. याचा अर्थ ते नियम युनायटेड किंग्डम किंवा ब्रह्मदेशानें अगोदरच परिपूर्ण केले आहेत असें गृहीत धरून चालावयाचें आहे. जपान किंवा जर्मनीसारख्या परक्या लोकांसंबंधीं करावयाचे नियम इंग्लिश माणसाला अगर कंपनीला लागू करतां यावयाचे नाहींत असा याचा अर्थ आहे.

हिंदी कायदेमंडळाला ज्याप्रमाणें असे कायदे करतां येणार नाहींत, तसेंच युनायटेड किंग्डमलाहि हिंदुस्थानांत स्थापन झालेल्या व युनायटेड किंगडममध्यें व्यापार करणाऱ्या हिंदी कंपन्यांबद्दल कायदे पास करतां येणार नाहींत.

व्यक्ती अगर कंपन्या यांत भेदाभेद करूं नये असें वर सांगितलें. आतां पुढें त्यांना कशा प्रकारें वागवावें हेंहि सांगितलें आहे. नव्या कायद्याप्रमाणें स्थापन झालेल्या एखाद्या कंपनीला जर हिंदी कायदेमंडळानें संपूर्ण कर माफ केला अगर अंशतः कराची माफी दिली किंवा त्यांना खास सवलती दिल्या तर तशीच करमाफी अगर सवलत युनायटेड किंगडममध्यें स्थापन झालेल्या व हिंदुस्थानांत व्यापार करणाऱ्या कंपनीला दिली पाहिजे. पण आपण असें समजूं कीं, जात, वंश, वर्ण, भाषा वगैरे अथवा भांडवलाचें नाणें, कंपनीचें उत्पत्तिस्थान वगैरे बाबींशिवाय इतर कारणांनीं युनायटेड किंग्डमच्या कायद्यांनीं जर हिंदुस्थानांत स्थापन झालेल्या व युनायटेड किंग्डममध्यें व्यापार करणाऱ्या कंपन्यांवर जादा कर बसविले तर आम्ही काय करावयाचें ? असे कर बसविण्यास वरील

कारणांशिवाय इतर कारणें असतील तर त्याला हरकत नाहीं असा त्याचा अर्थ होतो. हिंदुस्थानलाहि तशीच परवानगी आहे असें धरून चालावयास हरकत कोणती ?

यापुढें हिंदुस्थानांत स्थापन झालेल्या अगर होणाऱ्या कंपन्यांचे अधिकारी, भागीदार वगैरे जर युनायटेड किंग्डमचे रहिवाशी असतील तर त्यांनीहि वंश, वर्ण, भांडवल वगैरेच्या वर दिलेल्या अटी पाळल्या आहेत असें समजावें व त्यांनाहि सर्व सवलती द्याव्यात असें म्हटलें आहे. अशा प्रकारें युनायटेड किंग्डममध्यें स्थापन झालेल्या कंपन्यांचें ऑफिस, चालकमालक वगैरे येथें रहाणारे असोत किंवा हिंदुस्थानांत स्थापन झालेल्या कंपन्यांचे चालक मालक युनायटेड किंग्डममध्यें रहाणारे असोत, दोघांनाहि या सवलती मिळाव्यात. हे कायदे जरी दिसावयास मोठे सोज्ज्वल व न्यायाचे असले तरी ते घातुक आहेत. हिंदुस्थानांतील कंपन्या बाल्यावस्थेंत असल्यामुळें त्या विलायतेंत व्यापार करायला कशाला जाणार आणि त्या सवलती तरी कसल्या मागणार? ब्रिटिश कंपन्या मात्र हिंदुस्थानांत येऊन धुमाकूळ घालणार व सर्व सवलती मिळवणार. युनायटेड किंग्डमबरोबर ब्रह्मदेशांतील कंपन्यांनाहि या सवलती कायद्यानें दिल्या आहेत.

हिंदुस्थानच्या किनाऱ्यावरील व्यापार हिंदी लोकांच्या हातीं असावा अशाबद्दल एक बिल मध्यवर्ती कायदेमंडळांत बॅ. हाजी यांनीं आणलें होतें. हिंदी व्यापाऱ्यांच्या हातीं हा व्यापार जाऊ नये व अशा बिलांना मज्जाव करावा म्हणून पुढील कलम घातलें आहे. युनायटेड किंग्डममध्यें स्थापन झालेल्या जहाजांच्या कंपन्यांवर हिंदी कंपन्यांपेक्षां निराळीं

बंधनें असूं नयेत. विमानांनाहि हाच नियम लागू करावा. या नियमामुळें हिंदी नौकानयनाच्या व्यापाराला सवलती देतां येणार नाहींत. हा नियम इतर नियमाप्रमाणें परस्परावलंबी आहे. युनायटेड किंग्डमहि हिंदी कंपन्यांवर भेदाभेदात्मक बंधनें घालूं शकत नाहींत.

यानंतरचें कलम असेंच आमची गति कुंठित करणारें आहे. हिंदुस्थानच्या तिजोरींतून हिंदी उद्योगधंद्याच्या वाढीकरतां जी काय आर्थिक मदत दिली जाईल तितकीच मदत युनायटेड किंग्डममध्यें स्थापन झालेल्या व हिंदुस्थानांत तसाच व्यापार करणाऱ्या कंपन्यांना मिळाली पाहिजे. युनायटेड किंग्डमनें आपल्या खजिन्यांतून जर तेथील कंपन्यांना आर्थिक मदत अगर देणगी दिली, तर तशीच देणगी अगर मदत हिंदुस्थानांत स्थापन झालेल्या व युनायटेड किंग्डममध्यें तसाच व्यापार करणाऱ्या कंपन्यांना दिली पाहिजे.

हिंदी व्यापाऱ्यांना खरोखर मदतीची आवश्यकता आहे. पण आमच्या कंपन्यांना विशेष फायदा मिळूं नये व इंग्लिश कंपन्यांबरोबर चढाओढ करण्याचा प्रसंग आल्यास आम्हांला आमचा माल स्वस्त विकतां येऊं नये म्हणून हीं बंधनें आहेत.

ही देणगी अगर मदत देण्याच्या बाबतींत कायदा थोडासा सैल करण्यांत आला आहे तो असा. हा कायदा पास होण्याच्या तारखेला जर एखादी युनायटेड किंग्डममध्यें स्थापन झालेली कंपनी हिंदुस्थानबरोबर व्यापार करीत नसेल, तर त्या कंपनीला जी मदत अगर देणगी हिंदी कंपनीला मिळेल ती खालील अटी पूर्ण केल्याशिवाय मिळूं नये

(अ) ती कंपनी ब्रिटिश इंडियाच्या किंवा फेडरेटेड स्टेटस्च्या कायद्यानुरूप बनविली जावी.

(आ) कायदा ठरवील त्याप्रमाणें त्या कंपनीचे नियामकमंडळांत निम्मे हिंदुस्थानांत रहाणारे ब्रिटिश प्रजाजन अगर संस्थानी प्रजाजन असावेत.

(इ) हिंदुस्थानांतील ब्रिटिश प्रजाजनांना अगर संस्थानी प्रजेला धंदेशिक्षणविषयक सर्व योग्य सवलती द्याव्यात.

या तीन अटी मान्य करणाऱ्या युनायटेड किंग्डममधील कंपनीला वर्षासनें, देणग्या किंवा मदत देण्यास हरकत नाहीं. हिंदी लोक घेण्याची ही आपत्ति जहाजांच्या वहातुकीचे व्यापारावर येऊं नये म्हणून त्यांनीं एका पोटकलमान्वयें त्या कंपन्या हिंदुस्थानशीं व्यापार करीत आहेत असें धरून चालण्यास सांगितलें आहे.

हे भेदाभेदनिवारक कायदेपुस्तकांत घातले तर हिंदुस्थान कायमचा पांगळा राहील अशी भीति अनेकांनीं प्रकट केली. त्या भीतिमुळें नव्हे तर इतर कारणांकरतां कायद्यांत अशी एक योजना करून ठेवली आहे कीं, हिंदुस्थान व इंग्लंड या दोन देशांत जर व्यापारविषयक करारमदार परस्परांच्या तडजोडीनें झाले तर बादशहानें वरील सर्व कलमें जादा हुकूम काढून रद्द ठरवावीं. पण ज्या दिवशीं हा करार संपेल त्या दिवशीं जुना कायदा चालूच राहील.

इंग्लिश माणसांना हिंदुस्थानांत यावयास, व्यापार करावयास, उद्योगधंदे काढावयास, जादा कर न बसविण्यास, हिंदी कंपन्यांइतकी मदत, देणग्या वगैरे मिळविण्यास परवागी दिल्यानंतर आतां पुढें तेथील बौद्धिक धंदेवाइकांचीहि तरतूद केली आहे.

वकील, इंजिनीअर, प्रोफेसर वगैरे जे धंदेवाईक लोक आहेत त्यांनीं लायकीकरतां कोणत्या परीक्षा दिलेल्या असाव्यात हें वास्तविक हिंदी कायदेमंडळानें ठरवावयास पाहिजे. पण त्यांना गव्हर्नर किंवा गव्हर्नर जनरलच्या परवानगीशिवाय असें बिल अगर कायदादुरुस्ती करतां येत नाहीं. गव्हर्नर जनरलनें ही परवानगी आपल्या विवेचक बुद्धीनें द्यावयाची आहे. हे धंदे अगर नोकऱ्या करणारे जे लोक आहेत त्यांच्यासंबंधीं जनतेच्या हिताकरतां निर्बंधक कायदे करणें अवश्य असेल तरच ग. जनरल किंवा गव्हर्नरनें अशा कायद्यांना परवानगी द्यावयाची आहे. असे कायदे ग. जनरल किंवा गव्हर्नरच्या परवानगीनें पास झाल्यावर ज्यांचें धंद्यांतून अगर नोकऱ्यांतून उच्चाटन करावयाचें असेल त्यांना चार महिने अगोदर कायद्याच्या अंमलबजावणीपूर्वी जाहीर रीतीनें ही गोष्ट कळवावी आणि त्यांनीं जर दोन महिन्यांच्या आंत आपल्या तक्रारी गव्हर्नर किंवा गव्हर्नर जनरलला कळविल्या व त्यांना जर त्या रास्त वाटल्या तर त्यांनीं हे नियम रद्द करावे. या बाबतींत आपआपल्या मंत्रिमंडळाचा सल्ला ग. जनरल किंवा गव्हर्नर यांनीं घ्यावयाचा आहे.

डॉक्टरीचा धंदा करणारांना असेंच संरक्षण दिलें आहे. हिंदुस्थानांतील डॉक्टरांबरोबर ब्रिटिश डॉक्टर चढाओढ करतात म्हणून त्यांच्यावर कांहीं नियंत्रण घालावें अशी हिंदी लोकांची मागणी होती; पण कायद्यानें बंदीऐवजीं त्यांचें आसन स्थिर केलें आहे.

युनायटेड किंग्डममध्यें किंवा हिंदुस्थानांत जे ब्रिटिश प्रजाजन तेथील वैद्यकीय शिफारसपत्राप्रमाणें वैद्यकी सर्जरी किंवा सूतिकाकर्म करीत असतील त्यांना हिंदुस्थानांत वैद्यकी वगैरे करण्यास

मनाई करतां कामा नये. पण जर हिंदी कायदेमंडळाला असें वाटलें कीं, अमुक एका डिप्लोमाप्रमाणें मिळणारे वैद्यकीय ज्ञान हें वैद्यकी, शस्त्रक्रिया किंवा सूतिकाकर्म करण्यास अपुरें आहे तर ते तसा कायदा करूं शकतील. मात्र ह्या कायद्याची अंमलबजावणी करण्यापूर्वीं ग. जनरल किंवा त्या त्या युनिव्हर्सिटया किंवा अभ्यासनियंत्रक मंडळांना तुमचा डिप्लोमा अपुरा आहे हें कळवावें लागेल, आणि अशा प्रकारें त्यांच्या नजरेस ही गोष्ट आणल्यानंतर बारा महिन्यांनीं हा कायदा जारी होईल. युनिव्हर्सिटया किंवा डॉक्टरांना आपल्याला या बंधनामुळें अन्याय झाला आहे असें वाटत असेल तर त्यांनीं प्रिव्ही कौन्सिलकडे दाद मागावयाची आहे. प्रिव्ही कौन्सिलनें त्यांचें म्हणणें श्रवण करून जर त्यांचें ज्ञान पुरेसें आहे असा निर्णय दिला तर हिंदी कायदेमंडळानें हा कायदा रद्द करावयास हवा. हिंदी कायदेमंडळाचे अनेक कायदे ग. जनरल किंवा गव्हर्नर रद्द करूं शकत असे. या नियमानें इंग्लंडमधील प्रिव्ही कौन्सिललाहि हिंदी कायदेमंडळाचा कायदा रद्द करण्याची सत्ता दिली आहे.

हिंदी युनिव्हर्सिटयांची वैद्यकीय पदवी संपादन केलेल्या व ब्रिटिश प्रजाजन असलेल्या डॉक्टरांना इंग्लंडमध्यें धंदा करण्यास परवानगी आहे. मात्र त्यांची पदवी, त्यांचें ज्ञान, त्यांचें कौशल्य अपुरें आहे असें प्रिव्ही कौन्सिलनें ठरविलें तर त्यांना तेथें डॉक्टरीचा धंदा करतां येणार नाहीं. ही नालायकीची बाब सोडून दिली तर इतर कारणांमुळें इंग्लंडमध्यें डॉक्टरी करण्यास हिंदी लोकांना परवानगी आहे. इंग्लंडनें जर ही परवानगी दिली नाहीं तर हिंदुस्थाननेंहि तिकडील पदवी अगर प्रमाणपत्र धारण करणारांना हिंदुस्थानांत

वैद्यकी, शल्यतंत्र, किंवा सूतिकाकर्म करण्यास परवानगी देऊं नये असा हा परस्परावलंबी कायदा आहे. ह्या कायद्याप्रमाणें उभय देशांत वैद्यकीय धंदा करणारावर कोणत्याहि प्रकारचे निर्बंध लादूं नयेत असें बजावलें आहे. वैयक्तिक कारणाकरतां एखाद्याला प्रतिबंध करण्याची सत्ता अबाधित राखली आहे. तसेंच या डॉक्टरांना उभय देशांत ‘ रजिस्टर्ड मेडिकल प्रॅक्टिशनर्स ’ म्हणूनहि मान्यता मिळावयाची आहे. इंडियन मेडिकल सर्व्हिस-मध्यें काम करीत असलेल्या अधिकाऱ्यालाही हिंदुस्थानांत धंदा करण्यास परवानगी आहे.

ब्रम्हदेशांत इंग्लिश डॉक्टरांना धंदा करण्याची परवानगी दिली आहे. पण ब्रम्ही लोकांना इंग्लंडमध्यें धंदा करण्यास परवानगीची अट मात्र हिंदुस्थानप्रमाणें ठेवली नाहीं. ब्रम्ही लोकांना हिंदुस्थानांत किंवा हिंदी लोकांना ब्रह्मदेशांत डॉक्टरी करतां येईल किंवा नाहीं याबद्दल मात्र येथें उल्लेख नाहीं.

वरील सर्व कायदे जरी परस्परावलंबी दिसत असले तरी ते विचित्र आहेत. कोल्हा व करकोच्याच्या गोष्टीची येथें आठवण होते. दोघेहि एकाच ताटांत जेवायला बसले खरे पण करकोच्याची लांब चोंच मात्र कोल्ह्याच्या उथळ ताटांतील खीर खाऊं शकत नाहीं, तसा हा प्रकार आहे. आम्हांला इंग्लंडमध्यें व्यापारधंदा करण्यास परवानगी आहे पण त्याचा फायदा आम्हीं काय घेऊं शकणार ? उलट इंग्लिशांना आमच्या मागासलेपणाचा भरपूर फायदा घेतां येईल. लठ्ठ माणसापेक्षां किरकोळ माणसाला खुराकाची आवश्यकता अधिक असते. पण सत्तेपुढें शहाणपण नसतें हेंच खरें आहे.

हिंदुस्थान व ब्रिटन यांच्या परस्परावलंबी व्यापारविषयक सवलतीसंबंधीं जॉइंट सिलेक्ट कमिटीनें अत्यंत साळसूदपणाचें भाष्य केलें आहे. रिपोर्ट म्हणतो भेदाभेद दोन प्रकारचे. एक कायदे करण्याबद्दल व दुसरा अंमलबजावणीबद्दल. हिंदी लोकांची व्यापारविषयक सवलतीबद्दल फार गैरसमज झाली आहे असें सांगून तो गैरसमज दूर करण्याचा कमिटी प्रयत्न करीत आहे. १९१९ च्या आर्थिक व्यवहाराबद्दलच्या बिलावर कांहीं शिफारसी केल्या होत्या. त्यांना फिस्कल कन्व्हेंशन म्हणतात. या कन्व्हेंशनप्रमाणें ब्रिटन व हिंदुस्थानमध्यें व्यवहार होत. नव्या कायद्यामुळें हें कन्व्हेंशन रद्द ठरणार आहे. नव्या कायद्यामुळें हिंदुस्थानचा व्यापार मारून ब्रिटिश व्यापाऱ्यांचा फायदा होणार आहे हें खरें नाहीं. हिंदुस्थानांतील जबाबदार व्यक्तींनीं कांहीं विधानें केलीं, त्यामुळें ब्रिटिश व्यापारी गडबडले व ह्या तजविजी कराव्या लागल्या. हिंदुस्थान व इंग्लंड हे दोन्ही देश एकएकटे स्वयंपूर्ण नाहींत. त्या दोन्ही देशांनीं आपण एक आहोंत असें समजावें. एकाला दुसऱ्याची जरूरी लागते व एक दुसऱ्याचा पूरक आहे या भावनेनें ह्या अटीकडे पहाण्याचा पोक्त सल्ला जॉ. सि. क. नें दिला आहे.

इंग्लिश व्यापाऱ्यांनीं हिंदुस्थानांत जें भांडवल गुंतविलें आहे त्याचा फायदा त्यांना भरपूर मिळावा म्हणून ही योजना आहे. या बाबतींत म. गांधींनीं १९ नोव्हेंबर १९३१ रोजीं गोलमेज परिषदेंत जे विचार प्रकट केले ते विचारार्ह आहेत. गांधी म्हणतात:—*

‘ No existing interest legitimately acquired and not being in conflict with the best interests of the nation in general, shall be interfered with except in accordance with the law applicable to such interests. ’

न्यायानें जे विद्यमान हितसंबंध संपादन केले असतील व जे आमच्या हिताच्या सामान्यतः विरोधी नसतील त्यांच्या मार्गांत आम्ही येणार नाहीं आणि त्यांच्या मार्गांत जर यावयाचेंच असेल तर कायद्याप्रमाणें त्यांची व्यवस्था होईल ! गांधींची ही विचारसरणी भांडवलालाच लागू नसून व्यापारउद्योगधंद्यांनाहि लागू आहे. अन्यायानें लुटालूट करणाऱ्या अगर केलेल्या कंपन्यांच्या भांडवलाची पूर्ण चौकशी करणें व त्यांना प्रतिबंध करणें अवश्य असतें. वसाहतीच्या स्वराज्यांत हे हक्क वसाहतींना दिलेले असतात. पण ब्रिटिश लोकांना संरक्षण देण्याच्या बुद्धीनें हीं बंधनें घातलीं आहेत. दिसायला तीं न्यायाचीं दिसलीं तरी आम्हांला मारक होणार आहेत. निदान आमची प्रगति खुंटवणारीं खास ठरणार आहेत.



## १४

# फेडरेशन, प्रांत व संस्थानें यांचे संबंध.

ब्रिटिश हिंदुस्थानचें एकतंत्री राज्यसंस्थेंतून संयुक्त राज्यसंस्थेंत रूपांतर होतांना फेडरल व प्रांतिक संस्था यांचे संबंध पुनः निश्चित करण्याची जरुरी भासूं लागली. फेडरेशनपूर्वी मध्यवर्ती सत्ता ही प्रांतिक सरकारवर नियंत्रण घालूं शकत असे. प्रांतानें मध्यवर्ती सत्तेचे हुकूम मानले पाहिजेत अशी कायदेशीर जबाबदारी त्यांच्यावर असे. फेडरेशननंतर दोघांचीं कार्यक्षेत्रें निश्चित ठरविण्यांत आलीं आहेत. समाईक यादींतील विषय सोडले तर प्रांत व फेडरेशन यांची सक्त वाटणी झाली आहे. तथापि दोघांमध्यें एकसूत्रीपणा रहाण्याकरतां कांहीं योजना करणें जरूर वाटले. संयुक्त सरकारकडे ज्या बाबी सोंपविल्या आहेत, त्या बाबींत संयुक्तसरकार कायदे करूं शकते व त्या कायद्याचा अंमल प्रांत आणि फेडरेशन स्वीकारणाऱ्या संस्थानांत व्हावयाचा असतो. या कायद्यांचा अंमल व व्यवस्था त्या घटकांत करण्याची जबाबदारी फेडरेशनची आहे. त्याकरतां ते आपले अधिकारी प्रांतांत नेमतील किंवा प्रांतावर ती जबाबदारी सोंपवतील. संस्थानांत ही अंमलबजावणी कशी व्हावयाची हें मान्यतापत्रकाद्वारां ठरावयाचें आहे. व्हाइट पेपर म्हणतो, 'प्रांतावर जी जबाबदारी टाकली जाईल ती नैतिक आहे, कायदे-

शीर नाहीं.'ही नैतिक जबाबदारी त्यांनीं फेडरेशनच्या कारभाराला विसंगत न होईल अशा रीतीनें बजवावयाची आहे. संस्थानावरहि अशीच नैतिक जबाबदारी आहे. पार्लमेंटमध्यें या विषयाची चर्चा चालली असतां जे विचार प्रकट केले गेले ते महत्त्वाचे आहेत. ' या फेडरेशनची रचना इतर फेडरेशन्सप्रमाणें सदिच्छेवर आधारलेली आहे. जगांत कोठेंहि घटक सत्तेच्या इच्छेविरुद्ध वागावयास लावण्याची शक्ति फेडरेशनमध्यें नाहीं. पण हे घटक आपली कर्तव्यें पार पाडतील असा विश्वास आपणांस ठेवून चालावयाचें आहे.'* पण एखाद्या प्रांतानें जर फेडरेशनच्या आज्ञा धुडकावून लावल्या तर काय करावयाचें हा प्रश्न उभा राहातो.त्याचीहि तजवीज केली गेली आहे. प्रांतिक गव्हर्नर्सकडून ग. जनरल आपल्या हुकुमाची तामीली करूं शकतील. पण संस्थानिकांनीं जर फेडरेशनच्या आज्ञा मानल्या नाहींत तर तें प्रकरण फेडरल कोर्टाकडे जावयाचें आहे.

समाईक यादीच्या बाबतींत, अंमलबजणीची सत्ता प्रांताकडे आहे. या समाईक यादीचे दोन भाग आहेत.पहिल्या भागांत फेडरेशनच्या एक्सिक्युटिव्हला कांहीं करतां येत नाहीं. त्यांना सूचना ही देतां येणार नाहींत. पण दुसऱ्या भागाबद्दल ग. जनरलच्या पूर्व परवानगीनें कायदे वगैरे करतां येतील.

---

* Nowhere in the world, is there any sanction under which the Federal centre can compel the unit to act against the will of the unit but we have to assume that the units are going to attempt to carry out their duties under the Act in good faith (Vol. 299 Col. 2144–45)

संयुक्त राज्यघटना अंमलांत आली म्हणजे हिंदुस्थानांत तीन अधिकारीसत्ता निर्माण होतील. या तिघांचें नियंत्रण कसें करावयाचें हा महत्त्वाचा प्रश्न आहे. राज्यकारभाराचीं तीन अंगें असतात. एक कायदेमंडळाचें, कायदे अंमलांत कसें आणावयाचे याबद्दल सूचना देणें; हे कायदे अंमलांत आणण्याकरतां अधिकारी नेमणें आणि ते अधिकारी कायद्यांची अंमलबजावणी करतात किंवा नाहीं याबद्दल तपासणी करणें. हीं कामें परस्परांमध्यें भानगडी उपस्थित न होतां कशी पार पाडतां येतील याबद्दल कांहीं कलमें घालण्यांत आलीं आहेत.

संयुक्त कायदेमंडळाच्या कायद्यांना मान्यता मिळेल अशा प्रकारें प्रांताचे व संयुक्त घटनेंत सामील होणाऱ्या संस्थानांचे कारभार चालले पाहिजेत.

ग. जनरलकडे जीं चार खातीं—संरक्षण, बाहेरील कारभार, धर्म व टोळ्यांचे टापू—सोंपविलीं आहेत, त्यांपैकीं टोळ्यांचा टापू सोडून एका किंवा सर्व खात्यांच्या विशिष्ट बाबींची व्यवस्था ग. जनरल गव्हर्नरवर सोपवूं शकतो. त्या बाबतींत त्यानें कोणाचाहि सल्ला घेण्याची जरूरी नाहीं. टोळ्यांच्या टापूचे बाबींत विशिष्ट बाबींबरोबर सर्वसाधारणपणें गव्हर्नरकडे अधिकार सोपवितां येतात.

फेडरेशनचे कायदे प्रांतांत कसें अंमलांत आणावयाचे याबद्दल खालील प्रकार सांगितले आहेत. कांहीं बाबतींत फेडरेशनच्या कायद्यांची अंमलबजावणी, आपले स्वतंत्र अधिकारी नेमून करतां येईल. अंमलबजावणी करणाऱ्या फेडरल सत्तेचा अधिकार जितक्या गोष्टींत प्रांताच्या कारभारापर्यंत पोहोंचूं शकतो, तितकीं कामें ग. जनरल हा प्रांतांच्या सरकारच्या संमतीनें प्रांतावर किंवा प्रांतिक

अधिकाऱ्यांवर सशर्त अगर बिनशर्त सोपवूं शकतो. संयुक्त कायदे-मंडळ एखादा कायदा करून प्रांत किंवा प्रांताचे नोकर किंवा अधिकारी यांना नसलेले कांहीं अधिकार देऊं शकतें. प्रांताकडून हा कारभार करून घ्यावयाचा असला तर त्याबद्दल संयुक्त सत्तेनें एकमेकांच्या संमतीनें कांहीं रक्कम प्रांताला द्यावयाची आहे. दोघांत जर एकमत झालें नाहीं तर हिंदुस्थानच्या मुख्य न्यायाधिशानें एक पंच नेमून त्याला लवाद करावयास सांगावयाचें आहे.

संयुक्त सरकार व घटक यांच्यामध्यें जी कारभाराची वांटणी करावयाची त्याचे प्रकार दोन आहेत. ग. जनरलवर ज्या चार बाबी खास म्हणून सोंपविल्या आहेत, त्यांची अंमलबजावणी तो गव्हर्नरमार्फत करूं शकतो. गव्हर्नरला तें काम करावेंच लागतें. पण फेडरेशनच्या कायद्यांची अंमलबजावणी करण्यास प्रांताचें सरकार किंवा मंत्रिमंडळें हीं फेडरेशनचीं ताबेदार नाहींत. दोघांचे अधिकार व सत्ता सारखीं आहेत. म्हणून त्यांना फेडरेशनचीं कामें करावयास सांगण्यापूर्वीं त्यांची संमति घ्यावी लागेल. त्यामुळें प्रांताची अंमलबजावणीची मर्यादा वाढेल.

ह्या अंमलबजावणीचे पुनः दोन पोटभेद आहेत. फेडरेशनचें अधिकारक्षेत्र हें फेडरेशनला ज्या बाबतींत कायदे करतां येतात तेवढें आहे. फेडरेशनची जी एक नंबरची यादी आहे, ती जितकें क्षेत्र व्यापतें, तितका फेडरेशनचा अधिकार. याबद्दल जें काम प्रांतिक सरकारकडून करून घ्यावयाचें त्याला प्रांतिक सरकारची संमति लागते.कारण कायद्याची अंमलबजावणी फडरेशनची व ती प्रांताकडून करून घ्यावयाची. आतां दुसरा पोटभेद असा. प्रांतिक कायदे-मंडळाला ज्या बाबतींत कायदे करण्याची सत्ता नाहीं, त्यासंबंधीं

फेडरल कायदेमंडळ, प्रांत किंवा अधिकारी किंवा अधिकारीसंस्था यांना अधिकार देऊं शकेल किंवा कांहीं कामें त्यांच्यावर सोपवूं शकेल. ऑस्ट्रेलियांत मध्यवर्ती सत्ता प्रांतांना असे अधिकार देऊं शकत नव्हती.

फेडरल सरकारच्या हुकमाची अंमलबजावणी प्रांतांत कशी व्हावयाची हा एक महत्त्वाचा प्रश्न आहे. कायद्यांत असें सांगितलें आहे कीं, ज्या विषयाबद्दल प्रांतिक सरकारला कायदे करण्याची पात्रता आहे, अशा विषयावर फेडरल सरकारची हुकमत चालत नाहीं.समाईक यादी जी आहे, त्या यादींतील कायदे फेडरेशनला व प्रांतालाहि करतां येतात आणि फेडरेशनचें त्यांत वर्चस्वहि असतें. तथापि समाईक यादींतील कायदा फेडरेशननें केला, तरी त्याच्या अंमलबजावणीकरतां त्यांना प्रांतिक कार्यकारी सत्तेच्या तोंडाकडेच पहावें लागेल. पहिल्या यादींतील कायदे फक्त फेडरेशनलाच करतां येतात. प्रांताला करतां येत नाहींत. तेव्हां त्या कायद्यांची अंमलबजावणी कशी करावी याबद्दल फेडरेशन प्रांताला सूचना देईल. फेडरेशनच्या कायद्याला विघातक होईल असा कोणताहि राज्यकारभार प्रांतानें करतां कामा नये.

''समाईक यादींत पुनः दोन भाग करण्यांत आले आहेत. एका भागांत सामाजिक व आर्थिक प्रश्न घातले आहेत. आणि दुसऱ्या भागांत कायदा, सुव्यवस्था, वैयक्तिक हक्क, मानमरातब वगैरे विषय घातले आहेत. या दुसऱ्या भागांतील विषय व्यापक आहेत व त्या विषयांवर केलेले कायदे हे कोर्टानें किंवा फौजदारी खटले भरण्याची सत्ता असलेल्या प्रांतिक अधिकाऱ्यानें अंमलांत आणावयाचे आहेत. या बाबतींत फेडरेशनला कांहींहि सत्ता नाहीं. आर्थिक व सामा-

जिक विषयांत ट्रेड युनियन्स, कामगारांचे प्रश्न, मजुरांचे हक्क-संरक्षण, कारखाने, गिरण्या, खाणी, सांसर्गिक रोग, वीज, सिने-माचे चित्रपट हे विषय येतात. त्याबद्दल फेडरल सरकार विशिष्ट मर्यादेंत प्रांतांना दिशा दाखवूं शकेल. या सूचना प्रांतांना प्रांतां-तर्फे आलेले फेडरेशनमधील सभासद विचार न करतां देणार नाहींत व प्रांतांच्या हक्कावर आक्रमण करणार नाहींत. याला दुसरेंहि संरक्षण घातलें आहे."* त्याला ग.जनरलच्या आगाऊ परवानगीची अट ठेवली आहे.

प्रांताप्रमाणेंच संस्थानचा कारभारहि अशाच पद्धतीनें करावयाचा आहे. त्याचे चार प्रकार होऊं शकतील असें गृहीत धरण्यांत आलें आहे.

## संस्थानांतील फेडरल कारभार.

ग. जनरल हा संस्थानिकांच्या संमतीनें संस्थानिकांनीं मान्य केलेला संस्थानांना लागू होणारा फेडरेशनचा सर्व कारभार त्याच्यावर किंवा त्याच्या अधिकाऱ्यांवर सशर्त अगर बिनशर्त सोपवूं शकतो. एखाद्या विशिष्ट बाबतींत स्थानिक कारभार कोणत्या मर्यादेपर्यंत संस्थानिकांवर सोपवावयाचा हें ठरविण्याचें काम संयुक्त सरकारचें आहे. संस्थानिकांवर हा कारभार बिनशर्त सोपविला तर त्याची अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संस्थानिकांवर आहे. त्यानें त्या कारभाराकरतां अधिकारी नेमावेत. या अधि-ऱ्यांनीं संयुक्त सरकारकडून येणाऱ्या सूचना मानावयास हव्यात. संस्थानिकांवर सशर्त कांहीं भागांपुरता राज्यकारभार संयुक्त सरकारला सोपवितां येतो.

संयुक्त कायदेमंडळाची सत्ता जितक्या मर्यादेपर्यंत संस्थानावर पोहोंचते, तितक्या बाबीपुरता कायदा संयुक्त कायदेमंडळ लागूं

* जा. पा. कमिटी रिपोर्ट पॅरि. २२०

करून संस्थानिक किंवा त्यांचे अधिकारी यांच्यावर कांहीं कामें लादूं शकतें आणि त्यांना अधिकारहि देऊं शकतें. संस्थानिक किंवा त्यानें नेमलेले अधिकारी यांनीं संस्थानाला लागू होणाऱ्या संयुक्त कायदेमंडळाच्या कायद्याची अंमलबजावणी कशी करावी हें स्पष्टपणें निर्दिष्ट केलें आहे.संस्थानिकांनीं ही अंमलबजावणी करण्या-करतां अधिकारी नेमावयाचे आहेत. पण संयुक्तमंडळ एखादा कायदा करून हे अधिकारी संस्थानिकांच्या ताब्यांतून काढून घेऊन स्वतःच्या नियंत्रणाखालीं घेऊं शकेल.

संयुक्त कायदेमंडळाच्या कायद्यांचा संस्थानांत अंमलबजावणी करण्याचा तिसरा प्रकार असा. संस्थानिकांना जो कायदा लागू असेल त्याची अंमलबजावणी करण्याची हमी आपण घेतों अशाबद्दल संस्थानिक व ग. जनरल यांनीं करार करावयाचा आहे. या कराराप्रमाणें संस्थानिकांनीं जर आपल्यावर हमी घेतली तर ग. जनरल संयुक्तकायदेमंडळाच्या धोरणाप्रमाणें राज्यकारभार चालतो किंवा नाहीं याची तपासणी करील आणि त्यांत कांहीं कुचराई होत असेल तर संस्थानिकांना सूचना देईल.ह्या करारान्वयें संस्था-निकांना राज्यकारभाराबद्दल कांहींहि मिळावयाचें नाहीं. मोठाल्या व सुव्यवस्थितपणें चाललेल्या संस्थानिकांकरतांच हा नियम आहे.

पण अशा प्रकारें कांहीं करार झाले नाहींत व मान्यतापत्रकांत तशा कांहीं खास योजना नसतील तर संयुक्त कायदेमंडळ आपले स्वतःचे अधिकारी संस्थानांत नेमून व त्यांच्यावर आपले पूर्ण नियंत्रण ठेवून हा कारभार करूं शकतील.

तेव्हां संस्थानच्या बाबतींत चार पर्याय संभवूं शकतील. (१)

संस्थानिकावर किंवा त्याच्या अधिकाऱ्यावर सर्व कारभार सोपवितां येईल (२) संयुक्त कायदेमंडळ कायदा करून संस्थानिक किंवा त्यांनीं नियुक्त केलेल्या अधिकाऱ्यावर कांहीं अधिकार व कांहीं जबाबदाऱ्या सोपवूं शकेल. (३) संस्थानिक व ग. जनरल यांच्यांत करारमदार होऊन संस्थानांना लागू असलेल्या फेडरल कायद्यांचा कारभार पूर्णपणें सोपवितां येईल. (४) या वरील तीन योजना जर अंमलांत आल्या नाहींत व मान्यतापत्रकांत कांहीं खास सोय नसेल तर संयुक्त सरकार स्वतःच्या अधिकाऱ्यामार्फत संयुक्त कायद्यांची अंमलबजावणी संस्थानांत करूं शकेल.

## प्रांत व फेडरल सत्ता.

संयुक्त कायदेमंडळ, त्यांचे कार्यकारी मंडळ, प्रांतिक कार्यकारी मंडळ, ग. जनरल व गव्हर्नर यांचे वरिष्ठकनिष्ठपणाचे संबंध हे कार्याच्या आड येत असल्यास काय करावें याचीहि योजना करून ठेवण्यांत आली आहे. संयुक्त कार्यकारी मंडळाच्या सत्तेआड प्रांतांच्या कार्यकारी मंडळाची अंमलबजावणी येतां कामा नये. संयुक्त कार्यकारीमंडळ आपल्या सरकारला अवश्य वाटतील त्या सूचना प्रांताला देऊं शकतील. लष्कराच्या वहातुकीला अवश्य असणारे रस्तेसुद्धां प्रांताकडून ते बांधून घेऊं शकतील. एखादा प्रांत संयुक्त सरकारच्या सूचनांची बजावणी करीत नाहीं असें ग. जनरलला दिसून आलें तर तो गव्हर्नरला त्याबद्दल हुकूम फर्मावूं शकतो. विशेषतः सामुदायिक शांततेला धोका पोहोंचण्याचा संभव आहे, अशा परिस्थितींत गव्हर्नरला ग. जनरल आपल्या हुकुमाप्रमाणें वागण्यास सांगूं शकेल.

संस्थानांच्या बाबतींतसुद्धां वरील नियम लागू आहेत. मात्र संस्थानिकांनीं जर ग. जनरलच्या हुकुमाची अंमलबजावणी केली

नाहीं तर काय करावें याबद्दल कायद्यांत सूचना देण्यापलीकडे दुसरी तजवीज नाहीं. अर्थात् ग. जनरलला व्हाइसरॉय म्हणून जे पॅरामौंटसी ( अधिराज्याचे ) अधिकार आहेत, त्याप्रमाणें तो संस्थानिकांना सरळ करूं शकेल.

फेडरेशनमध्यें जीं संस्थानें सामील झालीं आहेत,त्यांनीं आपल्या संस्थानांला लागूं होणाऱ्या कायद्याच्या बाबतींत फेडरेशनच्या हुकमतीला अडथळा होणार नाहीं, अशाप्रकारें आपला कारभार चालविला पाहिजे. संस्थानिकांनीं जर ही जबाबदारी पार पाडली नाहीं तर गव्हर्नर जनरलनें त्यांचें म्हणणें ऐकून त्यांला योग्य त्या सूचना द्याव्या. एखादा फेडरेशनसंबंधीं विषय संस्थानाला लागूं होतो किंवा नाहीं, याबद्दल वाद उत्पन्न झाल्यास त्याचा निर्णय कोर्टामार्फत करून घ्यावा असें सांगितलें आहे.

प्रांत व संस्थानें यांच्या बाबतींत फेडरेशनच्या हुकमतीबाबत तीन फेरफार होणारे मुद्दे आहेत.

(१) प्रांताच्या बाबतींत फेडरेशनचा प्रत्यक्ष कायदा नसला पण कायदा करण्याची फेडरेशनला पात्रता असली म्हणजे चालते. पण संस्थानांच्या बाबतींत फेडरेशनची हुकमत संस्थानांवर लागूं होण्यापूर्वीं तसा कायदा पास व्हावा लागतो.

( २ ) प्रांताच्या बाबतींत, फेडरेशनची सत्ता प्रांतावर चालावयाची किंवा नाहीं हें फेडरल यादी किंवा समाईक यादी भाग २ यांत ती सत्ता आहे किंवा नाहीं यावर अवलंबून असतें. पण संस्थानांच्या बाबतींत, त्यांनीं त्या विषयाबद्दल कायदे करण्यास फेडरेशनला मान्यतापत्रकान्वयें परवानगी दिली आहे किंवा नाहीं हें पहावें लागेल.

( ३ ) अमुक विषयाबद्दल प्रांतांना सूचना द्यावयाच्या किंवा नाहीं हें ठरविणारी अखेरची सत्ता ग. जनरलची आहे. पण संस्थानाच्या बाबतींत फेडरेशनची हुकमत अमुक विषयावर चालावयाची किंवा नाहीं हें फेडरल कोर्ट ठरवूं शकतें.

प्रांत, संस्थानें व संयुक्त सरकार यांच्यांत दोन बाबींसंबंधीं भानगडी उद्भवण्याचा संभव असतो. एक नद्याबद्दल व दुसरा ब्रॉड कास्टिंगबद्दल. १९१९ च्या कायद्याचे वेळीं रेडिओचा प्रचार झाला नव्हता. रेडिओमुळें सगळ्या जगाशीं संबंध येऊं शकतो. आजकाल रेडिओवर गाणींच गायलीं जात आहेत. पण पुढील काळांत त्याचा वाटेल तसा उपयोग करतां येईल. या ध्वनि क्षेपक योजनेंत दोन भाग असतात. एक जेथून बोलले जाते तो ( ध्वनिक्षेपक ) आणि दुसरा जेथें हा ध्वनि उमटतो तो. यांपैकीं पहिल्याची फार भीति असते. वाटेल तें बोलून लोकांचीं मनें भडकतील अशी शक्ती ध्वनिक्षेपकाजवळ असल्यामुळें त्याचा ताबा संयुक्त सरकारकडे असावा असें प्रतिपादन केलें जात होतें. पण तें अमान्य झालें. प्रांत किंवा संस्थानें ध्वनिक्षेपणाचें कार्य करूं शकतील. संयुक्त सरकारलाहि आपलीं यंत्रें उभारतां येतील. पण कोठेंहि काय शांततेला विघातक असा प्रचार होऊं लागला तर गव्हर्नर जनरल आपल्या अधिकारांत अशा ध्वनिक्षेपणाचा बंदोबस्त करूं शकेल. दुसरा प्रश्न नद्यांचा आहे. कृष्णा, गंगा, नर्मदा वगैरे नद्यांना प्रांताप्रांतांची वांटणी होणार आहे ही कल्पना नसल्यामुळें त्या दोन दोन प्रांतांतून व संस्थानांतूनहि वहात गेल्या आहेत. त्यांच्या पाण्याबद्दल जर भांडणें झालीं तर काय करावयाचें असा प्रश्न येतो. एखाद्या प्रांतानें किंवा संस्थानानें जर ग. जनरल-

कडे तक्रार केली, तर त्यानें एक तज्ज्ञांचें कमिशन नेमावयाचें आहे. या कमिशननें हक्क, वहिवाट वगैरे पाहून आपल्या शिफारसी ग. जनरलकडे करावयाच्या आहेत. ग. जनरलचा निकाल बाहेर पडण्यापूर्वी एखाद्या प्रांताला किंवा संस्थानिकाला हा प्रश्न बादशहाकडे पाठवावा असें वाटलें तर ते पाठवूं शकतात. बादशहा आपल्या मंत्रिमंडळाच्या सल्ल्यानें आपला निकाल देऊं शकतात. बादशहाकडे हें प्रकरण गेलें नाहीं तर शेवटच्या निकालाचा अधिकार ग. जनरलचा आहे. हे दोन्ही अधिकारी कायदेमंडळाचा ठराव बदलूं शकतात. चीफ कमिशनरच्या प्रांतांत जर ही पाण्याची भानगड निघाली तर तिचाहि निकाल ग. जनरल करूं शकतात. कोर्टाची सत्ता त्यांत नाहीं हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. आपल्या संस्थानांतील पाण्याला अडथळा येईल अशा प्रकारचे कायदे आपल्याला लागूं करूं नयेत असे संस्थानिक आपल्या मान्यतापत्रकांत सांगूं शकतात. पण ग. जनरलची किंवा बादशहाची सत्ता ही अखेरची असल्यामुळें संस्थानिकांचें म्हणणें तारतम्यानेंच मानलें जाईल.

प्रांतांप्रांतांतील लढे मिटविण्याकरतां बादशहानें एक आंतरप्रांतीय मंडळ नेमावें व या मंडळानें प्रांत व प्रांत आणि प्रांत व संयुक्त मंडळें यांच्यांतील लढे मिटवावे अशी योजना करण्यांत आली आहे. हें मंडळ नेमण्याची विनंति ग. जनरलनें बादशहाला करावयाची आहे. या मंडळावर संस्थानिकांचे प्रतिनिधी घेतले जावेत असेंहि म्हटलें आहे.

अशा प्रकारें प्रांत, संयुक्त मंडळें व संस्थानें यांच्यांत एकसूत्रीपणा राखण्याची तरतूद कायद्यांत केली आहे.

---

# १५

# संयुक्त सरकार व आर्थिक प्रश्न.

संयुक्त सरकारच्या कारभाराची यथायोग्य कल्पना येण्याकरतां आपल्याला आर्थिक प्रश्नाकडे विस्तारशः लक्ष दिलें पाहिजे. पैशावरच कोणत्याहि सरकारचें स्थैर्य, शाश्वती व भवितव्य अवलंबून असते. राष्ट्रामध्यें औद्योगिक,सांस्कृतिक व आर्थिकदृष्ट्या जर क्रांति करावयाची असेल आणि गोरगरिबांच्या जीविताचा प्रश्न सोडवावयाचा असेल तर पैसा उत्पन्न करणें, पैशाची वांटणी करणें व पैसा राखून ठेवणें यावर पूर्ण ताबा असावा लागतो. ज्या राज्यपद्धतींत समाजांतील खालचा वर्ग सुखी व समाधानी करण्याची शक्यता अगर पात्रता नसते, ती राज्यपद्धत केव्हांहि यशस्वी होत नाहीं. समाजसत्तावादासारखे मूलभूत वाद तेथें डोकें वर काढतात व राष्ट्रामध्यें वर्गकलह निर्माण होऊन राष्ट्राचा गाडा कुंठित करतात अगर तो खिळखिळा करून मोडून टाकतात. आधुनिक काळांत औद्योगिकदृष्ट्या पुढारलेल्या देशांत श्रीमान व गरीब यांच्यांत सारखे कलह चालू असून श्रीमान् वर्ग नष्ट करण्यापर्यंत विचाराची मजल गेली आहे. या प्रवृत्तीला कलाटणी देण्याकरितां फॅसिझमसारखे प्रतिगामी उपाय निघाले आहेत. पण साम्राज्यशाही राष्ट्रांनीं आपल्या शक्तीची पराकाष्ठा केली आणि दडपलेल्यांना अधिक दडपून टाकलें म्हणून दारिद्य व उपासमारीचें निवारण होत नाहीं. या स्वाभाविकपणें स्फोट पावणाऱ्या प्रवृत्तीचें

नियंत्रण करावयास तोफा व बंदुका कुचकामी ठरणार असून लोकांच्या हातीं राष्ट्राचें भवितव्य अनिर्बंधपणें देणें हाच खरा उपाय आहे.

हिंदुस्थानांत जो नवा कायदा सुरू होणार आहे, त्या कायद्यानें या प्रवृत्तीचा विचारच केला नाहीं. ब्रिटिश सरकारनें आपलें साम्राज्य टिकविण्याकरतां व बलाढ्य करण्याकरतां स्वत:च्या हातीं राज्यकारभाराचीं सारीं सूत्रें ठेवलीं आहेत, एवढेंच नव्हे तर त्या कारभाराकरतां लागणारा पैसाहि आधींच आपल्या हातीं ठेवून घेतला आहे. सैन्य, नोकऱ्या वगैरे जीं बहिर्गत व अन्तर्गत ताबा चालविण्याचीं साधनें आहेत त्यांना आम्ही कोणत्याही रीतीनें स्पर्श करूं शकत नाहीं. त्यांच्या खर्चाची तरतूद प्रथम करून नंतर रहाणारीं चिपाडें लोकांनीं चघळत बसावें अशी ही योजना आहे. १९१९च्या कायद्यांत लष्कर, नोकऱ्या वगैरेंच्या खर्चावर आमचा ताबा नव्हता, पण तेव्हां जबाबदारीचें राज्य आम्हांला दिलें आहे असा टेंभा तरी सरकार मिरवीत नव्हतें. आज हिंदुस्थानला जबाबदारी दिली आहे असें सरकार म्हणत आहे पण प्रत्यक्ष कारभारांत फरक पडलेला नाहीं. त्यामुळें फेडरेशनचा कारभार अंगावर घेणाऱ्या कोणत्याही पक्षाला अगर व्यक्तिसमूहाला ओसाड अरण्याचा ताबा घेण्याइतकाच कारभार करतां येणार आहे.

## १९१९ पूर्वी

१९१९ पूर्वी पैशाच्या बाबतींत काय परिस्थिति होती हें आपण पाहूं. त्यापूर्वी सेक्रेटरी ऑफ स्टेटची हिंदुस्थानच्या मध्यवर्ती कायदेमंडळावर पूर्ण सत्ता असे. हिंदुस्थानांतील प्रांत व मध्यवर्ती सत्ता ही एक, अविभक्त अशी समजली जात होती. प्रांतिक सरकारांना

स्वतंत्र अस्तित्व नसे. त्यांची सत्ता ही मध्यवर्ती सत्तेवर अवलंबून असे. भारतमंत्र्याची सत्ता मध्यवर्ती मंडळावर व मध्यवर्ती मंडळाची सत्ता प्रांतिक मंडळावर अशी अन्योन्यावलंबी योजना तेव्हां असल्यामुळें प्रांत काय अगर मध्यवर्ती सत्ता काय भारतमंत्र्याच्या आधीन असत. हिंदुस्थानच्या उत्पन्नावर मालकी बादशहाची आहे असें कायद्यानेंच ठरवून टाकलें होतें. प्रांतिक सरकारवर मध्यवर्ती सत्तेकडून कांहीं तुकडे टाकले जात व त्यावर त्यांना आपली गुजराण करावी लागे. मध्यवर्ती सत्ता ही स्वाभाविकपणेंच प्रांतांना उपाशी मारण्याचा सतत प्रयत्न करी. प्रांतिक सरकार मग मध्यवर्ती सत्तेकडे धाव घेई व तेथें कोणाच्या वगवशिल्यानें डाळ शिजली तर तेथें मिळालेल्या पैशावर कारभार होई. प्रांतिक सरकारला कर बसविण्याची किंवा स्वतंत्रपणें कर्ज काढण्याची सत्ता नसे. मध्यवर्ती कायदेमंडळ प्रांताच्या बजेटावर सक्त अंमल गाजवी.

१९१९ चा मॉंटेग्यू चेम्सफर्ड कायदा पास करण्यापूर्वी प्रांतांचे हे रोडावलेले सांपळे त्यांच्या दृष्टीस पडले. ते म्हणाले नवा कायदा करण्यापूर्वी जर आम्हाला पहिली गोष्ट कोणती करावयाची असेल तर जुना सांगाडा नष्ट करून त्याच्या जागीं नवी रचना करण्याची. प्रांतांचा कोंडमारा किती होत आहे हें त्यांनीं प्रथम दाखवून प्रांत व मध्यवर्ती सत्ता यांचें आर्थिक उत्पन्न अगदीं तुटक असलें पाहिजे असें प्रतिपादन केलें. पूर्वी उत्पन्नाच्या तीन वांटण्या असत. एक मध्यवर्ती सत्तेची, दुसरी प्रांताची व तिसरी दोघांची. ही पद्धत त्यांनीं थांबवली. प्रांतांना कराचीं खातीं वांटून दिलीं व मध्यवर्ती सत्तेला अशीच कांहीं खातीं तोडून दिलीं. प्राप्तीवरील कर हा मध्यवर्ती

सत्तेकडे गेला आणि स्टँप हा उभयतांकडे ठेवला. जनरल स्टँप मध्यवर्ती सत्तेनें घ्यावा व न्यायनिवाडयाकरतां लागणारा स्टँप हा प्रांतानें घ्यावा असें ठरलें. एकंदरींत या वांटणीमुळें प्रांतांना जरा हायसें वाटलें एवढें खरें. या वांटणीचा मध्यवर्ती मंडळावर परिणाम होऊन सुरवातीलाच त्यांना १० कोटींची तूट आली. ही तूट भरून काढण्याकरतां प्रांतानें दरवर्षी कांहीं रक्कम मध्यवर्ती मंडळाला द्यावी असें ठरलें. मेस्टन अवॉर्ड म्हणतात तें याचबद्दल होतें. या मेस्टनच्या निवाडयावर फार टीका झाली. सर्वच प्रांत गरम झाले. त्यांचें म्हणणें असें—मध्यवर्ती सत्तेचा खर्च हा ठराविक आहे व त्यांचीं उत्पन्नाचीं साधनें ताणावीं तेवढीं लवचीक आहेत. उलट प्रांताचा कारभार हा वाढणारा आहे आणि त्यांच्या उत्पन्नाचीं साधनें मात्र मर्यादित आहेत. शेतसारा वाढवून किती वाढवणार ? आधींच तो डोईजड झालेला आहे. पाणीपट्टी, मद्यपान, जंगलें वगैरेंचें उत्पन्न काय येणार असा प्रश्न प्रांत विचारीत. उलट मध्यवर्ती सत्तेकडे जकात, रेल्वे,प्राप्तिकर, संस्थानिकाकडून येणाऱ्या खंडण्या, पोस्ट अशी श्रीमंत खातीं असल्यामुळें त्यांना आपले कर वाढवितां येतात. सुरवातीला अशी कल्पना होती कीं, प्रांताजवळ कांहीं शिल्लक उरेल व शिक्षणप्रसारासारखीं राष्ट्रीय संवर्धनाचीं कामें हातीं घेतां येतील. पण प्रांतांच्या बजेटांनीं दगा दिला. त्यांच्याच उत्पन्नांत तूट येऊ लागली. त्यामुळें दुपाखी राजवटींतील मंत्री हात जोडून स्वस्थ बसले. प्रांतांच्या तिजोरींत तूट येऊं लागल्यामुळें शिक्षणासारख्या उपयुक्त खात्यावर खर्च वाढण्याऐवजीं तो कमीच होऊं लागला. १९२३-२४ मध्यें, १९२१-२२ पेक्षां शिक्षणावर कमी खर्च केला गेला. मध्यवर्ती खात्याचें अंदाजपत्रक असेंच

आंतबट्याचे ठरलें. प्रथम नवे कर बसविण्यांत आले. पण या करांपासून उत्पन्न वाढण्याऐवजीं १८ कोटींची तूट आली. ही ओढाताण बरींच वर्षे चालू होतीं. अखेरीस १९२७–२८ सालीं बेताल झालेल्या बजेटाची बऱ्याच प्रयत्नानंतर तोंडमिळवणी होऊं शकली. इंचकेप कमिटी त्याकरतां नेमावी लागली आणि त्या कमिटीनें प्रांतिक खंडणी रद्द केली. पण बजेटाच्या या भडकलेल्या स्थितीला सरकारचा लष्करावर होणारा बेसुमार खर्चच कारणीभूत होता. आजहि ही स्थिति पालटलेली नाहीं. लष्करी खातें सारें उत्पन्न खाऊन टाकत असल्यामुळें मध्यवर्ती सरकार किंवा प्रांतिक सरकार यांना प्रगति करणें दुरापास्त होतें. डब्ल्यु. टी. लेटन नांवाचे गृहस्थ आर्थिक प्रश्नाच्या चौकशीकरतां जें मंडळ नेमलें होतें त्यांतील एक सल्लागार होते. त्यांनीं लोकोपयोगी खात्यांची उपासमार होत आहे व लष्करी खात्याला अजीर्ण झालें आहे असें आपलें मत प्रकट केलें. त्यांनीं ही परिस्थिति लक्षांत घेऊन प्रांत व मध्यवर्ती सरकार यांच्यामध्यें उत्पन्नांच्या साधनांची विभागणी कशी करावी याबद्दल योजना सुचविली होती. पण सायमन कमिशनच्या शिफारसीबरोबर लेटनच्या शिफारसीहि विलयाला गेल्या.

## रा. टे. मध्यें आर्थिक प्रश्न

सायमन कमिशनच्या शिफारसी निकालांत निघाल्यानंतर गोलमेज परिषदा भरल्या. लॉर्ड पील यांच्या अध्यक्षतेखालीं संयुक्त घटनेच्या आर्थिक व्यवस्थेचा प्रश्न सोडविण्याकरतां एक कमिटी नेमली. या कमिटीनें आपल्या चौकशीला सुरवात करतांना कांहीं प्रमेयें निश्चित केलीं होतीं. फेडरेशनपूर्वी जी परिस्थिति आहे तींत विशेष कारणांशिवाय ढवळाढवळ करावयाची नाहीं. प्रांत व मध्यवर्ती सरकार यांना ज्या उत्पन्नाच्या बाबी वांटून दिल्या आहेत,

त्या बदलावयाच्या नाहींत; निदान प्रारंभीच्या काळांत तरी अशी बदल करावयाची नाहीं असें त्यांनीं ठरविलें.

फेडरल घटनेला स्वच्छ कोऱ्या पाटीवर आपला कारभार चालवितां यावा म्हणून त्यांनीं हिंदुस्थानवर लादलेलें पूर्वीचें कर्ज पेन्शन वगैरेचे खर्च रद्द करावेत अशी शिफारस केली होती. प्राणिशास्त्र व पुराणवस्तुसंशोधन यांकरतां जें खातें आहे, त्यांचा खर्च फेडरेशनवर नसावा; मुलकी पेन्शनरांच्या पेन्शनचा कांहीं हिस्सा माफ करावा, तसेंच कर्जापैकींहि कांहीं रक्कम सोडून द्यावी अशा त्यांच्या तीन शिफारसी होत्या. संयुक्त सरकारवर हा बोजा कां नसावा याबद्दल फार चर्चा झाली. संस्थानें संयुक्त सरकारमध्यें येणार असल्यामुळें तींहि म्हणूं लागलीं, जुन्या सरकारचें कर्ज आमच्यावर अंशतः बसणार व तें कर्ज आम्ही कां द्यावें? पण देण्याप्रमाणेंहि येणेंहि आहे व तें फेडरेशनला मिळत असल्यामुळें संस्थानिकांची तक्रार निकालांत निघाली.

या कमिटीनें उत्पन्नाच्या बाबींची वांटणी प्रांत व संयुक्त सरकार यांच्यांत केली. त्यांनीं प्राप्तिकर हा प्रांतांना दिला होता. संयुक्त सरकारच्या उत्पन्नांत त्यामुळें जी तूट येईल ती प्रांतांकडून देणगी घेऊन भरून काढावी असें त्यांनीं सूचित केलें होतें. पण पील कमिटीची ही सूचना पुष्कळ राजकारणशास्त्रविशारदांना अव्यवहार्य वाटली. मध्यवर्ती सरकार हें त्यामुळें दिवाळखोर बनेल अशी भीति प्रगट करण्यांत आली. प्रांतांनीं द्यावयाची देणगी जर अपेक्षेप्रमाणें दिली नाहीं तर संयुक्त सरकारचा कारभार कुंठित होईल अशीहि शक्यता असल्याचें अनेकजण सांगूं लागले. पील कमिटीच्या या शिफारसी व त्यावर व्यक्त झालेलीं मतें विचारांत

घेऊन पर्सी कमिटीनें आणखी एक नवी सूचना केली. अर्थात् प्राप्तीवरील कराचा प्रश्नच काय तो चर्चिला जात होता. पर्सी कमिटीचें म्हणणें असें कीं, प्राप्तीवरील कराच्या दोन वांटण्या कराव्यात. एक मध्यवर्ती सत्तेला द्यावी व दुसरी प्रांतांना द्यावी.

दुसऱ्या पील कमिटीनें पर्सी कमिटीच्या या शिफारसी मान्य केल्या आणि सरकारनें व्हाइटपेपरमध्यें त्यांचा अंतर्भाव केला. सरकारतर्फे जें सूचित केलें गेलें तें असें. प्राप्तीवरील कराच्या उत्पन्नापैकीं, शेंकडा ५० ते ७५ टक्के कर प्रांतांना द्यावा व कायद्यांत तसें स्पष्टपणें नमूद करावें. व्हाइटपेपरमधील ही सूचना जॉइंट सिलेक्ट कमिटीपुढें आली. या कमिटीनें प्रांताचा अमुक टक्के हिस्सा या करांत असावा या स्पष्ट उल्लेखाला हरकत घेतली आणि तो किती असावा हें ठरविण्याकरतां आणखी एक कमिटी नेमावी असें सुचविलें. कमिट्यावर कमिट्या नेमण्याचा हा सपाटा कार्याच्या दृष्टीनें त्रासाचा असला तरी सरकारला तो आवश्यक वाटला. पण या जॉइंट सिलेक्ट कमिटीनें या वांटणीबद्दल आपलें मत त्या वेळीं मार्गदर्शक व्हावें म्हणून नमूद केलें. 'प्रांतांना द्यावयाच्या हिश्श्याचें प्रमाण प्रथम नक्की करूं नये, तें क्रमशः करावें. पहिल्या कांहीं वर्षांत मध्यवर्ती सत्तेला अधिक हिस्सा द्यावा. दुसऱ्या कालखंडांत मध्यवर्ती सत्तेला द्यावयाचें हिश्शाचें प्रमाण कमी करावें; आणि शेवटीं मध्यवर्ती सत्ता व प्रांतिक सत्ता यांना किती प्रमाणांत पैसा द्यावयाचा हें निश्चित ठरवून टाकावें.' जॉइंट सिलेक्ट कमिटीच्या शिफारसींप्रमाणें प्राप्तीवरील कराच्या तीन अवस्था होणार होत्या. पहिल्या कांहीं वर्षांत संयुक्त सरकारला जास्त हिस्सा द्यावयाचा, दुसऱ्या कांहीं वर्षांत तो हिस्सा कमी करावयाचा व

शेवटीं दोन्ही सरकारांना द्यावयाचा हिस्सा नक्की करावयाचा अशी ही करविभागणीची कल्पना होती.

प्राप्तीवरील कराशिवाय इतर करांचाहि विचार व्हाइटपेपरमध्यें होता. व्हाइटपेपरमधील शिफारसी दोन पील कमिट्यांच्या निर्णयावर आधारलेल्या होत्या. व्हाइटपेपरचें म्हणणें असें-प्रांत व संयुक्त सत्ता यांच्यामध्यें जी राज्यकारभाराची विभागणी केली आहे, तीच कराच्या वसुलीला आधार म्हणून घ्यावी. नव्या कायद्यानें राज्यकारभाराच्या तीन याद्या तयार केल्या आहेत. एक यादी संयुक्त सरकारची, दुसरी प्रांतिक सरकारची व तिसरी दोन्ही सरकारांना समान असणारी. त्या याद्यांत राज्यकारभाराची जी विभागणी केली आहे, ती करवसुलीच्या बाबतींतसुद्धां करावी. उदाहरणार्थ, संयुक्त सरकारला आयातजकाती, रेल्वे, निर्यात कर, मीठावरील कर, तंबाखूवरील जकात वगैरे खातीं तोडून द्यावीं. प्रांताकडे जमीनमहसूल, दारू, वगैरे खातीं द्यावीं. मध्यवर्ती सत्तेला आणखी एक अधिकार दिला होता. त्यांना वाटल्यास, १ मीठ २ निर्यातीवरील कर आणि ३ संयुक्त सरकारच्या कक्षेंत येणाऱ्या एक्साईजवरील कर, हे त्यांनीं पूर्णपणें अगर अंशतः प्रांतांना द्यावेत. निर्यातीवरील करांपैकीं, ज्यूटपासून जो कर मिळेल त्यांतील कमींत कमी निम्मा म्हणजे ५० टक्के त्या प्रांताला दिलाच पाहिजे असें संयुक्त सरकारवर बंधन घालण्यांत आलें. प्रांतांना कांहीं कांहीं किरकोळ कर बसविण्याच्या बाबी देण्यांत आल्या. वारसा कर, खाणीवरील हक्काबद्दल कर, रेल्वे,नौका व विमानें यांच्या द्वारां होणाऱ्या मालाच्या व माणसांच्या वहातुकीवरील टर्मिनल कर, रेल्वे तिकिटांवरील कर, स्टँपावरील कर हे प्रांतांना देण्याची शिफारस करण्यांत आली.

पण त्यांची वांटणी निरनिराळ्या प्रांतांत कशी करावी हें ठरविण्याची सत्ता संयुक्त सरकारवर सोपवावी आणि त्यांनींहि त्यांतला कांहीं हिस्सा हवा तर घ्यावा असेंहि सूचित केलें.

पहिल्या व दुसऱ्या पील कमिटीच्या दरम्यान वर उल्लेखिलेली युस्टेस पर्सी यांच्या अध्यक्षतेखालीं कमिटी नेमली गेली. ती हिंदुस्थानांत १९३२ मध्यें येऊन गेली. या कमिटीमुळें प्रांतांना प्राप्तीवरील कर जो सर्व मिळणार होता, त्यांत संयुक्त सरकारला वांटा दिला गेला.

नव्या घटनेप्रमाणें नवे प्रांत जन्मास येणार होते, त्यांना बाळकडू दिल्याशिवाय ते बाळसें धरणें शक्य नव्हतें. तेव्हां त्यांचाहि विचार पर्सीकमिटीनें केला. त्याच्याच आधारावर पुढील सर्व कमिटयांनीं आपल्या शिफारसी केल्या व शेवटीं कायद्यानेंहि त्याला मान्यता दिली. सगळ्यांत रोडका प्रांत सिंध होता. हा प्रांत स्वतंत्र करावा म्हणून मुसलमानांची सतत अनेक वर्षें मागणी होती. ओरिसा, आसाम, सरहद्द वगैरे प्रांत असेच कंगाल आहेत. त्यांनाहि खुराक देणें जरूर होतें, पण दरवर्षी मध्यवर्ती सत्तेकडून मिळणारी भिक ही जर निश्चित नसेल तर त्या प्रांतांच्या कारभाराला स्थैर्य लाभणार नाहीं, म्हणून प्रथम कांहीं वर्षें या प्रांतांना निश्चित अमुक रक्कम मिळेल अशाबद्दल कायद्यानें व्यवस्था करावी ही सूचना करण्यांत आली. पुढें पाहिजे तर ही रक्कम बदलावी असेंहि पील कमिटी, व्हाइटपेपर वगैरेंनीं सुचविलें.

## नेमियर निर्णय

या सर्व प्रश्नांचा विचार करण्याकरतां सर ऑटोनेमियर यांच्या अध्यक्षतेखालीं ता. ६ डिसेंबर १९३५ रोजीं एक कमिटी नेमण्यांत

आली व तिचा रिपोर्ट ६ एप्रिल १९३६ रोजीं बाहेर पडला. या कमिटींत फक्त एकच सभासद असल्यामुळें तिला कमिटी म्हणणेंहि कठीण आहे. सर नेमिअर हे फार हुषार गृहस्थ असल्यामुळें व त्यांच्यावरच सर्व जबाबदारी असल्यामुळें त्यांचा रिपोर्ट बऱ्याच जणांना समाधानकारक वाटला. पण प्रांतांनीं त्याबद्दल अकांडतांडव केलें. वास्तविकपणें सरकारनें पांच वर्षें आपल्या नालायकीचें प्रदर्शन करून जे पैसे उधळले, जो काल खर्ची घातला आणि ज्या अनेक कमिटया नेमल्या, त्याऐवजीं त्यांनीं अशी एखादी कमिटी आधींच नेमली असती तर सर्व प्रश्न पूर्वींच निकालांत निघाले असते.

१९३० पासून १९३४ पर्यंतचा काळ राजकीय दृष्टया धामधुमीचा गेला.त्यामुळें ब्रिटिश अधिकाऱ्यांचीं डोकीं शांतपणें विचार करण्यास ताळ्यावर राहिलीं नव्हतीं. तसेंच त्या काळांत आर्थिक मंदीची प्रचंड लाट आल्यामुळें अंदाजपत्रकांनीं ताळ सोडला. एखादा सिद्धांत बसविण्यास खवळलेली परिस्थिति चालत नाहीं. १९३०-३१ च्या काळांत अंदाजपत्रकें घसरगुंडीला लागलीं होतीं व अनेक कोटींची तूट मध्यवर्ती कायदेमंडळांत येत असे. पण ही मंदीची लाट दोनतीन वर्षांत ओसरली व तोट्याऐवजीं अंदाजपत्रकांत जास्त जमा दिसूं लागली. सर ऑटो नेमियर यानीं ज्या वेळीं चौकशीला सुरवात केली, त्या वेळीं सभोंवतालीं रखरखलेला ओसाड प्रदेश त्यांना दिसत नव्हता. नुक्तीच पर्जन्यवृष्टि होऊन नूतन तृणांकुर जमीनींतून डोकीं वर काढीत असावेत तसा तो काळ होता. त्यामुळें सर नेमियर यांनीं असा निष्कर्ष काढला कीं, नवी घटना आर्थिक दृष्टया यशस्वी होणें शक्य आहे.

मात्र पैशाचा कारभार व्यवस्थितपणें व थोडासा शहाणपणानें चालवला म्हणजे झालें. सर नेमियर यांनीं केलेल्या सूचना पुढें मान्य केल्या गेल्या.

सर ऑटो नेमियर यांच्या पुढें दोन प्रश्न प्रामुख्यानें निर्णयाकरतां सोंपविले होते. एक, ज्या प्रांताची आदा खर्चापेक्षां कमी आहे त्यांना किती रक्कम द्यावयाची व दुसरा प्राप्तीवरील कराची विभागणी कशी करावयाची. नवे प्रांत कोणत्या का कारणानें निर्माण होईनात पण ते प्रांत निर्माण करणें अवश्य होऊन बसलें होतें. सिंध व सरहद्द प्रांत कोरून काढावयाचे सरकारनें ठरविल्यावर त्यांचा संसार चालविणें भागच होतें. त्याकरतां प्रांत व मध्यवर्ती सरकार यांच्या उत्पन्नांतील कांहीं हिस्सा तोडून तो या प्रांतांना देण्याशिवाय गत्यंतर नव्हतें. कांहीं प्रांतांचें उत्पन्न चांगलें होतें ही खरोखर त्यांचें उत्पन्न काढून घेण्यास योग्य सबब नव्हती. पण त्याहि बाबतींत समर्थन करणारे लोक पुढें येऊं शकतात.

निरनिराळ्या प्रांतांची नेमियरनीं कसकशी व्यवस्था केली हें आतां पाहूं.

**सिंधः**—मुंबई प्रांतापासून सिंध निराळा झाल्यामुळें मुंबईचा खर्च ९० लाखांनीं कमी झाला. ओरिसा स्वतंत्र केल्यामुळें बिहारचा खर्च ८ लाखांनीं कमी झाला. पूर्वीच्या एकंदर ८ प्रांतांपैकीं, मुंबई पंजाब व मद्रास हे प्रांत आर्थिक दृष्ट्या पुढारलेले, बंगाल हा गरीब व बिहार ओरिसा हे दरिद्री प्रांत होते. मध्यप्रांत दरिद्रीच पण बिहारपेक्षां जरा बरा आणि संयुक्तप्रांताचा सध्यांचा काळ जरी बेताबाताचाच असला, तरी भविष्यकाळ चांगला आहे. सिंध व ओरिसा हे नुक्तेच बाहेर पडलेले प्रांत असल्यामुळें त्यांचें भवितव्य

अद्याप ठरावयाचें आहे. पण कोणत्याही प्रांताची कांहींहि स्थिति असली तरी त्यांची सोय नेमियरना करणें भागच होतें. त्यानीं सिंध प्रांताला १९४७–४८ पर्यंत दरवर्षी १०५ लाख रुपये द्यावें असें सांगितलें. त्यानंतर दरवर्षी ही रकम २५ लाखांनीं कमी करावी व ती २० वर्षेंपर्यंत द्यावी. खालील कोष्टकांत त्यांची वांटणी दिली आहे.

| | लाख | दरवर्षी |
|---|---|---|
| १९३७–३८ | ११० | ,, |
| १९३८–३९ ते १९४७–४८ | १०५ | ,, |
| १९४८–४९ ते १९६८–६९ | ८० | ,, |
| १९६९–७० ते १९७४–७५ | ६५ | ,, |
| १९७५–७६ ते १९८०–८१ | ६० | ,, |
| १९८१–८२ ते लॉईड बॅरेजचें कर्ज फिटेपर्यंत | ५५ | ,, |

हें कर्ज १९८७–८८ सालीं फिटेल अशी त्यांची कल्पना आहे. हें कर्ज फिटल्यावर तो प्रांत आर्थिक दृष्टया स्वावलंबी झाला पाहिजे. ज्या वर्षीं हें कर्ज फिटेल त्या वर्षापासून सिंधला मदत देण्याची आवश्यकता नाहीं असेंहि या योजनेंत म्हणून ठेवलें आहे.

सिंधप्रांताला पहिल्या वर्षीं १०८ लाख रुपये देण्यांत आले व $१७\frac{१}{२}$ लाख इमारतीकरतां शिवाय दिले गेले. १०८ लाखांपैकीं ५ लाख शिकारपूरच्या तुरुंगाकरतां देण्यांत आले. हें दान अर्थांतच मध्यवर्ती सरकारकडून होत आहे. लॉईड बॅरेजकरतां काढलेलें कर्ज व्याजमुद्दलासुद्धां फिटून जमिनीच्या साऱ्याचें उत्पन्न यावयास ४०।४५ वर्षें तरी लागतील तोंपर्यंत हा प्रांत स्वतंत्र केल्याबद्दलचा भुदंड मध्यवर्ती सरकारला द्यावा लागणार असा याचा

अर्थ आहे. पण लॉईड बॅरेजची योजना नसती तर एक कोट रुपये सतत द्यावे लागले असते.

**ओरिसा**:—हा प्रांत कंगाल असल्यामुळें त्याला मध्यवर्ती सरकारकडून जी देणगी देण्यांत आली ती ५० लाखांची. यांपैकीं, ४२॥ लाख रुपये अंदाजपत्रकांत येणाऱ्या तुटीबद्दल, ७॥ लाख रुपये दुष्काळ फंड व रस्ते बांधण्याकरतां आणि २ लाख इतर खर्चाकरतां. सर ऑटो नेमियर यानीं आणखी चार लाख रुपये रस्ते, दुष्काळ वगैरेकरतां द्यावे असें सुचविलें. ऑर्डर इन कौन्सिल (बादशहांच्या हुकमान्वयें ) प्रमाणें ओरिसा प्रांताला नवा कायदा सुरू झाल्यावर पहिल्या वर्षीं ४७ लाख रुपये, त्या पुढें चार वर्षें ४३ लाख व त्यानंतर दरवर्षीं ४० लाख रुपये द्यावे असें ठरविलें.

**आसाम**:—हा नेहमींच कंगाल रहाणार आहे. नव्या घटनेप्रमाणें ह्या प्रांतावर आणखी खर्चाचा बोजा पडणार असल्यामुळें त्याची तरतूद करणें अवश्य होऊन बसलें. आसाममध्यें असलेल्या ( Rifles ) पलटणीचा एकंदर खर्च १५ लाख रुपये असे. त्यांतील १२ लाख मध्यवर्ती सरकार देत असे. यांपैकीं, मणिपुरला जी तुकडी आहे तिचा ३ लाख रुपये खर्च मध्यवर्ती सरकार करणारच आहे. शिवाय या फौजेच्या बाकीच्या खर्चपैकीं ७ लाख रुपये आपण देऊं असें मध्यवर्ती सरकारनें म्हटलें आहे. या ७ लाखांचा व प्रांताला द्यावयाच्या मदतीचा कांहीं संबंध नाहीं असें सरकारनें कबूल केलें आहे.

पेट्रोलवरील जकात आपल्याला मिळावी असा आसामच्या सरकारनें हक्क सांगितला. पण तो मान्य करण्यांत आला नाहीं. आसामला ४५ लाख रुपये द्यावेत असें नेमियरनें सुचविलें होतें.

याशिवाय १० लाख रुपये आसामी फौजेकरतां मध्यवर्ती सत्तेकडून निराळे आसामला मिळणार आहेत.

**सरहद्द प्रांतः**—हा प्रांत तर अगदीं डोंगराळ असल्यामुळें त्याला भरपूर मदत देणें जरूर आहे. इतर प्रांतांना द्यावयाची रक्कम वाढवावयाची असली तर बादशहाकडे कायदेमंडळाची विनंति जावी लागते. पण सरहद्द प्रांताची मदत स्वतः बादशहाच वाढवूं शकतात. परचक्राची भीति या सरहद्दीवर नेहमीं वाटत असल्या-मुळें हा प्रांत बादशहाच्या खास मर्जींतला आहे. या प्रांताला १ कोट रुपये मिळतच आहेत. त्यांत आणखी १० लाखांची भर घालण्याकरतां पहिल्या पांच वर्षांनंतर पुनः या प्रांताच्या हिशेबाची तपासणी करावी असें नेमियर यानीं सुचविलें.

याशिवाय बंगालला ७५ लाख, बिहारला २५ लाख, मध्य-प्रांताला १५ लाख व संयुक्तप्रांताला २५ लाख रुपये मदतीदाखल द्यावेत असेंहि त्यानीं सांगितलें. त्यांच्या शिफारसीप्रमाणें प्रत्येक प्रांताला खालील रकमा मिळावयाच्या आहेत.

| | लाख | |
|---|---|---|
| बंगाल | ७५ | |
| बिहार | २५ | |
| मध्यप्रांत | १५ | |
| आसाम | ४५+७ लाख आसाम रायफल्सकरतां | |
| सरहद्द प्रांत | १०० | |
| ओरिसा | ५०+१९ लाख (१९ लाख एकदांच.) | |
| सिंध | १०५+५ लाख (दरवर्षी कमी होणारे) | |
| संयुक्त प्रांत | २५ | ५ वर्षें फक्त. |

या प्रांतांना द्यावयाच्या रकमा जशा ठरल्या, तसें त्या प्रांतांकडून यावयाच्या कर्जाचाहि विचार करणें जरूर होतें. मध्यवर्ती सरकारचें कर्जदार असणाऱ्या बंगाल, बिहार, आसाम सरहद्द व ओरिसा या पांच प्रांतांचें १ एप्रिल १९३६ पूर्वींचें सर्व कर्ज माफ करण्यांत आलें. ह्या कर्जमाफीमुळें बंगालचे ३३ लाख, बिहारचे २२, आसामचे १५½, सरहद्द प्रांताचे १२, आणि ओरिसाचे ९½ लाख दरवर्षी वांचले. मध्यप्रांताचे ३१ मार्च १९३६ पूर्वी जेवढें तोटयाचें कर्ज होतें, तें माफ केलें. तसेंच सुधारणापूर्वकाळांतील २ कोटी कर्ज माफ केलें. या माफीमुळें मध्यप्रांताला १५ लाखांची वार्षिक सवड मिळाली.

रोडक्या प्रांतांना द्यावयाच्या रकमा निश्चित केल्या. त्या रकमांतून कर्ज माफ केलें; आतां बाकीची तूट भरून काढण्याकरतां त्यांना कराचें उत्पन्न द्यावयाचें ठरलें. बंगाल, बिहार, ओरिसा व आसाम या चार प्रांतांत जें ज्यूटच्या कराचें उत्पन्न येतें तें सर्व मध्यवर्ती सत्तेला न मिळतां त्यांतील मोठा हिस्सा या चार प्रांतांना मिळणें न्याय्य होतें. नेमियरनीं त्यांची मागणी कबूल केली व त्यांचें प्रमाण६२½ टक्के ठरविलें. ज्यूटच्या उत्पन्नाची खर्च वजा जातां ६२½ टक्के प्रमाणें प्रांतवारी वांटणी केली ती अशीः—बंगाल ४२ लाख, बिहार २½, आसाम २¼; व ओरिसा ¼. येणें व देणें या दोन गोष्टींचा विचार करून नेमियरनीं प्रांतांच्या देणग्यांचा निकाल खालीलप्रमाणें लावला.

| | मध्यवर्ती सरकारनें | | | प्रत्यक्ष |
|---|---|---|---|---|
| प्रांत | द्यावयाची मदत | कर्जमाफी | ज्यूटकर | मदत |
| | लाख | वजा | वजा | एकूण |
| बंगाल | ७५ | −३३ | −४२ | = ० |
| बिहार | २५ | −२२ | −२½ | = ० |
| मध्यप्रांत | १५ | −१५ | | = ० |
| आसाम | ४५ | −१५½ | −२¼ | = ३० |
| सरहद्द | १०० | −१२ | | =१०० |
| ओरिसा | ५० | −९½ | − ¼ | = ४० |
| सिंध | १०५ | | | =१०५ |
| संयुक्तप्रांत | २५ | | | = २५ |

( १९४२ पर्यंत )

वा. स. प्रांताच्या मदतींत कर्जमाफी धरली नाहीं. आसाम व ओरिसाचा हिशेब काटेकोर केला नाहीं.ऑटो नेमियरनीं केलेली ही वांटणी बादशहानें एक फर्मान काढून १९३६ च्या आक्टोबरमध्यें मंजूर केली.

## प्राप्तिकर

या प्रश्नाप्रमाणें भांडणाचें मूळ होऊन राहिलेला प्रश्न प्राप्तीवरील कराचा होता. त्याची विल्हेवाट लावण्याचें काम ऑटो नेमियरवर सोपविण्यांत आलें.त्याला तीन प्रश्न सोडवावयाचे होते.(१) प्रत्येक प्रांताला प्राप्तीवरील करापैकीं किती रक्कम द्यावयाची. (२) सुरवातीला किती रक्कम द्यावयाची व कायम किती

रक्कम द्यावयाची. (३) निरनिराळ्या प्रांतांमध्यें जी कराची वांटणी करावयाची ती कोणत्या आधारावर करावयाची. हे प्रश्न फार भानगडीचे तसेंच भांडणाचे होते. मुंबई व कलकत्त्यासारखी शहरें म्हणत कीं, आम्ही औद्योगिक दृष्ट्या पुढारलेले असल्यामुळें आमच्या प्रांतांतच प्राप्तिकर जास्त वसूल होतो. तेव्हां आमचा पैसा दुसऱ्या बिनउद्योगी प्रांताना देणें अन्यायाचें आहे. उलट शेतकीप्रधान प्रांत म्हणत कीं, आमचा कच्चा माल घेऊनच तुम्ही उद्योग करतां, मग तो पैसा आमचाच आहे व आम्हांला तें उत्पन्न मिळालें पाहिजे. तीन वर्षेपर्यंत ही ओढाताण चालली होती.

शेवटीं नेमियरनीं ह्याहि भांडणाचा शेवट केला. त्यांत कांहीं प्रांतांना अन्याय झाला असें वाटणें साहजिक आहे. पण नेमियर पुढें साऱ्या हिंदुस्थानचा प्रश्न असल्यामुळें त्याना हे आक्षेप सहन करावे लागले. त्यानीं आपल्या निर्णयाकरतां १९३६–३७ सालचें प्राप्तिकराचें उत्पन्न घेतलें. तें १५·७ कोटी इतकें होतें. त्यांतून २·१ ब्रह्मदेशचें उत्पन्न वजा जातां १३·६ कोटी शिल्लक राहिलें. त्यांतून १॥ कोटी उत्पन्न निरनिराळ्या कारणांकरतां वजा घालतां बाकी १२ कोटी रुपये उरले. या १२ कोटींपैकीं, निम्मी रक्कम म्हणजे ६ कोट रुपये संयुक्त सरकारनें आपल्याकरतां ठेवावी असें त्यानीं सांगितलें. मध्यवर्ती सरकारच्या स्थैर्यावर प्रांताचें स्थैर्य अवलंबून आहे हें जरी खरें असलें तरी मध्यवर्ती सत्ता सैन्याच्या व इतर अनेक प्रकारच्या खात्यांवर भरमसाट पैसा खर्च करीत आहे ही गोष्ट अक्षम्य आहे. पण हा खर्च कमी करावा हें सांगण्याचें धैर्य नेमियरना नव्हतें, कदाचित् तें त्याच्या

अधिकाराबाहेरील काम असेल. नेमियरनें संयुक्त सरकारचा ६ कोटींचा वांटा ठेवावा असें सांगितलें. पण हे ६ कोटी रुपये संयुक्त सरकारनें नेहमींच ठेवीत रहावेत कां त्याला कांहीं मुदत असावी हा त्यापुढचा प्रश्न होता. प्रांत व मध्यवर्ती सत्ता यांच्यांत प्राप्तीवरील कर निम्मा निम्मा विभागून द्यावा असें सांगितल्यामुळें मध्यवर्ती सत्तेला प्राप्तीवरील कराचा निम्मा भाग नेहमींच मिळत रहाणार हें उघड आहे. किंबहुना प्राप्तीवरील कराचें स्वामित्व आपलें आहे असें मध्यवर्ती सरकार म्हणतें आणि प्रांतांना जो हिस्सा द्यावयाचा तो मेहरबानीखातर द्यावयाचा असा त्यांचा सिद्धांत आहे. याच्या उलट प्रांतांचें प्रतिपादन आहे.

नेमियरनीं प्रांत व मध्यवर्ती सत्ता यांच्यांत निम्मी निम्मी वांटणी करून टाकली खरी; पण प्रांतांना आपला हिस्सा केव्हांपासून मिळावा हें ठरविणें जरुर होतें. नव्या राज्यघटनेमध्यें मध्यवर्ती सत्तेला बराच ताण पडणार आहे व त्यांना स्थैर्यहि लाभणार नाहीं अशा भूमिकेवर पुढील व्यवस्था करण्यांत आली. मध्यवर्ती सत्तेला कमीत कमी १३ कोटी रुपये पाहिजेत हें सर्वजण धरून चालले आहेत. या १३ कोटींत कोणत्याही कारणानें तूट येतां कामा नये असें मध्यवर्ती सत्तेचे पुरस्कर्ते सांगतात. हें १३ कोटी रुपये त्यांनीं प्राप्तीवरील कर व रेल्वेचा नफा यांतून काढावयाचे आहेत. पण रेल्वेंत नफा उरला नाहीं तर काय करावयाचें ? प्रांताच्या तोंडाला पानें पुसलीं जाणार हें उघड आहे. प्राप्तीवरील करापासून १३ कोटी रुपये मागेंहि येत होते व पुढेंहि येत रहाणार. तेव्हां मध्यवर्ती सत्तेची त्यामुळें ओढाताण होणार नाहीं. प्राप्तीवरील करापैकीं ५० टक्के प्रांतांना वांटून द्यावें असें म्हटलें आहे खरें पण ही

वांटणी कागदी वांटणी आहे. प्रांताच्या पदरांत हा हिस्सा पडण्याकरतां एक तर प्राप्तीवरील कर १३ कोटींपेक्षां जास्त वाढविला पाहिजे किंवा रेल्वे तरी नफ्याची रक्कम मध्यवर्ती सरकारच्या पदरांत टाकूं लागली पाहिजे. पण जोंपर्यंत या दोनपैकीं एकहि गोष्ट होत नाहीं तोंपर्यंत प्रांतांना अनुकूल कालाची मार्गप्रतीक्षा करीत राहिलें पाहिजे हें उघड आहे. मध्यवर्ती सत्ता आपल्या खर्चाला कात्री लावावयास तयार नाहीं. या सत्तेमार्फत होणारा खर्च हा बहुतेक ग. जनरलच्या खास अधिकारांतला असल्यामुळें त्यांत काटकसर सुचविणें अगर करणें हेंहि जबाबदार म्हणविल्या जाणाऱ्या मंत्रिमंडळाला शक्य नाहीं. उत्पन्नांत वाढ करावी म्हटलें तर तिकडेहि नाकेबंदी केली आहे. बाहेरून येणाऱ्या मालावर जादा जकाती बसवून आणि हिंदी मालाला प्रोत्साहन देऊन येथें उद्योगधंद्यांची वाढ करणें व जकातीचें आणि प्राप्तीवरील कराचें उत्पन्न वाढविणें हेंहि अशक्य करून टाकलें आहे. हिंदी व्यापाऱ्यांचे पाय इंग्रजी व्यापाऱ्यांच्या पायांशीं बांधून टाकले असल्यामुळें आमचे व्यापारी जोरानें पळूं म्हणतील तर त्यांचीं तोंडेंच फुटतील. बरें रेल्वेचा कारभार हातीं घेऊन, त्यांत कांहीं काटकसर, कांहीं उत्पन्नवाढ करावी म्हटलें तर तेंहि जांवईखातें करून टाकलें आहे. रेल्वेखातें हें जबाबदार सरकारपासून तोडून स्वतंत्र खातें केलें आहे व त्यावर ग. जनरलची खास सत्ता चालणार आहे. त्या खात्यांत असलेले गोरे–निमगोरे नोकर, त्या खात्यामार्फत खरेदी करण्यांत येणारा माल, करावें लागणारें बांधकाम यांचा वारसा इंग्रजी कंपन्यांकडे जाणार असल्यामुळें

रेल्वेंतून नफा दिसणें जवळजवळ अशक्य करून टाकलें आहे. अशा प्रकारें खर्चाची रक्कम ब्रम्हलिखित आणि उत्पन्नाची वाढ अशक्य करून टाकल्यामुळें या नव्या जबाबदारीच्या अधिकाराचें भ्रामक स्वरूप प्रत्ययास येत आहे. या नव्या घटनेंतून गोरगरिबांना उसंथ मिळणें हें तर मृगजळापासून तृषाहरण होण्याइतकें सुलभ आहे. तेव्हां ओटोनेमियरसारखा अर्थतज्ज्ञ आणला म्हणून तो या सांगाड्यांत जीव कसा ओतणार ?

नेमियरनीं प्राप्तीच्या कराबद्दल कायद्यांतील शब्दप्रयोगांना अनुसरून ज्या सूचना केल्या व ज्या ३ जुलै १९३६ रोजीं बादशाही फर्मानानें कायद्याचा भाग झाल्या त्या अशा प्रकारच्या आहेत.

शेतकीचें उत्पन्नाशिवाय बाकीचें जें उत्पन्न आहे त्याच्यावर संयुक्त सरकारनें कर बसवावा व वसूल करावा. ह्या करांपैकीं जी रक्कम चीफ कमिशनरच्या प्रांतांतून येईल किंवा संयुक्त सरकारच्या नोकरांच्या पगारपेन्शनपासून प्राप्तीवरील कराच्या रूपानें जी रक्कम घेतली जाईल ती संयुक्त सरकारच्या (प्राप्तीवरील कराच्या) उत्पन्नांत धरूं नये. तेवढी रक्कम वगळतां बाकीचा वसूल झालेला कर हा त्या प्रांतांतून व संस्थानांतून आलेला कर आहे असें समजून त्यांच्यांत ठराविक प्रमाणांत वांटून द्यावयाचा आहे.

हें वांटणीचें प्रारंभीं ठरलेलें प्रमाण बादशहानें आपलें फर्मान काढून बदलूं नये. तसेंच संयुक्त सरकारला हा प्राप्तीवरील कर वाढवावा असें वाटलें तर तें सरकार आपल्या कारभाराकरतां प्राप्तीवर जादा कर बसवूं शकेल व हें वाढलेलें उत्पन्न संयुक्त सरकारचें उत्पन्न समजलें जाईल. पण त्या सरकारला वाढलेलें सर्व

उत्पन्न तोडून मिळेल असें नाहीं. आपण अशी कल्पना करूं कीं, सध्यां १२ कोटी प्राप्तीवरील कर आहे. त्यांतील ६ कोटी प्रांताला व ६ कोटी मध्यवर्ती सत्तेला मिळतात. मध्यवर्ती सत्तेला हें उत्पन्न अपुरें आहे असें वाटलें व त्यांनीं १२ कोटींचें उत्पन्न १६ कोटी केलें. तर मध्यवर्ती सत्तेला ६ कोटी, अधिक हें वाढलेलें ४ कोटी असें १० कोटी मिळणार नसून ८-८ कोटीच रुपये मिळतील. वर जें तत्व प्रतिपादन झालें त्याला व्यवहाराची मुरड पुढें घातली आहे व तत्त्वाचें मृगचर्म खुंटीवर टांगून ठेवलें आहे.

प्रांतामध्यें जरी ठराविक प्रमाणांत रक्कम वांटून द्यावी असें म्हटलें असलें तरी संयुक्त सरकार ठराविक मुदतीच्या काळांत दरवर्षी ही रक्कम स्वतःकडे ठेवूं शकेल.

या ‘ ठराविक मुदतीचे ’ पांच पांच वर्षांचे कालखंड करण्यांत आले आहेत. नवा कायदा अमलांत आल्यापासून पहिल्या पांच वर्षेपर्यंत पहिला कालखंड व तो संपल्यावर पुढील पांच वर्षांचा दुसरा कालखंड.

या पहिल्या पांच वर्षांत संयुक्त सरकार प्रांतांना द्यावयाची सबंध अगर कांहीं (म्हणजे ६ कोटी किंवा कमी) रक्कम प्रांतांना न देतां स्वतःच्या खर्चाकरतां ठेवूं शकतें. ही रक्कम रेल्वेपासून होणारा फायदा हिशेबांत धरून कमीत कमी १३ कोटि रुपये धरली आहे.

रेल्वेपासून होणारा फायदा म्हणजे काय याचेंहि विवरण फर्मानांत केलें आहे. २० सप्टेंबर १९२४ रोजीं लेजिस्लेटिव्ह असेंब्लीनें जो ठराव केला आहे व त्यांत जीं तत्त्वें प्रतिपादन केलीं आहेत त्या तत्त्वानुरूप हा निव्वळ नफा काढावयाचा आहे. ब्रम्हदेश निराळा झाल्यामुळें ब्रम्हदेशच्या रेल्वेचें उत्पन्न त्यांतून वगळा-

वयाचें आहे. तसेंच हा फायदा ठरवितांना घसाऱ्याच्या फंडांतून ( Depreciation Fund ) जी रक्कम हा कायदा सुरू होण्यापूर्वी उसनवार घेतली असेल ती परत द्यावयाची नाहीं हें लक्षांत ठेवावयाचें आहे. त्याचप्रमाणें एकंदर उत्पन्नांत जी रक्कम मदतीदाखल घेतली असेल व जी नव्या कायद्याच्या सुरवातीला फेडावयाची राहिली असेल तीही परत करावयाची नाहीं हें लक्षांत ठेवलें पाहिजे. अशा प्रकारें रेल्वेपासून होणारा फायदा व प्राप्तीवरील कर यांची बेरीज १३ कोटींपेक्षां जेव्हां जास्त होईल तेव्हांच प्रांतांना प्राप्तिकराचा हिस्सा मिळेल. तोंपर्यंत मिळणार नाहीं.

पहिल्या पांच वर्षांत काय करावयाचें याची अशी विल्हेवाट लागली. आतां पुढच्या पांच वर्षांत कशी व्यवस्था करावी हें कायद्यांत सांगितलें आहे. दुसऱ्या पांच वर्षांतसुद्धां संयुक्त सरकार प्रांताच्या तोंडांत पडणारा घास हिरावून घेऊं शकतें. मात्र सहाव्या वर्षांपूर्वी म्हणजे पांचव्या वर्षांमध्यें जो प्रांताचा हिस्सा संयुक्त सरकारनें आपल्याकडे ठेविला असेल, तो हिस्सा, पुढील काळांत सारख्या रकमेनें म्हणजे $\frac{1}{6}$ नें कमी करावा आणि शेवटच्या वर्षी दरवर्षी कमी कमी करीत आणलेला हा हिस्सा त्या वजावाटीच्या बेरजेइतका असावा. याचा अर्थ असा:—आपण असें समजूं कीं, पांचव्या वर्षी प्रांतांचे सर्व म्हणजे ६ कोटी रुपये संयुक्त सरकार आपल्या कडे ठेवीत आहे. पुढच्या पांच वर्षांत ही रक्कम १।· कोटीनें अंदाजीं कमी करावयाची आहे. म्हणजे साधारणतः सहाव्या वर्षी १। कोटी, सातव्या वर्षीं २॥ कोटी, आठव्या वर्षी ३॥। कोटी, नवव्या वर्षी ५ कोटी व दहाव्या वर्षी ६ कोटी असें क्रमशः प्रांतांना वांटून द्यावयाचे आहेत.

पण ही सदिच्छा आहे, कारण संयुक्त सरकारची परिस्थिति सुधारली तरच त्यांना हातांतील ही रक्कम सोडतां येईल. नाहींतर जुना जमाना पुढें चालूं राहील.

हा पांच पांच वर्षांचा काळ दिला आहे तो कमीअधिक करण्याचा अधिकार, ज्यानें हा काळ ठरविला त्यांना म्हणजे फर्मान काढणाऱ्या बादशहांना नसून ग. जनरलला आहे. ग. जनरलला असें वाटलें कीं, संयुक्त सरकारची आर्थिक स्थिति चांगली नाहीं, तर ते आपल्या विवेचक बुद्धीनुसार दुसऱ्या कालखंडांत सुद्धां पहिल्या कालखंडाइतकी रक्कम संयुक्त सरकारच्या खातीं ठेवूं शकतील आणि कायदा विटाळूं नये म्हणून दुसरा कालखंड ते लांबवूं शकतील. मात्र असें करतांना त्यांनीं निरनिराळ्या हितसंबंधीं लोकांचा सल्ला घ्यावा व आर्थिक स्थैर्याचाहि विचार करावा असें त्यांना सुचविलें आहे.

संयुक्त राज्यघटनेच्या क्षेमस्थैर्याकरतां ज्या वेळीं प्राप्तीवरील कराची जादा आकारणी होईल, त्या वेळीं संस्थानांचें काय करावयाचें हा प्रश्न उद्भवेल. फेडरेशननें संस्थानी प्रजेकडून खालसा प्रजाजनाप्रमाणें हा कर प्रत्यक्ष वसूल न करतां संस्थानिकांनीं आपल्या संस्थानांवर किती कर बसणें शक्य आहे याचा हिशेब करावा व आपल्या वांट्याची जवळ जवळ तितकी रक्कम संयुक्त सरकारला द्यावी.

प्राप्तीवरील कराचें उत्पन्न निरनिराळ्या प्रांतांना कोणत्या प्रमाणांत वांटून द्यावयाचें तें खालीं दिलें आहे. ही वांटणी ज्या प्रांतांतून जितकें उत्पन्न येत आहे त्या प्रमाणावर केली आहे:—

| | | | शेंकडा. |
|---|---|---|---|
| १ | मद्रास | — | १५ |
| २ | मुंबई | — | २० |
| ३ | बंगाल | — | २० |
| ४ | संयुक्तप्रांत | — | १५ |
| ५ | पंजाब | — | ८ |
| ६ | बिहार | — | १० |
| ७ | मध्यप्रांत | — | ५ |
| ८ | आसाम | — | २ |
| ९ | सरहद्द प्रांत | — | १ |
| १० | ओरिसा | — | २ |
| ११ | सिंध | -- | २ |
| | | | १०० |

प्राप्तीवरील कराच्या बाबतींत संस्थानांनीं जर संयुक्त घटनेचा अंमल मानला व आपल्या संस्थानांत जर हा कर वसूल करूं दिला तर त्यांनाहि प्रांताप्रमाणें कांहीं हिस्सा द्यावा लागेल. पण त्यामुळें सध्यां ठरविलेली ही हिस्सेरशी बाधित होणार नाहीं.

प्रांतांना वाटून दिलेली ही रक्कम त्यांच्या पदरांत पडावयास किती अडचणी आहेत हें वर सांगितलेंच आहे. पण ही रक्कम पदरीं पडेपर्यंत त्यांना मदतीदाखल देणग्या (Subvention) ज्या देऊं केल्या आहेत त्या मिळतच रहातील. फक्त मुंबई, मद्रास व पंजाब या तीन प्रांतांना मात्र कोणत्याहि प्रकारचें सहाय्य होणार नाहीं. अलीकडे अलीकडे ग्रामोद्योगाकरतां कांहीं रक्कम प्रांतांना देण्याचें सरकारनें सुरू केलें आहे. ह्या रकमेच्या मुळाशीं गांधींच्या ग्रामोद्योग

चळवळीशीं स्पर्धा करावी ही बुद्धि आहे. पण असल्या तुटपुंज्या रकमांनीं प्रांत सुधारत नाहीं. कोट दीड कोट रुपये रस्ते बांधण्याकरतांहि प्रांतांना मिळतात. पण तें प्रांतांत वसूल केलेल्या पेट्रोलवरील कराचे असतात.

अशा प्रकारें ज्या मध्यवर्ती सत्तेंत जबाबदारी नाहीं त्या सत्तेला पैशाची भरपूर मदत देऊन साम्राज्यशाहीची पक्कड घट्ट करण्याचा प्रयत्न केला आहे; आणि ज्या प्रांतांना अल्पस्वल्प जबाबदारी दिली आहे व ज्यांना जनतेच्या हिताची प्रत्यक्ष कामें करावयाचीं आहेत त्यांना ओरडत ठेवलें आहे. प्रांतिक कारभारांत आज जो अपुरेपणा दिसत आहे, त्याला कारण पैशाचा अभाव. ह्या अभावाला मध्यवर्ती सत्तेचा अनुदारपणा कारणीभूत आहे.

## कार्पोरेशन कर.

उद्योगधंदा करणाऱ्या ज्या कंपन्या असतात त्यांच्यापासून हा कर घ्यावयाचा आहे. त्या कंपन्यांचें बिगरशेतकीचें जें उत्पन्न असेल त्यावर हा कर बसवावयाचा आहे. तो सुपर-टॅक्सच्या स्वरूपाचा आहे. त्याची व्याख्या जी केली आहे ती पुरेशी नाहीं अशी तक्रार केल्यावरून भारतमंत्री म्हणाले, आम्ही ती पार्लमेंटकडून पुढें स्पष्ट करून घेऊं. ती व्याख्या अशी:— ज्या कंपन्यांना आपल्या व्याजांतून, डिव्हिडंडमधून किंवा नफ्यांतून प्राप्तीवरील कराचे पैसे कापून घ्यावेत अशाबद्दल अधिकार दिले नसतील, त्याबद्दलचे कायदे ज्या कराला लागूं नाहींत, त्या कराला कार्पोरेशनचा कर म्हणतात. कंपनी प्राप्तीवरील कर देते, पण भागीदार हा कर देत नाहींत.

हा कर संस्थानांत सुद्धां वसूल करावयाचा आहे; पण तो आम्ही वसूल करूं अगर अन्य तऱ्हेनें तुम्हाला देऊं असें संस्थानिक म्हणत राहिले. त्यांची ही वृत्ति जॉइंट सिलेक्ट कमिटीला सुद्धां प्रशस्त वाटली नाहीं. कारण संस्थानांत काय प्रकार चालतात हें ब्रिटिश मुत्सद्यांना आमच्यापेक्षां अधिक ठाऊक आहे. तथापि कायद्यानें संस्थानिकांचे हे लाड पुरविले खरें.

फेडरेशनच्या स्थापनेला दहा वर्षे उलटून जाईपर्यंत कोणत्याहि संस्थानांत हा कर वसूल करावयाचा नाहीं. ज्या वेळीं हा कर वसूल करावयाचा काळ अवतरेल त्या वेळीं संस्थानिक असें म्हणूं शकतील कीं, आमच्या संस्थानांतून हा कर वसूल करून घेण्याऐवजीं आम्ही दरवर्षी तितकी रक्कम संयुक्त सरकारला देऊं म्हणजे झालें. एखादा संस्थानिक प्रत्यक्ष करवसूलीलाहि संमति देईल. पण त्यानें अशी संमति दिली नाहीं तर ही रक्कम निश्चित करण्यापूर्वी संस्थानिकानें जरूर ती माहिती ऑडिटर-जनरलला दिली पाहिजे. त्या अधिकाऱ्यांनीं ठरविलेली रक्कम जर संस्थानिकाला अन्याय्य वाटली तर तो फेडरल कोर्टाकडे फिर्याद नेऊं शकतो. पण फेडरल कोर्टाचा निर्णय मात्र अखेरचा मानला पाहिजे. हा कॉर्पोरेशन-कर सुद्धां कागदीच आहे.

## मीठ, एक्साइज कर.

प्रांताच्या बाबतींत तीन करांची खैरात केली आहे असें वरवर पहाणाराला वाटतें. हे तीन कर म्हणजे १ मीठ २ एक्साइज ३ निर्यात कर. ह्या तीनहि करांचें सर्वच्या सर्व अगर कांहीं उत्पन्न प्रांत अगर संस्थानें यांना वांटून द्यावें असा कायदा करण्याची

सत्ता संयुक्त सरकारला दिली आहे. प्रांत अगर संस्थानें यांना कोणत्या प्रमाणांत हीं उत्पन्नें वाटून द्यावयाचीं यासंबंधींची योजना ठरविण्यांत यावयाची आहे. हीं तीनहि उत्पन्नें प्रांतांना देण्यांत सरकारचा काय डाव अगर कावा आहे हें समजून घेतलें पाहिजे. मिठाच्या कायदेभंगाची चळवळ सुरू असतां सरकारच्या डोक्यांत ही कल्पना प्रामुख्यानें आली असावी. त्यांना असें वाटत असावें कीं, यापुढें मिठावर कर बसविणें अशक्य होईल. तेव्हां मध्यवर्ती सत्ता कदाचित् हा कर माफ करील किंवा कमी करील. प्रांतांना हें उत्पन्न देतो असें म्हटल्यानें प्रांताकडून अशी मागणी येईल कीं, हें उत्पन्न थांबवूं नका. आणि प्रांतांत काँग्रेसची सत्ता प्रचलित होणार असल्यामुळें ज्यांनीं मिठाचा कायदेभंग केला त्यांच्याकडून ही मागणी आल्यामुळें आम्ही हा कर चालू ठेवीत आहों असें मध्यवर्ती सत्ता म्हणूं शकेल. जसा पूर्वी शिक्षण पाहिजे असेल तर दारूवरील कर घ्या असा पेंच प्रांतांना घातला होता, त्याप्रमाणें पैसे पाहिजे असतील तर मिठावर कर बसवा असें ग. जनरलची पूर्ण छाप पडलेली मध्यवर्ती सत्ता प्रांतांना सांगूं शकेल. प्रांताच्या सल्ल्यानें हा कर चालू ठेवलाच तर त्यांतील किती भाग स्वतःला घ्यावयाचा हें संयुक्त सरकार ठरवूं शकेल. तेव्हां मिठाचा कर प्रांतांना देऊं करण्यांत दुहेरी डाव कायदा करणारांनीं साधला आहे. एक तर बुडणाऱ्या मिठाच्या कराचे दान प्रांतांना देण्याचें औदार्य त्यांनीं दाखविलें आहे. उलट जर प्रांतांच्या सांगण्यानें कर चालू ठेवला, तर त्यांतील उत्पन्न स्वतःला घ्यावयास त्यांचे हात कोणी बांधले नाहींत.

दुसरा कर निर्यातीचा. तो फक्त ज्यूटवर आहे व त्याची निव्वळ

उत्पन्नाची विभागणी ६२½ टक्के प्रमाणांत बंगाल, बिहार, आसाम व ओरिसांत करून टाकली आहे. तेव्हां इतर प्रांत त्या बाबतींत संबद्ध आहेत.

तिसरा कर एक्साइज. (राष्ट्राच्या उपयोगाकरतां राष्ट्रांत तयार केलेल्या वस्तू) त्यांतून पिण्याची दारू, अफू, अमली पदार्थ, मद्य असलेलीं औषधें वगैरे वगळलीं आहेत. तंबाखू, साखर, आगपेट्या वगैरे पदार्थांवर बसविण्यांत येणाऱ्या करांपैकीं, सर्व अगर कांहीं प्रांत व संस्थानांना द्यावयास संयुक्त कायदेमंडळ कायदे करूं शकेल. अशा प्रकारें मीठ, देशांत होणाऱ्या वस्तू, आणि ज्यूट या तीन पदार्थांवर बसविलेली करांची अंदाजी रक्कम, अनुक्रमें ८ कोटी, ७ कोटी व ४ कोटी म्हणजे १९।२० कोटी होते. एवढी अगर त्यांतील कांहीं रक्कम संयुक्त कायदेमंडळाच्या इच्छेनुरूप प्रांताला देण्यांत येईल. तंबाखूवरील कर इतके दिवस प्रांताकडे होता, तो आतां संयुक्त सरकारकडे जाऊं शकेल.

आतांपर्यंत आपण तीन प्रकारचे कर पाहिले. एक प्रांत व संयुक्त सरकारचा, दुसरा सर्वस्वी संयुक्त सरकारचा आणि तिसरा फेडरेशनच्या कायद्यानें प्रांतांना देतां येण्यासारखा.

संयुक्त सरकारच्या तिजोरींत चार मार्गांनीं पैसे येतात. (१) कराच्या द्वारां (२) व्यापारउद्योगद्वारां (३) सार्वभौमत्वाच्या नात्यानें (४) संस्थानिकांकडून. या चारांपैकीं, २, ३ व ४ ह्या बाबी बिनभानगडीच्या आहेत. पोस्ट, रेल्वे, बँका वगैरेंच्या द्वारां येणाऱ्या पैशांचा समावेश दुसऱ्या सदरांत होतो. सार्वभौमत्वाकरतां येणारा पैसा दोन मार्गांनीं येतो. ते म्हणजे नाण्यांत व

चलनांत होणारा नफा आणि बिनवारसी संपत्ति.४ थी बाब संस्थानिकांकडून येणाऱ्या खंडणीबद्दल आहे.

भानगड जर असेल तर पहिल्या म्हणजे कराच्या बाबतींत. कराच्या द्वारां येणाऱ्या पैशाचे तीन मुख्य प्रकार आहेत. पहिला प्रकार म्हणजे पैसा प्रांताचा, पण गोळा करणारी सत्ता मध्यवर्ती असलेली. त्यांत वारसा कर, स्टँप, रेल्वे व विमानांचे टर्मिनल कर आणि रेल्वे व मालावर बसविलेले कर. दुसरा प्रकार दोघांच्या समाईक भागीचा.त्यांतहि पुनः दोन पोटभेद आहेत.कांहीं करांची वांटणी कायद्यानेंच करून टाकली आहे. असे कर म्हणजे प्राप्तीवरील कर व ज्यूटच्या निर्गतीवरील कर. दुसरा पोटभेद जो आहे तो मीठ,स्थानिक उपयोगाच्या वस्तू व निर्यात कर. ह्या करांची वांटणी कायद्यानें केली नसून ती संयुक्तमंडळानें करावयाची आहे.

कराचा तिसरा प्रकार म्हणजे फेडरेशननें गोळा करावयाचा व स्वतःकरतां ठेवावयाच्या कराचा. त्यांत जकात, कॉरपोरेशन कर, आणि वर समाईक म्हणून निर्दिष्ट केलेले कर येतात.

प्रांताकडे जे कर जमा होतात, त्याचे तीन प्रकार आहेत.संयुक्त सरकारचा असलेला पण प्रांताचा नसलेला असा एकच प्रकार त्यांत कमी आहे. तो म्हणजे चलन व नाण्यांचा. बाकी दोघांच्या उत्पन्नाच्या बाबी सारख्याच आहेत. प्रांताकडे येणाऱ्या मुख्य उत्पन्नाच्या बाबी म्हणजे जमीनमहसूल, दारूकर, शेतकीच्या उत्पन्नावरील कर,शेतीच्या वारसाहक्काचे कर,खाणीवरील हक्काबद्दल कर, विक्री व जाहिरातीवरील कर, ऑक्ट्रॉय, करमणुकीवरील कर, स्टँप ( फेडरेशनचे वगळून ), टोल, नद्यांतून जाणाऱ्या उतारू व मालावरील कर, उद्योगधंद्यावरील व घरावरील कर इतक्या

प्रांताच्या कराच्या बाबी आहेत. यांपैकीं शेवटच्या दोनवर व नाक्यांवर म्युनिसिपालिटी कर घेते.

प्रांत व संयुक्त सरकार यांच्या उत्पन्नाची जी वांटणी केली आहे तींत बदल करणारें बिल आणण्याचा प्रसंग जर संयुक्त सरकारवर आलाच तर त्याला ग. जनरलची आगाऊ संमति घ्यावी लागेल. ग. जनरलनें सुद्धां ही संमति देण्यापूर्वी काटकसरीचे सर्व उपाय संपले आहेत याविषयीं स्वतःची खात्री करून घ्यावयास हवी. त्याचप्रमाणें फेडरेशनला आपल्या वांटयाला येणाऱ्या करामध्यें वाढ करण्याचे सर्व उपाय खुंटले असें कळून आलें तरच ग. जनरलनें अशा बिलांना संमति द्यावयाची आहे. जेथें प्रांताचे हितसंबंध गुंतले असतील अशा बिलांबद्दलच ग. जनरलनें विचार करावयाचा आहे.

यानंतर फेडरेशनमध्यें येणाऱ्या संस्थानांत कराची वाढ कोणाला व कशी करतां येईल, प्रांत, म्युनिसिपालिटया व लोकलबोर्डें वगैरेंचे कर पूर्वीप्रमाणेंच कसें चालू रहातील, निवळ उत्पन्न म्हणजे काय वगैरेंसंबंधीं कायदेशीर विवरण केलें आहे. पण त्यांत गैरसमज होण्याला जागा नसली तरी कायदा कल्पनेवर कांहींहि सोपवीत नसल्यामुळें त्याचें स्पष्टीकरण केलें आहे.

---

## १६

# संस्थानिकांचे आर्थिक प्रश्न

अखिल हिंदुस्थानची एकजिनसी संयुक्त घटना करण्याकरतां संस्थानिकांना आंत खेंचण्याचा जो प्रयत्न होणार आहे, तो आर्थिक दृष्टया ब्रिटिश हिंदुस्थानला निःसंशय तोटयाचा होणार आहे. आजपर्यंत संस्थानिक निरनिराळ्या कारणांनीं जी हिंदुस्थान-सरकारला नगद रक्कम देत असत ती माफ व्हावयाची आहे. उलट संयुक्त सरकारनेंच त्यांना तोडून दिलेल्या मुलखाकरतां जवळजवळ १ कोट रुपये अर्पण करावयाचे आहेत. मि. विन्स्टन चार्चिल हे फटकळपणाबद्दल प्रसिद्ध आहेत. ते म्हणाले कीं, संस्थानिकांना ही लांच देऊन तुम्हीं फेडरेशनमध्यें आणीत आहां. उलट डेव्हिडसन कमिटी म्हणते संस्थानिक फेडरेशनमध्यें येण्याचीच जी प्रचंड देणगी देत आहेत, ती सोन्याच्या कांटयांतसुद्धां मोजतां येणार नाहीं. ह्या भानगडीचा विस्तारशः आपण विचार करूं व त्यांत कायकाय प्रकार अंतर्भूत झाले आहेत ते पाहूं.

संस्थानें व आर्थिक प्रश्न यांकरतां १४५ ते १४९ एवढीं कलमें लिहिलीं आहेत. संस्थानिकांना फेडरेशनमध्यें घ्यावयाचें असलें तर काय काय तजविजी केल्या पाहिजेत याचा विचार करण्याकरतां सर जे. सी. डेव्हिडसन यांच्या अध्यक्षतेखालीं एक कमिटी नेमली होती. ऑटोनेमियर यांच्या सूचना ज्याप्रमाणें जशाच्या तशा कायद्यांत अंतर्भूत करण्यांत आल्या, त्याप्रमाणें डेव्हिडसन

कमिटयांच्या सूचनाहि कायद्याचें स्वरूप पावल्या. खरें फेडरेशन स्थापावयाचें असेल तर त्याचे जे घटक असतात त्यांनीं मध्यवर्ती सत्तेला सारखेसारखे पैसे द्यावयास हवेत. पण हिंदुस्थानचें फेडरेशन हे संस्थानिक आंत आल्यामुळें रंगीबेरंगी ठिगळें लावलेल्या गोधडीप्रमाणें एक विचित्र पांघरूण झालें आहे. जगाच्या वस्तुसंग्रहालयांत ठेवण्यालायक हें फेडरेशनचें महावस्त्र होणार आहे. संस्थानें सगळीं नष्ट झाल्याशिवाय फेडरेशनला शुद्ध स्वरूप येणार नाहीं. पण संस्थानें नष्ट करणें हें आजचें ध्येय नाहीं. ब्रिटिश सरकारच्या हिंदुस्थानांतील अस्तित्वाला जर कोणाचा आधार असेल तर तो संस्थानिकांचा. संस्थानिकांच्या पाठीमागें ही सत्ता असल्यामुळें त्यांना आपलें अस्तित्व नष्ट होईल अशी भीति वाटत नाहीं. तेव्हां संस्थानिकांचें अस्तित्व आहे त्या स्वरूपांत जोंपर्यंत रहाणार आहे तोंपर्यंत हिंदी फेडरेशनला शुद्ध स्वरूप येणार नाहीं.

बटलर कमिटीनें हिंदी संस्थानांची जी मोजदाद केली, तींत २३५ संस्थानें व ३२७ जहागिरी भरल्या. या २३५ संस्थानांपैकीं, मोठीं संस्थानें थोडींच आहेत. पण सर्व संस्थानांना कांहीं हक्क, कांहीं सवलती, कांहीं अधिकार,कांहीं फायदे ब्रिटिश सरकारकडून मिळत आले आहेत. त्या सर्वांचें विसर्जन करण्याची त्यांची तयारी नाहीं व ब्रिटिश सरकारहि नव्या कायद्याच्या निमित्तानें त्यांचे हक्क वगैरे हिरावून घेऊं इच्छित नाहीं. त्यामुळें वर म्हटल्याप्रमाणें हिंदी फेडरेशन हा एक विचित्र नमुना म्हणूनच अस्तित्वांत येणार आहे.

संस्थानिकांनीं फेडरेशनमध्यें यावें म्हणून त्यांना थोडेसें आमिष दाखविलें आहे हें खरें आहे. पण तें इतकें थोडें आहे कीं,तेवढ्या-

करतांच संस्थानिकांनीं आंत येण्याची मोठी घाई करण्याचें कारण नाहीं. २० वर्षांत ७०० संस्थानांना १ कोट रुपये, त्यांचे हिशेब वगैरे पाहून मिळणार आहेत आणि तेसुद्धां ज्या संस्थानिकांनीं हिंदुस्थान सरकारला मुल्ख तोडून दिले असतील त्यांना. अशी संस्थानें फारच थोडीं आहेत. मात्र कांहीं संस्थानांच्या पदरांत एक गोष्ट पडणार आहे. ती म्हणजे दरवर्षी संस्थानें जी खंडणी साम्राज्य सरकारला देत असतात तीं २० वर्षांत अजिबात बंद होणार आहे. ही खंडणीची रक्कम १ कोट १७ लाख रुपये आहे.

ह्या जमाखर्चाचा प्रश्न लक्षांत येण्याकरतां खालील इतिहास लक्षांत घेतला पाहिजे.

## संस्थानिकांच्या खंडणीचे प्रकार

( १ ) कांहीं संस्थानिकांनीं हिंदुस्थानसरकारला निरनिराळ्या कारणांकरतां नक्त रकमा (Cash Contributions) द्याव्यात असें ठरलें होतें. त्याप्रमाणें हे संस्थानिक दरवर्षी हिंदुस्थानसरकारला ७७ लाख रुपये देत असतात.

( २ ) कांहीं संस्थानिकांनीं उचलून पैसे देण्याऐवजीं हिंदुस्थान सरकारला मुलूख तोडून दिले होते. या तोडून दिलेल्या मुलुखांचें उत्पन्न ३७ लाख रुपये आहे.

( ३ ) कांहीं संस्थानिक उचलून पैसे देत नाहींत किंवा त्यांनीं मुलूखहि तोडून दिले नाहींत. त्यांनीं सरकारी प्रॉमिसरी नोटा खरेदी करून त्या हिंदुस्थान सरकारच्या नांवानें करून दिल्या आहेत. अशा प्रॉमिसरी नोटांची किंमत २६ लाख रुपये आहे. त्यांचें व्याज सरकारला मिळतें.

वरील तीन प्रकारांपासून सरकाराला खंडणीचें उत्पन्न ११७ लाख रुपये येते. ही जमेची बाजू झाली.

आतां याच्या उलट संस्थानिकांना हिंदुस्थान सरकारपासून संरक्षक सवलती मिळतात. ( Immunity Privileges ) ह्या सवलती खालील प्रकारच्या आहेतः—

१ मीठ. २ जकाती. ३ मोफत पोस्टाचीं तिकिटें. ४ संस्थानी पत्रव्यवहाराची मोफत वहातूक. ५ नाणीं व चलनाचा नफा.

या सवलतींची रुपयांत मोजदाद केली व ती जवळजवळ २५५ लाख रुपये भरली. तेव्हां ब्रिटिश सरकारकडून संस्थानिकांला २५५ लाख रुपयांचे पैशाच्या स्वरूपांत हक्क मिळतात आणि संस्थानिक त्याच्या मोबदला नव्हे, पण तह तडजोडी, वगैरे कारणांनीं ब्रिटिश सरकारला ११७ लाख रुपये देतात. सामान्य मनुष्य हिशेब करतांना असें म्हणेल कीं, सवलतीच्या २५५ लाखांतून खंडणीचे ११७ लाख रुपये वजा करावेत व बाकीचे १३८ लाख रुपये संस्थानिकांकडून घ्यावेत. पण असा हिशेब करणें मूलतः चूक असल्यामुळें त्या पद्धतीनें हिशेब केला नाहीं. त्याचें कारण एक तर असें आहे कीं, सवलती मिळणारीं संस्थानें खंडणी देतात असें नाहीं. कांहीं संस्थानें खंडणीच देतात,तर कांहीं संस्थानांना संरक्षक सवलती मिळाल्या आहेत. त्यामुळें जमाखर्चाचें हें गणित चूक ठरणार आहे.

नव्या कायद्यांत काय केलें आहे तें आपण प्रथम बघूं म्हणजे ह्या वांटणीचा ग्रंथ आपण लावूं शकूं. डेव्हिडसन कमिटीनें व त्यांच्या पूर्वींच्या कमिट्यांनीं एक तत्त्व प्रतिपादन केलें आहे.संस्थानें फेडरेशनमध्यें येणार असल्यामुळें त्यांना पूर्वींच्या खंडणीचे पैसे

माफ करावेत. यानंतर हिंदुस्थान हा एक होणार असल्यामुळें संस्थानिकांनीं लष्करी संरक्षणाकरतां एके काळीं जी खंडणी ब्रिटिश सरकारला देऊं केली होती, ती फेडरेशननंतरहि चालू ठेवणें अयोग्य आहे असें सर्वांचेंच मत पडलें. त्या कमिट्यांच्या सभासदांनीं त्यावर असें सुचविलें कीं, या खंडण्यांची सर्वची सर्व रक्कम एकदम माफ करून टाकावी. पण मध्यवर्ती सरकारला एकदम ही धस सहन करणें अशक्य होणार असल्यामुळें त्यांनीं त्या माफीकरतां २० वर्षांचा काळ निश्चित केला. पण जीं संस्थानें आपल्या एकंदर करापैकीं, ५ टक्क्यापेक्षां जेवढी जास्त रक्कम हिंदुस्थान सरकारला देत असतील, तेवढी रक्कम त्यांना ताबडतोब माफ करावी असें कमिटीनें सुचविलें आहे. बाकीच्या खंडणीच्या रकमा संस्थानिकांना मिळणाऱ्या संरक्षक सवलतींचा विचार करून ते फेडरेशनमध्यें आल्यावर २० वर्षांत रद्द करावयाच्या आहेत. ह्या रकमा रद्द करतांना एक विचार डोळ्यांपुढें होता. प्रांतांना ज्याप्रमाणें प्राप्तीवरील कराचें उत्पन्न वांटून द्यावयाचें आहे, त्या प्रमाणें संस्थानिकांनाहि कांहीं वाटून द्यावयास हवें. त्याशिवाय दोघांमध्यें समानता आहे हें कसें प्रस्थापित होणार ?

आपल्या कराच्या उत्पन्नापैकीं शेकडा ५ टक्क्यांवर हिंदुस्थान सरकारला मिळणारी खंडणी फक्त ११ लाखांपेक्षां थोडीशी अधिक आहे. तेव्हां एकंदर ७७ लाख खंडणीपैकीं हे ११ लाख रुपये बिनशर्त व ताबडतोब रद्द होणार आहेत. बाकीचे ६६ लाख हिशेबांनीं २० वर्षांत कमी कमी होणार आहेत.

ज्यांनीं हिंदुस्थान सरकारला नक्त रकमेऐवजीं मुलुख तोडून दिला आहे अशीं तीन संस्थानें आहेत. १ ग्वाल्हेर, २ सांगली, ३ हैद्राबाद.

हैद्राबाद सोडून ह्या दोन संस्थानांनीं तोडून दिलेला मुलुख ३७ लाखांच्या उत्पन्नाचा आहे. त्यांपैकीं, सांगलीकरांना दरवर्षी १·१ लाख रुपये द्यावेत अशी शिफारस करण्यांत आली आहे.

इंदूर व धार या दोन संस्थानांनीं २६ लाख रुपयांच्या प्रॉमिसरी नोटा सरकारजवळ खंडणीदाखल ठेवल्या आहेत.

## खंडण्या कां बसविल्या ?

ह्या खंडण्या ज्या संस्थानिकांवर बसविल्या त्याचीं कारणें ७ आहेत. ह्या ७ कारणांपैकीं, कोणत्या तरी एक किंवा अनेक कारणांनीं खंडण्या बसविल्या गेल्या.

**प्रकार**(१) इंग्लिशांचें आधिपत्य मान्य केल्यामुळें संस्थानिकांचें संरक्षण करण्याची जबाबदारी सरकारनें पत्करली. या संरक्षणाकरतां रक्कम देण्याची जबाबदारी संस्थानिकांवर आली. ह्या पहिल्या प्रकारांत बुंदी, जयपूर, सिरोही, उदेपूर, कोटा, कोचीनचा कांहीं भाग, म्हैसूर, पोरबंदर हीं संस्थानें येतात. १८१८ च्या तहान्वयें राजपुतान्यांतील वर निर्दिष्ट केलेल्या संस्थानांनीं इंग्रजांचें प्रभुत्व मान्य केलें व आपल्या रक्षणाकरतां त्यांना खंडणी देण्याचें कबूल केलें. म्हैसूरचा इतिहास असाच आहे. टिपु सुलतानच्या पराभवानंतर म्हैसूरचा ताबा मूळ वंशजांकडे गेला. त्या वेळीं म्हैसूरच्या महाराजांनीं आपल्या रक्षणाकरतां इंग्रजांची तैनाती फौज ठेवून घेतली व ईस्ट इंडिया कंपनीला वर्षाचे २४॥ लाख रुपये देण्याचें कबूल केलें.

**प्रकार**(२) आपल्या पदरीं लष्कर ठेवून इंग्रजांना मदत करण्याचें कांहीं संस्थानिकांनीं कबूल केलें होतें. पण पुढें त्यांनीं ही लष्कर ठेवण्याची भानगड काढून टाकली आणि इंग्रजांना सांगितलें

कीं, तुम्हींच सैन्य ठेवा अगर इतर व्यवस्था करा, आम्ही त्याचा खर्च देत जाऊं. ज्या संस्थानांनीं ही सेवा पैशांत बदलून घेतली तीं, भोपाळ इंदूर, देवास व जावरा. भोपाळनें १८१८ मध्यें ६०० घोडदळ व ४०० पायदळ ठेवण्याचें कबूल केलें होतें. पुढें १८४९ मध्यें या फौजेबद्दल वर्षाला १,६१,२९० रु. सरकारला देणें सुरू केलें. इंदूरनें आपली सेवा पैशाच्या स्वरूपांत १८६५ मध्यें देण्यास सुरवात केली.

**प्रकार** ( ३ ) संस्थानाच्या रक्षणाकरतां ब्रिटिश लष्कर बादशहानें ठेवलें. त्याचा खर्च संस्थानिकांनीं द्यावयाचा असें ठरलें होतें. ब्रिटिश लष्कर ज्यांच्या करतां ठेवलें अशीं संस्थानें त्रावणकोर, कोचीन व ग्वाल्हेर हीं आहेत. ग्वाल्हेर आपल्या संस्थानांतील पैसा देत नाहीं. त्याला मध्यहिंदुस्थानांतील ज्या संस्थानिकांकडून खंडणी घ्यावयाची असते, तीं संस्थानें त्यांनीं परस्पर लावून दिलीं आहेत.

**प्रकार** ( ४ ) संस्थानांत लष्कर किंवा पोलिस ठेवण्याबद्दल खंडणी व एजंटचा खर्च. जोधपूर, कोटा, टोंक, उदेपूर, इंदूर वगैरेंचा त्यांत समावेश होतो. एजंटाचा खर्च देणारे कोल्हापूर संस्थान आहे. हा खर्च सालिना ४८००० रु. आहे. तो खर्च माफ करावा असें डेव्हिडसन कमिटीनें सांगितलें आहे.

**प्रकार** ( ५ ) संस्थान निर्माण झालें किंवा पुनः एखाद्या विभागांत संस्थानी सत्ता स्थापली किंवा संस्थानी हद्द वाढविली तर त्याकरतां घेतली जाणारी खंडणी.

ही खंडणी देणारीं संस्थानें झालवार, लावा, अजयगड,

चरखारी, पन्ना, इंदूर, कच्छ, भावनगर, मणिपूर, कूचबिहार, बनारस व पंजाबांतील कांहीं संस्थानें आहेत.

१७७४ मध्यें कूचबिहारची भूतानपासून सुटका झाली व त्यानें आपलें निम्में उत्पन्न ब्रिटिशांना द्यावयाचें कबूल केलें. पुढें ही रक्कम ६७७०० रु. ठरविण्यांत आली. लहान जहागिरींची संस्थानें झालीं अशीं उदाहरणें दक्षिण हिंदुस्थानांत आहेत. पटवर्धनांना प्रथम पेशव्यांनीं जहागिरी दिल्या होत्या. पुढें या जहागिरींची संस्थानें झालीं. त्याकरतां त्यांना खंडणी द्यावी लागली.

**प्रकार** (६) एक संस्थान दुसऱ्या संस्थानाला कांहीं खंडणी देई. पण कांहीं वेळां हा मूळचा संस्थानिक जिंकला जातो किंवा तें संस्थान खालसा होतें. अशा वेळीं हे पोटसंस्थानिक खंडणींतून मुक्त होत नाहींत. त्यांना ती खंडणी इंग्रजांना द्यावी लागते. उदाहरणार्थ त्रावणकोर संस्थान कर्नाटकच्या नबाबाला १३॥ हजार रुपये नजराणा म्हणून देत. पुढें कर्नाटकाच्या नबाबाची सद्दी संपली व हा नजराणा इंग्रजांना मिळूं लागला.

**प्रकार** (७) मूळ संस्थानिकांनीं आपल्या मांडलिक संस्थानांची खंडणी इंग्रजांना देऊन टाकली आहे, ती खंडणी इंग्रजांना मिळते. बडोदा, ग्वाल्हेर, इंदूर, धार या संस्थानिकांनीं अशी व्यवस्था केली आहे.

ह्या निरनिराळ्या प्रकारांनीं इंग्रजांना खंडण्या मिळत गेल्या. त्या रद्द कराव्या असें डेव्हिडसन कमिटीनें मत दिलें व तें नव्या कायद्यानें मान्य केलें.

ही खंडणीची रक्कम ७७ लाख भरते हें वर सांगितलें. त्यांपैकीं आपल्या उत्पन्नाच्या ५ टक्क्यांवर जीं संस्थानें खंडणी देत आहेत

तितकी ताबडतोब माफ केल्यामुळें ११ लाख रुपये मध्यवर्ती सरकारचे जातात. बाकी उरणाऱ्या ६६ लाखांपैकीं, जर कांहीं संस्थानांत असणाऱ्या सैन्याच्या तुकडया काढून टाकल्या तर मध्यवर्ती सत्तेचा एकूण तोटा ५३ लाखच होईल.

## तोडून दिलेला मुलूख.

लष्करी संरक्षणाकरतां संस्थानिकांनीं कांहीं मुलूख स्वखुषीनें तोडून दिले होते. स्वखुषीनें हा शब्द त्यांत असल्यामुळें ते खालसा किंवा जप्त केलेले मुलूख नाहींत. म्हणजे त्या मुलुखांवर कायदेशीर सत्ता संस्थानिकांचीच आहे असें गृहीत धरलें आहे.

कांहीं संस्थानिकांनीं आपल्या हद्दींतून जाणाऱ्या रेल्वेला जी जमीन लागते तिच्यावरील सर्व सत्ता ब्रिटिश सरकारला दिली आहे. म्हणजे ती जागा, जमीन वगैरे इतर ब्रिटिश मुलखाप्रमाणें ब्रिटिशांची होते. तेथें कायदे, कानू वगैरे लागू करण्याचा अधिकार ब्रिटिश सरकारकडे आहे. पूर्वीं दिलेले हें अधिकारक्षेत्र आपल्याला परत मिळावें, निदान त्याबद्दल पैसे मिळावेत असा संस्थानिकानीं प्रयत्न केला होता. रेल्वेरस्त्यावरील अधिकारक्षेत्र जर संस्थानिकांना दिलें असतें तर फारच मौज झाली असती. दिल्लीपासून मुंबईपर्यंत एकंदर ३८ संस्थानिकांच्या हद्दींतून म्हणजे त्यांच्या अधिकारक्षेत्रांतून आगगाडी गेली असती आणि कदाचित् ३८ ठिकाणीं उतारूंना निरनिराळे संस्थानी कर द्यावे लागले असते. ही गोष्ट डेव्हिडसन कमिटीनें अमान्य केली.

हे मुलूख जे तोडून दिलेले आहेत, त्यांच्या हद्दी ठरविणें व त्यांचा खर्च काढणें हीं कामें अत्यंत कठीण होतीं. पण तें काम

मोठया कष्टानें पुरें करण्यांत आलें. संस्थानिकांनींहि ह्या हद्दी बरोबर आहेत अशी कबूली दिली. पुढें त्यांची पैशांत किंमत ठरविली गेली. ही किंमत एकंदर ३७ लाख ठरविण्यांत आली.

या तोडून दिलेल्या मुलुखापासून जरी ३७ लाख उत्पन्न येतें असें धरलें तरी तेथें राज्यकारभार चालविण्यास जो पैसा लागतो, तो हिशेबांत घेतला तर हैद्राबादशिवाय कोणत्याहि मुलुखापासून हिंदुस्थानसरकारला उत्पन्न मिळत नसे असें म्हणण्यास हरकत नाहीं. आपल्या हक्काच्या शाबीदीकरतां हा मुलूख वहिवाटला जाई इतकेंच. पण आतां संस्थानिकांना त्याबद्दल पैसा द्यावयाचा म्हटल्यानंतर ब्रिटिशांना तसा विचार कोण करूं देतो; किंवा ब्रिटिश सरकार तसा विचार कशाला करणार ? संस्थानिकांना खुष करण्याकरतां या परतफेडीची धोंड ते हिंदुस्थानच्या गळ्यांत बांधणार आहेत.

निजामची मात्र तशी स्थिति नाहीं. निजामनें वऱ्हाड प्रांत ब्रिटिशांना तोडून दिला. या प्रांतापासून ब्रिटिशांना १९२९-३० सालीं सरासरी १८२ लाख रुपये प्रांतिक कराचे व ६३·३ लाख रुपये मध्यवर्ती कराचे मिळत. राज्यकारभाराचा खर्च वजा जातां प्रांताकडे ४४,३३,००० रु. व मध्यवर्ती सरकारकडे २३,४८,००० रु. शिल्लक उरत. पण वऱ्हाडचा प्रश्न स्वतंत्र असल्यामुळें त्याची चर्चा डेव्हिडसन कमिटीनें केली नाहीं. वऱ्हाडशिवाय इतर मुलूख जो निजामनें तोडून दिला होता, त्याची जमा व खर्च बरोबर आहे असें त्यांनीं मत दिलें.

निजामसरकार मच्छलीपट्टणच्या बंदराकडे जाणारा एक चिंचोळा प्रदेश आपल्याला द्यावा, एकादें बंदर बांधण्यास व वाढ-

विण्यास परवानगी द्यावी, त्या बंदरावर ब्रिटिश साम्राज्यांतून येणारा माल जकातीशिवाय आंत आणूं द्यावा व हैद्राबादमध्यें तयार होणारा माल निर्यात-कराशिवाय पाठवितां यावा याबद्दल अधिकार मागूं लागले. पण त्यांची कोणतीच मागणी मान्य कर-ण्यांत आली नाहीं.

अशा प्रकारें ज्या संस्थानिकांनीं मुलूख तोडून दिले आहेत, त्या मुलखांच्या वहिवाटीकरतां लागणाऱ्या खर्चाचा विचार न करतां त्या संस्थानांना दरवर्षी परत फेड म्हणून ठराविक रक्कम द्यावी असा निर्णय घेतला गेला. ही परतफेड फेडरेशन सुरू झाल्यावर व तीं संस्थानें फेडरेशनमध्यें मान्यतापत्रकाद्वारां संमीलित झाल्यावर सुरू व्हावयाची आहे. ह्या परतफेडीचें प्रमाण प्रांतांना द्यावयाच्या प्राप्तीवरील कराशीं जुळतें असावें अशी अट घालण्यांत आली आहे.

ह्या सवलतीनें हैद्राबाद, बडोदें, ग्वाल्हेर व इंदूर यांचा फायदा होणार आहे. ह्या फायद्याचें आमिष दाखवून या मोठ्या संस्था-नांना फेडरेशनमध्यें ओढण्याचा डाव आहे हें उघड दिसतें. पण हैद्राबादसंस्थान या सवलतीचा फायदा घेऊं इच्छित नाहीं. जें संस्थान आपल्यावरील लष्करासंबंधीची जोखीम दूर करावी असें म्हणत नसेल त्याला तोडून दिलेल्या मुलखाबद्दल रक्कम परत कर-ण्याची जरुरी नाहीं, असें कायद्यांत म्हटलें आहे. हैद्राबाद असें म्हणत आहे कीं, १८०० च्या तहाप्रमाणें आपण सैन्याची जबाबदारी उचलण्यास तयार आहों. त्यामुळें हैद्राबाद परतफेडींतून वगळला गेला. त्यानें आपल्या तोडून दिलेल्या मुलखाची किंमतच करूं नये असें सांगितलें.

बाकी उरलेलीं संस्थानें बडोदा, ग्वाल्हेर व इंदूर यांना अनुक्रमें सालिना २२·९८; ११·७८ व १·११ लाख रुपये वरील अटी पाळल्यास मिळणार आहेत. सांगलीला १·१ लाख रुपये मिळणार आहेत. इंदूर व धार यांनीं ज्या २६ लाखांच्या सरकारी प्रॉमिसरी नोटा ठेवल्या आहेत, त्यांनाहि वरीलप्रमाणेंच परतफेड मिळणार आहे.

## करमाफीच्या सवलती.

वर संयुक्त सरकारनें खंडण्याबद्दल, तोडून दिलेल्या मुलखाबद्दल अगर रकमांबद्दल काय तजविजी कराव्या याची मांडणी केली. आवक रकमेच्या त्या बाबी झाल्या. या रकमांचें उगमस्थान लष्कर-विषयक जबाबदाऱ्या हें आहे. आतां आपण कांहीं संस्थानांना कर अगर जकातमाफीच्या ज्या सवलती मिळाल्या आहेत तिकडे वळूं. ही माफी अर्थातच व्यापारधंदेविषयक आहे. राजकारणाशीं त्यांचा संबंध आहेच पण तो अप्रत्यक्ष आहे. करापासून कांहीं संस्थानि-कांना जी माफी देण्यांत आली आहे ती त्यांच्या मानाकरतां अगर प्रतिष्ठेकरतांहि आहे. गव्हर्नर व ग. जनरल यांनाहि कांहीं बाबतींत आदराकरतां करांतून मुक्तता मिळाली आहे. संस्थानिकांना मिळा-लेल्या या करमुक्ततेच्या मानाशिवाय इतर कारणेंहि आहेत. पण कोणत्याहि कारणानें जरी संस्थानिकांना ही माफी मिळाली असली तरी तिचा हिशेब करावयाचें टळत नाहीं.

संस्थानिक फेडरेशनमध्यें आल्यावर असें म्हणूं शकतील कीं, आपल्याला करमुक्ततेच्या या सवलती नकोत. आमचें संस्थान खालसामुलखाप्रमाणें कर द्यावयास तयार आहे. जर एखाद्या

संस्थानानें आपले हे हक्क अशा प्रकारें स्वखुषीनें सोडून दिले तर त्याला परत द्यावयाच्या रकमा ह्या सवलतीच्या किंमतींतून वजा घालण्याची जरूरी नाहीं.

पण याचा अर्थ असा नव्हे कीं, जितक्या रकमेच्या सवलती संस्थानानें सोडल्या असतील तितकी रक्कम त्यांना द्यावी. एखाद्या संस्थानाला ५० लाख रुपयांचा माल संस्थानांत मोफत येऊं देण्याची सवलत असते. तो संस्थानिक असें जर म्हणूं लागला कीं, माझ्या मालावर तुम्ही जकात बसवा पण मला दरवर्षी सवलतीचे हे ५० लाख रुपये द्या; तर त्याचें म्हणणें ऐकलें जाणार नाहीं. ह्या सवलतीच्या रकमा ज्या ठरविल्या आहेत त्या हिशेबाकरतां आहेत. पैसे परत देण्याकरतां नाहींत. संस्थानिकांना त्यांच्या तोडून दिलेल्या मुलखांचे जे पैसे परत करावयाचे आहेत, ते या सवलतींतून वजा घालावयाचे आहेत. आणि सवलतीपेक्षां परतफेडीची रक्कम जास्त असली तर तेवढी जास्त रक्कम त्याला द्यावयाची आहे. उलट परतफेडीची रक्कम कमी असेल व सवलतीची रक्कम जास्त असेल तर कोणी कोणाला कांहींहि द्यावयाचें नाहीं.

आपण अशी कल्पना करूं कीं, एका संस्थानिकाला ५० लाखांच्या सवलती मिळाल्या आहेत व त्याच्या परतफेडीची रक्कम ३५ लाख आहे. त्या संस्थानाकडून सवलतीचे १५ लाख रुपये घेतले जाणार नाहींत व त्याचे ३५ लाखहि त्याला परत मिळणार नाहींत. दुसऱ्या संस्थानिकाच्या परतफेडीची रक्कम २० लाख आहे व त्याला १५ लाखांच्या सवलती मिळाल्या आहेत. तेव्हां या संस्थानिकाला परतफेडीची रक्कम फक्त ५ लाखच मिळेल.

ह्या जो देण्याचा हिशेब करावयाचा, तो प्रत्येक संस्थानिकांचा

स्वतंत्रपणें करावयाचा आहे. ह्या पद्धतीमुळें पुष्कळ संस्थानिकांचा फायदा होणार आहे.

कांहीं संस्थानें अशीं आहेत कीं, त्यांना नुसत्या सवलतीच आहेत, खंडण्या द्याव्या लागत नाहींत. त्याच्या उलट कांहीं संस्थानें अशीं आहेत कीं, तीं नुसत्या खंडण्याच देतात; त्यांना सवलती मिळालेल्या नाहींत. सर्वच संस्थानिकांना करमाफीच्या सवलती असत्या तर मध्यवर्ती सत्तेचे जे ११७ लाख रुपये नुकसान होणार आहे तें झालें नसतें. डेव्हिडसन कमिटीनें सवलतीचे पैसेहि वसूल करावेत असें म्हटलें असतें तर मध्यवर्ती सत्तेच्या तिजोरींत एक कोटी-वर रुपये येऊन पडले असते. पण सवलतीचे पैसे घ्यायचे नाहींत मात्र खंडणीचे पैसे माफ करावयाचे अगर परत द्यावयाचे असा विचित्र निर्णय या कमिटीनें दिल्यामुळें मध्यवर्ती तिजोरी तितक्या रकमेला मुकणार आहे. पण हा उपक्रम संस्थानिकांना फेडरेशनमध्यें आणण्या-करतां मुद्दाम केला आहे.

काश्मीर संस्थान असें आहे कीं, त्याला समुद्रावरील मालाच्या वहातुकीची माफी प्रमाणाबाहेर मिळालेली आहे. फेडरेशनमध्यें येण्यानें ही माफी कायम टिकणार असल्यामुळें व इतरांच्या कारभारांत हात घालावयास मिळणार असल्यामुळें काश्मीर खुषीनें फेडरेशन-मध्यें येईल. त्याच्या उलट बडोदें व म्हैसूरची स्थिति आहे. त्यांना करमाफीच्या सवलती कमी आहेत पण हीं संस्थानें खंडण्या देतात अगर त्यांनीं मुलूख तोडून दिलेला आहे, म्हणून त्यांनाहि फेडरेशनमध्यें येणें फायदेशीर आहे. कारण फेडरेशनमध्यें येण्यानें त्यांच्या खंडण्या माफ होणार व मुलुखाबद्दल त्यांना रकमा मिळणार.

अशा प्रकारें प्रत्येक संस्थानांचे हिशेब केल्यावर संयुक्त सरका-

रचें एक कोटीनें सालिना उत्पन्न कमी होणार आहे. ही फेड कमी होण्याला आणखी एक मार्ग आहे, पण तो अगदीं किरकोळ आहे. मीठ, देशांत तयार होणाऱ्या वस्तू आणि निर्यात माल ह्यां-वरील सर्व अगर कांहीं कर संयुक्तसरकार प्रांतांना व घटक संस्था-नांना वांटून देऊं शकतें असें वर सांगितलें आहे. अशी वांटणी जर झाली तर एखाद्या संस्थानाच्या वांटयाला जी रक्कम येईल, ती रक्कम ज्या कराच्या बाबतींत मिळालेली असेल, आणि त्या संस्था-नाला त्याच कराच्या बाबतींत माफीच्या सवलती असतील तर ती रक्कम सवलतीच्या रकमेंतून वजा घालावी आणि बाकी उरणाऱ्या सवलतीच्या रकमेंतून संस्थानाला करावयाची फेड वजा घालावी आणि उरेल तें संस्थानाचें देणें समजावें. आपण असें समजूं कीं,एका संस्थानाला मिठाच्या कराबाबत ३ लाखांची सवलत आहे व त्या संस्थानाला ५ लाख परत द्यावयाचे आहेत. पूर्वीच्या हिशेबा-प्रमाणें संस्थानचें देणें २ लाख येतें. पण आतां आपण असें समजूं कीं, मिठाचा कर प्रांताला व संस्थानला वांटून द्यावयाचें संयुक्त-सरकारनें ठरविलें व ह्या उदाहरणादाखल घेतलेल्या संस्थानाच्या वांट्याला १ लाख रुपये आले. तेव्हां या संस्थानाला ३ लाखांतून १ लाख रुपये वजा घालतां २ लाखांची करमाफी उरते. हे दोन लाख त्या संस्थानांच्या ५ लाख देण्यांतून वजा घालून त्याला ३ लाख द्यावयाचे आहेत असें ठरतें.

## समुद्रावरील जकाती

समुद्रावरील जकातींचा प्रश्न अत्यंत अवघड आहे, तसाच तो भानगडीचाहि आहे. संस्थानिकांचें म्हणणें असें:-आम्हाला आमच्या

टापूंतील जमीन व पाण्यावर वाटेल ते कर बसविण्याचा अधिकार आहे. हा अधिकार आमच्या सार्वभौमत्वामुळें आम्हांला मिळाला आहे. आमच्या बंदरांत जो माल येतो त्याच्यावर बसविलेल्या जकातीचें उत्पन्न हेंच आमच्या संस्थानचें खरें उत्पन्न आहे. पण फेडरेशनचा ग्रंथ लिहावयास बसलेल्या पंडितांना अडचण अशी पडली कीं, हिंदुस्थानच्या सर्व बंदरांवर जर जकातीचे दर सारखे नसले तर ती विषमता फेडरेशनच्या तत्त्वाला विरोधी होईल.शिवाय असेंहि होण्याचा संभव आहे कीं, एखाद्या संस्थानी बंदरांत जर जकाती कमी असल्या तर तेथें बराच माल उतरेल. त्यामुळें दुसऱ्या संस्थानांचे किंवा हिंदुस्थानसरकारचें जकातीचें उत्पन्न बुडेल. हें उत्पन्न ज्याप्रमाणें संस्थानांचें मुख्य व मोठें उत्पन्न आहे तसेंच तें ब्रिटिश हिंदुस्थानचेंहि महत्त्वाचें उत्पन्न आहे. संस्थानिकांनीं आपल्या संस्थानांत उपयोगांत येणाऱ्या मालावर जर निरनिराळ्या जकाती बसविल्या तर हा प्रश्न तितकासा त्रासदायक होणार नाहीं. त्यांतहि लबाड्या होणार नाहींत असें नाहीं. पण अशा लबाड्या टाळावयाच्या असतील तर एका बंदरीं संस्थानांतून येणाऱ्या मालावर दुसऱ्या संस्थानाला किंवा हिंदुस्थानला जकाती बसवाव्या लागतील त्यामुळें अंतर्गत खुला व्यापार करतां येणार नाहीं.

ह्या सर्व भानगडी मिटवण्याकरतां ज्या संस्थानांना या जकाती बसविण्याचे अधिकार दिले आहेत ते संयुक्त सरकारनें विकत घेतले पाहिजेत. त्याशिवाय या प्रश्नाचा निकाल लागणार नाहीं. पण कोणतेंहि संस्थान हा हक्क विकण्यास तयार नाहीं. त्यांच्या सार्वभौमत्वावर अगर तहान्वयें मिळविलेल्या या हक्कावर कुऱ्हाड चालविणें अशक्य नसलें तरी अन्यायाचें होणार आहे. म्हणून डेव्हि-

डसन कमिटीनें फेडरेशनमध्यें येणाऱ्या संस्थानाशीं तडजोड करावी व हा प्रश्न सोडवावा असें म्हटलें आहे. ज्या संस्थानांना फेडरेशनमध्यें यावयाचें असेल त्यांनीं हे हक्क मोबदला घेऊन सोडले पाहिजेत अशीहि अट घातली जाणें अशक्य नाहीं. फक्त कोचीन व त्रावणकोर या दोन संस्थानांत कोचीनच्या बंदरांतून जो माल येतो, त्या मालावर बसणाऱ्या जकातीचा हक्क विकत घ्यावा असें म्हटलें आहे. अशा प्रकारें हा प्रश्न अनिर्णीत ठेवला आहे.

जकातीबद्दल संस्थानांना जी माफीची सवलत ठेवली आहे तिची अंदाजे सालीना किंमत १८२ लाख रुपये आहे.

## मिठाच्या कराची माफी.

ब्रिटिश हद्दींत हा नाठाळ कर फार दिवसांपासून आहे. गरीबांच्या या आवश्यक पदार्थावर कर बसविण्याचा निष्ठुरपणा फार दिवस चालू आहे. कांहीं संस्थानांत मिठाचीं आगरें होतीं व संस्थानांतून ब्रिटिश हद्दींत मीठ येत असे. संस्थानी हद्दींत मिठावर बिलकूल कर नसे अगर थोडा असे, त्यामुळें ब्रिटिश सरकारच्या मिठाला पायबंद बसे. ही अडचण दूर करण्याकरतां ब्रिटिशांनीं बऱ्याच संस्थानी हद्दींतील मिठागरें स्वतःकडे घेतलीं व लहानसहान संस्थानीं मिठागरें बंद केलीं. त्यांनीं हीं मिठागरें आपल्या ताब्यांत घेतांना संस्थानिकांना नुकसानभरपाई देण्याची तरतूद केली. फक्त काठेवाड व कच्छचीं मिठागरें १८८३ व १८८५मध्यें आपल्या अधिराज्याच्या हक्कानें घेतलीं. नव्या कायद्याच्या वेळीं संस्थानिकांनीं ह्या प्रश्नाचा फेरविचार करावा म्हणून विंनति केली; पण ती अमान्य करण्यांत आली.

हिंदुस्थानांत जवळ जवळ ५० संस्थानें मीठ तयार करीत असत. ह्या संस्थानांच्या हातून हीं मिठागरें काढून घेतल्याबद्दल त्यांना नुकसानभरपाई द्यावी असें ठरलें असल्यामुळें त्याची रक्कम ठरविणें नव्या कायद्याच्या वेळीं अवश्य होऊन बसलें. ५० वर्षांपूर्वीं घेतलेल्या अगर नष्ट करून टाकलेल्या या मिठागरांची आज किंमत ठरविणें कठीण आहे असें डेव्हिडसन कमिटी म्हणाली. तसेंच जुन्या करारांचें आतां काय असेंहि त्यांनीं सांगितलें. कच्छ व काठेवाडच्या बाबतींत असे करार झाले नव्हते. तेथील मिठागरें व बाजारांत मीठ विकण्याचे हक्क या संस्थानांना द्यावेत असें ह्या कमिटीनें सांगितलें. मात्र संयुक्त सरकारच्या अधिकाऱ्यांना संयुक्त सरकारचा मिठावरील कर, मिठागरांत वसूल करण्यास या संस्थानांनीं परवानगी द्यावी असें सांगितलें.

मिठाच्या बाबतींत जी माफी किंवा सवलत म्हणून म्हटली आहे त्याचा अर्थ काय हा प्रश्न उद्भवतो. संस्थानांनीं मध्यवर्ती सरकारला प्रांताप्रमाणेंच मिठावरील कर जर दिला असता तर त्याचें जें उत्पन्न आलें असतें, तें उत्पन्न तह व नुकसानभरपाई-मुळें जितक्या रकमेनें कमी येतें, त्याला माफी किंवा सवलत म्हटलें आहे. ही माफीची किंवा सवलतीची रक्कम काठेवाडांतील संस्थानें धरून ४६ लाख रुपये आहे असें ठरविण्यांत आलें आहे.

**पोस्ट व टेलिग्राफः**—२७ संस्थानांनीं पोस्टाचीं तिकिटें संस्थानी कारभाराकरतां फुकट वापरण्याचा हक्क गाजवला. हीं तिकिटें फुकट वापरण्याचा हक्क संस्थानांना दिल्यामुळें ब्रिटिश सरकारचें ३ लाख रुपये उत्पन्न बुडत असे. तसेंच संस्थानचे सरकारी कागद-पत्र फुकट नेण्याच्या सवलतीदाखल ब्रि. सरकारचे ७ लाख रुपये

उत्पन्न जाई. येणाऱ्या फेडरेशनमध्यें संस्थानिकांची ही १० लाखांची मोफत सवलत काढून घेण्याचा व त्यासंबंधीं कायदे करण्याचा हक्क संयुक्त सरकारला मिळावयास पाहिजे. तो हक्क बजावल्यास संस्थानांचीं पोस्ट ऑफिसें बंद पडतील आणि संस्थानिकांना आपल्या सार्वभौमत्वावर गदा आली असें वाटेल. डेव्हिडसन कमिटीनें संस्थानांना नाखूष करावयाचें नाहीं—अर्थात् तीं फेडरेशनमध्यें येईपर्यंत—या स्वार्थी विचारानें त्यांची पोस्ट-ऑफिसें कायम ठेवावीत असा निर्णय दिला आहे! हीं स्वतंत्र पोस्ट ऑफिसें असणारीं संस्थानें हैद्राबाद, ग्वाल्हेर, पतियाळा, झिंद, चांभा, नाभा वगैरे आहेत. बडोद्यानें आपलीं पोस्टऑफिसें बंद केलीं.त्याच्या मोबदला त्यांना ८५००० रु. चीं फुकट तिकिटें दिलीं जातात.

## काश्मीरची मोफत आयात.

१८७० च्या तहनाम्याप्रमाणें मध्य आशियांतील जो माल काश्मीर संस्थानच्या हद्दींतून ब्रिटिश हिंदुस्थानांत जातो, त्यावर काश्मीर संस्थान जकात घेत नाहीं.त्यामुळें काश्मीरची जी जकात बुडते, तिची भरपाई करण्याकरतां दर्यामार्गानें येणाऱ्या मालावरील जकात त्याला देण्यांत आली. काश्मीर संस्थानला लागणारा जो माल एखाद्या बंदरांत येतो त्यावर जकात घेतली जात नाहीं असें नाहीं. ती जकात घेतात आणि काश्मीरला ती रक्कम परत देतात. ही जकातीची रक्कम जवळजवळ ३० लाख रुपये होते; पण डेव्हिड-सन कमिटीनें ह्या सवलतीचें मूल्य २५ लाख ठरविलें. हे २५ लाख निश्चित करतांना काश्मीरच्या मार्गानें ब्रिटिश हिंदुस्थानांत

जाणारा मध्य आशियांतील माल ५ लाख रुपये किंमतीच्या जकातीचा आहे असें असेल तर वेगळें. एरवीं काश्मीरवर पूर्वीची रक्कम कमी करण्यानें अन्याय झाला आहे असें वाटतें. कांहीं झालें तरी हें संस्थान ब्रिटिश हिंदुस्थानला बिगर जकातीनें जो माल जाऊं देते, त्याची किंमत ठरविणें जरूर आहे.

## नाणीं व चलन.

फेडरेशनच्या क्षेत्रांत एकच चलन व एकच नाणें प्रचलित असणें हें अवश्य असतें. हिंदुस्थानांत अद्यापपर्यंत जवळजवळ २०संस्थानें आपलीं नाणीं पाडतात. त्यांतील सातच संस्थानें रुपये पाडतात व तींच विचार करण्यासारखीं आहेत. हैद्राबाद संस्थानाला तर नोटा काढण्याचा अधिकार आहे. ह्या सात मोठ्या संस्थानांनाच नाण्यांपासून फायदा होतो. त्यांतल्या त्यांत हैद्राबादला खूपच फायदा होतो. तेव्हां डेव्हिडसन कमिटीनें हैद्राबाद संस्थानचा हा हक्क विकत घ्यावा असें सुचविलें आहे. बाकीच्या संस्थानांचीं नाणीं संयुक्त राज्यकारभाराच्या आड येणार नसल्यामुळें त्यांचा हक्क खरेदी करण्याची घाई नाहीं असें या कमिटीचें मत आहे. हैद्राबादचा हा हक्क १७ लाखांचा आहे असें त्यांनीं ठरविलें आहे.

अशा प्रकारें संस्थानिकांच्या सवलतींचा थोडक्यांत वर परामर्ष घेतला आहे. वरील सवलतींपैकीं, कोणत्याही सवलती ज्या ब्रिटिश सरकार हिशेबांत धराव्या असें म्हणतें तें आपल्या अधिराज्याच्या नात्यानें म्हणतें ही गोष्ट संस्थानांना समजावयास पाहिजे. हिंदुस्थानांतील जल, तरु, काष्ट, पाषाण, दगड, धोंडा, काडी, माती वगैरेंवर आपली सत्ता आहे, दुसरी कोणाची नाहीं,

ही गोष्ट गृहीत धरून संस्थानांच्या रकमेची विल्हेवाट लागावयाची आहे. संस्थानांना दिलेल्या या सवलतींची आज किंमत ठरवली गेली, कदाचित् हीं संस्थानें फेडरेशनमध्यें आल्यावर त्या सवलती काढूनहि घेण्यांत येतील. यावरून संस्थानिकांनीं आपल्या सार्वभौमत्वाबद्दल फुशारकी मारूं नये व आपला दर्जा बादशहाच्या बरोबरीचा आहे अशा भ्रमांत राहूं नये.या सवलतीची व करमाफीची बेरीज किती होते तें आपण पाहूं.

| | | लाख |
|---|---|---|
| समुद्रावरील जकातमाफी | — | १५७ |
| मीठ | — | ४६ |
| पोस्ट | — | ३ |
| पोस्टाची मोफत वहातुक | — | ७ |
| काश्मीर जकात परत | — | २५ |
| हैद्राबाद नाण्याची हक्कखरेदी | — | १७ |
| | | २५५ |

या २५५ लाखांशिवाय आणखी कांहीं रक्कम वाढण्याचा संभव आहे. कारण नाणीं पाडणाऱ्या हैद्राबादशिवाय इतर संस्थानांच्या नाणीं पाडण्याच्या हक्कखरेदीकरतां द्यावी लागणारी रक्कम यांत धरली नाहीं.

वर ज्या डेव्हिडसन कमिटीच्या शिफारसी निर्दिष्ट केल्या आहेत, त्यांच्या अनुरोधानें कायद्यांतील कलमें बसवलीं आहेत. त्यांत या सर्व हक्क, सवलती, देणीं, घेणीं वगैरेंचा अन्तर्भाव होईल अशी सावधगिरीची भाषा वापरण्यांत आली आहे.मात्र या जमाखर्चाप्रमाणें संस्थानिकांना द्यावयाची जी हप्तेबंदी ठरेल ती ‘ Charge-

able on the Revenue' म्हणजे अॅसेंब्ली सभासदांच्या मताकरतां टाकतां येणार नाहीं. ती रक्कम अवश्यमेव म्हणून द्यावयाची असें कायद्यानें बांधून टाकलें आहे.

फेडरेशनचे जे तीन घटक आहेत त्यांतील संस्थानचें उखळ चांगलेंच पांढरें झालें आहे. त्यांनीं आपल्या संस्थानांत प्राप्तीवरील कर बसवूं नये असा आग्रह धरला व तो मान्य करण्यांत आला. फक्त कार्पोरेशन टॅक्सला व कांहीं जादा करांना त्यांनीं मान्यता दिली आहे. प्राप्तीवरील कर हा संस्थानांवर न बसविण्यांत ब्रिटिश प्रजेला मोठा अन्याय झाला आहे. कारण ह्या करांतील कांहीं भाग फेडरेशनच्या म्हणजे संस्थानांच्या सुद्धां कारभारांत खर्च होणार आहे. कर देणार आम्ही व त्याचा मोफत फायदा मिळणार संस्थानांना अशी स्थिति आहे. या संस्थानांनीं फेडरेशनकरतां आपला वांटा काय दिला आहे ? सैन्याचा आपण प्रश्न घेऊं. सैन्यावर हिंदुस्थानच्या करापैकीं जवळ जवळ निम्मा पैसा खर्च होतो. हें सैन्य आतां संस्थानांचें सुद्धां रक्षण करणार आहे. पण या रक्षणाकरतां संस्थानिक काय देणार आहेत ? त्यांच्याकडून एक तृतीयांश म्हणजे १५ कोटी रुपये तरी घ्यावयास पाहिजे होते, पण एकहि रुपया त्यांना संरक्षणाकरतां द्यावा लागणार नाहीं.

हे संस्थानिक आपल्या हद्दींतील जकाती रद्द करावयासहि तयार नाहींत. मुंबईचा माल मद्रासला जकात न देतां जाऊं शकतो. पण तोच जर हैद्राबादला जाणार असला तर करोडगिरी द्यावी लागते. या जकातीमुळें आमच्यांत व संस्थानांत समता कोठें रहाते ? ब्रिटिश हिंदुस्थानवर ही संयुक्त राज्यघटना चालविण्याकरतां जो कराचा बोजा पडणार आहे, त्याचें दुःख संस्थानांना

कांहींच भोगावें लागणार नाहीं. संस्थानिकांना खूष करण्याच्या भरांत ब्रिटिश सरकारनें खालसांतील हिंदी प्रजेचें अत्यंत नुकसान केलें आहे. ही विषमता नष्ट होणें जरूर आहे व ती जोंवर नष्ट होत नाहीं तोंवर फेडरेशनला होणारा विरोधहि नष्ट होणार नाहीं. फेडरेशन जर योग्य रीतीनें अस्तित्वांत यावयाचें असेल व कार्यक्षमतेनें चालावयाचें असेल तर सर्व घटकांवर सारखेच कर बसले पाहिजेत व सर्व घटकांनीं मध्यवर्ती कारभाराकरतां आपला वांटा योग्य प्रमाणांत सारखाच दिला पाहिजे. कोठलाहि संस्थानिक जर या गोष्टींला तयार नसेल तर त्याला फेडरेशनमध्यें घेऊं नये.

हिंदुस्थानच्या रक्षणाकरतां जे जवळ जवळ ५० कोट रुपये लागतात, त्यांतील १५ कोट रुपये संस्थानांनीं दिले असते तर मध्यवर्ती सत्तेवरील बोजा तितकाच कमी झाला असता व प्रांतांना आपले कारभार व्यवस्थितपणें चालविण्यास सवड सांपडली असती. प्रांतांना सार्वत्रिक शिक्षण करावयाचें आहे, दारू बंद करावयाची आहे, शेतसारा कमी करावयाचा आहे. या सुधारणांकरतां लागणारा पैसा जर मध्यवर्ती सत्तेच्या खर्चांतील $\frac{1}{3}$ हिस्सा संस्थानांनीं उचलला असतां तर प्रांतांनीं शिलकी रकम मध्यवर्ती सत्तेकडे मागितली असती. संस्थानांनीं फेडरेशनचा राज्यकारभार चालविण्याकरतां काय हिस्सा दिला आहे ? जवळजवळ कांहीं नाहीं.

ब्रिटिश सरकारनें संस्थानांना न दुखवितां, हिंदुस्थानच्या भरधांव चालणाऱ्या कारभाराला त्यांचें लोढणें घालावें म्हणून त्यांना आंत खेचलें आहे. डेव्हिडसन कमिटीनें केलेल्या शिफारसी ह्या सर्व संस्थानिकांनीं बिनतक्रार आंत यावें या धोरणानें केल्या आहेत. वरिष्ठ कौन्सिलांत ५२ जागा व निम्मी संस्थानी प्रजा जेव्हां अंतर्भूत होईल तेव्हां फेडरेशन अस्तित्वांत येणार आहे अशी अट कायद्यांत घातली आहे. डेव्हिडसन कमिटीनें ज्या सवलती

दिल्या आहेत त्यांचें सूक्ष्म अवलोकन केल्यास ही संख्या ज्या संस्थानिकांमुळें भरूं शकेल, त्यांच्यावरच बहाल मर्जी केली आहे असें सवलतींची छाननी केल्यावर दिसून येतें. तेव्हां या शिफारसींत प्रामाणिकपणा फार थोडा आहे. अशाच संस्थानिकांची मनधरणी करण्याचा त्यांचा प्रयत्न आहे ही गोष्ट उघड दिसते. म्हणूनच डेव्हिडसन कमिटीच्या शिफारसींवर गहजब झाला आणि चर्चिलसारखा सभासद म्हणाला कीं, संस्थानिकांना फेडरेशनमध्यें आणण्याकरतां लांच दिली जात आहे.

सोम्याला नागवून गोम्याला सजवावा तसा प्रकार येथून तेथून दिसतो. संस्थानिकांच्या करमाफीबद्दलच्या सवलती कायम ठेवावयाच्या त्यांच्या खंडण्या बन्द करावयाच्या, त्यांनीं तोडून दिलेल्या मुलखाबद्दलचे पैसे परत करावयाचे, त्यांच्यावर प्राप्तीवरील कर बसवावयाचे नाहींत, हे सर्व प्रकार पाहिले म्हणजे फेडरेशनचें स्वरूप उघडें पडतें. आतां हिंदुस्थान संयुक्त होणार आहे म्हणून खंडण्या बंद कराव्या असें म्हणणाऱ्या आर्थिक तज्ज्ञांचा विवेक संस्थानांत प्राप्तीवरील कराच्या, अंतर्गत जकातीच्या वेळीं कोठें गेला होता ? जर एक अन्याय तुम्ही विचारांत घेतां तर दुसरा अन्याय कां चालू ठेवतां ? तेव्हां डेव्हिडसन कमिटीचें काम हें बरोबर झालेलें नाहीं. त्यांत पक्षपात व अन्याय आहे तो दूर झाला पाहिजे. ब्रिटिश सरकारनें आपल्या स्वार्थाकरतां मागें कांहीं तहनामे केले असतील, ते तहनामे संस्थानें जर संयुक्त घटनेंत येणार नसतील, तर न्याय्य ठरलें असतें. जबाबदारीचें राज्य जर हिंदुस्थानला आम्हीं देणार आहों असें म्हणतां तर मागील घाणही तुम्ही काढून टाकली पाहिजे. ह्या अन्यायाची जाणीव शिफारसी करणाऱ्यांना नव्हती असें नाहीं, पण सर्वच गोष्टी कोरड्या तर्कानें होत नाहींत असा त्यांचा अभिप्राय आहे.

---

## १७

# पैशाचा जमाखर्च

१५० ते १६० कलमांत किरकोळ आर्थिक प्रश्नांबद्दल तजविजी केल्या आहेत. त्यांतील कांहीं तपशीलासंबंधीं असल्यामुळें सामान्य वाचकांना त्यांत शिरण्याचें कारण नाहीं. पण ढोबळ ढोबळ ज्या तजविजी करण्यांत आल्या आहेत त्यांचा येथें उल्लेख करणें जरूर आहे.

प्रांताच्या किंवा संयुक्त सरकारच्या तिजोरीवर हिंदुस्थानाबाहेरील कामाकरतां बोजा लादूं नये असें म्हटलें आहे. पण दोन्ही कायदेमंडळांच्या कक्षेबाहेरील कार्याकरतां मदत देतां येतें. कांहीं युनिव्हर्सिटीज्‌ना या सवलतीचा फायदा घेतां येईल. मद्रास विश्वविद्यालय हें संयुक्त सरकारचें समजण्यांत येऊन त्याला मध्यवर्ती सरकारकडून मदत मिळण्याची व्यवस्था झाली आहे.

संयुक्तसरकारचा किंवा प्रांताचा पैसा सुरक्षित राहण्याची जबाबदारी ग. जनरल व गव्हर्नरवर टाकण्यांत आली आहे. पैसे ठेवणें, काढणें, हिशेब ठेवणें वगैरेंबद्दल ग. जनरल अगर गव्हर्नर यांनीं मंत्र्यांच्या सल्ल्यानें नियम करावयाचे आहेत.

हिंदी मंत्र्यांच्या ताब्यांत आर्थिक खातें देण्यापूर्वी रिझर्व्ह बँक स्थापन झाली पाहिजे अशी अट घालण्यांत आली होती. ही बँक राजकीय पक्षोपपक्षांपासून स्वतंत्र ठेवण्यांत यावी व तिनें नाणीं पाडणें, चलनी नोटा काढणें, पत टिकविणें वगैरे राष्ट्रांत व पर-

राष्ट्रांत आर्थिक स्थैर्य टिकविण्याच्या गोष्टी कराव्या असा बँक काढण्यांत हेतु होता. बाह्यतः हिंदुस्थानच्या आर्थिक स्थैर्याकरतां जरी ही बँक काढावयाची असली तरी मनांतील हेतु इंग्लंडमधील भांडवलवाल्यांचें संरक्षण करणें व त्यांना सवलती देणें हा होता. ही बँक १९३४ चा कायदा होऊन पुढील सालीं स्थापन झाली. या बँकेच्या मध्यवर्ती बोर्डावर जे अधिकारी घ्यावयाचे त्यांतील गव्हर्नर, दोन डेप्युटि गव्हर्नर्स, चार डायरेक्टर्स, व एक सरकारी तज्ञ इतके ८ जण गव्हर्नर जनरलनें नेमावयाचे आहेत. बाकीचे आठ निवडावयाचे आहेत. या बँकेच्या नाण्याबद्दल अगर चलनाबद्दल किंवा घटनेबद्दल संयुक्त कायदेमंडळाला ग. जनरलच्या आगाऊ संमतीशिवाय कोणतींहि बिलें आणतां येणार नाहींत. ही संमति ग. जनरलनें आपल्या विवेचक बुद्धीनें द्यावयाची आहे.

फेडरेशनच्या मिळकतीवर प्रांत किंवा संस्थान कर बसवूं शकत नाहीं. यासंबंधीं निराळी व्यवस्था संयुक्त कायदेमंडळ कायदा करून करूं शकते. पण प्रांतिक घटना अंमलांत येण्यापूर्वीं जर या मिळकतीवर कर घेत असतील तर फेडरेशनचा निराळा कायदा होईपर्यंत हा कर घेतला जाईल.

प्रांत किंवा संयुक्त घटनेंत येणारीं संस्थानें यांची ब्रिटिश हिंदुस्थानांत जी जमीन, इमारती वगैरे मिळकत असेल त्या मिळकतीच्या उत्पन्नावर संयुक्त कायदेमंडळ कर बसवूं शकणार नाहीं. पण जर एखादा प्रांत आपल्या प्रांताबाहेर किंवा संस्थानिक संस्थानाबाहेर ब्रिटिश हिंदुस्थानांत व्यापारधंदा करीत असेल तर त्यावर कर घेतला जाईल. तसेंच एखाद्या संस्थानिकाची संस्थानाबाहेर ब्रिटिश

हिंदुस्थानांत वैयक्तिक मिळकत असेल तर तिच्या उत्पन्नावर कर घ्यावयास प्रत्यवाय नाहीं.

कोर्टाचे, कमिशनचे, सरकारी नोकरांच्या पेन्शनचे पैसे हे फेडरेशननें किंवा प्रांतानें दिले पाहिजेत असें एका कलमांत सांगितलें आहे.

सेक्रेटरी ऑफ स्टेटवर ही देणीं भागवण्याची जबाबदारी आहे, त्याकरतां त्याच्या हातीं भरपूर पैसा ठेवला पाहिजे. सेक्रेटरी ऑफ स्टेटवर इंग्लंडमधील सेवानिवृत्तांचे पैसे देण्याची जबाबदारी असते. ती त्याला बिनबोभाट भागवितां यावी म्हणून त्याच्या हातीं पैसा खेळता असावा असें कायद्यानें सांगितलें आहे.

ब्रह्मदेश हिंदुस्थानपासून स्वतंत्र झाल्यामुळें त्यांच्या आर्थिक संबंधाची कायद्यानें तरतूद केली आहे. याबद्दल ज्या तजविजी कराव्या लागतील त्याचे अधिकार बादशहांना देण्यांत आले आहेत. त्याचप्रमाणें ब्रह्मदेशांत जाणाऱ्या व येणाऱ्या मालावर बसविण्याच्या जकातीबद्दलहि बादशहानें तजविजी कराव्या असें कायद्यानें सांगितलें आहे.

रिझर्व्ह बँक स्थापन झाल्यामुळें तिच्याकडे हिंदुस्थान व ब्रह्मदेशांतील नाणीं व चलनाचा प्रश्न सोंपविला आहे. हीं नाणीं दोन्हीकडे एकच आहेत. त्यांतून होणारा फायदा कोणाला किती द्यावयाचा हेंहि ठरलें आहे.

दुसरा प्रश्न ब्रम्हदेशाच्या कर्जाचा. हिंदुस्थान व ब्रम्हदेश जेव्हां एकच होते, तेव्हां जीं कर्जें हिंदुस्थाननें काढलीं, त्यांतील आपल्या वांटयाचें कर्ज आतां ब्रम्हदेशानें उचललें पाहिजे. हें कर्ज रिझर्व्ह बँकेला नाण्यांतून जो नफा राहील त्यांतून परस्पर घेतलें

जावें अशी योजना करण्यांत आली आहे. १९३७ सालीं ब्रम्हदेशानें हिंदुस्थान सरकारला ३,२३,०१,००० रु. द्यावयाचें होतें.

आयात-निर्यातीच्या कराबद्दल ब्रम्हदेश व हिंदुस्थान यांच्यांत करार झाला आहे. तीन वर्षेंपर्यंत पूर्वींचेच कर कायम रहावयाचे आहेत. त्यानंतर जर या करांत कांहीं बदल करावयाचा असेल तर बारा महिने अगोदर ग. जनरल किंवा ब्रम्ही गव्हर्नर यांनीं नोटिस देऊन करार संपवावा.

## उसनवारी व हिशेबतपासणी

सेक्रेटरी ऑफ स्टेट, फेडरल सरकार, प्रांतिक सरकार व संयुक्त घटनेंत येणारीं संस्थानें यांना कर्जाऊ रकमा काढाव्या लागतात. ही कर्ज काढण्याची सत्ता कोणाला किती असावी याची तरतूद कायद्यांत केली आहे. सेक्रेटरी ऑफ स्टेटला इतके दिवस हिंदुस्थानच्या करतां कर्ज काढण्याची सत्ता होती, ती या कायद्यानें काढून घेतली आहे. फेडरेशन स्थापन होईपर्यंत दरम्यानच्या काळांत स्टेट सेक्रेटरी हिंदुस्थानकरतां कर्ज उभारूं शकेल. पण फेडरेशन स्थापन झाल्यानंतर आपल्या करांच्या तारणावर संयुक्त कायदेमंडळाला कर्ज काढण्याची सत्ता दिली आहे. तशीच प्रांताला प्रांतिक कराच्या तारणावर कर्ज काढण्याची सत्ता देण्यांत आली आहे.

फेडरेशन हें प्रांताला कर्ज देऊं शकतें, किंवा प्रांतांनीं कर्ज काढलें असेल तर त्याबद्दल हमी घेऊं शकतें. फेडरेशनला प्रांताला देण्याकरतां लागणारी ही कर्जाऊ रक्कम कायदेमंडळांत मताला टाकतां येत नाहीं.

प्रांताला स्वतंत्रपणें कर्ज उभारण्याचा हक्क असावा असें डोळ्यांत आसवें आणून प्रांताचे अभिमानी आर्थिक चौकशीपुढें सांगत होते. ते म्हणत कीं, मागील कायद्यानें आपल्यावर निष्कारण अनिष्ट बंधनें घातलीं आहेत व आपली सत्ता मर्यादित केली आहे. कर्ज काढण्याची अमर्याद सत्ता आपल्याला असावी असें त्यांचें मागणें होतें. ह्या अप्रतिहत कर्ज काढण्याच्या सत्तेमुळें निरनिराळ्या घटकांत भलतीच चढाओढ होईल असें सांगण्यांत आलें. तथापि प्रांतांना नव्या कायद्यांत कर्ज काढण्याची बरीच सत्ता दिली आहे. प्रांतातर्फे गाऱ्हाणीं मांडणारे २५० जण होते व त्यांना मध्यवर्ती सत्तेतर्फे गप्प बसविणारे तितकेच थोर पुरुष होते. स्वायत्त प्रांतांना जर मोकळेपणानें कर्ज काढूं दिलें नाहीं तर त्यांची प्रगति कुंठित होईल असें प्रांताभिमानी म्हणत. त्यांचें म्हणणें पील कमिटीनें मान्य केलें. संयुक्तसरकारचा प्रांताच्या कर्जउभारणीवर पूर्ण ताबा असणें अनिष्ट आहे असें त्यांनीं मत दिलें. आणि आपल्या उत्पन्नाच्या तारणावर कर्ज काढण्याची परवानगी प्रांतांना देण्यांत आली. हें कर्ज जर हिंदुस्थानाबाहेर काढावयाचें असेल किंवा पूर्वींचे कर्जाची कांहीं फेड करावयाची शिल्लक असेल तर नवें कर्ज काढण्यापूर्वीं फेडरेशनची परवानगी घ्यावी लागेल. फेडरेशननें ही परवानगी देतांना निष्कारण आढेवेढे घेऊं नयेत; पण जर फेडरेशननें हटवादीपणानें परवानगी नाकारली तर ग. जनरलकडे दाद मागावी व त्यानें ह्या प्रकरणाचा स्वतः निकाल द्यावा असें सांगितलें आहे.

संयुक्तसरकारनें, फेडरेशनमध्यें आलेल्या संस्थानिकांना जर कर्ज

पाहिजे असेल तर त्यांची परिस्थिति पाहून व अटी लादून त्यांना कर्ज द्यावें अगर त्यांच्या कर्जाकरतां हमी घ्यावी.

संस्थानिक व मध्यवर्ती सत्ता यांच्यामधील देण्याघेण्याची विल्हेवाट ज्याप्रमाणें लावण्यांत आली, त्याप्रमाणें प्रांत व मध्यवर्ती सत्ता यांच्याहि देण्याघेण्याच्या व्यवहाराचा निकाल कसा करावा याबद्दल ऑटो नेमियर यांनीं आपली योजना मांडली आहे.

प्रांतिक स्वायत्तता सुरू झाल्यानंतर हिंदुस्थानसरकारनें दोन गोष्टी करावयाच्या आहेत. (१) प्रांतांच्या शिलकी रकमा ज्या हिंदुस्थान सरकारच्या नांवावर आहेत, त्या प्रांतांना देऊन टाकावयाच्या आहेत व (२) १९३७ पूर्वीची म्हणजे स्वायत्ततेच्या पूर्वीचीं निरनिराळीं कर्जें फेडून कमी दराचें एकच नवें कर्ज उभारावयाचें आहे अशा या दोन सूचना होत.

प्रांतिक सरकारच्या ज्या शिलकी हिंदुस्थानसरकारकडे असतात, त्यांतील कांहीं व्याजानें असतात व कांहीं अनामत बिनव्याजीं असतात. या रकमा रिझर्व्ह बँकेच्या स्थापनेपासून प्रांताकडे गेल्या आहेत. प्रांतांना लागणाऱ्या रकमा व रिझर्व्ह बँकेंत कमींतकमी ठेवावयास लागणाऱ्या ठेवी या त्यांनीं मध्यवर्ती सरकारकडून घेतल्या आहेत. पण त्यांच्या ठेवी मध्यवर्ती सरकारकडे जर यापेक्षां जास्त असतील तर त्या मध्यवर्ती सरकारच्या कर्जाच्या पोटीं फेड म्हणून वळत्या करावयाच्या आहेत. मध्यवर्ती सरकार प्रांतांची अडचण लक्षांत घेऊन ही फेड करून घेणारहि नाहीं, पण त्यांत प्रांतांचा तोटा आहे. कारण मध्यवर्ती सरकारचें कर्ज ज्या वेळीं काढलें गेलें त्या वेळीं व्याजाचे दर आजच्यापेक्षां भारी होते. तेव्हां या भारी व्याजाच्या कर्जाची वळतावळत करून

नवें कर्ज काढणें केव्हांहि श्रेयस्कर. त्यामुळें प्रांतांच्या अंदाजपत्रकांत थोडी बचत होईल. याच पद्धतीनें प्रांतांचीं जीं काय जुनीं कर्जें असतील तीं भारी दराचीं असल्यामुळें, देऊन टाकावीं व नवें एकच कर्ज काढावें अशी नेमियरची सूचना आहे व ती चांगली आहे. हें एक कर्ज फेडून टाकण्यास ४५ वर्षांची मुदत घ्यावी असेंहि सुचविण्यांत आलें आहे.

प्रत्येक प्रांताला कर्ज किती आहे, त्यावर व्याज किती द्यावें लागतें, नव्या योजनेप्रमाणें त्यांत किती बचत होईल तें पुढील कोष्टकांत दाखविलें आहे.

( आंकडे लाखांचे )

| तपशील | मुंबई | मद्रास | सिंध | सं.प्रांत | पंजाब | म.प्रांत |
|---|---|---|---|---|---|---|
| एकंदर कर्जाची रक्कम | २३२५·३ | ९७८·१ | ४५५·२ | २६४७·१ | १७९१·४ | ३७८·४ |
| त्या निरानिराळ्या कर्जांवरील सालीना व्याज | १४९·३ | ९०·५ | २४ | १५७·४ | ९६·९ | ४५·६ |
| एकच कर्जावरील होणारें व्याज | १२१·५ | ५१·२ | २२·१ | १३३·५ | ८६·५ | १९·० |
| त्यांमधील ठोकळ नफा | २७·८ | ३९·३ | १·९ | २३·९ | १०·४ | २६·६ |
| या नफ्यावरील देणीं वगैरे | १३·३ | १३·१ | १·२ | ११·२ | ८·७ | ५·७ |
| त्यामधील निवळ नफा | १४·५ | २६·२ | ·७ | १२·७ | १·७ | २०·९ |

बाकीच्या प्रांतांचीं कर्जें मदतीच्या पोटीं मध्यवर्ती सरकारनें वळतीं करून घेतलीं. अशा प्रकारें नेमियरच्या लवादनिवाडयाप्रमाणें प्रत्येक प्रांताला कांहीं नफा होईल हें निःसंशय आहे.

**ऑडिटर–जनरलः**—सबंध हिंदुस्थानला एक सरहिशेब-तपासणीस असावा अशी कायद्यानें व्यवस्था केली आहे. त्याची

नेमणूक करणें अगर त्याला काढून टाकणें हें बादशहाच्या हातीं आहे. तसेंच त्याला काम नेमून देणें हेंहि बादशहा व पुढें संयुक्त कायदेमंडळ ठरविणार आहे. प्रांताला जर असा सरहिशेबतपासणीस हवा असेल तर तोही बादशहा नेमतील.

विलायतेंत होणाऱ्या हिंदुस्थानच्या खर्चाची तपासणी करण्याकरतां एक ऑडिटर ग. जनरलनें नेमावयाचा आहे. विलायतेंतील या ऑडिटरच्या व फेडरेशनच्या ऑडिटर–जनरलच्या पगाराचा बोजा फेडरेशनवर आहे व त्यावर मतें देतां येणार नाहींत. संस्थानविषयक होणाऱ्या खर्चाची तपासणी ह्या दोघांनीं परिस्थितिप्रमाणें करावयाची आहे. ऑडिटर–जनरलचा पगार ६०,००० रु. सालीना ठरला आहे.

## मिळकती, ठेके, कर्जाच्या जबाबदाऱ्या व फिर्यादी.

सरकारी इमारती, जमिनी वगैरे ज्या असतात, त्या प्रांत व मध्यवर्ती सरकार यांच्या असतात. नव्या कायद्यामुळें पूर्वींचे शब्दप्रयोग बदलले आहेत व त्यामुळें जुनेच मालकी हक्क, पण नव्या शब्दप्रयोगांत, निर्दिष्ट केले आहेत. ही सारी संपत्ति बादशहाची आहे हें तर उघड आहे.

जी मिळकत—जमिनी व इमारती—प्रांतांत असेल, ती प्रांताच्या मालकीची आहे. पण जर प्रांत व मध्यवर्ती सरकार यांच्यांत ती मिळकत संयुक्त सरकारच्या उपयोगाकरतां किंवा हिंदी संस्थानांत बादशाही सत्तेच्या उपयोगाकरतां घ्यावी असे करार झाले असतील तर ती संयुक्तसरकारची समजली जाईल. ती मिळकत हिंदुस्थानच्या बाहेर ( ब्रम्हदेश व एडनखेरीजकरून ) असेल तर ती संयुक्तसर-

कारची समजली जावी. युनायटेड किंगडममधील मिळकत ही कमिशनस् ऑफ वर्क्सच्या नियंत्रणाखालीं आहे. पण तिची विल्हेवाट ग. जनरलच्या संमतीनें होऊं शकेल.

बिनवारसी संपत्ति गव्हर्नरच्या प्रांतांत असेल तर ती प्रांतिक सरकारची आणि तशी नसेल तर फेडरेशनची समजली जाईल.ह्या मिळकतीची खरेदीविक्री, दान, गहाण वगैरेसंबंधीचे सर्व अधिकार प्रांतिक किंवा संयुक्त मंडळाच्या कार्यकारी सत्तेला आहेत.ग. जनरल किंवा गव्हर्नर सांगतील तसें अगर सांगतील त्याला हे व्यवहार करतां येतील. नवी मिळकत जी संपादन केली जाईल अगर होईल ती बादशहाच्या नांवानें केली जाईल.

सेक्रेटरी ऑफ स्टेटवर पूर्वी हिंदुस्थानकरतां फिर्यादी होत असत. नव्या घटनेप्रमाणें या फिर्यादी प्रांत किंवा फेडरेशनवर होतील.तसेंच पूर्वी सेक्रेटरी ऑफ स्टेट जशा फिर्यादी लावी, तशा आतां प्रांत किंवा संयुक्त सरकार लावूं शकेल.सेक्रेटरी ऑफ स्टेटला अधिकारविहीन केल्यामुळें त्याचा वारसा फेडरेशन व प्रांताकडे आला आहे.

पूर्वी सेक्रेटरी ऑफ स्टेट ज्या कर्जाला जबाबदार असे, ती सर्व जबाबदारी १ एप्रिल १९३७ पासून प्रांत व फेडरेशनवर पडली आहे.

सेक्रटरी ऑफ स्टेट इन् कौन्सिल हा ज्या फिर्यादींत युनायटेड किंगडममध्यें वादी अगर प्रतिवादी असेल, त्या फिर्यादींत सेक्रेटरी ऑफ स्टेट हे शब्द योजावयाचे आहेत. यापुढें जर हा सेक्रेटरी प्रांत किंवा फेडरेशनकरतां कांहीं करारमदार करील तर त्याबद्दलच्या फिर्यादी त्याच्यावर करतां येतील. मात्र खर्चाची जबाबदारी

केव्हांही त्याच्यावर म्हणजे इंग्लंडच्या तिजोरीवर पडतां कामा नये. ती प्रांत किंवा फेडरेशननें घ्यावयाची आहे. ह्याच गोष्टी त्यांनीं संयुक्त घटनेंत आलेल्या संस्थानांच्या बाबतींत केल्या तर त्याच्या खर्चाची अगर नुकसानीची जबाबदारी फेडरेशनवर पडेल.

आर्थिक प्रश्नाबाबत निरनिराळ्या व्यवस्था कसकशा केल्या आहेत याबद्दल वर विस्तारशः हकिगत दिली आहे. आतां फक्त पैशाच्या उत्पत्तीचें एकच खातें राहिलें व तें रेल्वेचें. त्या खात्या-संबंधीचा विचार पुढील प्रकरणांत करूंच, पण त्या खात्याकडे वळण्यापूर्वी आपण नव्या घटनेंत नवें काय आहे हें बघितलें पाहिजे.

नव्या घटनेचे घटक तीन आहेत हें मागें सांगितलेंच आहे. एक संयुक्त सरकार, दुसरे प्रांत व तिसरीं संस्थानें. वास्तविक विचार करतां हे सर्व घटक हिंदुस्थानांतील असल्यामुळें एका घटकाला अधिक पैसा दिला किंवा दुसऱ्याला कमी दिला म्हणून तक्रार करण्याचें कारण नाहीं. जेवायला बसल्या-नंतर वाटींत एकादा पदार्थ वाढला, द्रोणांत दुसरा वाढला किंवा ताटांत तिसरा वाढला तरी खाणारा एकच असल्या-मुळें वाढण्याबद्दल केलेली कुरकुर ही फार तर छांदिष्टपणाची आहे असें आपण म्हणूं शकूं. हिंदुस्थान हा हिंदुस्थानचा खरा धनी असतां तर मद्रास पुढें गेला, काश्मीर मागें पडलें, सिमल्याला तंगी झाली किंवा कूर्ग प्रांतांत पैशाचा पूर लोटला म्हणून व्यापक दृष्टीच्या राष्ट्रीय गृहस्थाला तक्रार करण्यास जागा नसती. आज आम्ही जी तक्रार करीत आहों, ती मद्रास मुंबईविरुद्ध किंवा संयुक्त प्रांत सिमल्याविरुद्ध आहे म्हणून करीत नसून सर्वेचे सर्व

प्रांत व मध्यवर्ती सत्ता ब्रिटिश पार्लमेंटविरुद्ध करीत आहों. ब्रिटिश पार्लमेंटनें नव्या राज्यघटनेंत प्रांतोप्रांतीच्या गव्हर्नरचे हातीं आणि संयुक्त सरकारवर ताबा चालविणाऱ्या ग. जनरलचे हातीं जी अमर्याद सत्ता व ती गाजविण्यास प्रमाणबाह्य पैसा ठेवला आहे त्याबद्दल तक्रार आहे. घरांत सणवार केव्हां करावयाचा, पैपाहुणा आला तर त्याला कोंडाभाकरी घालावयाची कां पंचपक्वान्नांचें जेवण घालावयाचें, आपण पोटाला चिमटा घेऊन मुलाबाळांचे अगर रुग्णाइतांचें संगोपन कसें करावयाचें हीं जर विवेचक बुद्धीनें निर्णय देण्याची सत्ता कुटुंबांतील घटकांना नसेल तर तें कुटुंब कधींच तगूं शकणार नाहीं. पोट फुटेपर्यंत अजीर्ण झालेल्यांना आणखी खाऊं घाला आणि भुकेनें मरणाराला लंघन घाला असा विचित्र हुकूम एखाद्या त्रयस्थानें सोडला तर त्याच्या अरेरावीविरुद्ध बंड करणें व त्याचे हुकूम अमान्य करणें हें आवश्यक होऊन बसतें. आम्ही हें जें विवेचन करीत आहों ते न्याय, समता वगैरे भूमिकेवर उभे राहून करीत आहों.

फेडरेशनला हिंदुस्थानचा जो विरोध आहे, तो बाहेरील आवरणाला अगर सांगाड्याला विरोध नाहीं. तो आंतमध्यें घातलेल्या प्राणाला विरोध आहे. मनुष्याच्या सांगाड्यांत पशूचें अगर पक्ष्याचें काळीज घालून त्या सांगाड्याला मनुष्यत्व येत नाहीं. मयसभा निर्माण करणारा कारागीर कितीहि कुशल असला तरी त्याला चिखलाचे खांब आणि पाण्याचें छत लावतां आलें नाहीं.

बिनजबाबदारीच्या नव्या राज्यघटनेला जबाबदार राज्यपद्धति म्हणणें म्हणजे अन्यायाला न्याय म्हणण्यासारखें आहे. हिंदुस्थानला जबाबदार राज्यपद्धतीवर संतुष्ट रहावयाचें आहे, कां त्याला

ब्रिटिश साम्राज्यांतून फुटून निघावयाचें आहे, हा प्रश्न नंतरचा आहे. हिंदुस्थानला जबाबदारीचें राज्य आपण देत आहों अशी जी नव्या कायद्याच्या निमित्तानें ब्रिटिश मुत्सद्यांनीं बडबड चालवली आहे ती खोटी आहे एवढेंच सिद्ध करावयाचें आहे.

ग. जनरलच्या हातांत खर्चापैकीं, किती भाग ठेवला आहे हें आपण आंकड्यानिशीं पाहिलें म्हणजे जबाबदारीची जाणीव येईल. त्याच्या हातीं इतक्या रकमा ठेवण्याचीं कारणें अनेक आहेत. हिंदुस्थानवर अविश्वास, स्वतःची सत्ता न सोडण्याची मनोवृत्ति, ब्रिटिश भांडवलाला सुरक्षितता, आपल्या नोकरांना अभय वगैरे कारणें त्यांत प्रमुख आहेत.

आपण १९३८-३९ चे अगदीं ताजे खर्चाचे ढोबळ आंकडे घेऊं व त्यांत ग. जनरलचे हातीं किती खर्च ठेवला आहे व लोकप्रतिनिधींच्या हातीं किती दिला आहे तें पाहूं.

आंकडे हजारांचे.

| | मताचा | बिनमताचा | एकूण. |
|---|---|---|---|
| जकात | ७९,२२, | ४२,८४ | १,२२,०६ |
| मध्यवर्ती एक्साइज कर | १०,५० | ३२,५८ | ४३,०८ |
| प्राप्तीवरील कर कॉर्पोरेशन टॅक्स धरून | ७८,२८ | १,०२ | ७९,३० |
| मीठ | ६४,७२ | ४३,४८ | १,०८,२० |
| अफू | २४,३७ | १,४२ | २५,७९ |
| प्रांतिक एक्साइज | ४,९७ | ४० | ५,३७ |
| स्टँप्स् | १६,७९ | १,९२ | १८,७१ |
| जंगल | ६,०२ | २,७३ | ८,७५ |
| इरिगेशन | २,०९ | १२,२९ | १४,३८ |
| पोस्ट व तार | १०,८६,६६ | ८९,५७ | ११,७६,२३ |

| | मताचा | बिनमताचा | एकूण. |
|---|---|---|---|
| कर्जावरील व्याज | ९५,४४ | १३,६६,८८ | १४,६२,३२ |
| कार्यकारी कौन्सिल | १,२८ | ५०१ | ६२९ |
| कौन्सिल ऑफ स्टेट | १,३४ | ३ | १३६ |
| ले.असेंब्ली व ले.डिपार्टमेंट | ८,३२ | ७९ | ९,११ |
| होम डिपार्टमेंट | ९.४३ | २०३१ | २९,७४ |
| ले. डिपार्टमेंट | ४७३ | २१७ | ६२० |
| शिक्षण, आरोग्य व जमीनखातें | ६४३ | २५२ | ८९५ |
| फायनॅन्स खातें | ५६५ | ९२६ | १४९१ |
| औद्योगिक खातें | ४५० | १९९ | ६४९ |
| मजूरखातें | ४१३ | १५१ | ५६४ |
| कम्युनिकेशन खातें | १७१ | ११२ | २८४ |
| रेव्हेन्यु मध्यवर्ती | ३०९ | १४५ | ४५४ |
| इंडिया ऑफिस व हायकामिशनर ऑफिस | १७,५८ | २३,७८ | ४१,३६ |
| दुसरीं सरकारीं खातीं | १२५ | ... | १२५ |
| हिशेबतपासणी | ९४०५ | ९७८ | १,०३,८३ |
| न्यायकारभार | ११२ | ३३५ | ४४७ |
| पोलिस | १६६ | ४५ | २११ |
| पोर्टस व पिलटेज | १४३० | ९६३ | २३,९३ |
| दीपगृहें व दीपनौका | ८८३ | १० | ८९३ |
| मोजणी | १९४० | ७०१ | २६४१ |
| हवाखातें | २०६० | ९६ | २१५६ |
| भूगर्भपहाणी | २१८ | २२९ | ४४७ |
| वनस्पतिपहाणी | ६१ | ३५ | ९६ |
| प्राणीपहाणी | १३७ | ४७ | १८४ |
| पुराणवस्तु | १२,५१ | ८३ | १३३४ |
| खाणी | १५६ | १२५ | २८१ |
| इतर शास्त्रीय खातीं | ३०५ | | ३०५ |

| | मताचा | बिनमताचा | एकूण |
|---|---|---|---|
| शिक्षण | ६७४ | १३ | ६८७, |
| मेडिकल सर्व्हिसेस् | ७०४ | २६५ | ९७९ |
| सार्वजनिक आरोग्य | १०६३ | ३२० | १३८३ |
| शेतकी | ३५७९ | ७२ | ३६५१ |
| शेतकीखातें संशोधन | ७५३ | १५२ | ९०५ |
| शेतकीविक्रीसुधारणा | ५१० | ... | ५१० |
| सिव्हिल व्हेटेरनरी सर्व्हिसेस् | ८९७ | ७९ | ९७६ |
| उद्योगधंदे | ९०७ | ५ | ९१२ |
| विमान | ३२५३ | २६ | ३२७९ |
| विमानावर भांडवल | १ | ... | १ |
| ध्वनिक्षेपण | २२३२ | ... | २२३२ |
| इंडियन स्टोअर्स खातें | २२९४ | १२२ | २४१६ |
| व्यापारी बातम्या व आंकडे | ७७६ | ८५ | ८६१ |
| खानेसुमारी | ५ | १० | १५ |
| एमिग्रेशन–आंतील | १२ | ... | १२ |
| एमिग्रेशन परदेशीय | १९२ | १४५ | ३३७ |
| समाईक भांडवल कंपन्या | १४७ | ६ | १५३ |
| किरकोळ खातीं | ४१६ | २९ | ४३५ |
| चलन | १५६४ | १६३ | १७२७ |
| टांकसाळ | १९०७ | १०९ | २०१६ |
| सिव्हिल कामें | ८४७३ | २४३९ | १,०९,१२ |
| मध्यवर्ती रस्तेफंड | १,७०,०० | ... | १,७०,०० |
| सुपरॲन्युएशन भत्ते व पेन्शन | १,१०,२८ | १,७२,८८ | २,८४,१६ |
| स्टेशनरी व छपाई | ५३,४३ | ४८ | ५३,९१ |
| किरकोळ | ११,४५ | २७८ | १४२३ |
| प्रांतिक सरकारांना ग्रँट्स | १,७२, | ३,०३,०० | ३,०४,७२ |
| प्रांत व मध्यवर्ती सत्तेमधील किरकोळ वजावाट | १० | | १० |
| नोकरांच्या खर्चांतलि काट | ७ | | ७, |

| | मताचा | बिनमताचा | एकूण. |
|---|---|---|---|
| दिल्ली–राज्यव्यवस्था खर्च | ५४,६५ | ३५६ | ५८२१ |
| अजमेर ,, | १६२६ | २९६ | १९,२२ |
| पंथपिपलोदा | १३ | .... | १३ |
| अंदमान निकोबार | ३१,९० | १७६ | ३३६६ |
| ग. जनरलचा नोकरवर्ग घरखर्च व भत्ता | ... | १७६६ | १७६६ |
| फेडरल पब्लिक सर्व्हिस कमिशन | ... | ४७९ | ४७९, |
| संरक्षणखातें | ... | ५९७ | ५९७ |
| धर्मखातें | ... | ३२१९ | ३२१९ |
| बादशहाच्या प्रतिनिधींचे पगार वगैरे देणें | | १,३१,३९ | १,३१,३९ |
| मागासलेले विभाग | .... | २०१७३ | २०१७३ |
| परराष्ट्रीय व्यवहार | ... | ६३५६ | ६३५६ |
| बलुचिस्थान | ... | ७४८९ | ७४८९ |
| सैन्य | ... | ५०,७७,६९ | ५०,७७,६९ |
| पोस्ट व तार भांडवल | २०८३ | ... | २१८३ |
| पोस्ट व तार स्टोअर्स सस्पेंस | १ | ... | १ |
| सदर टेलिफोनवाढीकरतां | २,५०,०० | ... | २,५०.०० |
| शेतकीसुधारणाभांडवल | २३ | ... | २३ |
| विजगापट्टम बंदर भांडवल | ३८६ | ... | ३८६ |
| दिल्ली वसविण्याकरितां भांडवल | १५७५ | ... | १५७५ |
| पेन्शनऐवजीं रोख रक्कम | १ | १३६५ | १३६६ |
| बिनव्याजी ॲडव्हान्स फेड | ४६२६ | ... | ४६२६ |
| कर्जाऊ रकमा व व्याजाचे ॲडव्हान्स | ९५२९ | ... | ९५२९ |
| बादशहाच्या प्रतिनिधीनें संस्थानांना दिलेलें कर्ज | ५ | ५ | ५ |
| एकूण. | २९,०९,२९ | ७८,५३,८३ | १,०७,६३,२२ |

बजेटमध्यें खर्चाचा आंकडा १,२२,१८,४७,००० इतका दाखविला आहे. त्यांत पोस्ट व तारखात्याचा,१०,९५,७५,००० व इतर किरकोळ ३,७१,००० इतका खर्च मिळवून आणि

त्यांतून रेल्वे खर्चाचे ३०,०१,७५,००० इतके वजा घालून एकूण खर्च १०३,१६,१८,००० इतका दाखविला आहे.

ह्या खर्चाची आपण ढोबळ छाननी केली तर आपणांस असें दिसतें कीं, १०७ कोटींपैकीं, ५१ कोटी सैन्य, १॥· कोटी पेन्शन्स, १३॥ कोटी व्याज यांवर खर्च झाले आहेत. प्रांतांना द्यावयाची देणगी (Subvention) ३ कोटीं, बादशहाच्या संस्थान विषयक कारभाराचा १,३१ लक्ष खर्च व मागासलेल्या टापूंचा २ कोटी खर्च हा आपण हिशेबांत घेतला म्हणजे ज्यावर असेंब्लीला मत देतां येत नाहीं असा एकूण खर्च ७१ कोटी होतो. बाकीचा ७-७॥ कोटी जो खर्च उरतो त्यांतील बराचसा आय्. सी. एस्. सारख्या नोकरांच्या पगारांवर होतो. अशा प्रकारें १०७ कोटींपैकीं, ७७ कोटी म्हणजे जवळजवळ ७५ टक्के खर्च असा आहे कीं, ज्यावर संयुक्त सरकारची सत्ता चालणार नाहीं. ग. जनरलनें आपल्या हातीं ही एवढी खर्चाची सत्ता ठेवून (१) संरक्षण, (२) सनदी नोकर (३) स्वदेशी व परदेशी भांडवलवाले अशा वर्गांचें हितसंरक्षण केलें आहे. फेडरेशन सुरू झाल्यावर आणखी जीं खातीं निर्माण होतील त्यांचा खर्च ग. जनरलच करणार असल्यामुळें ७५ टक्क्यांचा खर्च ८० टक्क्यांवर जाईल.

हिंदी लोकांच्या हातांत जर हे अधिकार दिले असते तर त्यांत खरोखर कमी अधिक केलें गेलें असतें. सैन्याचा आपण प्रश्न घेऊं. हिंदुस्थानला सैन्य नको आहे असें नाहीं. उलट जगाच्या तोडीचें आरमार व वैमानिक दल आम्हांला हवें आहे. सध्यां हिंदुस्थानांत जे निकृष्ट दर्जाचें सैन्य आहे तसें सैन्य हिंदी लोकांच्या हातीं सत्ता आली तर ठेवलें जाणार नाहीं. जगांतील प्रमुख राष्ट्रांच्या सैन्याशीं

तुलना केली तर हिंदी सैन्य त्यांच्यापुढें किती काळ टिकाव धरील हा खरोखर प्रश्न आहे. हिंदुस्थानला ५० कोटीच काय पण त्यापेक्षां अधिक खर्च सैन्य, आरमार व वैमानिक दल यांवर करावा लागेल. पण निव्वळ इंग्लंडमध्यें निरुपयोगी ठरलेले गोरे लोक येथें पोसून आम्ही आमच्या पैशाची नासधूस करणार नाहीं. इंग्लंड-मधील या तिसऱ्या दर्जाच्या गोऱ्या लोकांऐवजीं हिंदुस्थान पहिल्या दर्जाचे हिंदी लोक आपल्या सैन्यांत ठेवील व त्यांच्या पगाराचा बोजाहि हिंदुस्थानवर तितका पडणार नाहीं. हिंदी लोकांच्या हातीं सैन्याचे अधिकार आले तर लष्कराची पुनर्घटना करून हें खातें चांगलें सुधारावें लागेल. आजचें सैन्य हें परचक्रापासून हिंदुस्थानचें रक्षण करण्यास कुचकामी आहे. तें हिंदी लोकांना व फार तर अफगाणिस्थानसारख्या मागासलेल्या लोकांना भीति दाखवण्यास उपयोगी पडेल.

ब्रिटिश सरकारनें या सैन्याच्या खर्चापैकीं निम्मा अगर कांहीं खर्च उचलावा असें कांहींजणाकडून सुचविलें जात आहे. आजच्या घटनेप्रमाणें जर पुढेंहि राज्यकारभार चालणार असेल तर या भाडोत्री सैन्याकरतां आम्ही निम्मा खर्च तरी कां सोसावा ? आमच्या खर्चानें आम्हांला गुलामगिरींत ठेवणाऱ्या या सैन्याला आम्ही कां पोसावें हें समजत नाहीं. पण सैन्याचा ताबा हिंदी लोकांच्या हातीं येणार असेल व तो यावयास पाहिजे असेल तर ब्रिटिश सरकारकडून आम्ही एक कवडीहि सैन्याकरतां घेतां कामा नये. आज ब्रिटिश सरकार हिंदी सैन्याचा खर्च देण्याची जी तयारी दाखवीत आहे असें म्हणतात ती जर खरी असेल तर हिंदुस्थानचा त्यांत घात आहे. जो पैसा देतो तो सत्ता गाजवतो. निम्मा खर्च देऊन सबंध

सत्ता गाजविण्यास लागणारें धाडस ब्रिटिश सरकारजवळ नाहीं असें समजण्याचें कारण नाहीं. तेव्हां तात्पुरत्या मोहाला बळी पडून आपण सैन्याच्या बाबतींत ब्रिटिशांचे ताबेदार रहाणें आत्मघातकीपणाचें होणार आहे.

आय्. सी. एस्. व तत्सम अधिकाऱ्यांच्या पगाराला आम्ही हात लावूं शकत नाहीं याचा अर्थ जबाबदारीचें राज्य आम्हांला मिळालें असा होत नाहीं. काँग्रेसचे मंत्री जर ५०० रुपयांवर काम करतात, तर त्यांच्या नोकरांना ५००० रुपये देणें हें कोठल्या कायद्यांत न्याय्य ठरणार आहे ?

कर्जावरील व्याजाच्या बाबतींतहि ब्रिटिश व हिंदी भांडवलवाल्यांना असेंच अभय दिलें आहे. हें कर्ज तपासण्याची सत्ता जबाबदार सरकारला नसावी काय ? म. गांधींनीं म्हटल्याप्रमाणें हें कर्ज कशाकरतां घेतलें, त्या कर्जाचे पैसे कोणत्या मार्गानें मिळविलें, कर्जापेक्षां व्याज जास्त घेतलें गेलें कीं काय वगैरेंची तपासणी झाली पाहिजे. जर प्रांतिक सरकारचे काँग्रेसमंत्री सावकारी नियंत्रणाचे कायदे करतात, त्यांच्या कर्जांत बाजारभावाप्रमाणें काटछाट करूं शकतात, तर तोच न्याय याहि कर्जाला कां लावूं नये ? ब्रिटिश सरकारला हीच भीति वाटत आहे म्हणून त्यांनीं कर्ज व कर्जावरील व्याज ही बाब ग. जनरलच्या हातीं ठेवली आहे.

अशा प्रकारें हिंदुस्थानच्या एकंदर खर्चापैकीं, पाऊण खर्च ग. जनरलकडे सोपवून जबाबदारीच्या स्वराज्याचा पाऊण हिस्सा आधींच काढून घेतला आहे. याशिवाय रेल्वेच्या कारभाराबावत तक्रार आहे ती वेगळीच. संस्थानिकांना जांवयाप्रमाणें

वागविण्याची वृत्ति हीहि हिंदुस्थानच्या जबाबदारीचें स्वरूप किती भ्रामक आहे हें दाखविण्यास पुरेशी आहे. संस्थानिकांना संयुक्त राज्यघटनेचे सर्व फायदे पाहिजेत पण त्यांना त्याचा खर्च सोसावयास नको आहे. इतरत्र म्हटल्याप्रमाणें संस्थानिकांनीं सैन्याच्या खर्चाचा $\frac{1}{3}$ हिस्सा दिला पाहिजे, सनदी नोकरांच्या पगाराचा कांहीं खर्च उचलला पाहिजे, आणि कर्जालाहि नकार देतां कामा नये. कारण हिंदुस्थाननें जें कर्ज काढलें तें हिंदुस्थानच्या हिताकरतांच काढलें नाहीं कां? नव्या घरांत जर तुम्ही रहावयास येणार आहां, तर त्या घराकरतां काढलेलें कर्ज तुम्ही देणार नाहीं, कारकुनांचा पगार देणार नाहीं, शिपाईप्याद्यांचा व रखवालदारांचा खर्च सोसणार नाहीं! या संस्थानिकांना प्राप्तिकर माफ केले आहेत, त्यांच्या जुन्या करमाफ्या अबाधित ठेवल्या आहेत, आणि उलट त्यांच्याकडून येणाऱ्या खंडण्या बंद करून व तोडून दिलेल्या मुलुखाचें उत्पन्न त्यांना परत करावयास सांगून अन्यायावर कळस चढविला आहे. असे हिशेब ज्या राज्यपद्धतींत केले जातात व अशी सत्ता ज्या राज्यपद्धतींत गव्हर्नर-जनरलच्या हातीं दिली जाते, तिला जर जबाबदार राज्यपद्धति म्हणावयाचें, तर बेजबाबदार राज्यपद्धति कोणती असते याचें तरी स्पष्टीकरण झालें पाहिजे.

मागासलेल्या टापूवर ग. जनरलची सत्ता कां असावी, चीफ कमिशनरचे ७ प्रांत इतर प्रांतांत सामील न करतां ग. जनरलनें त्यांवर आपला अंमल कां चालवावा व या सर्वांचा खर्च आम्ही बिनबोभाट कां द्यावा हेंहि कळत नाहीं. इंग्लिश लोकांना आपल्या परमार्थिक उत्कर्षाकरतां देवळें, भिक्षुक, धर्मगुरु वगैरे लागतात.

त्यांचा खर्च ख्रिस्तेतर लोकांनीं कां सोसावा याचेंहि कारण समजत नाहीं. त्यांना लागणाऱ्या भिक्षुकांकरतां परधर्मी म्हणजे हिंदुमुसलमान पार्शी, शीख, यहुदी, वगैरे लोकांनीं खर्च करणें हें ख्रिस्ती धर्माला पर्यायानें मदत करण्यासारखें आहे. इंग्लंडमध्यें असणाऱ्या मशिदी देवळें अगर अग्यारीचे पैसे ब्रिटिश खजिन्यांतून दिले जातात काय? आणि तेथें मशिदी, देवळें वगैरे नसलीं तर तीं बांधून त्यांचा खर्च केला जातो काय?हा खर्च व हें खातें ताबडतोब बंद झालें पाहिजे, तें हिंदी मंत्र्यांच्या हातींहि येतां कामा नये. सधन इंग्लिश लोक आपल्या भिक्षुकांची आजच्यापेक्षां अधिक सोय खास करूं शकतील.

असलेल्या उत्पन्नांतील बहुतेक उत्पन्न अशा प्रकारें काढून घेतलें, पण नवें उत्पन्न हिंदुस्थानला मिळवितां येईल म्हणावें तर त्यांतहि अनेक अडचणींचे हिमालय उभे करून ठेवले आहेत. हिंदुस्थानची औद्योगिक वाढ झाली, येथें नवे नवे धंदे सुरूं झाले तर सरकारचें उत्पन्नहि वाढेल. पण नव्या उद्योगधंद्यांची वाढ, नव्या सुधारणा-कायद्याच्या आगमनप्रसंगीं कायदेशीर साखळदंडांनीं आवळून टाकली आहे. स्वतःच्या देशांतील उद्योगधंदे वाढवावयाचे असतील तर त्या धंद्यांना आर्थिक मदत द्यावी लागते, वहातुकीच्या सवलती द्याव्या लागतात, आणि त्या धंद्यांशीं स्पर्धा करणाऱ्या इतर धंद्यांवर जबर जकाती बसवाव्या लागतात. ज्या वेळीं इंग्लंडची बाजारपेठ यांत्रिक शक्तीवर तयार झालेल्या कापडांनीं गच्च भरून गेली, त्या वेळीं हिंदुस्थानच्या कापडाची गळचेपी ब्रिटिश सरकारनें कशी केली याचा इतिहास अजून नष्ट झाला नाहीं. इंग्लंडच्या बाजारांत येणाऱ्या डाक्काच्या मलमलींनीं वेडावलेल्या आंग्लयुवतींना हिंदी कपडा घेणें अशक्य व्हावें म्हणून ५०० पट जकाती बसविण्यांत

आल्या होत्या किंवा नाहीं ? हिंदी कापड वापरणाऱ्या स्त्रियांच्या अंगावरील कापड जाळून टाकण्याकरतां त्यावर रस्त्यानें जाणारे येणारे इंग्लिश देशभक्त ॲसिडें टाकीत असत किंवा नाहीं? हिंदुस्थानांतील सोनें जहाजें भरभरून इंग्लंडांत नेलें, त्या पैशावर गिरण्या उभारल्या, आमचे उद्योगधंदे साफ मारून टाकले आणि आज ब्रिटिश मुत्सद्दी इंग्लिश व हिंदी व्यापाऱ्यांना समानतेनें वागवा असें सांगण्याकरतां पुढें येत आहेत! ही सवलत एकपक्षी नसावी, म्हणून इंग्लंडमध्येंहि हिंदी व्यापाऱ्यांना ब्रिटिश व्यापाऱ्यांइतक्या सवलती व हक्क दिले जातील असें सांगत आहेत! आम्हांलाहि ठाऊक आहे व इंग्लिश व्यापाऱ्यांनाहि ठाऊक आहे कीं, विलायतेंत देऊं केलेल्या या सवलती निव्वळ ढोंगीपणाच्या आहेत. इंग्लिश व्यापारी आज जसा हिंदुस्थानची बाजारपेठ थोडयाबहुत प्रमाणांत काबीज करूं शकतो, तशी हिंदी व्यापारी जर करूं शकले असते तर यांपैकीं एकहि सवलत आम्हाला मिळाली नसती. जो आपल्या देशाच्या गरजा पुरवूं शकत नाहीं, तो दुसऱ्याच्या देशाचा व्यापार काय काबीज करणार ?

व्यापारविषयक तटबंदी अशाप्रकारें करून हा कायदा स्वस्थ बसला नाहीं. रिझर्व्ह बँकेसारखी बँक काढून नाणीं, चलनें, हुंडणावळी वगैरेंची सत्ता तिच्या हातीं दिली आहे. ह्या बँकेवर ग. जनरलची सत्ता चालणार आहे. तेव्हां नाण्याच्या, बँकेच्या, भांडवलाच्या, बाबतींत हिंदुस्थानच्या प्रगतीला विरोधक होईल अशी तजवीज आगाऊच करण्यांत आली आहे. बँकेचा ताबा हिंदी मंत्रिमंडळाकडे दिला असतां तर आज जी हातचलाखी केली जाते ती थांबली असती.

रेल्वेच्या व जहाजांच्या बाबतींतहि असेच बंधारे घातले आहेत. रेल्वेकरतां एक स्वतंत्र बोर्ड तयार करून त्यावर ग. जनरलनें नेमलेल्या लोकांची सत्ता प्रस्थापित केली आहे. हिंदी उद्योगधंद्यांना पोषक असे वहातुकीचे दर हें बोर्ड कधीं ठरवील काय ? नौकानयनाच्या बाबतींत तर बोलण्याचीच सोय नाहीं. आम्ही इंग्लिश जहाजांबरोबर स्पर्धा करूं शकणार नाहीं व तो व्यापार आपल्या ताब्यांत घेऊं शकणार नाहीं अशी ती योजना आहे.

हिंदुस्थानच्या ताब्यांतून ब्रह्मदेश व एडन हे दोन विभाग काढून घेतल्यामुळें हिंदुस्थानचें क्षेत्रफळ संकुचित झालें आहे. त्यांपैकीं, ब्रह्मदेश निराळा झाल्यामुळें तर हिंदुस्थानचें उत्पन्न कमी होऊन खर्चांत मात्र वाढ झाली आहे. हें उत्पन्न १३८ लाखांनीं कमी झालें असून खर्च ९२ लाखांनीं वाढला आहे.* ब्रह्मदेश गेल्यामुळें एकूण नुकसान ५५६ लाख झालें आहे. एडनची वाढ करण्याकरतां पैसा हिंदुस्थानचा गेला आणि ताबा मात्र बादशहांनीं घेतला. अशा प्रकारें पैशाच्या दृष्टीनें ही राजकीय विभागणी हिंदुस्थानला मारकच झाली.

राजकीय दृष्टि सोडून निव्वळ आर्थिक दृष्टीनें प्रांताच्या व संयुक्त घटनेच्या अंदाजपत्रकांचा विचार केला तर कोणत्याहि सत्तेचा कारभार सुखानें चालेल अशी शक्यता दिसत नाहीं. १९३७ सालीं जेव्हां प्रांतांतील फडणिसांची परिषद झाली, तेव्हां त्यांनीं आपल्याला उज्ज्वल भवितव्य नाहीं असा निष्कर्ष काढला. फेडरेशनचा असो किंवा प्रांताचा असो रडतखडत कारभार चालला

*बजेटवरील अर्थमंत्र्याचें भाषण १९३७-१९३८.

आणि जमाखर्चाची कशीबशी तोंडमिळवणी झाली तरी त्यामुळें हिंदुस्थानचा उत्कर्ष होणार आहे असें थोडेंच आहे? आजच प्रांतोप्रांतीं पैशाची कशी ओढाताण चालली आहे हें पहाण्यासारखें आहे. एकीकडे जमीनमहसूल कमी करा म्हणून गरीब शेतकरी ओरडत आहेत, दुसरीकडे मद्यपान बंद करा म्हणून निकड लागली आहे, तिसरीकडे प्राथमिक शिक्षण मोफत व सक्तीचें करा म्हणून आक्रोश चालला आहे. ह्या सर्व मागण्या पुऱ्या कशा पाडणार? सनदी नोकरांचे पगार कमी करतां येत नाहींत अशी आणखी प्रांतावर सक्ति आहे. अशा स्थितींत राष्ट्राची वाढ होणें शक्य नाहीं. ऑटो नेमियरसारखा अर्थपंडित आणला म्हणून तो मातीचें सोनें थोडेंच करूं शकणार? तेव्हां मर्यादित पैशांत मोठीं कामें करण्याची शक्यता नसल्यामुळें प्रांत काय किंवा संयुक्त सरकार काय जमेवर व खर्चावर पूर्ण ताबा आल्याशिवाय आणि कर वाढविणें, उत्पन्न वाढविणें व खर्च कमी करणें या बाबतींत पूर्णपणें स्वतंत्र झाल्याशिवाय ही राज्यघटना चालवूं शकणार नाहींत. ग. जनरलच्या पगारापासून तों गांवांतील पाटीलतलाठ्यांच्या पगारापर्यंत, सर्वांच्या पगारावर कायदेमंडळाचा ताबा असणें व उत्पन्नांतील व खर्चांतील पै न पै वर कायदेमंडळाचा अधिकार सुरू होणें अवश्य आहे. हा अधिकार जोंवर येत नाहीं तोंवर फेडरेशन हें असेंच निरुपयोगी, कुचकामी व त्याज्य ठरणार आहे.

---

## १८

# रेल्वेचा कारभार

१९१९ च्या कायद्याप्रमाणें रेल्वेचा कारभार एका रेल्वेबोर्डामार्फत चालत असे. त्या बोर्डाचें नियंत्रण व्यापार व उद्योगधंद्याचा जो सभासद असे, त्याच्याकडे होतें. पण नवा कायदा जन्मास येतांना हा कारभार अशा एखाद्या सभासदाकडे न ठेवतां, एका स्वतंत्र बोर्डाकडे देण्यांत आला आहे. इंग्लंडमधील भांडवलवाल्यांचे पैसे रेल्वेमध्यें गुंतले असल्यामुळें त्यांना विश्वास वाटेल अशी योजना करणें पार्लमेंटला आवश्यक होतें. हिंदुस्थानांतील अधिकारारूढ राजकीय पक्षाच्या हातांत रेल्वेचीं सूत्रें दिलीं तर ते हें भांडवल बुडवून टाकतील अशी भीति या भागीदारांना वाटली असल्यास न कळे. तसेंच हिंदी मंत्र्याच्या हातांत रेल्वे दिली तर तो रेल्वेच्या कामगारवर्गावर आपले वर्चस्व ठेवून त्यांच्याकडून राजकीय आंदोलनें करवील अशीहि भीति कायदा करणारांना वाटली असावी. कायदेभंगाची चळवळ सुरू झाली आणि रेल्वेचा नोकरचाकरवर्ग हा संघटित झाला व त्यानें अशा वेळी जर संप केले तर व्यापार, उतारू, सैन्य, पोलिस, कागदपत्र या सर्वांना जागच्या जागीं स्थगित होऊन पडावें लागेल अशीहि भीति ब्रिटिश सरकारला वाटल्यावांचून राहिली नसावी. तिसरें कारण, हिंदुस्थानच्या बाहेर कोठें युद्ध झालें व या युद्धाकरतां सैन्याच्या हालचाली करण्याचा प्रसंग जादा कायदा करून उद्भवला तर हिंदी

मंत्र्यांचें रेल्वेनियंत्रण हें अडथळा आणणारें होईल हीहि शंका कायदा करणारांना आल्याशिवाय राहिली नसावी. या तीन कारणांशिवाय व्यापारविषयक चवथें कारण या योजनेच्या मुळाशीं नसेल असें वाटत नाहीं. हिंदी मालाला किती सवलती द्यावयाच्या व इंग्लिश मालाला किती सवलती द्यावयाच्या हें जरी कायद्यानें ठरविलें असलें तरी प्रत्यक्ष व्यवहारांत ज्या कारवाया होतात, त्या कायद्याच्या क्षेत्राबाहेर अकल्पनीय अशा होत असतात. ती सत्ता हिंदी मंत्र्याच्या हातांत देऊन इंग्लिश व्यापाऱ्यांचें भागणार नव्हतें. म्हणून नवा कायदा पास होण्यापूर्वी रिझर्व्ह बँकेच्या स्थापनेची जशी एक अट घालण्यांत आली तशी रेल्वे बोर्डाच्या स्थापनेची अट घालण्यांत आली.

राजकारणाच्या चंचलतेची हवा रेल्वेला लागूं नये म्हणून ही स्वतंत्र व्यवस्था करण्यांत येत आहे असें स्पष्ट सांगण्यांत आलें. हें खातें मंत्र्याच्या ताब्यांत नामतः आहे हें खरें आहे. त्याला रेल्वेविषयक धोरण ठरविण्याचाहि कांहीं अधिकार दिला आहे हेंही खरें आहे. पण आर्थिक खात्याची सत्ता ज्याप्रमाणें हिंदी मंत्र्याच्या हातांत जाणार आहे, तशीच ही सत्ता आहे.

१९३३ सालीं सेक्रेटरी ऑफ स्टेटनें रेल्वे कारभाराच्या चौकशीकरतां एक कमिटी नेमली, तिच्या बैठका विलायतेंत झाल्या व त्या कमिटीच्या सूचना कायद्यानें बव्हंशीं मान्य केल्या. रेल्वेच्या कार्यकारी सत्तेचे अधिकार हे ग. जनरलला देण्यांत आले आहेत व त्यानें कायद्यामध्यें ज्या तरतूदी केल्या असतील त्याच्या अनुषंगानें हे अधिकार वहिवाटावयाचे आहेत.

ही जी रेल्वेची कार्यकारी सत्ता निर्माण केली आहे तिनें रेल्वे

बांधणें, रेल्वेचें नियंत्रण करणें, रेल्वेचा कारभार आहे तसाच सुरक्षित ठेवणें व चालविणें हीं कामें करावयाचीं आहेत.

संयुक्तसरकारनें उतारूंची व रेल्वेनोकरांची जा ये सुरक्षितपणें होण्याकरतां व अपघात झाल्यास त्याची चौकशी करण्याकरतां जी काय तजवीज त्रयस्थपणें करतां येईल ती करावयाची आहे. आमच्या समजुतीप्रमाणें हीं कामें एखादा रेल्वेचा इन्स्पेक्टरसुद्धां करूं शकेल. संयुक्तसरकारकडे हें देखरेखीचें काम देऊन त्यांना गौरविलें नसून त्यांना अवमानित केलें आहे.

ही जी रेल्वे ऑथॉरिटी कायद्याप्रमाणें स्थापन व्हावी असें म्हटलें आहे, तींत ७ सभासद असतील. हे सातहि सभासद ग. जनरलनें नेमावयाचे आहेत. या सात सभासदांपैकीं, तीनांपेक्षां कमी ग. जनरलनें आपल्या विवेचक बुद्धीनें नेमावयाचे नाहींत. यावरून बाकीचे चार त्यानें वैयक्तिक निर्णयानें नेमावयाचे आहेत असें सिद्ध होतें. म्हणजे ३ सभासदांची नेमणूक करतांना त्यांनीं मंत्र्यांचा सल्ला घेण्याची जरूरी नाहीं पण बाकीचे चार नेमतांना त्यांनीं मंत्र्यांचा सल्ला घ्यावा व तो पटला तर ते सभासद नेमावेत नाहींतर आपल्या मर्जीप्रमाणें नेमणुका कराव्यात. हे सभासद व्यापार, शेतकी, धंदा, राज्यकारभार, अर्थव्यवहार यांत अनुभवी असावेत. त्यांच्या नेमणुकीपूर्वीं ते बारा महिने कोणत्याहि कायदेमंडळाचे सभासद नसावेत. तसेंच ते सरकारी किंवा रेल्वेचे अधिकारी नसावेत. कायदेमंडळाचे सभासद घेण्याला बंदी करून रेल्वेचा कारभार राजकारणापासून अलिप्त ठेवण्याचा आपला निश्चय तडीस नेण्याचा हा प्रयत्न आहे.

या पहिल्या सातांपैकीं, तिघांची नेमणूक फक्त तीन वर्षांकरितां

केली आहे व बाकीच्यांची पांच वर्षांकरतां केली गेली आहे. त्यांना नालायकीमुळें काढून टाकण्याची सत्ता ग. जनरलच्या वैयक्तिक निर्णयावर सोंपविली आहे. या सभासदांना पगार व भत्ता काय द्यावयाचा हें मंत्र्याच्या सल्ल्यानें (तो पटल्यास) ग. जनरलनें ठरवावयाचें आहे. या मंडळापुढें आलेल्या प्रश्नांचा निर्णय बहुमतानें व्हावा हें ठीक आहे. पण या बोर्डाचा अध्यक्ष ग. जनरलनें विवेचक बुद्धीनें नेमावयाचा असल्यामुळें व त्याला सारखीं मतें पडल्यास दोन मतांचा अधिकार दिला असल्यामुळें ही घटना किती सावधगिरीची आहे हें लक्षांत येतें. कायदेमंडळाच्या अध्यक्षाला अशीं दोन मतें नसतात. या बोर्डाच्या सभासदांना रेल्वेचीं कॉंट्रॅक्टस् घेण्याला प्रतिबंध केला नाहीं. मात्र त्यानें आपण अमुक एक कॉंट्रॅक्ट घेतलें आहे असें सांगावें व त्यासंबंधीं प्रश्न निघाला तर स्वस्थ बसावें! या परवानगीमुळें चांगलेच घोटाळे व वशिलेबाजी माजेल. आपल्या नातेवाइकांना रेल्वेची कॉंट्रॅक्टस् देण्याची यामुळें उत्तम सोय होईल.

या रेल्वे ऑथॉरिटीच्या कार्यकारी मंडळाचा मुख्य एक चीफ् कमिशनर म्हणून असेल. त्याची नेमणूक ग. जनरलनें या रेल्वे नियामक मंडळाच्या सल्ल्यानें वैयक्तिक निर्णयानें करावयाची आहे. या चीफ् कमिशनरच्या मदतीला एक फिनॅन्स कमिशनर ग. जनरलनें नेमावयाचा आहे. याशिवाय आणखी मदतनीस हवे असतील तर ते चीफ् कमिशनरच्या सल्ल्यानें रेल्वे ऑथॉरिटीनें नेमावयाचे आहेत. हे दोन्ही अधिकारी रेल्वे ऑथॉरिटीच्या सभेला हजर राहूं शकतात. रेल्वे ऑथॉरिटीवर प्राप्तिकर किंवा सुपरटॅक्स बसवितां

येत नाहीं. या ॲथॉरिटीनें पैसे ठेवणें, काढणें, हुंडणावळ, वगैरे व्यवहार रिझर्व्ह बँकेमार्फत करावयाचे आहेत.

रेल्वे ऑथॉरिटीच्या नेमणुकीबद्दल, लायकीबद्दल, नोकरनाम्याबद्दल, कार्यकारी नोकरवर्गाबद्दल, प्राप्तिवरील कराबद्दल ज्या योजना आठव्या शेड्यूलमध्यें ( ज्याचा सारांश वर दिला आहे ) केल्या आहेत, त्यांत संयुक्त कायदेमंडळाला दुरुस्ती करतां येईल किंवा त्याला जोड देतां येईल. मात्र असें बिल आणण्यापूर्वी ग. जनरलची आगाऊ परवानगी लागेल. ही परवानगी ग. जनरलनें विवेचक बुद्धीनें द्यावयाची आहे.

संयुक्त सरकारला जर मूलग्राही बदल करावयाचे असतील अगर या बोर्डाच्या आधारभूत कल्पनेला धक्का द्यावयाचा असेल तर तो देतां येणार नाहीं असें ग. जनरलच्या हातांत ठेवलेल्या सत्तेवरून निष्पन्न होतें.

या रेल्वे ऑथॉरिटीनें शेतकी, उद्योगधंदे, उतारूंच्या सोई वगैरे गोष्टी धंदेवाइकपणें कराव्या आणि आपल्या उत्पन्नांत खर्च भागविण्याची तत्परता ठेवावी. यासंबंधींच्या धोरणाचे जे प्रश्न असतील, त्या प्रश्नाबाबद संयुक्त सरकारच्या मार्गदर्शकत्वाप्रमाणें त्यांना चालावें लागेल. पण कोणती बाब या धोरण ठरविण्याच्या कक्षेंत येते व कोणती येत नाहीं याबद्दल वाद उत्पन्न झाल्यास अखेरचा निर्णय देण्याची सत्ता ग. जनरलला दिलेली आहे.

ही रेल्वे ऑथॉरिटी जी निर्माण केली आहे तिला मंत्रिमंडळाइतका दर्जा देऊन एक नवेंच छोटें राज्य मोठया राज्यांत उत्पन्न केलें आहे. ग. जनरलवर ज्या खास जबाबदाऱ्या टाकल्या आहेत, त्या पार पाडतांना तो ज्याप्रमाणें आपल्या विवेचक बुद्धीचा आणि

वैयक्तिक निर्णयाचा उपयोग करतो आणि मंत्रिमंडळाच्या कारभाराचें नियंत्रण करतो त्याप्रमाणेंच रेल्वे ऑथॉरिटीच्या बाबतींत त्यानें करावयाचें आहे. रेल्वे ऑथॉरिटी म्हणजे एक सात जणांचें मंत्रिमंडळ आहे असें समजून त्यांच्या कारभारांत कधीं विवेचक बुद्धीनें तर कधीं वैयक्तिक निर्णयानें त्याला ढवळाढवळ करतां येईल. इतर कारभारांत ज्याप्रमाणें अंमलबजावणी ही ग. जनरलवर सोंपविली असते, तशीच रेल्वेच्या बाबतींतहि ती त्याच्यावर सोंपवली आहे. आणि त्या कारभारांत मंत्रिमंडळाचीं जीं कामें असतात, तशींच कामें रेल्वे कारभारांत रेल्वे ऑथॉरिटीचीं आहेत. ही भूमिका लक्षांत घेऊन ग. जनरल ज्या ज्या वेळीं आपल्यावरील खास जबाबदारीच्या अंमलबजावणीचा प्रश्न येईल (दंगा, धोपा, बंड वगैरे) त्या त्या वेळीं या रेल्वे ऑथॉरिटीला अमुक प्रकारें तुम्हीं वागलें पाहिजे अशी आज्ञा करूं शकेल. वैयक्तिक निर्णयाचे वेळीं ज्या प्रमाणें ग. जनरल मंत्रिमंडळाचा सल्ला घेतो, त्याप्रमाणें त्यानें रेल्वे ऑथॉरिटीचा सल्ला घ्यावयाचा आहे.

या रेल्वे ऑथॉरिटीला रेल्वेची जमीन विकावयाची असेल अगर रेल्वेकरतां विकत घ्यावयाची असेल, तेव्हां संयुक्त सरकार कायदे करून ती जमीन रेल्वेला तिच्या खर्चानें मिळवून देईल. या रेल्वे ऑथॉरिटीनें कांहीं कॉंट्रॅक्टस् वगैरे घेतलीं तर त्याबद्दल फिर्यादी लावावयाच्या अगर लागावयाच्या असतील तर त्या ऑथॉरिटीच्या नांवानें लागतील अगर लावल्या जातील.संयुक्त सरकारचा त्याच्याशीं संबंध नाहीं.संस्थानांतील रेल्वेच्या किंवा खासगी रेल्वेच्या मालकाबरोबर कामापुरते करारमदार त्या त्या संस्थाशीं अगर व्यक्तींशीं रेल्वे-ऑथॉरिटी करूं शकेल. या रेल्वे ऑथॉरिटीनें रेल्वेफंड नांवाचा एक फंड काढावयाचा

आहे. या फंडांत त्यांना रेल्वेपासून अगर संयुक्त सरकारकडून मिळालेला पैसा जमा व्हावयाचा आहे. त्याच फंडांतील पैशांतून खर्चहि करावयाचा आहे. ह्या खर्चाच्या बाबी खालीं दिल्या आहेत. आहे.

(१) कामांचा खर्च भागविणें.

(२) रेल्वेसंबंधींचे करार किंवा कॉंट्रॅक्टस्चे पैसे देणें.

(३) पेन्शन व प्रॉव्हिडंट फंडाचे पैसे देणें.

(४) फेडरेशनच्या जमेंत पेन्शन किंवा प्रॉव्हिडंट फंडाकरतां रेल्वेवर जो खर्च टाकला असेल तो देणें.

(५) एखादी व्यवस्था टिकविणें, एखादें काम पुनः सुरू करणें व सुधारणा किंवा झीज यांकरतां योग्य तरतूद करणें.

(६) फेडरेशनच्या जमेंत रेल्वेवर व्याजाचा जो बोजा टाकला असेल तो भागविणें.

(७) फेडरेशनच्या खर्चाकरतां रेल्वेला जी त्या वर्षी अवश्यमेव द्यावी लागेल ती रक्कम देणें.

वरील सर्व खर्च भागून जी शिल्लक उरेल ती फेडरेशन व रेल्वे ऑथॉरिटी यांच्यामध्यें, जी काय योजना ठरेल, त्याप्रमाणें वांटून द्यावयाची आहे. पण अशी योजना तयार होईपर्यंत पूर्वी (१९२४ च्या ठरावाप्रमाणें) जशी वांटणी होत असे तशीच करावयाची आहे. उलट रेल्वेला जर खर्चाकरतां किंवा भांडवलाकरतां कांहीं पैसे लागले तर ते फेडरेशननें द्यावयाचे आहेत व ते खर्चाच्या सदरांत घालावयाचे आहेत !

रेल्वेकरतां जें कर्ज काढलें असेल त्याचें व्याज या ऑथॉरिटीनें द्यावयाचें आहे. तसेंच या कर्जाची फेड ठरणाऱ्या योजनेप्रमाणें

करावयाची आहे. सेक्रेटरी ऑफ स्टेटनें रेल्वेकरतां जें कर्ज काढलें असेल तेंहि असेंच फेडावयाचें आहे. रेल्वेला आपल्या उत्पन्ना-व्यतिरिक्त इतर मार्गांनीं जर ही फेड करावयाची असेल तर ती करतां येईल. फेडरेशनवर किंवा सेक्रेटरी ऑफ स्टेटवर रेल्वेसंबंधीं फिर्यादी लागल्या असतील तर त्यांची रक्कम, नुकसान, खर्च वगैरे रेल्वेनें द्यावयाचा आहे. ज्या प्रांताकडून किंवा संस्थानाकडून रेल्वेच्या रक्षणाकरतां पोलिस घेतले असतील त्या पोलिसांचा खर्च त्या त्या प्रांतांना व संस्थानांना द्यावयाचा आहे.

रेल्वेच्या प्रॉव्हिडंट फंडापैकीं, घसाऱ्यापैकीं, किंवा रिझर्व्ह फंडापैकीं, जी रक्कम मध्यवर्ती सरकारकडे असेल ती रेल्वेला दुसरी-कडे गुंतवण्याकरतां मिळणार नाहीं. पण त्या त्या बाबींचे खर्च भागविण्याकरतां ती रक्कम मागतां येते. या शिलकेवर फेडरल सरकारनें व्याज द्यावें.

रेल्वेचे हिशेब ऑडिटर-जनरलनें तपासावयाचे आहेत. रेल्वेनें जे उतारूंचे किंवा सामानांचे दर आकारावयाचे आहेत, त्याबद्दल रेल्वे ऑथॉरिटीला सल्ला देण्याकरतां एक 'रेट कमिटी' ग. जनरलनें वेळोवेळीं नेमावयाची आहे. ह्या दराबद्दल जर एखादें बिल आणा-वयाचें असेल तर त्याला ग. जनरलची परवानगी घ्यावी लागेल. दोन रेल्वेकंपन्यांच्या दरांत फरक ठेवावयाचा नाहीं. संयुक्त सरकार व रेल्वे ऑथॉरिटी यांच्यांत दराबद्दल जर भिन्न मत झालें तर त्याचा निर्णय ' रेल्वे ट्रिब्यूनलनें ' करावयाचा आहे. या पंचांकडे रेल्वे-संबंधीं संयुक्त सरकार व रेल्वे यांच्यामध्यें जास्तींतजास्त व कमींत कमी दर ठरविण्याबद्दल, नव्या रेल्वे बांधण्याबद्दल वगैरे ज्या तक्रारी उद्भवतील त्यांचा निर्णय सोपविला जाईल.

ग. जनरल हा रेल्वे ऑथॉरिटी व फेडरेशनमध्यें येणाऱ्या संस्थानांना अमुक एक रेल्वे बांधावयाची आहे, अगर रेल्वे रस्ता बदलावयाचा आहे किंवा रेल्वे रुळाचे मापांत फेर करावयाचा आहे अशाबद्दल जरूर त्या नोटिसा देण्यास फर्मावील. त्याविरुद्ध संस्थानें किंवा ऑथॉरिटी तक्रारी करूं शकतील. या तक्रारी जर ठराविक मुदतींत त्यांनीं काढून घेतल्या नाहींत तर ग. जनरल रेल्वे ट्रिब्यूनलकडे जाईल व त्यांच्या म्हणण्याप्रमाणें वागेल. पण हा नियम संरक्षणाकरतां असणाऱ्या रेल्वेच्या बाबत लागूं नाहीं. तेथें ग. जनरलची सत्ता हीच अखेरची समजली जाईल.

या रेल्वे-ट्रिब्युनलमध्यें एक अध्यक्ष व दोन सभासद असतील. ग. जनरल प्रथम एक आठ तज्ञांचें मंडळ नेमील. या आठ जणांतून तो हे दोन सभासद प्रत्येक केसचा निर्णय देण्याकरतां नेमील. या मंडळाचा अध्यक्ष हा फेडरल कोर्टाच्या न्यायाधिशांपैकीं एक असेल व त्याची नेमणूक हिंदुस्थानच्या मुख्य न्यायाधिशाला विचारून ग. जनरल करील. हा अध्यक्ष पांच वर्षें नोकरीवर राहील. पण जर फेडरल कोर्टावरील त्याची जागा गेली तर त्याचें अध्यक्ष-पदहि जाईल. रेल्वेसंबंधींच्या तक्रारींचा निर्णय देण्याची या मंड-ळाला सत्ता आहे. त्यांचे निर्णय निरनिराळ्या अधिकाऱ्यांनीं अंमलांत आणावयाचे आहेत. त्यांच्या निर्णयांतील एखाद्या कायद्याच्या मुद्या-वरच फेडरल कोर्टाकडे अपिल करतां येतें. अध्यक्षाशिवाय बाकींच्या सभासदांचे पगार ग. जनरल ठरवील व त्यांचा खर्च फेडरेशनवर लादला जाईल. ह्या मंडळाकडे जे पैसे येतील ते फेडरेशनच्या तिजोरींत जमा होतील.

अशा प्रकारें रेल्वेच्या व्यवस्थेची योजना केली आहे. ही

योजना किती गुंतागुंतीची व आक्षेपार्ह आहे हें थोडासा विचार केला तरी लक्षांत येतें. रेल्वे ऑथॉरिटी, रेल्वे ट्रिब्युनल अशीं निरनिराळीं मंडळें कायद्यानें निर्माण केलीं आहेतच. त्यांशिवाय फेडरेशनची सत्ताहि मधूनमधून रेल्वेवर चालणार आहे. एका राज्यांत दुसरें राज्य निर्माण करावें, त्याप्रमाणें हें रेल्वेराज्य तयार केलें आहे. इतकेंहि करून शेवटीं रेल्वेपासून फायदा नाहीं व पुष्कळ वर्षे होणार नाहीं असें ऑटोनेमियरनें मत दिलेंच आहे. फेडरेशनपूर्वी रेल्वेला मध्यवर्ती सरकारचें जें कर्ज होतें तें माफ करण्यांत आलें आहे. पण अद्यापपर्यंत ९४० (१९३७-३८) कोटींचें कर्ज रेल्वेच्या बाबतींत आहे. यापैकीं इंग्लंडांतील कर्ज १८० व हिंदुस्थानांतील ७६० कोटी रुपये आहे. या ९४० कोटींपैकीं,घसारा फंडांत ६६५ कोटी व भांडवल म्हणून २७५ कोटी आहेत. असा आंतबट्ट्याचा कारभार ज्या सरकारनें चालविला त्या सरकारच्या हातांत यापुढें रेल्वेकारभार ठेवणें हें खास सुरक्षितपणाचें नाहीं. कोणत्याहि राजकीय पक्षाच्या हातांत रेल्वेचा कारभार ठेवूं नये ह्या मुद्यावर बऱ्याच जणांनीं भर दिलेला आहे. पण सैन्याचा कारभार जर स्वतंत्र देशांत राजकीय पक्षाच्या हातांत ठेवला जातो, तर रेल्वे कारभाराचीच भीति त्यांना कां वाटावी ? अमेरिकेंत राजकीय पक्षाच्या हातांत रेल्वे ठेवल्यानें लाचलुचपत, वशिलेबाजी, कारस्थानें वगैरेंना ऊत आला व सर्व कारभार बदलावा लागला असें म्हणतात. ब्रिटिश वसाहतींत पक्षोपपक्षाच्या भांडणांत रेल्वेचें कंबरडें मोडलें असाहि अनुभव सांगितला जातो. कानडामध्यें रेल्वे राजकारणी लोकांच्या हातांत दिल्यानें राष्ट्राच्या संपत्तीवर दुष्परिणाम झाले. आस्ट्रेलियांत हाच अनुभव आला. पैशाची उधळवाणकी

झाली व रेल्वेंत व्यवस्था राहीना. व्हिक्टोरिया, न्यू साउथ वेल्स, क्वीन्सलँड वगैरे देशांत निराळा अनुभव आला नाहीं. दक्षिण आफ्रिकेनेंहि रेल्वे कारभाराकरतां स्वयंशासित मंडळ निर्माण केलें आहे.

हिंदुस्थानच्या रेल्वेचा प्रश्न सोडवितांना ह्या सर्व देशांचा अनुभव लक्षांत घेतलेला दिसतो. स्वतंत्र अगर स्वयंशासित देशांत जो नियम प्रामुख्यानें लागूं केला जातो, तो परतंत्र देशांत तर सर्वस्व होऊन बसतो. कांहीं स्वतंत्र देशांत रेल्वेकारभार हा पक्षांच्या ताब्यांत सर्वस्वी नसला तरी त्या कारभारावर सत्ता नियंत्रण वगैरे राजकीय पक्षाशिवाय दुसरें कोणाचें असणार ? हिंदुस्थानांतसुद्धां रेल्वेच्या कारभाराकरतां अलग व्यवस्था केली तरी हरकत नाहीं. पण या सर्व व्यवस्थेवर गव्हर्नर जनरलची सत्ता चालण्याऐवजीं मंत्रिमंडळाची सत्ता चालली पाहिजे. ग. जनरल हा जरी हिंदुस्थानांतील कोणत्याहि राजकीय पक्षाचा नसला तरी त्याला विशिष्ट लोकांचे हितसंबंध अबाधित ठेवण्याची दृष्टि असतेच. या दृष्टीनें तो आजपर्यंत वागत असल्यामुळें ज्या रेल्वेच्या उत्पन्नांतून कोट्यवधि रुपये शिल्लक उरावयाचे ते न उरतां एखाद्या दुबळ्याप्रमाणें रेल्वेंतून फायदा होत नाहीं अगर लवकर होणार नाहीं असें सांगितलें जात आहे. हिंदुस्थानला आत्मसंरक्षणाकरतां, व्यापाराच्या उत्कर्षाकरतां, आपल्या खर्चाच्या तरतूदीकरतां, रेल्वे-वर संपूर्ण नियंत्रण मिळालें पाहिजे. हिंदुस्थानांत लोकमत जागृत झालें आहे. राजकीय पक्षांना दारिद्र्याच्या रोगांतून मुक्त व्हावयाचें आहे. अशा वेळीं हिंदुस्थानला अशी पूर्ण खात्री वाटते कीं, आपण चोख रीतीनें कारभार चालवून रेल्वेंतून नफा काढूं शकूं. ज्या

अन्य देशांत रेल्वेच्या कारभारांत लांचलुचपत किंवा वशिलेबाजीनें धुमाकूळ घातला म्हणतात तेथें स्वार्थी व अनैतिक प्रवृत्तींचा बुजबुजाट झाला असला पाहिंजे. पण इतर देशांत कांहींहि झालें असलें तरी आम्ही ग. जनरलच्या चमच्यानें किती दिवस अन्न खाणार ? ग. जनरल आज आहे, कदाचित् उद्यां रहाणार नाहीं. तेव्हां ह्या कारभारावरील नियंत्रण हें सर्वस्वी लोक-प्रतिनिधींकडे आलेंच पाहिजे.

# १९

# न्यायदान

फेडरेशनची संस्थापना करावयाची असें ठरविल्यानंतर, न्याय-कोर्टाची संस्थापना ही क्रमप्राप्तच होऊन बसते. संयुक्तघटनेंत जे निरनिराळे घटक असतात, त्यांच्यांतील हक्क, अधिकार, घटनेचा अर्थ वगैरे संबंधींचीं भांडणें मिटविण्यास एक स्वतंत्र मंडळ असावयासच पाहिजे. कधीं कधीं मध्यवर्ती सत्ता व प्रांत यांच्यांत वाद उत्पन्न होतील, कधीं संयुक्तघटनेंत येणारीं संस्थानें व प्रांत अगर मध्यवर्ती सत्ता यांच्यांत भांडणें लागतील. अशा प्रसंगीं ज्याची न्यायबुद्धि शुद्ध निरपवाद, पक्षभेदातीत व तल्लख आहे अशांचा निर्णय देणें अवश्य असते. ही न्याय देणारी संस्था सरकारच्या किंवा कायदेमंडळाच्या कक्षेंत येणारी असतां कामा नये. अशा प्रकारचें फेडरलकोर्ट हें घटनेच्या विवरणाकरतां व संरक्षणाकरतां अस्तित्वांत यावेंच लागतें.

सगळ्या ब्रिटिश हिंदुस्थानची दाद लागेल असें मध्यवर्ती न्याय-मंदिर हिंदुस्थानांत नाहीं. प्रत्येक प्रांतांत हायकोर्टें आहेत. त्यांच्या विरुद्ध दाद मागावयाची असेल तर इंग्लंडमध्यें प्रिव्हि कौन्सिलकडे धाव घ्यावी लागते.हिंदी प्रतिनिधींनीं फेडरेशनच्या निमित्तानें हाय-कोर्टाविरुद्ध अपीलें हिंदुस्थानांतच चालावीं अशाबद्दल खटपट केली. प्रथम पार्लमेंटनें ही विनंती झुगारून दिली. पण शेवटीं फेडरे-शननें जर कायदा केला तर हायकोर्टाच्या विरुद्ध अपीलें ऐकण्याचा त्यांचा अधिकार मान्य केला जाईल असें ठरलें. अशा प्रकारें

फेडरेल कोर्टाचें काम तीन प्रकारचें आहे. ( १ ) फेडरल प्रश्नासंबंधी जे दावे येतील ते ऐकणें ( २ ) या दाव्यांवर जर अपील केलें तर तेंहि ऐकणें ( ३ ) हायकोर्टाविरुद्ध त्यांच्याकडे अपील आलें तर त्याचा परामर्ष घेणें. मात्र तिसऱ्या प्रकारचा अधिकार ह्या त्यांना फेडरेशननें तसा कायदा केला तरच प्राप्त होणार आहे.

फेडरल कोर्ट हें एका दृष्टीनें कायदेमंडळापेक्षांहि श्रेष्ठ आहे. कारण ग. जनरल पेचप्रसंग निर्माण झाला तर घटना तहकूब करून आपल्या हातीं सर्व सत्ता घेऊं शकतो; पण त्याला फेडरल कोर्टाचे अधिकार स्वतःकडे घेतां येत नाहींत.

फेडरल कोर्टाच्या आवश्यकतेबद्दल हिंदुस्थानांतहि दुमत नाहीं. हिंदुस्थान स्वतंत्र झाल्यावरहि त्याला अशा कोर्टाची जरूरी लागणार आहे.

या फेडरल कोर्टाकडे जीं कामें येणार तीं घटना कायद्याच्या अर्थाबद्दल येणार. संस्थानासंस्थानांतील (फेडरेशनमध्यें आलेल्या) प्रांताप्रांतांतील, किंवा संस्थानविरुद्ध प्रांत किंवा मध्यवर्ती सत्ता यांच्यांतील घटनेच्या अर्थासंबंधीचीं भांडणें हें कोर्ट मिटवणार आहे. संस्थानिक आपल्या मान्यतापत्रकांमध्यें जेवढ्या बाबींपुरते आपण संयुक्तघटनेंत समाविष्ट होतो म्हणतील, तेवढ्यापुरतीच चौकशी करण्याचा अधिकार या फेडरल कोर्टाला असणार.

या फेडरल कोर्टानें अपीलांत एखादा निर्णय दिला तर त्यावर दाद मागण्याचा अधिकार आहे किंवा नाहीं, असल्यास कोणीकडे असाहि प्रश्न गोलमेज परिषदेंत निघाला. फेडरल कोर्टाच्या निर्णयावर प्रिव्हि कौन्सिलकडे अपील करण्याचा अधिकार ठेवला आहे पण त्याला बादशहाची परवानगी मिळाली पाहिजे. ग. जनरल

किंवा संस्थानिक आपापल्या क्षेत्रांतील न्यायनिवाडयांबद्दल प्रिव्हि कौन्सिलकडे अपील करूं शकतात.

हिंदुस्थानांत वरिष्ठ कोर्ट असावें कां नाहीं याबद्दल दोन वर्षे भांडणें चाललीं होतीं. ब्रिटिश हिंदी प्रतिनिधी म्हणत कीं, फेडरल कोर्टाला हायकोर्टाविरुद्ध आलेलीं अपीलें ऐकण्याचा अधिकार असावा. त्यांचें म्हणणें फेडरल कोर्टाच्या दोन तुकडया कराव्या. एक तुकडी फक्त फेडरेशनसंबंधीं दावे ऐकण्याकरतां व दुसरी हायकोर्टासंबंधीं दावे ऐकण्याकरतां असावी. संस्थानिक म्हणूं लागले,अशा दोन तुकडया नसाव्या. वरिष्ठ कोर्ट हें फेडरल कोर्टा-पासून अगदीं अलग ठेवावें. पण संस्थानिकांत एकमत नव्हतें. ते म्हणत कीं, फेडरल कोर्ट हें संस्थानांसह सर्व हिंदुस्थानचे खटले ऐकण्याकरतां स्थापन झालें असतां, त्यांच्याकडेच एका विभागाचें म्हणजे प्रांताचें काम देणें हें गैर आहे. ब्रिटिश हिंदी प्रतिनिधींतहि असा एक वर्ग होता कीं, जो असल्या वरिष्ठ कोर्टाची आवश्यकता मान्य करीत नव्हता. सर नृपेंद्रसरकार म्हणाले नुसत्या फांशीच्या शिक्षेविरुद्ध अपीलें ऐकण्यासच वीसपंचवीस न्यायाधीश लागतील. त्याकरतां इतका खर्च करूं नये.प्रिव्हि कौन्सिल हें स्थानिक भानगडीं-पासून अलिप्त असल्यामुळें त्यांच्याकडे असलेलें हें काम एर्वीतेवीं निघत नाहींच मग वरिष्ठ कोर्टाची आणखी एक पायरी कशाला! कांहींजण म्हणाले, असें बुद्धिवान न्यायाधीश मिळणें शक्य नस-ल्यामुळें वरिष्ठ कोर्टाची यातायात करूं नये.हैद्राबादचे सर अकबर हैदरी हेहि वरिष्ठ कोर्टाच्या स्थापनेविरुद्ध होते. हिंदुस्थानसरकार तात्त्विक दृष्टया वरिष्ठ कोर्टाला विरोध करीत नव्हतें. त्यांचें म्हणणें इतक्यांत हें कोर्ट स्थापन करूं नये. हिंदुस्थानला जर असें कोर्ट

हवें असेल तर संयुक्तसरकार तसा कायदा पास करून तें स्थापूं शकेल.

पुढें व्हाइटपेपर प्रसिद्ध झाला. त्यांत त्यानें वरिष्ठ कोर्टाला मान्यता दिली. या कोर्टानें सिव्हिल खटले व फांशीची शिक्षा दिले-ल्यांचे फौजदारी खटले ऐकावेत व त्यांविरुद्ध फेडरल कोर्टाकडे पुनः अपील करूं नये अशी शिफारस केली. वरिष्ठ कोर्ट स्थापावयाचें असेल तर तें संयुक्त कायदेमंडळानें बिल आणून व त्याला ग. जनरलची आगाऊ संमति घेऊन स्थापावें, असेंहि त्यांत म्हटलें.

जॉइंट सिलेक्ट कमिटीनें व्हाइटपेपरची ही सूचना अमान्य केली. ती कमिटी म्हणाली, असें वरिष्ठ कोर्ट स्थापन झालें तर तें फेडरल कोर्टाच्या बरोबरीचें होईल; तें स्वतंत्र असेल. त्यांनीं अशा अपील कोर्टाला मान्यता मात्र दिली. सर्व हिंदुस्थानचीं अपीलें ऐकण्याची सत्ता फेडरल कोर्टालाच द्यावी. मात्र तशी सत्ता संयुक्त कायदेमंडळानें कायदा पास करून फेडरल कोर्टाला द्यावी म्हणजे झालें. या फेड-रल कोर्टाच्या दोन खोल्या असाव्यात. एका खोलींत प्रांताच्या हायकोर्टाच्या संबंधीचीं अपीलें ऐकावींत व दुसऱ्या खोलींत फेडरे-शनचे दावे किंवा अपीलें अथवा दोन्हीं ऐकावींत. एका खोलींतील न्यायाधीश वेळोवेळीं दुसऱ्या खोलींत बसले म्हणजे त्याला तुटक स्वरूप न येतां एकजिनसी स्वरूप येईल अशी त्यांनीं पुस्ती जोडली. या कोर्टांत फांशीचींसुद्धां फौजदारी अपीलें ऐकूं नयेत असें त्यांनीं सुचविलें. फांशीच्या शिक्षेंत दाद मागण्याचीं भरपूर ठिकाणें आहेत असें त्यांचें मत पडलें.

जॉइंट सिलेक्ट कमिटीच्या सूचना फार चांगल्या आहेत असें

म्हणून पार्लमेंटनें त्या मान्य केल्या व कायद्यांत अंतर्भूत केल्या. या फेडरल कोर्टाच्या घटनेसंबंधीचा सारांश खालीं दिला आहे.

हिंदुस्थानांतील एक मुख्य न्यायाधीश व सहा दुय्यम न्यायाधीश असें सात जणांचें फेडरल कोर्ट असेल. ही सहांची संख्या वाढवावी असें बादशहाकडे ग. जनरलमार्फत संयुक्त कायदेमंडळानें विनंतिपत्र पाठविलें तर ही संख्या वाढवितां येईल. सध्यां जें फेडरल कोर्ट स्थापन करण्यांत आलें आहे, त्यांत तीनच जज्जेस् आहेत. कमींतकमी तिघांच्या नेमणुकीशिवाय ह्या कोर्टाचें काम सुरू होत नाहीं.

फेडरल कोर्टाचे न्यायाधीश वयाच्या ६५ वर्षेपर्यंतच कामावर राहूं शकतात. त्याच्या अगोदर त्यांना राजीनामा देतां येतो किंवा शारीरिक अथवा मानसिक दृष्टया ते नालायक ठरले किंवा त्यांनीं दुर्वर्तन केलें तर प्रिव्हि कौन्सिलच्या शिफारसीनें त्यांना काढतां येतें.

ज्याला न्यायाधीश म्हणून नेमावयाचे तो पांच वर्षे हायकोर्टाचा किंवा संयुक्त सरकारांत येणाऱ्या संस्थानचा न्यायाधीश असला पाहिजे. किंवा तो इंग्लंडचा किंवा उत्तर आयर्लंडचा (अल्स्टरचा) १० वर्षे काम करीत असलेला बॅरिस्टर असला पाहिजे; किंवा तितक्याच मुदतीचा स्कॉटलंडचा ॲडव्होकेट असला पाहिजे; किंवा ब्रिटिश हायकोर्टाचा किंवा फेडरेशनमध्यें येणाऱ्या संस्थानचा १० वर्षे काम करीत असलेला वकील पाहिजे. त्यांनीं दोन कोर्टांत लागोपाठ १० वर्षे कामें केलीं असलीं तरी त्याला नेमतां येईल.

मुख्य न्यायाधीश म्हणून ज्याची नेमणूक करावयाची तो १० चे ऐवजीं १५ वर्षे काम करीत असलेला पाहिजे. तसेंच त्याची हायकोर्टजज्जाचे जागीं पहिली नेमणूक जेव्हां झाली

असेल तेव्हांच तो बॅरिस्टर, वकील किंवा ॲडव्होकेट असला पाहिजे. हायकोर्ट जज्जाची जागा आय्. सी. एस्. ला सुद्धां मिळते. पण फेडरल कोर्टांत आय्. सी. एस्. गृहस्थ जर बॅरिस्टर वगैरे नसेल तर त्याला ही जागा मिळत नाहीं. तसेंच त्याच्या पहिल्या नेमणुकीनंतर जर तो बॅरिस्टर वगैरे झाला असेल तरीहि तो नालायक ठरतो. एखादा गृहस्थ सात वर्षें वकिली करीत आहे, नंतर त्याला न्यायाधीश नेमले, तर ती सात वर्षांची वकिली व न्यायाधिशाच्या जागेवरील तीन वर्षें मिळून त्यानें दहा वर्षें वकिली केली असें धरण्यांत येईल.

या न्यायाधिशांचे पगार, भत्ता, रजा, पेन्शन वगैरे सर्व बादशहा आपल्या कौन्सिलच्या सल्ल्यानें ठरवतील. मुख्य न्यायाधिशाचा पगार बादशाही फर्मानानें महिना ७००० रु. ठरला आहे व इतर न्यायाधिशांचा पगार ५५०० रु. ठरला आहे.

न्यायाधिशाची जागा रिकामी झाली, किंवा तो रजेवर गेला तर त्या मुदतींत दुसरी नेमणूक होईपर्यंत ग. जनरल आपल्या विवेचक बुद्धीनें त्याच कोर्टांतील एखाद्या जज्जाला त्या जागीं नेमूं शकतो.

हें कोर्ट दिल्लीला बसेल. दुसऱ्या जागीं जर कोर्टाला बसावयाचें असेल तर मुख्य न्यायाधीश ग. जनरलच्या सल्ल्यानें ही जागा बदलूं शकतील. ज्या वेळीं कोर्ट कुठें असावें असा गोलमेज परिषदेंत प्रश्न निघाला तेव्हां कलकत्ता, डेहराडून, पाचमढी, अलाहाबाद अशीं नांवें सुचविण्यांत आलीं होतीं. पण शेवटीं दिल्ली निश्चित झाली. मात्र वर म्हटल्याप्रमाणें ही जागाहि बदलणें अशक्य नाहीं.

या कोर्टाचें काम काय आहे ह्याची शहानिशा कायद्यांत केली आहे. संयुक्तसरकार, प्रांत किंवा संस्थानें यांच्यापैकीं दोघां

जेव्हां कायद्याच्या प्रश्नाबद्दल किंवा एखाद्या घडलेल्या गोष्टीबद्दल वाद निर्माण होईल तेव्हां तो खटला साक्षीपुराव्यासह ऐकण्याचा ह्या कोर्टाला अधिकार आहे. ज्याला ओरिजिनल पॉवर्स म्हणतात त्या ह्या कोर्टाला आहेत. पण ज्या खटल्यांत एखादें संस्थान पक्षकार असेल त्या कोर्टाच्या अधिकाराची व्याप्ति खालील बाबींपुरतीच राहील.

(१) १९३५ च्या कायद्याचा अर्थ करणें (२) या कायद्यान्वयें काढलेल्या बादशाही फर्मानांचा अर्थ लावणें, किंवा (३) मान्यतापत्रकाप्रमाणें फेडरेशनला कायदा किंवा अंमलबजावणीच्या बाबतींत कोणत्या मर्यादेपर्यंत अधिकार आहेत हें ठरविणें. (४) सहाव्या भागांत जे करार केले आहेत, त्याप्रमाणें संस्थानांत संयुक्त कायदेमंडळाच्या कायद्याची कशी व्यवस्था करावी या संबंधीं उपस्थित झालेल्या प्रश्नांचा निर्णय करणें. (५) बादशहानें संस्थानिकांच्या बाबतींत कोणत्या गोष्टी कराव्या यासंबंधीं बादशहाच्या प्रतिनिधीच्या मान्यतेनें जे करार फेडरेशन स्थापन झाल्यावर केलेले असतील, त्याबद्दल तें संस्थान आणि संयुक्त सरकार किंवा प्रांत यांच्यामध्यें जे वाद उत्पन्न होतील त्यांचा निर्णय देणें. मात्र फेडरल कोर्टाची सत्ता या वादांच्या बाबतींत चालू शकेल असा करारांत स्पष्ट उल्लेख असला पाहिजे.

पण एखाद्या करारांत जर फेडरल कोर्टाला अमुक अमुक बाबतींत अधिकार नाहींत असें स्पष्ट म्हटलें असेल तर कोर्टाला त्यांत हात घालतां येणार नाहीं.

फेडरल कोर्टानें जो अशा खटल्याच्या बाबतींत निर्णय द्यावयाचा तो मतप्रतिपादक (Declaratory) असावा.

**अपीलें**:—ब्रिटिश हिंदुस्थानांतील हायकोर्टांच्या निकालावर, डिक्रीवर किंवा फायनल ऑर्डरवर फेडरल कोर्टाकडे अपील करतां येतें. मात्र अशा अपीलाला हायकोर्टाचें शिफारसपत्र पाहिजे. हें शिफारसपत्र देतांना त्या खटल्यांत १९३५ च्या कायद्याच्या किंवा बादशाही फर्मानाच्या अर्थासंबंधी कांहीं महत्त्वाचा कायद्याचा प्रश्न निघूं शकतो किंवा कसें हें पाहून शिफारसपत्र द्यावयाचें किंवा नाहीं हें ठरवावयाचें आहे.*

हायकोर्टानें हें शिफारसपत्र दिलें तर फेडरल कोर्टाला असें सांगतां येईल कीं, अमुक एका १९३५ च्या कायद्याच्या मुद्यावर चुकीचा निर्णय दिल्यामुळें अपील करण्यांत येत आहे. पण हायकोर्टानें त्या खटल्यांत कायद्याच्या मुद्याचा प्रश्न नाहीं असें म्हणून अपीलाकरतां शिफारसपत्र दिलें नाहीं तर काय करावयाचें ? या कलमांत त्याची व्यवस्था केली आहे; ज्या मुद्याच्या बाबतींत खास परवानगीशिवाय प्रिव्हि कौन्सिलकडे अपील करतां येतें, त्या आधारावर फेडरल कोर्टाकडे अपील करतां येतें.तसेंच फेडरल कोर्टानें दुसऱ्या कोणत्याहि कारणाकरतां अपीलाची परवानगी दिली तरीहि अपील लावतां येतें. पण खास परवानगी असो किंवा नसो प्रिव्हि कौन्सिलकडे कोणत्याहि परिस्थितींत परस्पर अपील करतां येत नाहीं.

ज्या सिव्हिल खटल्यांत कमींतकमी ५०००० रुपयांच्या रकमेचा वाद असेल त्या खटल्याचें अपील हायकोर्टाच्या शिफारस-

*वर जे निकाल, डिक्री, किंवा फायनल ऑर्डर हे शब्द योजिले आहेत, त्याच्या अर्थासंबंधीं निरनिराळीं मतें आहेत. त्यांत फौजदारी खटलेहि येऊं शकतील असें कांहींचें मत आहे. त्यावर रणें माजण्याचा संभव आहे.

पत्राशिवाय फेडरल कोर्टापुढें चालेल. संयुक्त कायदेमंडळानें ही रक्कम कमी केली तरी १५००० पेक्षां कमी असूं नये असेंहि म्हटलें आहे. फेडरल कोर्टाच्या परवानगीनें ही रकमेची अटहि दूर होऊं शकेल. या कलमाप्रमाणें संस्थानांतील खासगी दावे अपीलाकरतां फेडरलकोर्टापुढें येणार नाहींत हें स्पष्ट आहे. पण फेडरेशनमध्यें आलेल्या संस्थानांतील हायकोर्टाच्या निर्णयावर संयुक्त घटनाकायद्याच्या, बादशाही फर्मानाच्या, कराराच्या, वगैरे बाबतींत कायद्याच्या अर्थाच्या प्रश्नावर फेडरलकोर्टापुढें अपील करतां येईल. संस्थानांतील हायकोर्टानें फेडरलकोर्टाचें त्या मुद्यावर मागितलेलें मत असाच या अपीलाचा उद्देश आहे. संस्थानांतील कोर्टानें जर अपीलाला परवानगी दिली नाहीं तर फेडरलकोर्टाकडे ती परवानगी मागतां येते. ब्रिटिश कोर्टांच्या निर्णयाबाबत मात्र अशी परस्पर परवानगी मागतां येत नाहीं.

**प्रिव्हि कौन्सिलः**—फेडरल कोर्टाच्या निर्णयावर प्रिव्हि कौन्सिलकडे अपील करतां येईल. हें अपील ओरिजिनल खटल्याच्या बाबतींत लावतां येईल. त्या खटल्यांत १९३५ च्या कायद्याच्या फर्मानाच्या संस्थानिकांच्या करारांच्या वगैरेच्या अर्थासंबंधीचा, मुद्दा असला पाहिजे. हें अपील करण्यास फेडरल कोर्टाच्या परवानगीची जरूरी नाहीं. पण याशिवाय इतर मुद्यांवर अपील करावयाचें असेल तर त्याला फेडरल कोर्टाची किंवा प्रिव्हि कौन्सिलची परवानगी लागेल.

फेडरल कोर्टाच्या निर्णयाची अंमलबजावणी करण्यास त्यांना स्वतंत्र साधन नाहीं. बेलिफ, पोलिस असे त्यांना दिलेलें नाहींत. त्यामुळें फेडरल कोर्टानें आपलें मत प्रदर्शित करून त्या निर्णयाची अंमलबजावणी करण्याकरतां तो निर्णय खालच्या कोर्टाकडे पाठवा-

वयाचा आहे. खर्चवसुलीसंबंधीहि त्यांना त्या कोर्टाचा आश्रय घ्यावा लागेल. फेडरल कोर्टाला संस्थानिकप्रश्नाबाबद जी जी मदत लागेल ती ती त्यांनीं तेथील हायकोर्टाकडून घ्यावयाची नसून संस्थानिकाला विनंतिपर पत्र पाठवून मिळवावयाची आहे.

ग. जनरलला जर एखाद्या सार्वजनिक प्रश्नासंबंधीं महत्त्वाच्या मुद्दयावर फेडरल कोर्टाचें मत पाहिजे असेल तर त्यानें तें त्या कोर्टाकडून मिळवावें. या कोर्टानें हें मत जणूं काय आपण एखादा खटलाच ऐकतों आहे अशा पद्धतीनें बहुमतानें द्यावा.ज्या न्यायाधिशाचें भिन्न मत असेल तेंहि त्यानें नमूद करावें.

या फेडरल कोर्टानें वेळोवेळीं, कोणत्या वकिलांना आपल्यापुढें वकिली करण्यास परवानगी द्यावी, अपील करण्याची मुदत किती असावी, खटल्याचा खर्च किती घ्यावा वगैरेंबद्दल नियम करावे. कोणत्या खटल्याकरतां किती न्यायाधीशांनीं बसावें हेंहि त्यांनींच ठरवावयाचें आहे. मात्र तिघांपेक्षां कमी न्यायाधीश कोणत्याही खटल्याचे वेळीं बसतां कामा नयेत. फेडरल कोर्ट जे नियम करील, त्याला अनुसरून मुख्य न्यायाधिशानें कामांची व व्यक्तींची वांटणी करावी.

ह्या कोर्टाच्या कारभाराचा व न्यायाधिशांच्या पगार,पेन्शन,भत्ता वगैरेंचा बोजा फेडरेशनच्या तिजोरीवर टाकला आहे. तसेंच या कोर्टाकडे जे पैसे येतील ते याच कोर्टाकडे जमा व्हावयाचे आहेत.

फेडरल संस्थानांतील कोणत्या हायकोर्टांना मान्यता द्यावयाची हें बादशहा व संस्थानिक यांच्यामध्यें पत्रव्यवहार होऊन ठरेल व त्या हायकोर्टांना मान्यता मिळेल.

एडनमधील कोर्टाच्या निकालावर मुंबईच्या हायकोर्टाकडे अपील करण्याचा हक्क एका कलमानें निश्चित केला आहे.

## थोडक्यांत

फेडरल कोर्टाकडे जें काम सोंपविण्यांत आलें आहे, तें तीन प्रकारचें आहे. (१) **ओरिजिनल** खटले ऐकणें. ह्या खटल्यांत संयुक्त सरकार, प्रांत किंवा फेडरल संस्थानें यांपैकीं दोन किंवा अधिक पक्षकार असले पाहिजेत व खटल्याचें स्वरूप १९३५ च्या नव्या घटनेशीं संलग्न झालेलें असलें पाहिजे.

(२) **अपीलें** ऐकणें, ह्या अपीलांचे तीन प्रकार आहेत. (अ) प्रांतिक हायकोर्टाविरुद्ध १९३५च्या कायद्यांतील एकाद्या मुद्द्याबद्दल जर निर्णय करून हवा असेल तर तो देणें. (ब) ५०,००० रु. पेक्षां कमी नसलेल्या रकमेची खाजगी व्यक्तींचीं हायकोर्टाविरुद्ध अपीलें ऐकणें.(क) फेडरेशनमध्यें आलेल्या संस्थानांतील१९३५ च्या कायद्यांतील एखाद्या कायद्याच्या मुद्याबद्दल अपीलें ऐकणें.

(३) **ग. जनरलनें एखाद्या मुद्याबद्दल मत विचारलें असतां तें देणें.**

ह्या तीन प्रकारांचीं कामें फेडरेलकोर्टाला करावयाचीं आहेत. फेडरल कोर्टाच्या निर्णयावर प्रिव्हि कौन्सिलकडे अपील करण्याचा अधिकार कायद्यानें हिरावून घेतला नाहीं. पहिल्या बाबतींत म्हणजे ओरिजनल खटल्याच्या बाबतींत फेडरल कोर्टाच्या परवानगीशिवाय अपील करतां येतें. पण फेडरेल कोर्टाच्या अपीलांतील निकालाविरुद्ध प्रिव्हि कौन्सिलकडे अपील करण्याचा हक्क हा मान्य केला गेला नाहीं. तथापि फेडरल कोर्टानें किंवा कौन्सिलनें जर परवानगी दिली तर त्या कौन्सिलकडे अपील करतां येईल.

हे कायद्याचे प्रश्न आहेत व म्हणून पार्लमेंटनें त्या बाबतींत कितीहि सावधगिरी बाळगली असली तरी हुषार वकील त्याच्या अर्था-बद्दल किती भांडखोरपणा करतील याचें भविष्य वर्तविणें कठीण आहे.

---

# २०
# ब्रिटिश हिंदुस्थानांतील इतर कोर्टें

कलकत्ता, मुंबई, मद्रास, अलाहाबाद, लाहोर, पाटणा, औंधचें चीफ कोर्ट, सरहद्द, सिंधप्रांतांतील ज्युडिशिअल कमिशनरचीं कोर्टें आणि नागपूर येथें नव्या कायद्यांतील अटींप्रमाणें स्थापन झालेलें हायकोर्ट यांना फेडरल कोर्टाच्या बाबतींत मान्यता दिली आहे. त्याच प्रमाणें नवें कोर्ट या कायद्याप्रमाणें स्थापन होईल त्याला व बादशहा ज्या ब्रिटिश हिंदुस्थानांतील कोर्टाला हायकोर्टाच्या योग्यतेचें ठरवतील अशा कोर्टाला हायकोर्टाचा दर्जा प्राप्त होईल.

या हायकोर्टांत एक मुख्य न्यायाधीश व इतर बादशहांना जरूर वाटतील तितके न्यायाधीश असतील. मात्र ही संख्या केव्हांहि जास्तींत जास्त जी संख्या ठरेल, त्यापेक्षां कधींहि अधिक असणार नाहीं. ही संख्या मुंबई १३, मद्रास १५, कलकत्ता १९, अलाहाबाद १२, लाहोर १५, पाटणा ११, नागपूर ७, औंध ५, सिंध ५ व सरहद्द प्रांत २ अशी ठरली आहे. त्यांत मुख्य न्यायाधीश धरलेला नाहीं.

फेडरल कोर्टाच्या न्यायाधिशांची वयोमर्यादा ६५ ठरविली आहे, तर हायकोर्टाच्या न्यायाधिशांची ६० ठरविली आहे. पूर्वी हायकोर्टांत $\frac{1}{3}$ बॅरिस्टर्स, $\frac{1}{3}$ सिव्हिल सर्व्हंटस् असावे लागत. तो नियम

काढून टाकण्यांत आला आहे. फेडरल कोर्टांत सिव्हिल सर्व्हंटस् नेमतां येत नाहीं पण हायकोर्टांत त्यांच्या नेमणुकीला परवानगी आहे. त्याचप्रमाणें पूर्वीच्या कायद्यांत हायकोर्टांत मुख्य न्यायाधीश जो असावयाचा तो बॅरिस्टरच असावा लागे. आतां ही जागा ॲडव्होकेट्सना किंवा सिव्हिल सर्व्हंट्सनाहि मिळूं शकेल.

(१) हायकोर्टांत ज्यांची नेमणूक करावयाची ते १० वर्षें धंदा करीत असलेले इंग्लंड किंवा उत्तर आयर्लंडचे बॅरिस्टर्स व स्कॉटलंडचे ॲड्व्होकेटस् असावेत किंवा (२) १० वर्षें नोकरी करीत असलेला सिव्हिल सर्व्हंट असावा व त्यानें ३ वर्षें डिस्ट्रिक्ट जज्ज म्हणून काम केलेलें असावें किंवा (३) पांच वर्षें सब-जज्ज किंवा स्मालकॉज जज्ज म्हणून काम केलेलें असावें किंवा (४) १० वर्षें वकील म्हणून हायकोर्टांत काम केलेलें असावें; पण ज्याची मुख्य न्यायाधीश म्हणून नेमणूक करावयाची त्यानें प्रथम ३ वर्षें हायकोर्ट जज्ज म्हणून काम केलेलें असावें; आणि त्याला (कोठलीहि) न्यायाधिशाची नोकरी मिळाली तेव्हां तो बॅरिस्टर, ॲड-व्होकेट किंवा वकील झालेला असेल किंवा मागाहून त्यानें यांपैकीं एखादी परीक्षा दिली असेल तर त्याला मुख्य जज्ज करतां येतें. हाय-कोर्ट जज्ज व हायकोर्टाचा मुख्य जज्ज यांच्या नेमणुकींत जो थोडासा फरक आहे, तो सूक्ष्म आहे पण महत्त्वाचा आहे. तो फरक फक्त सिव्हिल सर्व्हंटांच्या बाबतींत आहे. ज्या सिव्हिल सर्व्हंटानें १० वर्षें नोकरींत काढलीं असतील व ३ वर्षें ज्यानें डिस्ट्रिक्ट जज्ज म्हणून काम केलें असेल त्याला हायकोर्ट जज्ज होतां येतें. पण चीफ जज्ज व्हावयास त्याला ३ वर्षें हायकोर्ट जज्जाचें काम करावें लागून शिवाय तो बॅरिस्टर, ॲडव्होकेट किंवा वकील असावा लागतो.

सिव्हिल सर्व्हंट हा वकील, बॅरिस्टर किंवा ॲडव्होकेट असतोच असें नाहीं. तेव्हां त्याला चीफ जज्ज व्हावयाचें असेल तर त्यानें ही परीक्षा दिलेली असणें जरूर आहे. हायकोर्ट जज्ज झाल्यावर त्यानें ही परीक्षा दिली तरी चालेल.

त्यांचा पगार, भत्ता, रजा, पेन्शन वगैरे बादशहा ठरवितो. कलकत्त्याच्या मुख्य न्यायाधिशाचा पगार ७२००० रु. सालिना ठरला आहे. मुंबई, मद्रास, अलाहाबाद, लाहोर व पाटणाच्या न्यायाधिशांचा ६०००० व नागपूरच्या ५००००ठरला आहे.तसेंच या मुख्य हायकोर्टांतील जज्जांचा पगार ४८००० रु. ठरला आहे. हायकोर्टाच्या अधिकारांत नव्या कायद्यान्वयें फारसा फरक केला नाहीं.पण फेडरेशनच्या स्थापनेमुळें त्यांच्याकडे फेडरल किंवा प्रांतिक सरकारच्या कायद्यांतील एखादी बाब न्याय्य, अन्याय्य, समर्थनीय, असमर्थनीय आहे किंवा नाहीं हें ठरविण्याची सत्ता आली आहे. खालच्या कोर्टांत असा एखादा खटला आला असला व ॲडव्होकेट जनरलनें जर या सत्तेचा उपयोग करावा असें सांगितलें तर हायकोर्ट तो खटला चालवूं शकेल. रेव्हेन्यूच्या बाबतींत हायकोर्टाला पूर्वपरंपरेप्रमाणें खटले चालवितां येत नाहींत. ग. जनरल किंवा गव्हर्नरनें जर या बाबतींत कायदा करण्याची परवानगी दिली तरच प्रांतिक किंवा संयुक्त सरकारच्या कायदेमंडळांत असें बिल आणतां येईल.

हायकोर्टाचा खर्च प्रांतांच्या तिजोरीवर पडेल व जमाहि त्याच तिजोरींत जाईल.

नवीं हायकोर्टें स्थापणें किंवा दोन हायकोर्टें एक करणें ह्याला बादशहाची संमति लागेल. आसामओरिसांत हायकोर्टें नाहींत व

संयुक्त प्रांतांत अलाहाबादचें व औधचें चीफ कोर्ट अशीं दोन, एक करण्यासारखीं कोर्टें आहेत.

इतर फेडरेशन्समध्यें हायकोर्टांना जी सत्ता आहे, तशी सत्ता हिंदुस्थानांतील हायकोर्टांना देण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांचा संबंध मंत्रिमंडळाशीं न ठेवतां बादशहाशीं ठेवल्यामुळें हायकोर्टें हीं स्वतंत्र आहेत. त्याचप्रमाणें नव्या घटनेचा अर्थ करणें व तीं योग्य रीतीनें अंमलांत आणली जात आहे किंवा नाहीं हेंहि पहाण्याचें काम त्यांच्याकडे आलें आहे. पूर्वींच्या कायद्यांतील घटनेमध्यें एखादा कायदा घटनेप्रमाणें पास होत आहे किंवा नाहीं हें पहाण्याचें काम कोर्टाकडे नव्हतें. पण फेडरेशन अस्तित्वांत आल्यावर हायकोर्टें हीं त्या घटनेची संरक्षक होतात. यापुढें कायदा काय आहे एवढेंच पाहून भागणार नसून तो घटनेप्रमाणें आहे किंवा नाहीं हेंहि त्यांना पहावें लागेल. प्रांत व मध्यवर्ती सत्ता यांच्यामध्यें अधिकाराची केलेली वांटणी कांटेतोल व कडक आहे. पण एकमेक एकमेकांच्या अधिकारक्षेत्रांवर आक्रमण करतात किंवा कसें हेंहि कोर्टाला पहावें लागेल.

हायकोर्टें हीं प्रांतिक असावीं कां मध्यवर्ती सत्तेचा त्यांच्यावर ताबा चालावा,हायकोर्टाच्या न्यायाधिशांच्या संबंधी प्रांतिक कायदेमंडळांत चर्चा व्हावी किंवा होऊं नये याबद्दल गोलमेज परिषदांतून मनोरंजक प्रश्नोत्तरें झालीं.शेवटीं हायकोर्ट जज्जांना प्रांतिक कायदेमंडळांच्या कक्षेंतून वगळले. त्यांच्या पगाराबद्दल, अगर भत्त्याबद्दल अगर वर्तनाबद्दल प्रांतिक कायदेमंडळांत चर्चा होऊं शकणार नाहीं.

हायकोर्टें हीं प्रांतिक सत्तेच्या कक्षेंत येतात किंवा नाहीं याबद्दल फार वादविवाद झाले. सायमन कमिशननें त्यांचें प्रांतिकत्व मान्य केलें नव्हतें. पण जॉइंट सिलेक्ट कमिटीनें तें मान्य केलें. त्यामुळें प्रांतिक सरकारकडे ज्या बाबी सोपविल्या आहेत त्यांत न्यायखात्याची बाब अंतर्भूत केली आहे. असें सांगतात कीं, हें बिल पास होण्यापूर्वी हायकोर्टें ही मध्यवर्ती असावींत अशी ब्रिटिश मुत्सद्यांची व कायदेपंडितांची इच्छा होती. पण बिलाची शब्दरचना करतांना त्यांत चूक झाली व प्रांताकडे कलकत्त्याशिवाय बाकीचीं हायकोर्टें आलीं. डॉ. शफत् अहमदखान म्हणतात:—'It is interesting to recall that the Provinces were given this power owing mainly through a mistake in drafting ( Page 262 ). जी चूक झाली ती वर्गवारी करतांना झाली. 'But a mistake was now made in classification, which transferred all High Courts, except the Calcutta High Court, to the Provinces.' अशी चूक कशी झाली हें समजत नाहीं. शफत् अहमदखान म्हणतात:—२ ज्या चार्लस्च्या वेळीं-हेबियस कॉर्पस ॲक्टच्या वेळीं अशीच चूक झाली होती. तें बिल जेव्हां लॉर्डांच्या सभेंत मताकरतां गेलें तेव्हां तें खरोखर नापास झालें होतें. पण एका लठ्ठ लॉर्डाचें सरकारी मतगणकांनीं एक मत न मोजतां तीन मतें मोजलीं !

हिंदुस्थानसरकार, मे. फिँथम व स्टीफन्सन हे कायदेतज्ञ व इतर अनेकांचीं इच्छा हायकोर्टें हीं मध्यवर्ती सत्तेकडे जावीं अशी होती. पण आतां हायकोर्टांवर प्रांतिक सरकारची सत्ता चालणार आहे एवढें खरें.

# २१

# सरकारी नोकऱ्या.

हिंदुस्थानांत एकंदर तीन प्रकारच्या नोकऱ्या आहेत. एक प्रांतिक, दुसऱ्या मध्यवर्ती व तिसऱ्या सर्व हिंदुस्थानच्या. नोकऱ्यांची ही जी विभागणी करण्यांत आली आहे, ती ते नोकर कोणत्या सत्तेच्या नियंत्रणाखालीं काम करतात यांवर करण्यांत आली आहे. मध्यवर्ती सत्तेचे अधिकार, पोस्ट, तार, हिशेबतपासणी, भूगर्भशास्त्रांतील शोध, पुराणवस्तुसंशोधन, शास्त्रीय खातीं, सरहद्दीवरील व संस्थानांतील राजकारण यांवर चालतात. त्यामुळें ह्या खात्यांत जे काम करतात त्यांचा अंतर्भाव मध्यवर्ती सत्तेंत केला आहे. जे आय्. सी. एस्. झालेले असतात ते प्रांतिक सरकारच्या अधिकाराखालीं काम करतात; पण ते वाटेल तेथें जाऊं शकत असल्यामुळें त्यांचा अखिल हिंदुस्थानांत अंतर्भाव होऊं शकतो. तिसऱ्या नोकऱ्या प्रांतिक. या नोकऱ्यांत प्रांतिक सरकार आपल्या जरुरीप्रमाणें लोक घेतात.

प्रांतिक नोकऱ्यांवर प्रांतिक सरकारचा ताबा असतो; पण सिव्हिल सर्व्हंटांवर प्रांताचा ताबा नाहीं. प्रांतिक स्वायत्तता असो किंवा जबाबदार राज्यपद्धति असो, ती जर नीटपणें चालावयाची असेल तर सर्व नोकरांवर त्या त्या सरकारचा पूर्ण ताबा असला पाहिजे. हे नोकर ठेवणें, काढणें, त्यांचा पगार ठरविणें, त्यांच्या बदल्या करणें, त्यांना रजा, भत्ता, पेन्शन देणें वगैरे सर्व बाबतींत

जर जे सत्ता गाजवितात, त्यांचा ताबा नसेल तर तें राज्य चालविणें अशक्य होईल. प्रांतिक स्वायत्ततेंत हीच अडचण निर्माण झाली आहे. मंत्र्यांनीं ५०० रु. पगार घ्यावा व आपल्या हाताखालीं काम करणाराला ५००० रु. पगार द्यावा आणि पुनः तो आपले ऐकत नसला, तर त्याची बदलीहि करतां येऊं नये ही परिस्थिति अत्यंत असमाधानकारक व अन्यायाची आहे. इतर अनेक कारणांबरोबर हेंहि कारण प्रांतिक स्वायत्ततेच्या अगर फेडरेशनच्या स्वीकाराला प्रतिकूल आहे.

सिव्हिल सर्व्हिस ही आरंभीं आरंभीं तर इंग्लिश लोकांची मिरासदारी असे. काँग्रेसच्या अनेक बैठकांतून सिव्हिल सर्व्हिसमध्यें हिंदी लोक घ्या असे ठराव पास होत आले. हिंदुस्थानांत या परीक्षा घ्याव्यात याबद्दलहि रक्त ओकलें गेलें. कालांतरानें हिंदी लोकांचा या नोकऱ्यांत प्रवेश झाला व काहीं प्रमाणांत हिंदुस्थानांतहि सिव्हिल सर्व्हिसच्या नोकऱ्या भरल्या जाऊं लागल्या.

या नोकऱ्यांच्या इतिहासाकडे वळल्याशिवाय आपल्याला त्यांचें स्वरूप कळणार नाहीं. ईस्ट इंडिया कंपनी जेव्हां स्थापन झाली, तेव्हां त्या कंपनींत व्यापारी व कारकून असत. ते कंपनीच्या देवघेवीचा हिशेब टिपत. पण पुढें कंपनीनें तागडीबरोबर तरवार उचलली. आणि जे मुलूख जिंकले त्यावर युरोपीयन सनदी नोकर नेमले. या नोकरांना देशी भाषेचें शिक्षण मिळावें, व त्यांना कायद्याची माहिती करून द्यावी म्हणून कलकत्त्याला एक कॉलेजहि उघडलें. या कॉलेजांत प्रवेश मिळावयाचा असेल तर कंपनीच्या कोर्ट ऑफ डिरेक्टर्सची मंजूरी लागे. १८५३ सालीं हें नॉमिनेशनचें तत्त्व गुंडाळून ठेवण्यांत आलें आणि विलायतेंत चढाओढीनें परीक्षा घेतल्या

जाऊं लागल्या. कंपनीचा कारभार राणीसरकारच्या हातीं गेल्यावर तेंच तत्त्व मान्य केलें गेलें. जरी हिंदी लोकांना या परिक्षेकरतां मज्जाव नव्हता, तरी १८७० पर्यंत एकापेक्षां जास्त हिंदी माणूस त्या नोकरींत नव्हता. आर्थिक, सामाजिक व धार्मिक बंधनामुळें हिंदी माणूस विलायतेंत जाऊं शकत नसे. त्यामुळें हिंदी नोकरांच्या बाबतींत या कायद्याला थोडीशी मुरड घातली आणि असामान्य हिंदी गृहस्थाला परिक्षेशिवाय नोकरींत घ्यावें असें ठरविण्यांत आलें. पण हा नियम केल्यावरहि दोघांशिवाय अधिकांची भरती नोकऱ्यांत झाली नाहीं. पुढें १८७९ सालीं या नियमाचा फेरविचार करण्यांत आला आणि उच्च घराण्यांतील $\frac{1}{6}$ तरुण या नोकऱ्यांत घेण्याला परवानगी मिळाली. पण उच्च घराण्यांतील लोक बुद्धिमान असतातच असें नसल्यामुळें तो नियम निरुपयोगी ठरला. १८८७ सालीं पुनः एक चौकशीमंडळ नेमलें. त्यानें नोकऱ्यांचे तीन प्रकार केले.

१ इंडियन सिव्हिल सर्व्हिस २ प्रांतिक सिव्हिल सर्व्हिस व ३ कनिष्ठ सिव्हिल सर्व्हिस. पहिल्या प्रकारच्या नोकऱ्या फक्त चढाओढीनें इंग्लंडमध्यें घेतल्या जातील असें ठरविण्यांत आलें. पण तेवढ्यानें खरा प्रश्न सुटला नाहीं. त्यामुळें १९१२ सालीं इस्लिंग्टन कमिशन नेमून नोकऱ्याचा निकाल लावण्याचें ठरविण्यांत आलें. इस्लिंग्टन कमिशननें आपला अहवाल १९१५ सालीं सादर केला; पण युद्धाच्या धामधुमींत तो प्रसिद्ध होऊं शकला नाहीं. १९१७ सालीं हा रिपोर्ट बाहेर पडला. पण हा रिपोर्ट बाहेर पडला तेव्हां सारी परिस्थिति बदलली होती. २० ऑगस्ट १९१७ ला सेक्रेटरी ऑफ स्टेटनें जी घोषणा केली तींत असें म्हटलें कीं, हिंदुस्थानच्या

राज्यकारभारांत हिंदी लोकांचा जास्त जास्त संबंध यावा अशी आमची इच्छा आहे. पण त्याचा अंमल करावयास योग्य परिस्थिति पुढें दोनतीन वर्षें आली नाहीं.

मॉंटेग्यु सुधारणांचे वेळीं पुनः ह्या प्रश्नाकडे लक्ष वळविण्यांत आले. विलायतेंत पुरेशी शिक्षणाची सोय होणें शक्य नसल्यामुळें कांहीं नोकऱ्या हिंदुस्थानांत भराव्यांत असें या रिपोर्टांत सांगितलें गेलें. या नोकऱ्यांचें हिंदीकरण करावें, युरोपीअन नोकरांच्या परिस्थितींत सुधारणा करावी व कायद्यानें या नोकऱ्यांना संरक्षण मिळावें असेंहि त्या वेळीं ठरलें. गोऱ्या नोकरांना आपल्या मोकाट कुरणांत व्यत्यय येतो असें वाटून त्यांनीं त्रागा केला. त्यामुळें ऑल इंडिया सर्व्हिसेसमध्यें असणाऱ्या लोकांना सेवानिवृत्त होण्यास परवानगी मिळाली व त्यांच्या नोकरीच्या मानानें त्यांना पेन्शन देण्याची तरतूद केली गेली.

मॉंटेग्यु-चेम्सफर्ड सुधारणानंतर राजकीय चळवळ करणारे व हे नोकर यांचे संबंध सुधारण्याऐवजीं ते विघडतच गेले. हे सनदी नोकर स्वतःला नबाब समजत व त्यांना आपल्याविरुद्ध ब्रहि काढलेला खपत नसे. १९२० च्या कायद्यानंतर त्यांच्याबद्दल भलीबुरी टीका होऊं लागली. असहकारितेच्या काळांत तर सिव्हिल सर्व्हंटकडे अत्यंत तुच्छतेनें पाहिलें जाऊं लागलें. त्यामुळें त्यांनीं आपल्याला पेन्शन द्या असें म्हणणें सुरू केलें. याप्रमाणें १९२२ सालीं ऑल इंडिया सर्व्हिसेसमधून २०० लोक सेवानिवृत्त झाले. १९२४ सालीं हा आंकडा ३५० वर गेला. या असंतोषामुळें इंग्लंडमध्यें तरुण लोक या नोकऱ्या करावयास मिळेनासे झाले. हिंदी लोकांतहि या नोकऱ्यांबद्दल समाधान नव्हतें. त्यांना या नोकऱ्यांच्या

हिंदीकरणाचें प्रमाण फारच थोडें आहे असें वाटलें. तसेंच या नोकऱ्यांवर स्टेट सेक्रेटरीचा ताबा कां असावा ह्याहीबद्दल असंतोष व्यक्त केला गेला. हिंदी लोक असंतुष्ट व इंग्लिश तरुण नोकऱ्यांत यावयास नाराज असल्यामुळें एक कमिशन नेमण्याचा बूट निघाला व सुप्रसिद्ध ली कमिशनची स्थापना झाली.

या कमिशनपुढें ८ प्रकारच्या नोकऱ्यांचा प्रश्न होता:—

(१) इंडियन सिव्हिल सर्व्हिस (२) पोलिस (३) जंगल (४) शेतकी (५) शिक्षण (६) इंजिनीअर्स (७) पशुविषयक (८) वैद्यकी. या आठ प्रकारच्या नोकऱ्यांत एकूण ४२७९ लोक होते. त्यांपैकीं पहिल्या दोनमध्यें २०८२ नोकर होते.

या कमिशननें सिव्हिल, पोलिस, जंगल आणि इंजिनीअर्स या नोकऱ्यांवर भारतमंत्र्याचा पूर्ण अधिकार असावा व त्यानेंच या नोकऱ्या भराव्या असें सांगितलें. बाकीच्या चार जातींच्या नोकऱ्या ह्या सोपीव खात्यांतील असल्यामुळें त्यांच्यावर मंत्र्यांचा ताबा असावा व अखिल भारतीय प्रमाणावर त्या भरणें बंद करावें असें सांगितलें. त्यांतून फक्त वैद्यकी नोकऱ्या वगळल्या. या नोकऱ्या लष्करच्या वैद्यकी खात्यांत जे अधिकारी पाठविले जातात त्यांच्या नेमणुका प्रांतानें करून भराव्या असें ठरविले.

नोकऱ्यांच्या हिंदीकरणाचा प्रश्न पुढें निघाला. प्रांतिक नोकऱ्यांमधील शेकडा १० टक्के लोक वरिष्ठ नोकऱ्यांत घ्यावेत आणि नोकरांची प्रत्यक्ष भरती जी करावयाची ती हिंदी व युरोपीअन यांची समप्रमाणांत करावी अशीहि त्यांनीं शिफारस केली. या योजनेप्रमाणें १९३९ सालीं हिंदी नोकरवर्गांत निम्मे हिंदी व निम्मे युरोपीअन लोक होतील असें त्यांनीं गणित केलें.

पोलिस सर्व्हिसमध्यें ५ युरोपीअनांस३ हिंदी हें प्रमाण ठरविलें. पोलिसांच्या प्रांतिक नोकऱ्यांतून वरिष्ठ नोकऱ्यांत नोकर घ्यावयाचें प्रमाण शेंकडा २० ठेवलें. या प्रमाणान्वयें १९४९ सालीं निम्मे हिंदी व निम्मे यूरोपीअन लोक या खात्यांत होतील असें त्यांनीं सांगितलें. जंगलखात्यांत ७५ हिंदी व २५ यूरोपीयन आणि इंजिनीअर्सच्या इरिगेशन खात्यांत समप्रमाण त्यांनीं सुचविलें.

मध्यवर्ती नोकऱ्यांच्या बाबतींतहि असेंच प्रमाण ठरवून दिलें. (१) राजकीय खात्यांत $\frac{1}{4}$ हिंदी व $\frac{3}{4}$ यूरोपीयन्स (२) इंपीरिअल कस्टम्स् मध्यें निम्म्यापेक्षां कमी हिंदी नसावेत. (३) वरिष्ठ तार व बिनतार खातें २५ यूरोपीअन्स व ७५ हिंदीं(४) रेल्वे ७५ हिंदुस्थानांतील व २५ इंग्लंडमधील. राजकीय खात्याशिवाय बाकीच्या खात्यांत भरावयाचे नोकर, परीक्षा घेऊन भरावेत व राजकीय खात्यांत हिंदुस्थान सरकारनें आपल्या इच्छेप्रमाणें भरती करावी असें त्यांनीं सांगितलें.

नव्या सुधारणांच्या जन्मप्रसंगीं पुनः यूरोपीअन सिव्हिल सर्व्हंटस्ना भीतीनें पछाडलें. हिंदुस्थानला जर भरीव हक्क दिले तर आपली दुर्दशा उडेल, आपल्याला हिंदी लोकांच्या हाताखालीं काम करण्याचा मानहानिकारक प्रसंग येईल, नोकरीला शाश्वती रहाणार नाहीं वगैरे विचारांनीं त्यांना हैराण केलें. त्यांना अभय पाहिजे होतें व तें अभय त्यांना देण्यांत आलें.

व्हाइटपेपरमध्यें ह्या प्रश्नाची विस्तारशः चर्चा करण्यांत आली आणि त्यांच्या हक्कांचें भरपूर संरक्षण केलें गेलें. व्हाइटपेपरमध्यें या नोकरांना जाचक वाटणाऱ्या बारीकसारीक गोष्टींची तरतूद करण्यांत आली असून या नोकरांची ती सनदच आहे असें म्हणा-

वयास हरकत नाहीं. पण या नोकरांचें तेवढ्यानें समाधान झालें नाहीं व त्यांनीं आपलें एक शिष्टमंडळ जॉइंट सिलेक्ट कमिटीकडे पाठविलें. व्हाइटपेपरनें वास्तविकपणें त्यांच्या सर्व जुन्यापुराण्या हक्कांची हमी घेतली होती. व्हाइटपेपरनें नोकरभरतीचें कमिशननें ठरविलेलें प्रमाणहि मान्य केलें होते. ज्या सिव्हिल सव्हँटांना सेक्रेटरी ऑफ स्टेटनें नोकरीस लावले असेल त्यांच्या योगक्षेमाची सर्व जबाबदारी त्याच्यावर सोपविली. नवा कायदा सुरू झाल्यानंतर पांच वर्षांनीं पोलिस व सिव्हिल सर्व्हिसमध्यें जी भरती करावयाची त्याची एक कमिटी नेमून योजना ठरवावी, असें शुभ्रपत्रिकेनें सुचविलें. पण जॉइंट सिलेक्ट कमिटीनें या महत्त्वाच्या मुद्यावर बिब्बा घालून कालमर्यादेला फांटा दिला. नव्या कायद्यामध्यें या नोकरांची जी व्यवस्था केली आहे ती आपण पाहूं.

सिव्हिल सर्व्हिसमध्यें असलेल्या कोणाहि नोकराला ज्यानें त्याची नेमणूक केली असेल त्याच्या खालच्या दर्जाचा कोणताहि अधिकारी काढूं शकणार नाहीं. त्याची हकालपट्टी करावयाची असेल किंवा त्याचा दर्जा कमी करावयाचा असेल तर त्याचें म्हणणें काय आहे हें समजून घेतलें पाहिजे. पण त्याच्या गैरवर्तनामुळें त्याला जर शिक्षा झाली असेल तर त्याचें म्हणणें ऐकून घेतलें जाणार नाहीं. तसेंच त्याला नोकरींतून काढण्याचा ज्याला अधिकार आहे, त्याला जर असें वाटलें कीं, त्याचें म्हणणें, लेखी नमूद केलेल्या कारणांकरतां ऐकून घेणें व्यवहार्य होणार नाहीं, तर त्याला आपलें म्हणणें मांडण्यास परवानगी मिळणार नाहीं.

फेडरेशनमध्यें किंवा फेडरेशनसंबंधी कामांमध्यें ज्या सिव्हिल सव्हँटांच्या नेमणुका करावयाच्या त्या ग. जनरल किंवा तो

सांगेल तो अधिकारी करील. त्यानें आंखून दिलेल्या नियमांप्रमाणें या नोकरांना वागावें लागेल. प्रांतामध्यें गव्हर्नर किंवा त्यानें अधिकार दिलेला गृहस्थ या नेमणुका करील. प्रांतांतील सिव्हिल सर्व्हंटांना या नोकरीदात्यांचे नियम पाळावे लागतील. हे नोकरीचे नियम त्यांच्या संरक्षणपर असावेत. प्रांतिक स्वायत्तता सुरू होण्यापूर्वी जो गृहस्थ सिव्हिल सर्व्हंट म्हणून काम करीत असेल, त्याच्या हिताला बाधक असे नियम करण्याचा प्रसंग आला तर ते नियम, १९२६ च्या ८ मार्चला जो अधिकारी करूं शकला असतां, त्यानें किंवा सेक्रेटरी ऑफ स्टेट ज्याला अधिकार देईल त्यानें करावें. १९२६ च्या मार्च महिन्यांत मध्यवर्ती व प्रांतिक नोकऱ्यांसंबंधी हे नियम करण्याचे अधिकार अनुक्रमें ग. जनरल व गव्हर्नर यांना देण्यांत आले होते.

जर एखाद्या सिव्हिल सर्व्हंटाला कोणत्याहि हुकुमान्वयें शिक्षा झाली, किंवा त्याच्यावर ठपका ठेवला, त्याच्या नोकरनाम्यांतील नियमांत बदल झाला किंवा त्याचा अर्थ निराळा केला गेला किंवा मुदतीपूर्वी त्याची नोकरी समाप्त केली तर त्याचें अपील त्या नोकरीवर घेणाऱ्या अधिकाऱ्यानें ऐकलें पाहिजे. सिव्हिल सर्व्हंटासंबंधी जशी हीं अपीलें ऐकण्याची व्यवस्था केली तशी कनिष्ठ नोकराबद्दलहि केली आहे. ग. जनरल किंवा गव्हर्नर यानें जर एखादा हुकूम काढला असला तर मात्र कनिष्ठ नोकराचें अपील ऐकलें जाणार नाहीं. हे सगळे विधिनिषेध पाळून कायदेमंडळाला सिव्हिल नोकऱ्यांच्या बाबतींत नियम करण्याचा अधिकार आहे. पण कायदेमंडळाच्या नियमांनीं ग. जनरल किंवा गव्हर्नर बांधला जाणार

नाहीं. त्यांना जें न्याय्य व योग्य वाटेल तें ते हे नियम उल्लंघन करूनहि करूं शकतील.

ग. जनरलला जे अधिकार सिव्हिल सर्व्हंटाच्या बाबतींत दिलें आहेत,ते रेल्वे ऑथॉरिटीला रेल्वेच्या बाबतींत दिले आहेत.रेल्वेमधील वरिष्ठ जागा भरण्याच्या बाबतींत रेल्वे ऑथॉरिटीनें जे नियम करावयाचे ते पब्लिक सर्व्हिस कमिशनच्या सल्ल्यानें करावयाचे आहेत. एवढा सल्ला घेतला म्हणजे रेल्वे ऑथॉरिटीचा व या कमिशनचा कांहीं संबंध नाहीं. रेल्वेशीं अँग्लो-इंडियन लोकांचा फार दिवसांचा ऋणानुबंध असल्यामुळें ग. जनरल सांगेल तितके या जातीचे लोक नोकरीस घेतले पाहिजे व त्यांचे पगारहि तशाच प्रमाणांत ठेवले पाहिजेत. याशिवाय इतर जातींच्या लोकांनाहि किती प्रमाणांत नोकऱ्या द्यावयाच्या हें ग. जनरल जसें ठरवील तसें रेल्वे ऑथॉरिटीनें ऐकलें म्हणजे झालें. बाकी नोकऱ्या भरण्यांत त्यांच्यावर काहींच बंधन नाहीं.

अँग्लो-इंडियन लोकांचे लाड पुरविणें हें सूक्ष्म दृष्टीनें ठीक आहे; पण त्यामुळें जातवारीचें घातुक तत्त्वहि, फक्त अँग्लो-इंडियनांच्या बाबतींतच आपण पक्षपात केला नाहीं हें सिद्ध करण्याकरतां घालून दिलें आहे !

ह्या अँग्लो-इंडियनांची ब्याद नुस्ती रेल्वेपुरतीच नाहीं, तर ती पोस्ट, तार व कस्टम या खात्यांनाहि घेरून बसली आहे. या तीन खात्यांतहि त्यांना त्यांच्या संख्येचें मागील प्रमाण लक्षांत घेऊन नोकऱ्या द्याव्या असें म्हटलें आहे.

फेडरल कोर्टांतील जे नोकर असतील त्यांच्या संबंधींचे नियम करण्याचा हक्क हिंदुस्थानच्या मुख्य न्यायाधिशाला आहे व हाय-

कोर्टांतील नोकरासंबंधींचे नियम करण्याचा अधिकार हायकोर्टाच्या मुख्य न्यायाधिशाला दिला आहे.

याचा उद्देश असा कीं, सिव्हिल सर्व्हिसच्या बाबतींत जसा गव्हर्नर किंवा गव्हर्नर जनरल किंवा रेल्वेच्या बाबतींत जशी रेल्वे ऑथॉरिटी, तसें कोर्टाच्या बाबतींत मुख्य अधिकारी फेडरल कोर्टाचा किंवा हायकोर्टाचा चीफ जस्टिस हा आहे.

रेल्वेंत जशी अँग्लो-इंडियनांचें तट्टू घुसडून रेल्वे ऑथॉरिटीची सत्ता मर्यादित केली आहे, तशी कोर्टाच्या बाबतींतहि केली आहे. कोर्टांत जर एखाद्या जागेवर बाहेरचा नोकर नेमावयाचा असेल तर चीफ जज्जाला स्वतः नेमतां येणार नाहीं. त्यानें पब्लिक सर्व्हिस कमिशनच्या सल्ल्यानें ही नेमणूक केली पाहिजे. त्या नोकरांचा पगार, भत्ता, रजा पेन्शन संबंधाच्या नियमांना ग. जनरल किंवा गव्हर्नर याची संमति घेतली पाहिजे. कायदेमंडळाच्या मंत्र्यांना याहि साध्या बाबतींत तोंड उघडण्याची परवानगी नाहीं. न्यायाधिशांचा संबंध बादशहाकडे आणि कनिष्ठ नोकरांचा ग. जनरल किंवा गव्हर्नरकडे जोडला आहे.कोर्टें हीं कायदेमंडळापासून अलिप्त ठेवावीं असा या फाजिल सावधगिरीचा हेतू आहे.

## सेक्रेटरी ऑफ स्टेटनें भरावयाच्या जागा.

इंडियन सिव्हिल सर्व्हिस, इंडियन मेडिकल व इंडियन पोलिस सर्व्हिसमधील जागा पार्लमेंटचा निराळा कायदा होईपर्यंत भारतमंत्र्यानें भरावयाच्या आहेत. ग. जनरल व गव्हर्नर यांच्यावर विवेचकबुद्धीनें पार पाडावयाच्या ज्या जबाबदाऱ्या टाकल्या आहेत, त्या पार पाडण्याकरतां जर नव्या जागा निर्माण कराव्या

असें सेक्रेटरी ऑफ स्टेटला वाटलें तर त्यानें अशा जागांवर नेमणुका कराव्यात. किती जागा भरणें अवश्य आहे याचा तक्ता त्यानें पार्लमेंटपुढें ठेवावयाचा आहे. ह्या पद्धतीच्या कामाचें स्वरूप त्यानें सेक्रेटरी ऑफ स्टेटला वेळोवेळीं कळवावयाचें आहे आणि त्यांत कांहीं बदल करणें अवश्य असलें तर तेंहि सुचवावयाचें आहे.

इरिगेशन खात्यांत स्टेट सेक्रेटरी साहेबांनींच भरती करावयाची आहे. वास्तविकपणें हिंदुस्थानांत पाटबंधाऱ्याचें काम करूं शकणारे लोक मिळूं शकणार नाहींत ही तर कल्पना असह्य आहे. या खात्यांत सेक्रेटरी ऑफ स्टेटला भरती करूं देणें म्हणजे निव्वळ कांहीं इंग्लिश लोकांची सोय करणें आहे. असें म्हणतात कीं, कायदा करणारांनाहि या गोष्टीचें वैषम्य वाटलें. कारण १ एप्रिल १९३७ नंतर पांच वर्षांच्या आंत ह्या खात्याच्या पुनर्घटनेचा विचार व्हावा असा संकेत आहे. या पुनर्घटनेंत पार्लमेंटकडून ही भरती करण्याची सत्ता प्रांत किंवा फेडरल सरकार यांच्यावर सोंपविली जाईल असा अंदाज आहे.

## राखीव नोकऱ्या

वर निर्दिष्ट केलेल्या नोकऱ्यांशिवाय, सेक्रेटरी ऑफ स्टेट हा कांहीं सिव्हिल पोस्टस ज्यांना राखीव नोकऱ्या म्हटलें आहे अशा निर्माण करूं शकतो व त्यांवर लोक नेमूं शकतो. अशा जागा तीन महिन्यांवर रिकाम्या ठेवतां येणार नाहींत. त्या नोकऱ्यांत सेक्रेटरी ऑफ स्टेट ठरवील त्यापेक्षां निराळे लोक नेमतां येणार नाहींत व त्या नोकऱ्या, दुसऱ्या नोकऱ्या पत्करून, करतां येणार नाहींत. या राखीव जागा ज्यांना दिल्या जातील, त्यांना कोठें काम द्यावयाचें

हें ग. जनरल किंवा गव्हर्नर आपल्या वैयक्तिक निर्णयानें ठरवतील. यासंबंधी करावयाचे नियम पार्लमेंटपुढें ठेवावयाचे आहेत व पार्लमेंटनें बैठक भरल्यापासून २८ दिवसांत जर हे नियम अमान्य करावयाचे असतील तर अमान्य करावयाचे आहेत.

सिव्हिल सर्व्हिस किंवा सिव्हिल पोस्टस् ( राखीव नोकऱ्या ) यांचा पगार, पेन्शन, वगैरेसंबंधीचे नियम भारतमंत्र्यानें करावयाचे आहेत. यांशिवाय इतर नियम भारतमंत्री करूं शकतो; पण त्यानें जर असे नियम केले नाहींत तर तोंपर्यंत ग. जनरल किंवा गव्हर्नर अथवा त्यांनीं ज्यांच्यावर यासंबंधींचे अधिकार सोपविले असतील ते अधिकारी हे नियम करतील. या नोकरांची बढती, तात्पुरती नोकरीवरून हकालपट्टी व रजा या गोष्टींना ग. जनरल किंवा गव्हर्नर यांची मंजूरी लागेल. त्यांच्या पगाराचा व भत्त्याचा बोजा ते जेथें नोकरी करीत असतील त्याप्रमाणें फेडरेशन किंवा प्रांतावर पडेल. पण त्यांचें पेन्शन मात्र फेडरेशननें दिलें पाहिजे. या नोकरांना जर एखाद्या हुकमाबद्दल अन्याय झाला असें वाटेल तर त्यांनीं ग. जनरल किंवा गव्हर्नर यांचेकडे तक्रार करावी व भारतमंत्र्याकडे अपील करावें.

सेक्रेटरी ऑफ स्टेटनें आपल्या कौन्सिलच्या संमतीनें प्रांतिक स्वायत्तता अंमलांत येण्यापूर्वी म्हणजे १ एप्रिल १९३७ पूर्वी ज्या नोकऱ्या भरल्या असतील त्या नोकरांनाहि ह्या सवलती व हे हक्क मिळावयाचे आहेत.

## हायकमिशनर व ऑडिटर यांचा नोकरवर्ग.

हायकमिशनरच्या व हिंदुस्थानचे हिशेब तपासण्याकरतां जो ऑडिटर विलायतेंत नेमला जाणार आहे, त्यांच्या नोकरवर्गांना

वरील सर्व नियम लागू करण्यांत आले आहेत. हे सर्व नोकर इंग्लंड-डमध्यें काम करीत असले तरी ते हिंदुस्थानांतील नोकरांना दिलेल्या सवलतींना पात्र समजण्यांत आले आहेत. ऑडिटरसाहेब आपला नोकरवर्ग नेमूं शकतात. फक्त त्यांची संख्या, त्यांची लायकी व पगार हा ग. जनरलनें ठरवावयाचा आहे.

## न्यायखात्याची खास तरतूद.

वर जे सिव्हिल सर्व्हिस व सिव्हिल पोस्टासंबंधी नियम दिले आहेत ते फेडरल कोर्टाच्या किंवा हायकोर्टाच्या जज्जांना लागू नाहींत, कारण त्यांच्या संबंधीचे नियम निराळे व अधिक चांगले आहेत. एखादा सिव्हिल सव्हंट तात्पुरता हायकोर्ट किंवा फेडरल कोर्टाचा जज्ज झाला म्हणून त्याला हे जज्जाचे नियम लागू होणार नाहींत. पण एखादा सिव्हिलियन जर कायमचा जज्ज झाला तर त्याला पगार वगैरे संबंधींचे जे जज्जाचे नियम असतील ते लागू होतील. सिव्हिल सर्व्हिसचे नियम त्या परिस्थितींत लागूं होणार नाहींत. या सिव्हिलयन जज्जाचें पेन्शन फेडरेशनमधून मिळावयाचें आहे.

न्यायखातें हें राजकारणापासून अलिप्त ठेवावें म्हणून डिस्ट्रिक्ट जज्जांच्या नेमणुका ह्या मंत्र्यांच्या ताब्यांत न ठेवतां गव्हर्नरच्या ताब्यांत ठेवल्या आहेत. गव्हर्नरनें ह्या नेमणुका करतांना न मानावा लागणारा सल्ला मंत्र्याचा घ्यावा. त्यांचा पगार, बढती, व त्यांची नेमणूक कोणत्या जिल्ह्यावर करावयाची हें गव्हर्नरनें वैयक्तिक निर्णयानें ठरवावें. या बाबतींत त्यानें हायकोर्टाचाहि सल्ला घ्यावयाचा आहे. एखादा गृहस्थ जर सरकारी नोकरींत

नसला तर त्याची नेमणूक करण्यापूर्वी त्याला बॅरिस्टर, स्कॉटलंडचा अॅडव्होकेट किंवा वकील होऊन पांच वर्षें झालीं आहेत किंवा नाहींत हें पहावयाचें आहे. पांच वर्षांचा काळ लोटला असला तरच या बाहेरच्या माणसाला हायकोर्टाच्या शिफारसीनें डिस्ट्रिक्ट जज्ज करतां येतें. डिस्ट्रिक्ट जज्जाच्या व्याख्येंत अॅडिशनल, जॉइंट, अॅसिस्टंट जज्ज येतात. शिवाय स्मालकॉलचा जज्ज, प्रेसिडेंसी मॅजिस्ट्रेट, सेशन जज्ज, अॅडिशनल सेशन जज्ज आणि अॅसिस्टंट सेशन जज्ज इतके अधिकारीहि त्यांत येतात.

पहिल्या बिलांत स्मॉलकॉज जज्ज, प्रेसिडेंसी मॅजिस्ट्रेट व अॅसिस्टंट सेशन जज्ज यांचा अंतर्भाव केला नव्हता. मागाहून त्यांनाहि त्यांत घातलें.

**सबजज्जेस्**:—ह्याहि नोकऱ्यांना मंत्र्यांची बाधा होऊं नये म्हणून काळजी घेतली आहे. ह्या मुनसफांच्या जागा गव्हर्नरनें पब्लिक सर्व्हिस कमिशन व हायकोर्ट या दोघांचा सल्ला घेऊन भरावयाच्या आहेत. गव्हर्नरनें पब्लिक सर्व्हिस कमिशन व हायकोर्ट यांच्या सल्ल्यानें या जागांना कोण लायक आहे याबद्दल नियम करावयाचे आहेत. हे नियम केल्यावर पब्लिक सर्व्हिसच्या सदस्यांनीं उमेदवारांची गव्हर्नर सांगेल तर चांचणी घ्यावयाची आहे. ह्या चांचणीनंतर गव्हर्नरनें या नेमणुका करावयाच्या आहेत. त्यांतहि पुनः जातवारी पहावयाची आहे. या मुनसफांचा पगार, रजा, बढती, ठिकाण यासंबंधींचे सर्व अधिकार हायकोर्टाकडे आहेत. या बाबतींत अन्याय झाल्यास त्यांना अपील करण्याचा अधिकार आहेच.

**मॅजिस्ट्रेट**—मॅजिस्ट्रेटचे अधिकार कोणाला द्यावेत, ते अधिकार वाढवावेत कां कमी करावेत या संबंधीचे हुकूम डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटला

विचारल्याशिवाय काढूं नयेत. पण या कलमांत त्यांच्या नेमणुकां-बद्दल कांहींच सांगितलें नाहीं. कांहींच्या मतानें कायद्यांत ही भयंकर चूक राहिली आहे. पण जोंपर्यंत त्यासंबंधीं कांहीं नियम नाहीं, तोंपर्यंत त्याचा अर्थ सोईप्रमाणें करावा. कदाचित् या बाबतींत गव्हर्नर व मंत्री यांच्यांत खटका उडेल.

**राजकीय खातें**—बादशहाच्या वतीनें संस्थानांत जे अधिकारी कायमचे नेमले आहेत त्यांना वरील नोकरांचे नियम लागू नाहींत. त्यांची नोकरी केव्हां संपावयाची हेंहि बादशहाच्या मर्जीवर आहे. जे सध्यां नोकरीवर आहेत, त्यांना कोणत्याहि प्रकारचा प्रतिबंध केला नाहीं. या नोकऱ्या खुद्द बादशाही असल्यामुळें त्या नोकरांना अधिक सवलती व हक्क मिळण्याचा संभव आहे.

**विद्यमान नोकर**:—प्रांतिक स्वायत्तता अंमलांत येण्यापूर्वी मध्यवर्ती नोकरी वर्ग १,२, रेल्वे नोकरी वर्ग १,२व प्रांतिक नोकरी यांमध्यें असलेल्या नोकरांच्या जागा जर त्या नोकरांवर अनिष्ट परिणाम होणार असतील तर रद्द करतां येणार नाहींत.या नोकऱ्या केव्हां रद्द करतां येतील हेंहि सांगितलें आहे. ग. जनरल वैयक्तिक निर्णयानें फेडरेशनच्या कारभारांतील जागा रद्द करूं शकतो. तसेंच गव्हर्नरहि करूं शकतो. मध्यवर्ती नोकऱ्या वर्ग १, रेल्वे नोकऱ्या वर्ग १ आणि प्रांतिक नोकऱ्या यांचे पगार, भत्ते किंवा पेन्शन यांच्यांत जर कांहीं काटछाट करावयाची असेल तर ती ग.जनरल किंवा गव्हर्नर यांच्या वैयक्तिक निर्णयाशिवाय कोणी करूं शकणार नाहीं. जर अशा नोकरांची नेमणूक सेक्रेटरी ऑफ स्टेटनें कौन्सिलच्या संमतीनें केली असेल तर वरील अधिकार ग. जनरल किंवा गव्हर्नरला नसून स्टेटसेक्रेटरीला स्वतःला प्राप्त होणार आहेत.

एकंदर नोकऱ्यांचे प्रकार १९३० सालीं ६ केले आहेत. १ ल्या प्रकारांत १० जातींच्या नोकऱ्या आहेत. त्यांना ऑल इंडिया सर्व्हिसेस् म्हणतात. त्या भारतमंत्री भरतो. दुसरा प्रकार मध्यवर्ती नोकऱ्या वर्ग १ चा, त्यांत २० जाती आहेत. त्या हिंदुस्थानसरकारच्या ताब्यांत आहेत. मध्यवर्ती नोकऱ्या वर्ग २ या गव्हर्नर जनरल कौन्सिलच्या सल्ल्यानें भरतो. त्या ग. जनरल इन कौन्सिलच्या किंवा चीफ कमिशनरच्या नियंत्रणाखालीं आहेत.

यांशिवाय बाकीच्या तीन जाती गव्हर्नरच्या ताब्यांत आहेत' (१) प्रांतिक (२) खास (३) कनिष्ठ. अशा प्रकारें फेडरल मंत्रिमंडळ हें वर्ग २ च्या बाबतींत नियम करूं शकतें. ऑल इंडिया सर्व्हिसेस् सोडून बाकीच्या नोकऱ्यासंबंधींचे नियम ग. जनरलच्या संमतीनें त्यांना करतां येतात. तसेंच प्रांतिक मंत्रिमंडळ हें खास व कनिष्ठ नोकऱ्यांत वाटेल ते नियम करूं शकतें आणि गव्हर्नरच्या संमतीनें प्रांतिक नोकऱ्यांतहि बदल करूं शकतें.

१ एप्रिल १९२४ पूर्वी ज्यांची नेमणूक स्टेट सेक्रेटरी इन कौन्सिलशिवाय दुसऱ्या कोणी केली असेल, आणि ती नोकरी त्या तारखेपासून तों ह्या कायद्याचा हा भाग अंमलांत येईपर्यंत जर वरिष्ठ नोकरीच्या सदरांत मोडत असेल तर त्या नोकरांचे पगार फेडरेशन किंवा प्रांत यांच्यावर, ते जेथें काम करतील त्याप्रमाणें पडेल. सेक्रेटरी ऑफ स्टेटनें पुष्कळशा वरिष्ठ व किरकोळ नोकऱ्या निर्माण केल्या व त्या आतां या सदरांत घालून देण्यांत आल्या. त्यांतील कांहीं नोकऱ्या उदाहरण म्हणून देऊं. खाणी, पुराणवस्तु, कोळसेखातें, प्राणी, भूगर्भ, हवाखातें, वगैरे किरकोळ आणि सिव्हिल, पोलिस, जंगल, शिक्षण, शेतकी, वैद्यक वगैरे मुख्य मुख्य

खात्यांत नव्या जागा निर्माण केल्या. या सर्व नोकऱ्यांचा खर्च प्रांत व फेडरेशनवर लादण्यांत आला आहे; पण त्यांचें पेन्शन फेडरेशनवर आकारण्यांत येणार आहे. १ एप्रिल १९२४ पूर्वी सेवानिवृत्त झालेल्यांचें पेन्शनहि फेडरेशनवर टाकलें आहे. प्रांतिक स्वायत्तता अमलांत आल्यामुळें जे घाबरून सेवानिवृत्त झाले, त्यांचें पेन्शन प्रांत किंवा फेडरेशननें द्यावयाचें आहे.

## किरकोळ.

सेक्रेटरी ऑफ स्टेटला वर जी सत्ता नोकऱ्यांच्या बाबत दिली आहे, ती त्यानें आपल्या सल्लागारांच्या संमतीनें अंमलांत आणावयाची आहे. नोकऱ्यांशिवाय इतर बाबींत भारतमंत्र्याला कोणाचाहि सल्ला घेण्याची कायदेशीर जरुरी नाहीं.

ब्रिटिश प्रजाजन नसलेल्या कोणाहि गृहस्थाला सरकारी अधिकारी होतां येईल. एखादा संस्थानिक किंवा फेडरेशनमध्यें आलेल्या संस्थानचा प्रजाजन, किंवा फेडरेशनमध्यें न आलेल्या पण ग. जनरलनें निर्देश केलेल्या संस्थानचा प्रजाजन, किंवा विशिष्ट मागासलेल्या टापूंतील रहिवासी यांना ह्या जागा मिळतील असें ग. जनरलला जाहीर करतां येतें. तसेंच प्रांताचा गव्हर्नर आपल्या प्रांतांत वरील लोकांना जागा देऊं शकेल.

सेक्रेटरी ऑफ स्टेट हा हिंदी संस्थानांतील अमुक प्रजाजनाला, किंवा मागासलेल्या टापूंतील अमुक(जातीच्या)रहिवाश्याला सिव्हिल सर्व्हिसमध्यें घ्यावें असें सांगू शकेल. त्याची स्टेट सेक्रेटरीनें नेमणूक केल्यावर त्याला हिंदुस्थानांत कोठेंहि नोकरीकरतां नेमतां येईल.

पण वर निर्दिष्ट केलेल्या लोकांशिवाय दुसऱ्या कोणालाहि ह्या

जागा मिळणार नाहींत. जपान, जर्मन, फ्रेंच वगैरे लोक जर सिव्हिल सर्व्हिसमध्यें येऊं म्हणतील तर त्यांना परवानगी नाहीं. तथापि त्याहि बाबतींत थोडी पळवाट ठेवली आहे. हंगामी नोकऱ्या ब्रिटिश प्रजाजन नसलेल्यांना देतां येण्याची सोय कायद्यांत आहे.

स्त्रियांनाहि या नोकऱ्या मिळूं शकतील. लिंगभेद हा नोकऱ्यांच्या आड येणार नाहीं. पण गव्हर्नर, ग. जनरल किंवा भारत-मंत्री यांनीं जर खास खलीता काढला व स्त्रियांना अमुक जागा मिळणार नाहींत असें स्पष्टपणें जाहीर केलें तरच त्यांना त्या जागा मिळणार नाहींत. संयुक्त किंवा जोड नोकऱ्यांनासुद्धां परवानगी दिली आहे. एकच अधिकारी प्रांताचा व फेडरेशनचा कारभार पाहूं शकेल. मात्र त्याकरतां प्रांत व फेडरेशन यांच्यामध्यें करार व्हावे लागतील.

## पब्लिक सर्व्हिस कमिशन

जबाबदार फेडरेशनमध्यें अगर प्रांतिक स्वायत्ततेमध्यें नोकऱ्या भरण्याची सत्ता गव्हर्नर, ग. जनरल व सेक्रेटरी ऑफ स्टेटला दिल्यानंतर बाकीच्या नोकऱ्यांत मंत्र्यांना मोकळीक आहे म्हणावें तर तेंहि नाहीं. कोणाच्या नेमणुका कराव्यात हें ठरविण्याकरतां एक प्रांतिक व दुसरें फेडरल पब्लिक सर्व्हिस कमिशन नेमण्यांत येणार आहे. हें कमिशन नवें आहे असें नाहीं. प्रांतिक स्वायत्ततेंत हें कमिशन नेमण्याचा, त्याची घटना वगैरे करण्याचा अधिकार मंत्र्यांना मिळावयास पाहिजे होता. पण तो ग.जनरल व गव्हर्नरला देण्यांत आला आहे. या प्रकारामुळें कोणत्याहि नोकराला आ पण मंत्र्यांचें कांहीं लागतो असें वाटणार नाहीं.नोकर द्यायचे गव्ह-

नरनें आणि त्यांना वागवावयाचें मंत्र्यांनीं हा प्रकार विचित्र आहे. हें पब्लिक सार्व्हिस कमिशन प्रत्येक प्रांताकरतां एक व फेडरेशन-करतां एक असें नियुक्त करण्यास कायद्यांत सांगितलें आहे. दोन किंवा अधिक प्रांत आपल्याला एकच कमिशन चालेल असें म्हणाले तर कायद्याची आडकाठी नाहीं; तसेंच सर्व प्रांतांनीं मिळून एकच कमिशन नेमलें तरीहि कायदा आड येत नाहीं. मात्र एकापेक्षां अधिक प्रांतांनीं जर एकच कमिशन नेमलें, तर कोणत्या गव्हर्नरनीं त्यांच्यावर अधिकाराची अंमलबजावणी करावयाची हेंहि करारांत नमूद केलें पाहिजे.

फेडरेशनच्या पब्लिक सार्व्हिस कमिशनला प्रांतांचेंहि काम पहा असें सांगितलें तर ते ग. जनरलच्या संमतीनें पाहूं शकतील. प्रांतिक किंवा फेडरल पब्लिक सर्व्हिसचे सभासद व अध्यक्ष अनुक्रमें गव्हर्नर व ग. जनरलनें नेमावयाचे आहेत. या कमिशनमधील निम्या सभासदांनीं तरी आपल्या नेमणुकीपूर्वी सरकारी अधिकाराची नोकरी केलेली असली पाहिजे.

या कमिशनवर किती सभासद असावेत, त्यांची मुदत किती असावी, त्यांच्या नोकरीच्या अटी काय असाव्यात यांबद्दल ग. जनरल किंवा किंवा गव्हर्नर यांनीं नियम करावे. तसेंच या कमिशनच्या नोकरांची संख्या व त्यांच्या नोकरीच्या अटी ग. जनरल व गव्हर्नर यांनीं ठरवाव्या.

फेडरल पब्लिक सर्व्हिस कमिशनच्या सभासदांची कमिशनवरील मुदत संपल्यावर त्यांना सरकारी नोकरींत रहातां येणार नाहीं. प्रांतिक कमिशनच्या अध्यक्षाला फेडरल कमिशनचे सभासद किंवा अध्यक्ष होतां येणार नाहीं; किंवा दुसऱ्या प्रांतिक

कमिशनचेंहि अध्यक्ष होतां येणार नाहीं. पण त्याला सरकारी नोकरी करतां येईल. फेडरल किंवा प्रांतिक कमिशनच्या कोणत्याहि सभासदाला सरकारी नोकरी करतां येणार नाहीं. मात्र ग. जनरल किंवा गव्हर्नर यांची खास परवानगी असेल तरच त्यांना नोकरी करतां येईल.

या कमिशनचें काम नोकरांच्या नेमणुकीकरतां परीक्षा घेण्याचें आहे. दोन प्रांतांत जर जंगलखात्यांत एकच अधिकारी नेमावयाचा असेल तर फेडरल कमिशननें त्यांना मदत करावयाची आहे. सेक्रेटरी ऑफ स्टेट, ग. जनरल किंवा गव्हर्नर यांनीं ज्या नेमणुका आपल्या विवेचक बुद्धीनें केल्या असतील, त्या नेमणुकांच्याबद्दल नियम करण्याचा अधिकार त्यांचा आहे. त्यांनीं पब्लिक सर्व्हिस कमिशनचा सल्ला अशा नोकऱ्यांच्या बाबतींत घेण्याची जरूरी नाहीं. पण सिव्हिल सर्व्हिस व सिव्हिल पोस्टमध्यें कोणत्या पद्धतीनें नोकरभरती करावी, ह्या नोकऱ्या भरतांना कोणतीं तत्त्वें अनुसरावीं; बढत्या कशा कराव्या, एका खात्यांतून दुसऱ्या खात्यांत बदल्या कशा कराव्या; या नोकऱ्यांना कोणाला लायक समजावें, याबद्दल पब्लिक सर्व्हिस कमिशनचा सल्ला त्यांनीं घ्यावा. तसेंच शिस्तीच्या सर्व बाबतींत पब्लिक सर्व्हिस कमिशनचा सल्ला घ्यावा. सरकारी नोकरी करतांना जर त्याच्यावर फिर्याद झाली व त्यानें बचाव केला तर त्याबद्दल किती खर्च द्यावयाचा; तसेंच नोकरी करीत असतां एखाद्याला इजा झाली तर त्याला पेन्शन किती द्यावयाचें याबद्दलहि पब्लिक सर्व्हिस कमिशनचा सल्ला घेतला पाहिजे. पण अमुक जातीला इतक्या नोकऱ्या हें प्रमाण जर ठरलें असेल तर पब्लिक

सर्व्हिस कमिशनला गव्हर्नर किंवा ग. जनरल यानें विचारण्याचें कारण नाहीं. तसेंच पोलिसखात्यांतील कनिष्ठ नोकऱ्यांच्या बाबींत त्यांना सल्ला विचारणें अवश्य नाहीं. फक्त या पोलिसांना जखम-इजा झाली तर पेन्शन किती द्यावें आणि त्यांच्यावर फिर्याद झाली तर पैसा किती द्यावा हें कमिशनला विचारावें.

या कमिशनला अधिक कामेंहि करावयास सांगतां येतील. मात्र त्याकरतां फेडरेशननें किंवा प्रांतिक कायदेमंडळानें ग.जनरल किंवा गव्हर्नरच्या परवानगीनें तसा कायदा पास करावयास पाहिजे.

या कमिशनच्या सभासदांचा व त्यांच्या नोकरांचा पगार,भत्ता किंवा पेन्शन हें फेडरल किंवा प्रांतिक सरकारनें द्यावयाचें आहे. त्याबद्दल सभासदांना मतें देतां येणार नाहींत.

## मागील कृत्यांबद्दल सरकारी नोकरांना अभय.

१९३० व १९३२ च्या कायदेभंगाच्या चळवळींत पोलिसांनीं अनेक थरारून सोडणारीं दुष्कृत्यें केलीं. या दुष्कृत्यांचा काळाकुट्ट इतिहास त्या त्या वेळीं प्रसिद्ध झाला आहे. केवळ पोटाकरतां हिंदी स्वातंत्र्याची चळवळ मारून टाकण्याचा जो प्रयत्न हिंदी अधिकाऱ्यांनीं केला, तो भयंकर होता. त्यांत या नोकरांनीं आपली राजनिष्ठा व्यक्त केली असेल पण आपल्या अमानुषतेचें तें प्रदर्शन होतें.

ब्रिटिश मुत्सद्यांना त्यांचा कळवळा येणें साहजिक आहे. तेव्हां हा कायदा पास झाल्यावर प्रांतांतील सत्ता मंत्र्यांच्या हातांत जाऊन ते या अधिकाऱ्यांना अगर नोकरांना शिक्षा करतील या भीतीनें त्यांनीं कायद्यांत त्याची तरतूद केली आहे.सरकारी नोकरांनीं

हा कायदा अंमलांत येण्यापूर्वी जें काय केलें असेल त्याबद्दल त्यांच्यावर दिवाणी किंवा फौजदारी दावे करूं नयेत. असे दावे करणें अपरिहार्य आहे असें वाटलें तर त्याला गव्हर्नर जनरल किंवा गव्हर्नर यांची खास परवानगी घ्यावी लागेल,अशी ती तरतूद आहे.

नवा कायदा अंमलांत येण्यापूर्वी अगर नंतर जे असे दिवाणी अगर फौजदारी खटले भरलेले असतील ते त्या त्या कोर्टांनीं काढून टाकावेत. पण जर कोर्टाला असें वाटलें कीं, फिर्यादींत नमूद केलेलीं कृत्यें हीं शुद्ध हेतूनें केलेलीं नाहींत, तर त्यांनीं ते काढून टाकूं नयेत. जे खटले काढून टाकले आहेत, त्यांचा खर्चहि दावे आणणारांकडून वसूल करावयाचा आहे आणि तो तसा वसूल झाला नाहीं तर प्रांत किंवा मध्यवर्ती सत्ता यांच्यापैकीं ज्याचा तो नोकर असेल त्या सरकारवर बसवावा. मागील दुष्कृत्यांची जशी ही निष्कृति कायद्यानें करून टाकली, त्याप्रमाणें पुढील कृत्यांबद्दल तजवीज करणें क्रमप्राप्त होऊन बसलें.

इंडियन क्रिमिनल प्रोसीजर कोडाच्या १९७ कलमांत आणि सिव्हिल प्रोसीजर कोडाच्या ८० ते ८२ कलमांत कांहीं सरकारी नोकरांना जें संरक्षण दिलें आहे तें कमी करण्याबद्दल अगर अजिबात काढून टाकण्याबद्दल जर एखादें बिल किंवा दुरुस्तीचें बिल आणावयाचें असेल तर त्याला गव्हर्नर किंवा ग. जनरल यांची आगाऊ परवानगी पाहिजे. एखाद्यावर फौजदारी खटला भरावयाचा असेल तर त्या खटल्याला मंजुरी देणें आणि कोणत्या कोर्टापुढें तो खटला चालवावा याबद्दल हुकूम सोडणें हीं

कामें ग. जनरल व गव्हर्नर यांनीं आपापल्या नोकरांच्या बाबतींत १९७ कलमाप्रमाणें वैयक्तिक निर्णयानें ठरवावीं.

एखाद्या सरकारी नोकरावर सरकारी कामाबद्दल दिवाणी दावा झाला तर त्या दाव्याचा खर्च आणि त्यांनीं भरून द्यावयास लागणारें नुकसान हें ग. जनरल किंवा गव्हर्नर यांनीं वैयक्तिक निर्णयानें ठरविल्यास त्या त्या तिजोरींतून दिलें जाईल.

न्यायाधीश, मॅजिस्ट्रेट व कांहीं स्थानिक अधिकारी यांच्या रक्षणाकरतां हें कलम आहे. कोणाहि मॅजिस्ट्रेटवर एखादा गृहस्थ सूडानें फौजदारी करूं लागला तर त्याला संरक्षण मिळणें जरूर आहे. पण एखादा मॅजिस्ट्रेट दुष्ट असला तर त्याचें हें संरक्षण गव्हर्नरनें काढून घेणें तितकेंच जरूर आहे. या संरक्षणाविरुद्ध कोणी तक्रार न केल्यामुळें त्यांत बदल केला नाहीं. वास्तविकपणें सरकारी नोकर हे जबाबदारी ओळखून वागतात असा हिंदुस्थानांत तरी दाखला नाहीं. त्यांना संरक्षण देणें म्हणजे कांहींच्या अरेरावीला, कांहींच्या उर्मटपणाला, कांहींच्या सूडबुद्धीला, कांहींच्या गैरवर्तणुकीला आणि कांहींच्या लांचखाऊपणाला संरक्षण देणें आहे. सर्वांत जर कोणावर अधिक देखरेख ठेवावयाची असेल तर लोकांचे जे नोकर म्हणवितात त्यांच्यावर. पण सरकारी नोकर हे नोकर राहिले नसून मालक बनले आहेत व त्यांना सर्व सवलती, हक्क, संरक्षणें वगैरे दिलीं जात आहेत. प्रामाणिक नोकरांना अशी संरक्षणें मिळणें जरूर आहे पण अप्रामाणिकांना मिळणें धोक्याचें आहे. याबद्दल दुरुस्ती करण्याचा अधिकार प्रांतिक कायदेमंडळाला असल्यामुळें त्यांनीं ह्या नियमांत योग्य तो बदल करावा.

यानंतर सेक्रेटरी ऑफ स्टेटनें कोणाकोणाचीं पेन्शनें हिंदुस्थानवर आकारावीं हें सांगितलें आहे. हिंदुस्थाननें ते पैसे दिले नाहींत तर सेक्रेटरी ऑफ स्टेट हिंदुस्थानच्या जमेवर इंग्लंडच्या तिजोरींतून पैसे घेऊन त्यांचीं पेन्शनें देऊं शकतो. या पेन्शनवर पुनः प्राप्ती-वरील कर आकारतां येत नाहीं. मात्र ते हिंदुस्थानांत रहात नसावेत. या पेन्शनच्या बाबतींत कायदेमंडळाला मतें देण्याचा अधिकार नाहीं.

लष्करी खात्यांतील लोकांच्या विधवांकरतां किंवा पोरक्या मुलांकरतां वरिष्ठ नोकऱ्यांतील कुटुंबाकरतां जे फंड असतात त्याची बादशहानें एक कमिशनर नेमून त्याच्यामार्फत व्यवस्था करावयाची आहे. या कमिशनरच्या हातांत ते पैसे द्यावेत व त्यानें ते वाटावेत. जर एखाद्याला ही योजना मान्य झाली नाहीं तर त्या फंडांत पैसे देणाराचे असलेले पैसे हिंदुस्थानच्या तिजोरींत जमा होतील व त्यांतून ते दिले जातील. या फंडांतून मिळणाऱ्या पेन्शनवर वारसा-कर बसवितां येणार नाहीं.

हिंदुस्थानांतील नोकरांचें भूत, वर्तमान व भविष्य अशा प्रकारें पूर्णपणें संरक्षिलें आहे. हिंदुस्थानांतील सिव्हिल सर्व्हिस ही अत्यंत बलाढ्य संस्था आहे. या नोकरशाहीनें १९१९ पर्यंत हिंदुस्थानवर राज्य केलें. आपल्यावर हिंदुस्थानच्या बऱ्यावाईटाची जबाबदारी आहे असें समजून ते वागत आले व वाटेल तेवढी सत्ताहि त्यांनीं गाजवली. १९१९ च्या सुधारणानंतर ही नोकरशाही नमली व आपल्या सत्तेचा जरा बेतानेंच उपयोग करूं लागली. तथापि नोक-रशाहीची जी पक्कड एकदां राज्यकारभारावर बसली होती, ती तेव्हांहि कमी झाली नाहीं व आजहि कमी झाल्याचीं चिन्हें दिसत

नाहींत. ज्याप्रमाणें लष्करी खात्याचा संपूर्ण ताबा ब्रिटिशांनीं आपल्या हातीं ठेवला आहे, त्याप्रमाणें दिवाणी खात्याचा ताबा या नोकरांच्या मार्फत स्वत:कडे ठेवला आहे. ब्रिटिश साम्राज्यशाहीचे ते हात व डोकें आहेत आणि त्यांच्या मनांत आलें तरच ते एकादी राज्य-घटना यशस्वी करूं शकतील अगर ती मोडूं शकतील. लोकांमार्फत निवडून आलेल्या मंत्र्यांच्या ताब्यांत कितीहि सत्ता दिली, तरी त्या सत्तेची अंमलबजावणी जोंपर्यंत ब्रिटिश सरकारच्या विश्वस्तांकडून होत राहील तोंपर्यंत राजकारणाला या नोकरांच्या ओंजळीनें पाणी पीत रहावें लागेल.

या नोकऱ्यांचें हिंदीकरण करा असासारखा आग्रह चालला असतां, त्यांच्याच ली कमिशनच्या शिफारसी तेच अंमलांत आणीत नाहींत. वास्तविकपणें या हिंदी नोकरांचे पगार जर कायम राहणार असतील व त्यांची नेमणूक स्टेट सेक्रेटरी करणार असेल तर या हिंदीकरणाला अर्थहि नाहीं. हिंदी सिव्हिल सर्व्हंट हा इंग्लिश सिव्हिल सर्व्हंटापेक्षां कमी अरेराव असतो असें समजण्याचें कारण नाहीं. पण नोकर कोणीहि असो, त्याच्यावर ताबा कोणाचा हा खरा प्रश्न आहे.

ली कमिशननें १९३९ सालीं या नोकऱ्यांत निम्मे हिंदी व निम्मे यूरोपीअन लोक होतील असें म्हटलें होतें. पण अलीकडे या चढाओढीच्या परिक्षेंत इंग्लिश लोक कमी कमी येऊं लागले म्हणून सेक्रेटरी ऑफ स्टेटनें १९३६ सालीं बिनपरिक्षेनेंच ब्रिटिश युनिव्हर्सिटींतील ग्रॅज्युएट्सना नोकऱ्या दिल्या. ही नोकरांच्या नॉमिनेशन्सची नवी पद्धत हिंदी लोकांना पसंत नाहीं. पण निम्में निम्में

प्रमाण करण्याच्या सबबीखालीं अशा आडमार्गाच्या नेमणुका पसंत केल्या जातात.

या नोकऱ्यांत किती तरी भानगडी आहेत. त्यांत इंग्लिशांना मोकळें कुरण आहे, अँग्लो इंडियन्सना रेल्वे व पोस्ट राखून ठेवलीं आहेत, निरनिराळ्या जातींना तुमचे इतके लोक घेतले जातील असें सांगितलें आहे, पुनः कांहीं नोकऱ्या गव्हर्नर, गव्हर्नर जनरल, स्टेट सेक्रेटरी यांच्या हातांत आहेतच. जर कोणाच्या हातांत नोकऱ्या नसतील तर त्या लोकप्रतिनिधींच्या.

हिंदुस्थानांतून गेलेल्या शिष्टमंडळानें या नोकऱ्या ग. जनरलच्या हातांत ठेवाव्या असें प्रतिपादन केलें! जणूं काय सेक्रेटरी ऑफ स्टेटपेक्षां ग. जनरल कोणी निराळा आहे.

ह्या नोकऱ्यांकरतां ५७ कोटी रुपये खर्च होतात. या ५७ कोटींपैकीं १६ कोटी रुपये मध्यवर्ती नोकऱ्याकरतां व ४१ कोटी रुपये प्रांतांतील नोकऱ्याकरतां खर्च होतात.* यांत लष्करी नोकरांचा पगार धरला नाहीं, तसेंच रेल्वेचाहि धरला नाहीं. हिंदुस्थानांत एकंदर बजेटाच्या रकमा स्थूल मानानें खालील प्रमाणें आहेत. मध्यवर्ती सरकारची रेल्वे सोडून जमा ९० कोटी व प्रांतांची ८० कोटी आहे. रेल्वेचें एकंदर उत्पन्न १०० ( १९३८–३९ ) कोटी आहे. त्यांपैकीं अंदाजे १५ कोटी रुपये पगारावर खर्च होतात. पगार इतर खर्चवेच वजा जातां रेल्वेकडून मध्यवर्ती सरकारला ३० कोटी रुपये मिळतात व जवळजवळ तितकीच रक्कम व्याज म्हणून खर्चीं पडते. तेव्हां प्रांतिक सरकार-

* १९३०–३१ मध्यवर्ती कायदेमंडळांतील अर्थमंत्र्यांचें बजेटावरील भाषण.

च्या नोकऱ्यांचा खर्च ४१ कोटि, मध्यवर्ती सरकारचा सैन्य सोडून १६ कोटी, रेल्वे १५ कोटी असे एकंदर ७२ कोटी पगाराकरतां खर्च होतात. सैन्याच्या ५० कोटी बजेटापैकीं, ३० कोटी रुपये पगारावर खर्च होतात असें धरलें तर हिंदुस्थानच्या एकंदर २७० कोटी जमेपैकीं,१०० कोटी पगारावर खर्च होतात असें म्हणावयास हरकत नाहीं. या १०० कोटींपैकीं यूरोपियनांच्या पगारांवर नक्की किती खर्च होतात हें सांगणें कठीण आहे. पण हा आंकडा ४० कोटींपेक्षां खास कमी नसावा.*

प्रांतावर जो या नोकऱ्यांचा खर्च पडतो, तो प्रांतांच्या जमेच्या शेंकडा ४० इतका जवळजवळ पडतो असें जॉइंट पार्लमेंटरी कमिटीनेंहि (३१६ प्यारा पहा) त्यांना पुरविलेल्या माहितीवरून मान्य केलें आहे. सर जॉर्ज शूस्टर यांनीं हा आंकडा ४१ कोटी आहे, असें म्हटलें आहे. तेव्हां ४० ते ५० टक्के इतका साधारण बोजा सरासरीनें प्रांतांना नोकऱ्यांकरतां उचलावा लागतो. मोठ्या प्रांतांत हें प्रमाण कमी होईल पण लहान प्रांतांत तें जास्त होईल. ह्या नोकऱ्यांकरतां जो हा अवाढव्य खर्च होतो, तो जर कमी केला तर हिंदुस्थानला कमींतकमी २०-२५ कोटी रुपये वांचवतां येतील. नोकऱ्यांचें हिंदीकरण केलें तर ही गोष्ट सहज शक्य होईल. कारण आपल्याला अमुकच पगार मिळाला पाहिजे ही अट यूरोपीअन सिव्हिल सर्व्हंटांची आहे; हिंदी लोकांची नाहीं. तेव्हां व्हाइटपेपरमध्यें म्हटल्याप्रमाणें नव्या सुधारणा अंमलांत

*प्रो. के. टी. शहा यांनीं वरिष्ठ नोकऱ्यांचा खर्च १००कोटी धरला आहे. पण तो बरोबर असावा असें वाटत नाहीं. एकंदर नोकऱ्यांचा खर्च १०० कोटी होईल व त्यांतील ७० कोटी वरिष्ठ नोकऱ्यांवर खर्च होत असतील असें आम्हांस वाटतें.

आल्यानंतर पांच वर्षांनीं ह्या नोकऱ्यांची फेरतपासणी केली पाहिजे. अर्थात् फेडरेशनचा डाव जर उलथून पडला तर हा प्रश्न लवकर चर्चेला निघेल आणि त्यांत काटकसर करतां येईल.

हिंदुस्थानांत १९३३ सालीं २१९३ यूरोपीअन्स व १२२७ हिंदी लोक अखिल भारतीय नोकऱ्यांत होते. यांपैकीं, सिव्हिल सर्व्हिसमध्यें अनुक्रमें ८१९ व ४७८; पोलिस ५०५ व १५२; जंगल २०३ व ९६; एंजिनीअरिंग ३०४ व २९२; मेडिकल २०० व ९८; शिक्षण ९६ व ७९; शेतकी ४६ व ३० व पशुरोगनिवारण २० व २ असे होते. १९३९ सालीं हें प्रमाण बदलणार आहे.

सिव्हिल सर्व्हिसच्या बाबतींत थोडासा उल्लेख करणें जरूर आहे. इंग्लंडमधील विद्यार्थी हे या परिक्षांना अलीकडे बसेनासे झाले आहेत. बसलेच तर जितक्या जागा असतात त्यांपेक्षां कमी बसतात.पण सेक्रेटरी ऑफ स्टेटला एका ठराविक प्रमाणांत युरोपीअन सिव्हिलिअन्स घ्यावे लागतात. १९३६ सालीं ब्रिटिश युनिव्हर्सिटींतील कांहीं विद्यार्थी परीक्षा न घेतां या नोकऱ्यांत भरण्यांत आले हें वर सांगितलेंच आहे. जी प्रथा सेक्रेटरी ऑफ स्टेटनें पाडली आहे ती असमर्थनीय असली तरी तिचा अंमल हिंदी नोकरांच्या बाबतींत करण्यास अडचण नसावी. विलायतेंतील वातावरणांत दोन वर्षें घालविणें व तेथील जबर खर्च सोसणें यांऐवजीं साऱ्याच नोकऱ्या हिंदुस्थानांतील युनिव्हर्सिटींतून हुषार विद्यार्थी नेमून त्यांच्याकडून भरण्यांत याव्या. पाहिजे तर अशा विद्यार्थ्यांची येथें परीक्षा घ्यावी. पण विलायतच्या यात्रेचा हा फार्स बंद करावा.

तेव्हां या नोकऱ्यांचा फेरविचार करणें अत्यंत जरूर झालें

आहे. आमच्या पारतंत्र्याची आठवण करून देण्याकरतां येणारे हे गोरे नोकर बंद करणें अपरिहार्य आहे. गोऱ्या नोकरांना भिऊन वागण्याचे दिवसहि आतां उरले नाहींत. त्यांनाहि हिंदी प्रधानमंडळाच्या हाताखालीं अपमानानें केवळ पैशाकरतां दिवस कंठणें कठिण होत आहे. कारण दिवसेंदिवस कायद्यांत असो किंवा नसो, या गोऱ्या अधिकाऱ्यांचा दर्जा व दरारा कायम रहाणें शक्य नाहीं. मंत्रिमंडळाच्या हाताखालीं काम करतांना त्यांची पूर्वीची इभ्रत कोसळून पडलीच आहे. त्यामुळें पहिल्या दर्जाचा स्वाभिमानी यूरोपीअन हिंदुस्थानांत नोकरीकरतां यावयास तयार होणार नाहीं. आलेच तर कमी बुद्धिमत्तेचे व स्वाभिमानशून्य नोकर येथें येतील. अशाप्रकारें दोघांच्याहि दृष्टीनें सिव्हिल सर्व्हिसची परीक्षा बंद करणें व युरोपीअन नोकरांना ठराविक प्रमाणांत घेण्याची सक्ति दूर करणें आवश्यक झालें आहे.

---

# २२

# हिंदुस्थानच्या संरक्षणाचा प्रश्न

हा प्रश्न सर्वस्वीं ग. जनरलच्या हातांत दिला असल्यामुळें त्याबद्दल बोलायला अगर टीका करायला जागाच ठेवली नाहीं. पुष्कळांना अशी भीति वाटते कीं, इंग्रजांच्या युद्धकलानैपुण्याचा फायदा जर हिंदुस्थानला मिळाला नाहीं तर हिंदुस्थान दुसऱ्या एखाद्या सत्तेकडून जिंकला जाईल.पण ही भीति व्यर्थ आहे.आजच्या इतपत हिंदुस्थानचें रक्षण करण्याला हिंदुस्थान लायक आहे. इंग्रजांच्या नांवाचा दरारा सोडला तर आजचें हिंदी सैन्य काय लायकीचें आहे? जर्मनी, इटली, रशिया यांच्या तोडीचें आमचें सैन्य आहे काय ? जेथें इंग्लंडला स्वतःच्या सैन्याच्या कार्यक्षमतेबद्दल खात्री नाहीं, तेथें भिकार बंदुका व कुचकामी तोफा असलेलें हिंदी सैन्य जगाच्या पहिल्या अगर दुसऱ्या दर्जाच्या सैन्याशीं तुलना करतां काय किंमतीचें ठरेल हें सांगावयास नको. हिंदुस्थानला सैन्य, आरमार, वैमानिक दल सर्वांची जरुरी आहे व त्याकरतां पैसा खर्च करण्यासहि मागेंपुढें पाहिलें जाणार नाहीं. पण परावलंबनाचा आतां वीट आला आहे. मागासलेलीं राष्ट्रें जर या सर्व युद्धाच्या अंगोपांगांनीं सुसज्ज होऊं शकतात तर आम्हींच तेवढें इंग्रजांच्या तोंडाकडे पहात राहूं व त्यांची संरक्षणाकरतां गुलामी पत्करूं असें नाहीं. पण ब्रिटिश सरकारनें नव्या घटनेंत हिंदुस्थानला सैन्याचे अधिकार बिलकूल

दिले नाहींत. तेथें शिष्टाईकरतां गेलेल्यांनीं सर्व ताबा नसला तरी कांहीं ताबा, निदान आमचा प्रतिनिधि, आमचा सल्ला तरी विचारावा म्हणून खूप प्रयत्न केले. पण त्यांच्या प्रयत्नाला यश आलें नाहीं. लष्करचा संपूर्ण ताबा हा गव्हर्नर जनरलकडे दिला गेला.

ह्या सैन्याच्या प्रश्नाबद्दल जॉइंट पार्लमेंटरी कमिटीनें सर्वांचा भ्रमनिरास केला आणि ब्रिटिश इंडियन डेलिगेशनच्या सर्व सूचना युक्तिप्रयुक्तीनें उडवून लावून आपलें म्हणणें खरें कलें.

व्हाइटपेपरनें सर्व राखीव खात्यांची व्यवस्था ग. जनरलकडे सोपविली होती. तो सेक्रेटरी ऑफ स्टेटला म्हणजे पार्लमेंटला जबाबदार रहाणार असें यावरून निष्पन्न होतें. त्यानें या खात्यांचा कारभार तीन सल्लागार नेमून करावा असें म्हटलें.

जॉइंट पार्लमेंटरी कमिटीला त्याचेंच विस्तारानें विवरण करण्यापलिकडे व आपलेंच म्हणणें खरें आहे असें दाखविण्यापलिकडे कांहीं करावयाचें नव्हतें. बाहेरच्या शत्रूपासून व अंतर्गत बंडाळीपासून हिंदुस्थानचें रक्षण करण्याची जबाबदारी ग. जनरलशिवाय कोण घेऊं शकेल असें ते विचारतात. पार्लमेंटला ऐट तर मारावयाची आहे जबाबदारीची; पण एका कारभारांत दोन जबाबदार सत्ता नांदणें म्हणजे दुपाखी (Diarchy) राज्यव्यवस्था सुरू करणें होतें. त्यावर ते म्हणतात यांत दुपाखी कारभार नाहीं. या पद्धतींशिवाय दुसरी आणखी कोणती चांगली पद्धत असणार असा त्यांचा सवाल आहे. " प्रश्न हिंदुस्थानच्या रक्षणाचा आहे आणि तो हिंदुस्थानसरकारवर पुष्कळ काळ तरी सोपवून चालणार नाहीं. आतां तुम्हाला दोहाती कारभार आहे असें म्हणावयाचें असेल तर म्हणा. पण पद्धत कशीहि असली तरी

सैन्यावरील ग. जनरलची सत्ता अणुमात्रहि कमी होतां कामा नये. बादशहानें हिंदी संस्थानिकांच्या रक्षणार्चीहि जबाबदारी उचलली आहे. तेव्हां त्या बाबतींत ढिलाई उपयोगी नाहीं. "

रेल्वे, प्रांत वगैरे सर्वांवर संकटकालीं ग. जनरलची सत्ता चालली पाहिजे. इतर सर्व खात्यांनीं त्याला मदत केली तर ठीकच, नाहींतर तो आपले जादा अधिकार चालवील. ग. जनरल व मंत्री यांच्यामध्यें भांडणतंटे होऊं नयेत म्हणून हिंदी प्रतिनिधींनीं एक हिंदुस्थानच्या रक्षणाकरतां स्टॅटयूटरी कमिटी नेमावी अशी सूचना केली होती. पण ही कायदेशीर कमिटी ग. जनरलच्या हक्कांवर आक्रमण करील व कधीं कधीं त्याच्या मार्गांत विघ्न आणील अशी सबब सांगून ही सूचना धुडकावून लावली. त्याऐवजीं एक सल्लागारमंडळ ग. जनरलनें नेमावें अशी जॉ. सि. क. नें शिफारस केली.

१९१९ च्या कायद्याप्रमाणें ग. जनरलच्या कौन्सिलमध्यें असणारे हिंदी सभासद लष्करी धोरण ठरविण्याचे प्रसंगीं थोडेफार त्या धोरणाला वळण लावूं शकतात. पण नव्या कायद्यांत हें खातें सर्वस्वीं ग. जनरलकडे दिल्यानें असलेला हा तुटपुंजा हक्कहि काढून घेतला जाईल अशी भीति हिंदी सभासदांनीं व्यक्त केली. त्याकरतां त्यांनीं खालील तीन सूचना केल्या. (१) संरक्षणखात्याचा जो ग. जनरलचा सल्लागार असेल तो बिनसरकारी हिंदी गृहस्थ असावा; तो कायदेमंडळाचा किंवा संस्थानातर्फे आलेला सभासद असावा (२) सध्यां अर्थमंत्र्यांचा ताबा आहे तसाच चालू रहावा (३) सैन्याच्या धोरणाचे सर्व प्रश्न मंत्री व सल्लागार या दोघांनीं मिळून ठरवावेत. त्यांच्यांत मतभेद झाल्यास ग. जनरलचा शब्द शेवटचा मानावा.

या कमिटीनें या तीनहि सूचनांची वासलात कशी लावली हें आपण पाहूं. (१) ग. जनरलनें अमुकच गृहस्थ नेमला पाहिजे असें बंधन त्याच्यावर कां ? त्याला योग्य वाटेल तो मनुष्य त्यानें नेमावा. (२) सैन्याचे हिशेब व सैन्याचा पैसा हीं खातीं आर्थिक खात्याच्या अधिकाराखालींच आहेत. पण सैन्यखातें हें राखीव केल्यानंतर, त्याचा पैसा व हिशेब हा सैन्यखात्याच्या ताब्यांत आला पाहिजे. म्हणजेच सैन्यावरील आर्थिक खात्याचा ताबा उडवला पाहिजे. तिसऱ्या प्रश्नाबद्दल ही कमिटी असें सांगते कीं, ग. जनरलच्या आज्ञापत्रकांत सैन्याचें बजेट कायदेमंडळाला सादर करण्यापूर्वी तें मंत्रिमंडळाला दाखवावें, अशी शुभ्रपत्रिकेंतील योजना आहेच. ही कमिटी धोरणाबद्दल मंत्रिमंडळाचा सल्ला घ्यावा या सूचनेला बगल देऊन फक्त खर्चाबद्दल मंत्रिमंडळाशीं विचारविनिमय करावा असें म्हणून स्वस्थ बसली आहे. तेव्हां सध्यांचे लष्करी खात्यासंबंधी जे अधिकार आहेत ते साफ उडवून दिले आहेत. फेडरेशन प्रतिगामी कां आहे याचें हें उत्कृष्ट उदाहरण आहे.

## हिंदुस्थानचें सैन्य बाहेरदेशीं

हिंदुस्थानचें सैन्य बाहेरदेशीं पाठवावें किंवा नाहीं व पाठविल्यास त्याचा खर्च कोणीं करावा ह्या प्रश्नाचें उत्तर जॉ.सि. क. नें दिलें आहे. १९३० सालीं हिंदुस्थानवरील कर्जाच्या प्रश्नाचा विचार करण्याकरतां कॉंग्रेसनें श्री. बहादूरजी यांच्या अध्यक्षतेखालीं जी कमिटी नेमली होती, तिनें मागील सर्व बाहेरदेशीं केलेल्या युद्धांचे खर्च नाकारले होते. हीं युद्धें ब्रम्हदेश, अफगाणिस्थान, चीन वगैरे देशांबरोबर झालीं होतीं. जॉ. सि. क. नें बाहेरदेशीं

सैन्य पाठविण्याबद्दल ग. जनरलला संपूर्ण अधिकार दिले नाहींत ही खरोखर मेहेरबानीच म्हणावयाची. ग. जनरलनें त्याबद्दल मंत्रिमंडळाचा सल्ला घ्यावा असें सांगितलें आहे. पण बाहेरदेशीं हें सैन्य पाठविण्यांत हिंदुस्थानचें रक्षण होणार आहे असें ग. जनरलला वाटलें तर त्यानें हा सल्ला मानण्याचें कारण नाहीं. तसेंच पैशाबद्दल. हिंदुस्थानचा पैसा हिंदुस्थानांतच खर्च करावयाचा असल्यामुळें बाहेरदेशीं पाठविलेल्या या सैन्याचा खर्च (तें सैन्य जर हिंदुस्थानच्या रक्षणाकरतां व्यापक अर्थानें जात नसेल तर) हिंदुस्थानवर लादूं नये. त्याकरतां हिंदुस्थाननें देणगी द्यावी. मात्र ती देणगी संयुक्त कायदेमंडळानें मंजूर करावयास हवी. प्रांतांनाहि अशी देणगी देण्यास हरकत नाहीं. हिंदुस्थानचें सैन्य बाहेरदेशीं गेलें तर त्याचा खर्च हिंदुस्थानवर लादू नये हें खरें. पण बाहेर असेंपर्यंत त्यांचा पगार कोणी द्यावयाचा ह्या प्रश्नाचा उलगडा केलेला नाहीं. बाहेर गेलेल्या सैन्याचा पगार हाहि बाहेरच्या खर्चांत धरला पाहिजे.

### हिंदीकरण.

सैन्याचें हिंदीकरण करण्याबद्दल अनेकांनीं अनेक प्रयत्न केले. कांहीं कमिट्या, कांहीं कमिशनेंहि त्याकरतां नेमलीं गेलीं. या कमिटीपैकीं कांहींनीं ३० वर्षांत, कांहींनीं ६० वर्षांत हिंदीकरण करावें अशा सूचनाहि केल्या. पण या सर्व सूचना नव्या कायद्यानें गारद करून टाकल्या. आज नक्की हिंदीकरण केव्हां होईल याबद्दल ठाम योजना नाहीं.* मात्र ग. जनरलच्या आज्ञापत्रकांत

* सप्टेंबर १९३८ मध्यें मध्यवर्ती कायदेमंडळांत सैन्याचें हिंदीकरण ताबडतोब करावें असा ठराव आला असतां सरकारतर्फे अनुकूल अगर प्रतिकूल मत व्यक्त न देतां तो पास झाला.

' हिंदुस्थानच्या रक्षणाचा प्रश्न हा एकट्या युनायटेड किंगडमचा नसून तो वाढत्या प्रमाणांत हिंदुस्थानचा प्रश्न आहे ' ह्या गोष्टीला कबूली दिली आहे. ब्रिटिशांवर वचनभंगाचा आरोप जेव्हां केला जातो, तेव्हां त्याला अशीं कारणें असतात. इतक्या कमिट्या नेमून ब्रिटिशांनीं अमुक वर्षांत हिंदीकरण करतों अशीं वचनें कां दिलीं व तीं कां मोडलीं याचा खुलासा कोठेंहि नाहीं. हिंदीकरणाचा प्रश्न फार महत्त्वाचा, फार व्यावहारिक आहे असें तेव्हां त्यांना वाटलें नव्हतें. फक्त नव्या सुधारणांच्या वेळीं त्यांना याची आठवण झाली. ते म्हणतात १९३१ च्या योजनेप्रमाणें एक विभाग हिंदी करण्याचा आमचा प्रयोग चालूंच आहे. तो यशस्वी झाल्यावर पुढें बघूं. पोक्तपणाचा व शिष्टपणाचा आव आणून त्यांनीं ब्रिटिशांनाहि बजावलें आहे कीं, लक्षांत ठेवा तुम्ही म्हणाल सैन्याचें हिंदीकरण करावयाचें नाहीं. पण ती कांहीं सोवळी बाब नाहीं. आज ना उद्यां हिंदीकरण करावेंच लागेल !

## खर्च व अधिकार.

बादशहा ठरवील तो सर सेनापति व इतर अधिकारी यांचा खर्च हिंदुस्थाननें दिला पाहिजे. सैन्यांतील कॅप्टन, मेजर, कर्नल, मार्शल वगैरे अधिकार कोणाला द्यावयाचे हेंहि बादशहाच ठरवील. तसेंच आरमार व वैमानिक दलांतील अधिकारीहि बादशहाच नेमील.

आज्ञापत्रकांत हिंदी सैन्यावरील हिंदी अधिकारी नेमतांना व हिंदी सैन्य परदेशीं पाठवितांना सर्वसामान्य धोरण काय असावें हें ठरविण्यापूर्वीं मंत्र्यांचीं मतें अजमवावींत, एवढी मोठी सूचना ग.

जनरलला दिली आहे. याशिवाय मंत्रिमंडळ व ग. जनरलचे सल्लागार यांची संयुक्तमतें समजावून घ्यावींत असाहि अधिकार त्याला दिला आहे. हिंदुस्थानची अपेक्षा आणि त्यांच्यापुढें टाकलेले हे तुकडे यांचें प्रमाण कसें काय जुळतें याचा विचार तज्ञांनींच करावा. सामान्य माणसांना एवढेंच कळतें कीं, सैन्याच्या बाबतींत हिंदुस्थानच्या हातीं यत्किंचित् सत्ता नाहीं व या कायद्यानें येणारहि नाहीं.

या बाबतींत म. गांधीइतकें स्पष्ट, सडेतोड व स्वाभिमानी भाषण कोणींच केलें नाहीं. महात्मा गांधीनीं १७ नोव्हेंबर १९३१ रोजीं फेडरल स्ट्रक्चर कमिटीपुढें हिंदुस्थानच्या संरक्षणाविषयीं भाषण करतांना कॉंग्रेसचें म्हणणें जें मांडले तें थोडक्यांत असें आहेः—' कॉंग्रेसला संरक्षण व परराष्ट्रीय राजकारण यांची जबाबदारी हिंदुस्थानवर पूर्णपणें टाकली जावयास पाहिजे आहे. ज्या राष्ट्रावर ही जबाबदारी टाकली नसेल, तें राष्ट्र जबाबदार राष्ट्र आहे असें म्हणतां यावयाचें नाहीं.कॉंग्रेसला सैन्य, संरक्षण व परराष्ट्रीय संबंध यांवर पूर्ण ताबा हवा आहे.

' सध्यांचें सैन्य हें (' आर्मी ऑफ ऑक्युपेशन ') जिंकलेला देश ताब्यांत ठेवणारें सैन्य आहे. त्यांत शीख असोत, पठाण असोत, गुरखे असोत, रजपूत असोत किंवा मद्रासी असोत हे सर्वजण आम्हांला परके आहेत. ब्रिटिश शिपायांशिवाय सुद्धां सैन्याचा ताबा घेणें ही गोष्ट महत्त्वाची आहे, ह्याची मला जाणीव आहे. पण आम्ही ही जबाबदारी घेतलीच पाहिजे.

'हिंदुस्थानांत ब्रिटिश सैन्य कां ठेवण्यांत आलें आहे? हिंदुस्थानांतील लहान मूलसुद्धां सांगू शकेल कीं, हिंदी सैन्याबरोबर ब्रिटिश सैन्य ठेव-

ण्याचा उद्देश हिंदुस्थानावर होणाऱ्या परक्यांच्या स्वारीला अटकाव किंवा प्रतिकार करण्याचा निव्वळ नसून ब्रिटिशांचें हितरक्षण करण्याचा आहे....या सैन्याचा तिसरा उद्देश म्हणजे ब्रिटिशांच्या अधिकाराविरुद्ध होणारें बंड मोडून टाकण्याचा आहे..... निर-निराळ्या हिंदी शिपायांमध्यें समतोलपणा राखावा हाहि ब्रिटिश सैन्य ठेवण्याचा हेतू आहे.

'सर तेजबहादूर सप्रू किंवा पं. मदन मोहन मालवीय हे ज्या प्रश्नाला तोंड देऊं इच्छित नाहींत,त्या प्रश्नाचें उत्तर द्यावयास मला अडचण वाटत नाहीं. हिंदुस्थानांत असणारें हें सैन्य किती कमी करणें शक्य आहे अगर इष्ट आहे ह्याचें ते तज्ज्ञ नसल्यामुळें उत्तर देऊं शकत नाहींत. या सैन्याचें काय करावें हें सांगावयास मला कांहींच कठीण वाटत नाहीं. मी असें जोरानें प्रतिपादन करीन कीं, हिंदुस्थानांतील राज्यकारभाराची जबाबदारी असल्या अनेक बंधनांनीं माझ्या खांद्यावर घेण्यापूर्वीं, जर माझ्या हातीं सैन्याचा ताबा येत नसेल तर त्या सैन्याला रजा द्यावी. ही माझी मूलभूत कल्पना असल्यामुळें, मी तुम्हां ब्रिटिश मंत्र्यांना व ब्रिटिश जनतेला असें सांगतों कीं, जर तुम्हांला हिंदुस्थानचें कल्याण व्हावें असें वाटत असेल आणि आमच्या हातीं आतां सत्ता देणार असाल तर सैन्याचा ताबा पूर्णपणें आमच्या हातीं आला पाहिजे ही महत्त्वाची अट आहे असें तुम्ही समजा.

' मला ठाऊक आहे-सैन्य माझी सत्ता मानणार नाहीं. ब्रिटिश कमांडर इन चीफ, किंवा शीख किंवा अभिमानी रजपूत माझ्या नियंत्रणाला खुषीनें मान्यता देणार नाहींत हें मी जाणून आहे. असें असूनही ब्रिटिशांच्या सदिच्छेनें मी ही सत्ता चालविण्याची

म. गांधी व पं. जवाहरलाल ह्या दोघां पुढाऱ्यांच्या उद्‌गारांवरून हिंदुस्थान स्वतःकडे संरक्षणाची जबाबदारी घ्यावयास तयार आहे हें उघड आहे. विमानें व आरमार याहि बाबतींत आम्ही ब्रिटिशांच्या पंखाखालीं राहूं इच्छित नाहीं, हें सांगण्याची जरूर नाहीं.

सैन्याच्या खर्चाबद्दलचा प्रश्न अलिकडे उद्भवला आहे. कांहीं जण म्हणतात ज्या सैन्यावर आमचा ताबा नाहीं, त्या सैन्याचा खर्च आम्ही कां द्यावा ? प्रश्न बरोबर आहे पण तो अदूरदर्शीपणाचा आहे. हिंदुस्थानची मुख्य तक्रार पैशाबद्दल नसून अधिकाराबद्दल आहे. हिंदुस्थानच्या ताब्यांत हें सैन्य आल्यावर हिंदुस्थानला सध्यांपेक्षां जास्त पैसे त्यावर खर्च करावे लागतील. तेव्हां भांडण करावयाचें असेल तर तें पैशाकरतां न करतां अधिकाराकरतां करावें. ब्रिटिशसरकार कदाचित् सैन्याचा अर्धापाव खर्च देऊन सैन्याच्या साऱ्या हालचालींवर स्वतःचें नियंत्रण ठेवील. आज हिंदुस्थानच्या बाहेर सैन्य पाठवावयाचें असेल तर मंत्र्यांचा सल्ला घ्यावा एवढी तरी अट त्यांनीं लाजेकाजेस्तव ठेवली आहे. ती अट काढून टाकणें त्यांना हवेंच आहे. तेव्हां निम्मे काय पण सर्व पैसे त्यांनीं दिले तरी ते आपण मान्य करतां कामा नये.

---

# २३

# सेक्रेटरी ऑफ स्टेट

हिंदुस्थानदेश हा ब्रिटिश अमदानींत आतांपर्यंत तीन स्थित्यंतरांतून गेला. प्रथम तो ईस्ट इंडिया कंपनीच्या ताब्यांत गेला, नंतर १८५८ सालीं तो सेक्रेटरी ऑफ स्टेटच्या नियंत्रणाखालीं आला आणि १९३५ सालीं त्याच्यावर बादशहाची सत्ता प्रस्थापित झाली. ह्या स्थित्यंतरत्रयीला थोडासा इतिहास आहे, तो आपण या नव्या कायद्याच्या निमित्तानें नजरेखालून घातला पाहिजे.

१८५८ च्या कायद्यानें सेक्रेटरी ऑफ स्टेट फार इंडिया ही जागा निर्माण केली. त्याच्याकडे इंग्लंडमधील हिंदुस्थानचें काम सोपविलें आणि त्याच्या मदतीला १५ जणांचें एक कौन्सिल दिलें. हा स्टेट सेक्रेटरी ब्रिटिश मंत्रिमंडळाचा एक मंत्री आहे व तो एकीकडे पार्लमेंट व दुसरीकडे ग. जनरल यांच्यामधील दुवा आहे. ह्या सेक्रेटरीनें हिंदुस्थानविषयक सर्व कायदे, सर्व संपत्ति व सर्व कार्यें पहावयाचीं आहेत आणि जमाखर्चाच्या बाबींतहि देखरेख व नियंत्रण ठेवावयाचें आहे. गव्हर्नर्स व ग. जनरल यांना त्यांचे हुकूम पाळावे लागत. तोच बादशहाच्या तर्फे हुकूम सोडतो. नोकऱ्या देणें, नोकऱ्यावरून काढणें वगैरे कामें तोच करतो.

१९३७ च्या मार्चपर्यंत हा भारतमंत्री व त्याचें कौन्सिल काम करीत होते. पण आतां हें कौन्सिल बंद करण्यांत आलें आहे व त्याला सल्लागार दिले आहेत. १९१९ पर्यंत स्टेट सेक्रे-

टरीचा पगार व त्याच्या कचेरीचा खर्च हिंदुस्थान देत असे. पण त्यानंतर तो ब्रिटिश तिजोरीवर लादण्यांत आला. नव्या कायद्यामध्यें जबाबदारी हिंदुस्थानवर टाकण्यांत आल्या कारणानें सेक्रेटरी ऑफ् स्टेटवरील जबाबदारी कमी झाली. पूर्वीं हा भारतमंत्री हिंदुस्थानच्या जमाखर्चांतहि वाटेल ती ढवळाढवळ करूं शकत असे. नव्या कायद्यांत पैशाची जबाबदारी मंत्र्यावर सोपविली असल्यामुळें त्याचें हें कार्य लुप्त झालें. यापुढें हिंदुस्थानच्या देण्याघेण्याचा, संपत्तीचा, हक्काचा, सर्व अधिकार बादशहाकडे व त्याच्या मार्फतीनें प्रांतिक व फेडरल सरकारकडे आणि रेल्वे ऑथॉरिटीकडे गेला आहे. इंग्लंडमधील विद्यमान हक्क, जबाबदाऱ्या या सेक्रेटरी ऑफ स्टेटकडेच ठेवल्या आहेत. अशा प्रकारें पूर्वीं सेक्रेटरी ऑफ स्टेटकडे जी सत्ता होती, ती काढून घेण्यांत आली व ती हिंदुस्थानांत विभागून देण्यांत आली.

पण सेक्रेटरी ऑफ स्टेटकडे कांहीं अधिकार आहेतच. नव्या सुधारणान्वयें सेक्रेटरी ऑफ स्टेट इन कौन्सिल असा जो त्याचा हुद्दा होता तो काढून नुसता सेक्रेटरी ऑफ स्टेट असा करण्यांत आला. त्याच्या कौन्सिलच्या जागीं ३ ते ६ जणांचें एक सल्लागार मंडळ आलें. या सल्लागारमंडळाचा सल्ला त्यानें घ्यावा किंवा घेऊं नये. त्यांतील निम्मे सल्लागार तरी हिंदुस्थानांत दहा वर्षें नोकरी केलेले व नेमणुकीपूर्वीं दोन वर्षें कामावर असलेले गृहस्थ असावेत. त्यांची नेमणूक फक्त ५ वर्षांकरितां करावयाची आहे. त्यांचा पगार सालिना १३५० पौंड असेल व ते नेमणुकीपूर्वी हिंदुस्थानांत रहात असल्यास सब्सिस्टन्स अलौअन्स म्हणून त्यांना ६०० पौंड भत्ता मिळेल.

सेक्रेटरी ऑफ स्टेटनें जरी त्यांचा इतर बाबतींत सल्ला घेतला नाहीं तरी हिंदी नोकऱ्यांच्या बाबतींत सल्ला घेतलाच पाहिजे. या सल्लागारांपैकीं निम्या हजर लोकांनीं जरी त्याला मान्यता दिली तरी चालेल.

सध्यां या सेक्रेटरीच्या ऑफिसच्या खर्चाकरतां १॥ लाख पौंड ब्रिटिश खजिन्यांतून दिले जातात. यानंतर या ऑफिसच्या खर्चाकरतां हिंदुस्थाननें कांहीं पैसे द्यावयाचे आहेत. सेक्रेटरी ऑफ स्टेट हा फेडरेशनसंबंधीं जितका व्यवहार करील तितक्या मानानें त्याच्या ऑफिसचे पैसे हिंदुस्थाननें द्यावयाचे आहेत. पण त्याचा पगार व त्याच्या इतर खात्यांचा पगार ब्रिटिश खजिन्यांतून दिला जाणार आहे.हिंदुस्थानच्या जमेवरील भारतमंत्र्यांची सत्ता जरी काढली असली आणि त्याची देखरेख, नियंत्रण वगैरे कमी केलें असलें तरी गव्हर्नर्स व ग. जनरल यांच्यावरील त्यांची सत्ता कायम ठेवली आहे. या अधिकाऱ्यांवर ज्या खास जबाबदाऱ्या सोंपविल्या आहेत व ग. जनरलकडे जीं खास खातीं सोंपविलीं आहेत, त्या बाबतींत सेक्रेटरी ऑफ स्टेटचा ताबा कायम ठेवला आहे. ग. जनरल व गव्हर्नर्स यांची खास जबाबदारी सर्वव्यापी असल्यामुळें सेक्रेटरी ऑफ स्टेटचा ताबाहि सर्वव्यापी आहे असें म्हणावयास हरकत नाहीं.

हिंदुस्थानचा स्टेट सेक्रेटरी व वसाहतींचा स्टेट सेक्रेटरी यांच्यांत काय काय साम्य आहे तें आपण बघूं. वसाहतींमध्यें बादशहा हा सर्वाधिकारी असतो व त्याचे हे अधिकार गव्हर्नर्स चालवीत असतात. पण वसाहतींत गव्हर्नर्सची नेमणूक जी करतात ती वेस्टमिनिस्टर स्टॅटयूटपासून वसाहतमंत्र्यांच्या सल्ल्यानें करतात. तेथील गव्हर्नर्स हे वसाहतींतूनहि नेमले जातात.

त्या गव्हर्नर्सचें हातांत हिंदुस्थानच्या गव्हर्नर्सइतकी सत्ता नसते. वसाहतींतील गव्हर्नर्स किंवा बादशहा जी सत्ता चालवितात, ती ब्रिटिश मंत्रिमंडळाच्या सल्ल्यानें चालवीत नाहींत; वसाहतमंत्र्यांच्या सल्ल्यानें चालवितात. तेथें ब्रिटिश पार्लमेंटचा ताबा रद्द केला आहे. ज्याप्रमाणें इंग्लंडच्या मंत्रिमंडळाचा बादशहा हा प्रमुख असतो, त्याप्रमाणें वसाहतमंत्रिमंडळाचा प्रमुख बादशाहा असतो. वसाहतमंत्री व बादशाहा यांच्यामध्यें पार्लमेंटची लुडबुड नसते. हिंदुस्थानांत असा प्रकार नाहीं. येथील ग. जनरल व गव्हर्नर्स हे हिंदी मंत्र्यांच्या सल्ल्यानें नेमले न जातां ब्रिटिश मंत्र्यांच्या सल्ल्यानें नेमले जातात. हिंदी गव्हर्नर्स एखादी गोष्ट करतांना हिंदी मंत्र्यांना न विचारतां सेक्रेटरी ऑफ स्टेटला म्हणजेच ब्रिटिश मंत्र्यांना विचारतील.अशा प्रकारें हिंदुस्थानच्या या घटनेला जरी वसाहतीचें स्वरूप आहे असें वाटत असलें तरी ग. जनरल व गव्हनर्स हे जोंपर्यंत सेक्रेटरी ऑफ स्टेटच्या सल्ल्यानें चालणार आहेत, तोंपर्यंत ब्रिटिश पार्लमेंटचा हिंदुस्थानवरील ताबा हा कमी झालेला नाहीं.

नव्या घटनेमध्यें गव्हर्नर्सची नेमणूक जरी हिंदी मंत्र्यांच्या सल्ल्यानें करावी असें नसलें तरी येथील मंत्र्यांनीं ह्या बाबतींत वसाहतीची पद्धत रूढ करावी व स्वतःकडे हा हक्क घेण्याचा प्रयत्न करावा. त्याचे परिणाम काय होणार असतील ते होवोत पण त्याकरतां भांडण्याचें मात्र सोडूं नये.

सेक्रेटरी ऑफ स्टेटप्रमाणें एक हाय कमिशनरची जागा आहे. ती १९१९ च्या कायद्यानें निर्माण केली आहे.नव्या कायद्यांत ती जागा चालू रहाणार आहे.हा अधिकारी इंग्लंडमध्यें रहाणार. त्याची नेमणूक ग. जनरलनें वैयक्तिक निर्णयानें करावयाची आहे.ग.जन-

रल सांगेल त्याप्रमाणें यांनीं तिकडे करार करावयाचे आहेत.त्याला प्रांतिक सरकारांचीं सुद्धां कामें करावीं लागतील. हिंदी विद्यार्थ्यांवर देखरेख ठेवणें,आंतरराष्ट्रीय परिषदांत हिंदुस्थानचा प्रतिनिधि म्हणून जाणें, व्यापारविषयक माहिती देणें व आमच्या·धंद्यासंबंधीं काळजी वाहणें हीं कामें त्याला करावयाचीं आहेत. वसाहतींचे सुद्धां हाय कमिशनर्स इंग्लंडमध्यें असतात. पण ते वसाहतींचें हितरक्षण खरोखर करतात. हिंदुस्थानचा हायकमिशनर हा निरुपयोगी आहे व तो काढून टाकल्यास कांहीं हानि होणार नाहीं.

सेक्रेटरी ऑफ स्टेट हा गव्हर्नर्स व ग. जनरल यांच्या खास जबाबदाऱ्या व राखीव खातीं यांत हस्तक्षेप करूं शकेल व सिव्हिल सर्व्हिसकरतां नेमणूका करूं शकेल. या सिव्हिल सर्व्हिसची जबाबदारी जी पूर्वी सेक्रेटरी ऑफ स्टेट इन कौन्सिलवर असे ती सेक्रेटरी ऑफ स्टेटवर आल्याकारणानें पूर्वीच्या नोकरनाम्यांत, पेन्शनमध्यें अगर ज्या ज्या ठिकाणीं अवश्य असेल त्या त्या ठिकाणीं सेक्रेटरी ऑफ स्टेट इन कौन्सिल असे शब्द असतील, तेथें तेथें सेक्रेटरी ऑफ् स्टेट असा बदल करण्यांत आला आहे. से. आफ् स्टेट. इन कौन्सिलच्या नांवावर बँकांत असणाऱ्या रकमा, रोखे, पेन्शनफंड, करारनामे हे सेक्रेटरी ऑफ स्टेटच्या नांवावर करण्यांत यावयाचे आहेत.तसेंच पूर्वीचे हुकूम,अधिकारहि पुढें चालू रहावयाचे आहेत. अशा प्रकारच्या तपशीलवार व कायदेशीर अदलाबदली करण्यासंबंधीं कायद्याचीं कांहीं कलमें खर्ची पडलीं आहेत. त्यांत उद्देश एवढाच आहे कीं, हुद्दा बदलल्यामुळें पूर्वीचे व्यवहार बेकायदा ठरूं नयेत. फेडरेशन अंमलांत येणार असल्यामुळें नव्या राज्यघटनेला आवश्यक असेहि कांहीं नियम केले आहेत.

---

२४

# सर्वसाधारण तजविजी.

## बादशहा व संस्थानें.

फेडरेशनमध्यें आलेल्या संस्थानांनीं आपल्या मान्यतापत्रकांत ज्या अटी कबूल केल्या असतील, त्यांव्यतिरिक्त इतर कोणत्याहि बाबतींत बादशहांचे जे संस्थानासंबंधीं हक्क व कर्तव्यें आहेत त्यांना या कायद्यानें कोणताहि बाध येत नाहीं.

या कलमाचा उद्देश काय आहे हें समजून घेतलें पाहिजे. बादशहाला पॅरामौंटसी अगर अधिराज्याच्या नांवाखालीं संस्थानांत अनेक हक्क, अधिकार वगैरे आहेत. ते आतांपर्यंत सेक्रटरी ऑफ स्टेटच्या नियंत्रणाखालीं गव्हर्नर जनरल आपल्या कौन्सिलच्या मदतीनें अंमलांत आणीत असे. ते अधिकार वगैरे अबाधित रहाणें अवश्य आहे. पण त्यांची अंमलबजावणी करण्याची सत्ता संयुक्त घटनेंतील मंत्रिमंडळाला सर्वस्वी देण्यांत आली नाहीं. अर्थात् जें संस्थान फेडरेशनमध्यें येईल व ज्या बाबी तें संयुक्त घटनेमध्यें अंतर्भूत करील तेवढया बाबींच्या अंमलबजावणीपुरती सत्ता फेडरल मंत्रिमंडळाला मिळेल. पण बाकीच्या बाबींचें काय ? ब्रिटिश पार्लमेंट अगर संस्थानिक त्या बाबी फेडरल सरकारकडे सोंपविण्यास तयार नाहींत. त्याकरतां संस्थानिकांनीं व्हाइसरॉय मागून घेतला. ह्या व्हाइसरॉयचा राजाचा प्रतिनिधि म्हणून संस्थानिकांशीं संबंध रहाणार

आहे. ग. जनरल व व्हाइसरॉय यांचे अधिकार स्पष्ट व निराळे करण्यांत आले आहेत.

संस्थानिक व ईस्ट इंडिया कंपनी यांचे जे तहनामे झाले तें पुढें बादशहानें मान्य केलें. नव्या घटनेच्या वेळीं संस्थानिकांना आपल्या तहनाम्यांच्या अस्तित्वाची शंका आली, म्हणून या कलमानें त्यांचे तहनामे कायम रहातील असें पर्यायानें आश्वासन दिलें आहे. सर सॅम्युएल होअर म्हणाले, हें नव्या कायद्याचें बिल पास झालें काय किंवा न झालें काय संस्थानिकांवरील अधिराज्य हें कायमचेंच आहे. दुसऱ्या पक्षीं बिल पास झालें तरी पॅरामौंटसी फेडरेशनमध्यें येणाऱ्याच संस्थानिकांना लागू आहे असें थोडेंच आहे ? ती सर्वच संस्थानिकांना लागू आहे.

यापुढें संस्थानिकांना जर सैन्याची जरूरी लागली तर काय करावें याची तजवीज केली आहे. एखाद्या संस्थानिकाला सैन्याची जरुरी लागली तर तें सैन्य त्यानें व्हाइसरॉयकडे मागावयाचें आहे किंवा व्हाइसरॉय आपल्यावरील संस्थानिकांच्या संरक्षणाची जबादारी ओळखून हें सैन्य आपणहून मागेल. तें सैन्य त्यानें ग. जनरलकडे मागावयाचें आहे आणि ग.जनरलनें तें द्यावयाचें आहे. मात्र ह्या सैन्याकरतां लागणारा जादा खर्च संस्थानिकांकडून न घेतां बादशहावर संस्थानिकांच्या संरक्षणाची जी जबाबदारी आहे ती पार पाडण्याकरतां फेडरेशनवर बसवावयाचा आहे. अशा-प्रकारचा न्याय अगर अन्याय क्वचितच पहावयास सांपडेल! संस्थानिक तर असें म्हणत होतें कीं,आमच्या संरक्षणाकरतां व्हाइसरॉयजवळ निराळें सैन्यच ठेवा.पण त्यांची ही मागणी अमान्य झाली. नाहीं तर तो खर्च सतत हिंदुस्थानला करावा लागला असता.

अशा प्रकारें संस्थानिक हे फेडरेशनला कांहीं मोबदला न देतां त्यांच्याकडून फुकटचें सैन्य वापरावयास घेणार. ग. जनरलला हें सैन्य तुम्ही कां पाठवतां हेंहि विचारण्याची मंत्र्यांना परवानगी नाहीं. संस्थानिकांनीं गव्हर्नराकडे पोलिस मागितले नाहींत हें दैवच म्हणावयाचें. नाहींतर आपल्या प्रजेवर लाठीहल्ला करावयास त्यांनीं पोलिसहि मागितले असते.

कांहीं प्रांतांत लहानलहान संस्थानें आहेत व त्या संस्थानांशीं प्रांतांचे संबंध आहेत. हे संबंध तसेंच चालू रहावेत म्हणून ग. जनरलनें गव्हर्नर्सना ही सत्ता द्यावी अशाबद्दल कलम घातलें आहे.

## एडन.

ब्रिटिश हिंदुस्थानशीं एडनचा असलेला संबंध बादशहानें त्यांना योग्य वाटेल त्या दिवसापासून तोडून टाकावा. फक्त एडनमधील खटल्यांचें अपील ब्रिटिश हिंदुस्थानांतील एखाद्या प्रांतानें चालवावें व त्याचा खर्च एडनपासून घ्यावा. या कलमाप्रमाणें २६ सप्टेंबर १९३६ रोजीं एडन स्वतंत्र झाला. तेथील अपीलें मुंबई हायकोर्टांत चालावयाचीं आहेत.

## नवे प्रांत.

नवे प्रांत निर्माण करणें, असलेल्या प्रांतांचें क्षेत्र वाढविणें, अगर कमी करणें; प्रांतांच्या सीमा बदलणें या गोष्टी बादशहा आपल्या मंत्र्याच्यातर्फे फर्मान काढून करूं शकतील. पण असें करण्यापूर्वी बादशहा भारतमंत्र्यातर्फे फेडरल सरकार व फेडरल कायदेमंडळ आणि ज्या प्रांताशीं त्यांचा संबंध असेल त्या प्रांताचें सरकार आणि त्याचें कायदेमंडळ किंवा कायदेमंडळें यांची

मतें अजमावून घेईल. हा हुकूम सोडतांना त्या प्रांतांतून संयुक्त कायदेमंडळांत किती प्रतिनिधि पाठवावयाचे, नव्या प्रांतांत किती सभासद असावयाचे, दोन प्रांतांच्या देण्याघेण्याची काय व्यवस्था करावयाची वगैरेंचा विचार व तजवीज करावयाची आहे. पण प्रांत नवे निर्माण केले तरी फेडरेशनच्या दोन्ही कायदेमंडळांत पाठवावयाच्या प्रतिनिधींची एकूण संख्या बदलतां कामा नये.

फॉरिन ज्युरिस्डिक्शन कायद्यान्वयें संस्थानांत जे अधिकार बादशाहांना असत, त्या अधिकारांची व्याप्ति फेडरेशनमध्यें येणाऱ्या संस्थानांची किती हें एका कलमान्वयें विशद केलें आहे. याबद्दल भाष्य करतांना सॉलिसिटर जनरल म्हणाले, ‘ या कलमाचा अर्थ असा:—एखादी रेल्वे संस्थानी हद्दींतून जात असते व तेवढा भाग संस्थानांनीं हिंदुस्थान सरकारला दिलेला असतो. या भागावर मालकी जरी हिंदुस्थान सरकारची नाहीं, तरी त्या भागाला लागू होणारे कायदे हे ब्रिटिश सरकारचेच असतात. हे कायदे करण्याचे अधिकार १८९० च्या फॉरिन ज्युरिस्डिक्शन कायद्यान्वयें बादशहाला प्राप्त झालेले आहेत. हा भाग आतां जर फेडरेशनमध्यें आला तर त्यावर फॉरिन ज्युरिस्डिक्शनचे कायदे न चालतां फेडरल कायदेमंडळाचे कायदे चालले पाहिजेत असें ओघानेंच म्हटलें जाईल. पण फॉरिन ज्युरिस्डिक्शनची कायद्यांतील सत्ता स्वतंत्र असल्यामुळें ती फेडरेशनच्या सत्तेंत लुप्त होणार नाहीं. ती तशीच अबाधित राहील. ’

क्वेटा, महू, बंगळूर व सिकंदराबाद हे विभाग संस्थानांतील आहेत. पण त्यांवर बादशाहांची सत्ता चालते. ती तशीच चालू राहील. फेडरेशनचा त्यांवर अंमल चालणार नाहीं. पण ह्या विभा-

गांवरील सत्ता सोडून द्यावी असें बादशाहांना वाटलें तर त्यावर फेडरेशनची सत्ता स्थापन होईल. पण त्याकरतां संस्थानांनीं पुरवणी मान्यतापत्रक द्यावें व त्यांत ज्या मर्यादा व ज्या बाबी घातल्या असतील तेवढयावरच फेडरेशनची सत्ता चालावी. फॉरिन ज्युरिस्डिक्शनच्या अधिकारान्वयें जे ब्रिटिश हिंदुस्थानचे कायदे संस्थानांत चालू असतील ते कायदे ते संस्थान फेडरेशनमध्यें आल्यावर पांच वर्षेंपर्यंत चालू रहातील.

एखाद्या ब्रिटिश प्रजाजनानें संस्थानांत एखादा गुन्हा केला तर त्याचा खटला संस्थानी कोर्टापुढें न चालतां तो ब्रिटिश कोर्टापुढें चालावा अशी योजना केली आहे.

**देहदंड**:—ज्यांना मृत्यूची शिक्षा झाली असेल, त्यांना जीवदान देणें, त्यांची शिक्षा बदलणें अगर थांबविणें ह्या संबंधींचे अधिकार ग. जनरलला देण्यांत आले आहेत व ते त्यांनीं स्वतःच्या बुद्धीनें उपयोगांत आणावयाचे आहेत. प्रांताच्या गव्हर्नरला हे अधिकार आहेतच व ते मंत्र्यांच्या सल्ल्यानें उपयोगांत आणावयाचे आहेत. या कायद्यापूर्वीं हे अधिकार ग. जनरल इन कौन्सिलला होते पण कौन्सिलची जागा संयुक्त मंत्रिमंडळानें घेतली. हे अधिकार संयुक्त मंत्रिमंडळाला न देतां ग. जनरल या व्यक्तीला दिले आहेत. बादशहांचे अधिकार ह्या विभागणीमुळें कमी होत नाहींत.

## खुला व्यापार.

एखाद्या प्रांतांत बाहेरून माल आल्यास त्यावर कर, जकात वगैरे घेण्यासंबंधींचा कायदा कोणत्याहि कायदेमंडळाला करतां येणार नाहीं. तसेंच एखाद्या प्रांतांतून बाहेर माल गेल्यास त्यावरहि

कर बसविण्याचा कायदा करतां येणार नाहीं. पण बाहेरून येणाऱ्या दारूवर कर बसविण्यास कोणत्याहि प्रांताला बंदी नाहीं. मद्रास व संयुक्त प्रांतांत अशा प्रकारें जी एक्साइज् ड्यूटी बसवितात ती अनुक्रमें ४ व २ कोटी आहे. पण इतर तयार मालावर अंतर्गत कर बसवितां येणार नाहींत.

या कलमामुळें विलायती व परदेशी मालांच्या प्रसाराला बंधन नाहीं. एकदां किनाऱ्यावर माल उतरला व तेथें जकात वसूल केली कीं, तो माल सर्व हिंदुस्थानांत वाटेल तेथें कर न घेतां जाऊं शकेल. तसेंच संस्थानांतून येणाऱ्या मालावरहि जकात वगैरे बसवतां येणार नाहीं. पण संस्थानासंस्थानांत असणाऱ्या जकाती, जरी हीं संस्थानें फेडरेशनची घटक झालीं तरी थांबविण्याची व्यवस्था केली नाहीं. खुल्या व्यापाराकरतां ही तजवीज आहे.

## मूलभूत हक्क.

मूलभूत हक्कासंबंधींची मागणी अलिकडील नाहीं. मुसलमानांसारख्या अल्पसंख्याकांना ही मागणी फार महत्त्वाची वाटली. त्यांना वाटलें मूलभूत हक्क एकदां कायद्यांत घातले कीं, आपली सर्व गाऱ्हाणीं दूर होतील.

नेहरु रिपोर्टांत हे मूलभूत हक्क अंतर्भूत केले गेले. या कल्पनेला हिंदुस्थानांतील सर्व पक्षांनीं आनंदानें पाठिंबा दिला. पण सायमन कमिशननें प्रथम ही कल्पना धुडकावून लावली. त्यांनीं सांगितलें कीं, असले मूलभूत हक्क कायद्यानें अंमलांत येत नाहींत. पहिल्या गोलमेज परिषदेंत सर रॅम्से मॅकडोनल्ड यांनीं

त्याबद्दल सहानुभूति दाखविली. या पहिल्या परिषदेंत अल्प-संख्यांकांच्याकरतां जी उपसमिति नेमली तिनें ह्या मागणीचा आपल्या अहवालांत उल्लेख केला. संस्कृति, धर्म, यांचें संरक्षण आणि जात, धर्म, वंश अगर लिंग न पहातां सर्वांना आर्थिक, सामाजिक आणि नागरिक हक्क समानतेनें मिळावेत अशाबद्दल ही मागणी केली होती. ही कमिटी मूलभूत हक्कांना कायदेशीर मान्यता देण्याबद्दल शिफारस करणार असें कळतांच व्हाइसरॉयच्या सल्लागार कमिटीकडे १९३२ मध्यें मूलभूत हक्कांच्या याद्यावर याद्या येऊं लागल्या. पण या सर्वांचा अंत तिसऱ्या राउंडटेबलमध्यें झाला.

काँग्रेसनें हे हक्क कराची येथें भरलेल्या अधिवेशनांत मंजूर केले. पण काँग्रेसमध्यें हा ठराव फार पूर्वी १९१९ सालीं भरलेल्या अमृतसरच्या बैठकींत आला होता व १९२० सालीं पुनः नागपूरच्या काँग्रेसमध्यें तो आला. या प्रश्नाचे जनक सी. विजयराघवाचार्य आहेत.

व्हाइट पेपर, जॉइंट सिलेक्ट कमिटी या सर्वांनीं मूलभूत हक्कांवर कुऱ्हाड घातली. हे हक्क जर मान्य केले तर कायद्याची सत्ता उधळून जाते वगैरे म्हटलें गेलें. सर सॅम्युएल होअर म्हणाले, ' कांहीं राष्ट्रांत हे हक्क मान्य केले आहेत हें आम्हांला माहीत आहे. पण ते अनुभवानें निरुपयोगी ठरले आहेत. हे हक्क जर सिद्धांत म्हणून मांडले तर कायद्याच्या दृष्टीनें त्याना किंमत नाहीं. बरें ते उपयोगांत आणावयाचे म्हटलें तर कायदेमंडळाच्या हक्कावर गदा येते. हे हक्क मान्य केल्यानें पुष्कळसे कायदे रद्द करणें कोर्टाला अवश्य होईल. शिवाय संस्थानें हे हक्क मान्य करावयास तयार नाहींत. फेडरेशनमधील घटकांत जर असा भिन्न प्रकार झाला तर

फेडरेशनची किंमतच उरणार नाहीं !' अशा प्रकारें चहूंकडून थपडा बसल्यानंतर अल्पसंख्याकांनीं निदान राणीच्या जाहीरनाम्यांतील वचनें तरी पुनर्घोषित करा असा आग्रह धरला व तेवढा हट्ट होअरसाहेबांनीं पुरविला. मूलभूत हक्कांचें हें विकृत स्वरूप आहे.

हिंदुस्थानांत रहाणाऱ्या बादशहाच्या कोणत्याहि प्रजाजनाला धर्माच्या, जन्मस्थानाच्या, वंशाच्या, वर्णाच्या कारणाकरतां नोकरी नाकारली जाणार नाहीं. तसेंच त्याला संपत्ति कमविणें, धारण करणें अगर विकणें यालाहि प्रतिबंध केला जाणार नाहीं. त्याचप्रमाणें उद्योगधंदा, उदीम, व्यापार करण्यासहि बंदी केली जाणार नाहीं.

याला अपवाद कांहीं केले आहेत. पण ते विशिष्ट भागांतील लोकांकरतां केले आहेत.

जे हक्क युनायटेड किंगडममधील लोकांना दिले आहेत तेच हिंदी लोकांना दिले. त्यांत औदार्य अगर नावीन्य नाहीं, पण त्यामुळें कोणाची फसवणूक झाली नाहीं. भाषणस्वातंत्र्य, लेखनस्वातंत्र्य अगर संघस्वातंत्र्य याला तरी कायदा आड येतां कामा नये आणि तो आड येत असल्यास बदलावयाला पाहिजे.

## खासगी संपत्तिसंरक्षण.

ब्रिटिश हिंदुस्थानांतील कोणत्याहि माणसाची जमीन कायद्याखेरीज हरण केली जाणार नाहीं. सार्वजनिक कामाकरतां किंवा उद्योगधंद्याकरतां जरी खासगी व्यक्तींची जमीन घेणें असेल तर तीं त्या व्यक्तीला मोबदला दिल्याशिवाय संपादन करतां येणार नाहीं. एखाद्या खासगी व्यक्तीची जमीन सार्वजनिक मालकीची करावयाची असेल किंवा त्या जमिनीवरील हक्क नष्ट करावयाचे असतील किंवा त्यांत बदल करावयाचा असेल तर त्या संबंधींचें बिल कोणत्याहि

कायदेमंडळांत ग. जनरल किंवा गव्हर्नरच्या आगाऊ परवानगी-शिवाय आणतां येणार नाहीं. ह्या जमिनींवरील हक्कामध्यें शेत-साऱ्यासंबंधींचे हक्क व सवलती यांचाहि अंतर्भाव होतो.

जमिनीवरील शेतसाऱ्याचे हक्क व सवलती यांचें रक्षण करावयाचें म्हणजे जमीनदार, तालुकदार, जहागीरदार वगैरे वर्गांचें रक्षण करावयाचें. जमीनदारांचा शेतसारा कायमचा ठरला आहे. त्यांत बदल करावयास ग. जनरल किंवा गव्हर्नर यांची अधिकारक्षेत्रा-प्रमाणें आगाऊ परवानगी पाहिजे आहे.

कांहीं लोकांनीं सरकारची चाकरी बजावल्यामुळें त्यांना १ जानेवारी १८७० पूर्वीं अगर त्यानंतर ज्या जमिनी, ज्या सवलती, हक्क वगैरे मिळाले असतील अगर त्यांचा शेतसारा जो ठरला असेल त्यासंबंधीं जर कांहीं अंमलबजावणी संयुक्त किंवा प्रांतिक सरकारला करावयाची असेल तर त्यापूर्वी ग. जनरल किंवा गव्हर्नर यांचा हुकूम घेतला पाहिजे.

तसेंच ज्यांना राजकीय किंवा दयाळू बुद्धीनें पेन्शन दिलें असेल तें चालू राहिलें पाहिजे. अर्थात् ह्या पेन्शनरांनीं किंवा जमीनदा-रांनीं जर देणगींतील एखादी अट मोडली तर त्याबद्दल उपाय योज-ण्यास प्रत्यवाय नाहीं.

जॉइंट पार्लमेंटरी कमिटीनें ह्या कलमावर भाष्य करतांना सांगितलें कीं, साऱ्या हिंदुस्थानांत अनेक व्यक्ती व वर्गांना तालु-कदारी, इनामदारी, जहागिरदारी, वतनदारी व मुआफी अशा नांवांखालीं जमिनी मिळाल्या आहेत किंवा शेतसारा न भरतां त्या जमीनी वहिवाटावयास मिळाल्या आहेत किंवा कमी शेतसारा देण्याच्या अटीवर त्यांना जमीनी देण्यांत आल्या आहेत. हे हक्क

अगर जमीनी मोंगल व शिखांच्या वेळेपासून मिळाले आहेत व ते ब्रिटिश सरकारनें मंजुर केले आहेत. याशिवाय ब्रिटिश सरकारनेंहि कांहीं हक्क आपली सेवा बजावल्याबद्दल दिलेले आहेत. यांतील कांहीं जमीनी व हक्क देवस्थानांना दिलेले आहेत. नव्या राज्यघटनेंत मंत्रिमंडळें आपले हे हक्क हिरावून घेतील अशी या वर्गाला भीति वाटणें साहजिक होते.या सर्व वर्गांनीं तर हे हक्क कधींच हिरावून घेऊं नयेत अशी मागणी केली होती. पण ब्रिटिशसरकारनें असा कायदा करण्याचें नाकारलें. जर ह्या हक्कांत कांहीं बदल करावयाचा असेल तर गव्हर्नर्स किंवा ग. जनरल यांची आगाऊ परवानगी घ्यावी असें सांगितलें आहे.

१८७० सालची तारीख घालण्याचें कारण बंडांतील बहादुरांना जमीनीचे हक्क वगैरे दिले त्याचें रक्षण करणें हा आहे.

बंगाल, बिहार, ओरिसा, मद्रास व संयुक्तप्रांत या प्रांतांत जमीनदारांच्या बरोबर कायम शेतसाऱ्याचे ठराव केले आहेत. हा कायम साऱ्याचा ठराव करण्याचें कारण या जमीनदार वर्गाला त्या जमीनींचे मालकी हक्क द्यावेत व त्याबद्दल त्यांनीं सरकारला त्या जमिनीवर जो एकदां शेतसारा ठरला असेल तो गोळा करून द्यावा असें आहे. त्यांत कधींहि बदल करावयाचा नाहीं. या पांच प्रांतांतील जमीनदारवर्ग व इतर वर्ग ह्यांत फार फरक आहे. या जमीनदारवर्गाचे हक्क नष्ट करून टाकल्यास साऱ्या प्रांतावर परिणाम होईल. पण ज्यांना सरकारी कामाकरतां जमीनी मिळाल्या आहेत अशा तालुकदार, जहागीरदार वगैरे वर्गांचे हक्क हिरावून घेतले तर फक्त कांहीं व्यक्तींवर परिणाम होईल. पण कायम शेतसाऱ्याच्या धारणपद्धतींत बदल करतां येत नाहीं असें नाहीं. मात्र

अशा संबंधीचें पास झालेलें बिल हें बादशहानें मान्य करावयाचें आहे.

## घटनादुरुस्तीचे अधिकार.

सर्व सुधारलेल्या संयुक्त राज्यघटनेंत, घटनादुरुस्तीचे अधिकार त्या त्या घटकांना दिलेले असतात. हिंदुस्थानच्या घटनेंत तशी तजवीज केलेली नाहीं. ही सत्ता बादशहांना दिलेली आहे. आमच्याकडील मुसलमान, हरिजन यांनाहि ही सत्ता घटकांना मिळावयास नको होती. तिसऱ्या गोलमेज परिषदेंत ह्या विषयावर खूप चर्चा झाली. हा संबंध कायदा बदलण्याची सत्ता हिंदी कायदेमंडळाला द्यावी ही तर गोष्ट कोणालाच संमत नव्हती. पण किरकोळ दुरुस्ती करण्याचे अधिकार या कायदेमंडळांना असावेत ही गोष्ट मान्य होऊं लागली व त्याप्रमाणें कलमें घालण्याचे विचारहि सुरू झाले. जॉइंट सिलेक्ट कमिटीनें असें सुचविलें कीं, कायदेमंडळानें एखादा पास केलेला ठराव ग. जनरलकडे किंवा गव्हर्नर जनरलमार्फत बादशहाकडे पाठवितांना, त्या ठरावाचे परिणाम अल्पसंख्यांकांवर काय होतील हें त्यांनीं कळवावें. पण मुसलमानांना ही सूचना अग्राह्य वाटली. कारण १९३२ सालीं बादशहानें जो जातीय निर्णय दिला, त्यांत असें म्हटलें आहे कीं, त्यांत जर बदल करावयाचा असेल तर ज्या जातींचा त्यांत संबंध येतो, त्यांच्या संमतीनें तो बदल करावा. मुसलमानांनीं जॉइंट सिलेक्ट कमिटीच्या शिफारसीवर सडकून टीका केली. हौस ऑफ कॉमन्समध्यें डचेस ऑफ अथॉल आणि मि. ऐझॅक फूट यांनीं मुसलमानांची भीति व्यक्त केली. या प्रश्नाचा साधकबाधक विचार सध्यांचे व्हाइसरॉय लॉर्ड लिनलिथगो यांनीं हौस ऑफ लॉर्डस्मध्यें

केला व अल्पसंख्याकांना पसंत पडेल अशी दुरुस्ती कायद्यांत केली.

राउंडटेबलच्या बैठकींत बॅ. जयकर यांनीं कायदेमंडळांत घटना-दुरुस्तीबद्दल केलेल्या उपसूचनांचा कसकसा अनुक्रम असावा अशा-बद्दल पद्धत घालून दिली. ती जॉइंट सिलेक्ट कमिटीनें मान्य केली व कायद्यांतहि ती घातली गेली.

हिंदुस्थानच्या कायदेमंडळाला घटनादुरुस्तीचे फारच थोडे अधिकार आहेत. प्रत्येक कायदेमंडळांत सभासद किती असावेत व तें कायदेमंडळ कोणाचें बनलें जावें, सभासद कसे निवडले जावेत, सभासदांची लायकी काय असावी अशाबद्दल दुरुस्त्या सुचवितां येतात. पण कौन्सिल ऑफ स्टेट व संयुक्त कायदेमंडळ यांच्यामध्यें जें सभासदांचें प्रमाण आहे तें बदलतां येत नाहीं; किंवा संस्थानिक आणि ब्रिटिश हिंदुस्थान यांच्या जागांतील प्रमाण फिरवतां येत नाहीं. प्रांतिक घटनेंत दोन गृहें असावींत किंवा एक असावें, त्यांत सभासद किती असावेत, त्यांची लायकी काय असावी, त्यांची निवडणूक कशी करावी यांबद्दल दुरुस्तीच्या सूचना आणतां येतील. तसेंच स्त्रीमतदारांना नुसती साक्षरतेनें मताची लायकी येते कां अधिक शिक्षणाची अट घालावी, तसेंच स्त्रियांना आपल्या लायकीबद्दल अर्ज करावयास न लावतां त्यांचीं नांवें आपोआप दाखल व्हावींत कीं काय याबद्दलहि दुरुस्ती करतां येईल. मात्र प्रांतांना किंवा फेडरल असेंब्लीला नवी घटना स्थापन झाल्यापासून १० वर्षांच्या आंत अशी दुरुस्ती सुचवितां येणार नाहीं. ह्या दुरुस्त्या साध्या सभासदांना आणतां येणार नाहींत.त्या मंत्रिमंडळानें आणावयाच्या आहेत. त्या गव्हर्नर किंवा ग. जनरलमार्फत बादशहाकडे पाठवा-

वयाच्या आहेत. सेक्रेटरी ऑफ स्टेटनें त्या सहा महिन्यांच्या आंत पार्लमेंटपुढें आपल्या ठरावासह ठेवावयाच्या आहेत. ग. जनरल किंवा गव्हर्नर्स यांनीं या दुरुस्त्या पाठवितांना त्यांचा परिणाम अल्पसंख्याक वर्गावर काय होईल हें तर कळवावयाचें आहेच. पण त्याबरोबरच अल्पसंख्याक वर्गाचें म्हणणेंहि कळवावयाचें आहे. प्रांतिक किंवा फेडरल कायदेमंडळांतील अल्पसंख्याक वर्गांतील बहुमत काय आहे, ते त्या सूचनांना अनुकूल आहेत किंवा नाहींत हेंहि त्यांनीं कळविलें पाहिजे व भारतमंत्र्यानें तें मत पार्लमेंटपुढें मांडलें पाहिजे.

बादशहा आपल्या मंत्रिमंडळाच्या सल्ल्यानें दहा वर्षांपूर्वी वरील बाबतींत बदल करूं शकतात.पण जर ही दुरुस्ती महत्त्वाची असली तर भारतमंत्र्यानें फेडरेशन व प्रांतिक कायदेमंडळें, अल्प-संख्यांक वर्ग व त्यांतील बहुमत यांचें त्या दुरुस्तीबद्दल काय मत आहे हें समजावून घेतलें पाहिजे.

अशा प्रकारें घटनादुरुस्तीचें सर्व अधिकार शेवटीं बादशहांच्याकडे गेले. कॉंग्रेसचें म्हणणें हिंदुस्थानांतील निरनिराळ्या जातींची सामुदायिक मतदानाच्या हक्कावर निवडून आलेल्यांची एक परिषद बोलवावी व तिनें आपली घटना बनवावी असें आहे. पण तें म्हणणें मान्य करावयास भाग पाडण्याइतकी शक्ति अद्याप राष्ट्रांत यावयाची आहे किंवा त्या शक्तीची परीक्षा व्हावयाची आहे. पं. जवाहरलाल नेहरू ह्यांनीं लंडन येथें जुलै १९३८ सालीं हीच घोषणा केली. या घटनेंतील दोष कोणते आहेत त्याबद्दल भीति कोणाला वाटते वगैरे प्रश्नांचें निराकरण जसें आम्हीं आपसांत करूं तसें परक्या सत्तेला करतां येणार नाहीं. मात्र ही घटना

बनवितांना आमच्यावर बंधनें नकोत. ही घटना करतांना संपूर्ण स्वातंत्र्य असेल तरच घटना बनविणें उपयोगी होईल.

बादशहा जे हुकूम काढील ते मंत्रिमंडळाच्या सल्ल्यानें काढील. ते सेक्रेटरी ऑफ स्टेट पार्लमेंटपुढें ठेवील.त्याला ऑर्डर्स इन कौन्सिल म्हणतात. बादशहानें त्यांना मान्यता दिली कीं, ते अंमलांत येतील.

## संक्रमणावस्थेंतील तजविजी.

प्रांतिक घटनेची सुरवात व फेडरेशनची स्थापना यांच्यामधील काळांत काय काय तजविजी करावयाच्या हें ठरविणें जरूर होतें. त्याप्रमाणें त्या योजना केल्या आहेत.

फेडरेशन जोंपर्यंत अंमलांत आलें नाहीं, तोंपर्यंत ग.जनरलची जीं कामें असतील तीं गव्हर्नर जनरल इन कौन्सिल यांनीं करावयाचीं आहेत. ग. जनरलला काय काय अधिकार आहेत व त्याचीं कामें काय काय आहेत याचें मागें विवरण केलेंच आहे. फेडरल मंत्रि-मंडळ अस्तित्वांत नसल्यामुळें या संक्रमणावस्थेंतील काळांत वैयक्तिक निर्णय देण्याचा प्रश्नच उद्भवत नाहीं. ग. जनरल व त्याचें कार्य-कारीमंडळ यांच्यांत मतभेद झाल्यास काय करावें याची तजवीज १९१९ च्या कायद्यांत केली आहेच. वास्तविकपणें प्रांतिक स्वाय-त्ततेचा प्रश्न वगळला तर बाकीचा राज्यकारभार थोड्या फार फरकानें फेडरेशन येईपर्यंत पूर्वींप्रमाणेंच चालला आहे. सेक्रेटरी ऑफ स्टेटची सत्ता पूर्ववत्‌च रहाणार आहे. त्याचा हुद्दा मात्र सेक्रेटरी ऑफ स्टेट इन कौन्सिल असा न रहातां सेक्रेटरी ऑफ स्टेट असा होणार आहे. हा बदल प्रांतिक स्वायत्तता

अंमलांत आल्यापासून झाला आहे. फेडरेशन येण्यापूर्वींच, फेडरल कोर्ट, फेडरल पब्लिक सर्व्हिस आणि फेडरल रेल्वे ऑथॉरिटी हीं अस्तित्वांत यावयाचीं होतीं व त्याप्रमाणें तीं आलीं आहेत.

हा कायदा सर्वच्या सर्व जरी अंमलांत आला नाहीं, तरी त्यांतील एखादा भाग बादशहा अंमलांत आणूं शकतात. हा कायदा अंमलांत आल्यामुळें पूर्वींचे सर्व हिंदुस्थानविषयक कायदे रद्द होतात.

मात्र १९१९ च्या कायद्यांत जें प्रीअँबल आहे तें कायम ठेवलें आहे. तें कायम ठेवण्याचा उद्देश समजून घेतला पाहिजे. नव्या कायद्यांत हिंदुस्थानचा दर्जा काय, त्याला वसाहतीचें स्वराज्य मिळणार किंवा नाहीं, सध्यांच्या सुधारणांची हयात किती, याबद्दल उल्लेख टाळले आहेत. पण १९१९ च्या कायद्यांत हिंदुस्थानला क्रमशः जबाबदारीचें स्वराज्य मिळेल वगैरे उल्लेख आहे. नव्या कायद्याच्या प्रारंभीं हिंदुस्थानला वसाहतीचें स्वराज्य द्यावयाचें आहे अशा प्रकारच्या ध्येयाची घोषणा करावी म्हणून हिंदी प्रतिनिधींनीं जंगजंग पछाडलें. हेन्री पेजक्रॉफ्ट आणि विन्स्टन चर्चिलसारख्यांनीं त्याविरुद्ध आकांडतांडव आलें. त्यांचीच री इतरांनीं ओढली.पण ती निरनिराळ्या रीतीनें व निरनिराळ्या तऱ्हेनें ओढली. लॉर्ड पील हा उल्लेख न करण्याचें समर्थन करतांना हिंदी प्रतिनिधींना सांगतात 'डोमिनिअन स्टेटस' हे पवित्र शब्द न घातल्यामुळें हिंदुस्थानांतील लोकांना उत्साह वाटणार नाहीं असें तुम्ही म्हणतां, पण ज्यांनीं ह्या कायद्याची शब्दयोजना केली त्यांना ते शब्द आकर्षक वाटले नाहींत. कारण त्यामुळें कांहीं हिंदी लोकांना जरी आनंद झाला तरी दुसऱ्या लोकांचा गैरसमज होईल. हिंदी

लोक जसे भावनाप्रधान आहेत तसे त्यांच्यांत कांहीं पट्टीचे वकील-हि आहेत. वसाहतीचें स्वराज्य असें शब्द कायद्याच्या उपोद्घातांत घातलें कीं, ही बुद्धिमान मंडळी क्षणोक्षणीं वसाहतींची घटना व ही घटना यांची तुलना करूं लागतील. त्याचा फार भयंकर परिणाम होईल आणि सध्यांच्या घटनेंत त्यांना वसाहतीच्या घटनेशीं साम्य आढळलें नाहीं म्हणजे आमच्यावर विश्वासघाताचा आरोप करूं लागतील.' लहान मुलांना जसें समजवावें तसा हा प्रयत्न आहे. त्यापेक्षां हिंदुस्थानाला वसाहतीचें स्वराज्य देणें हें आमचें ध्येय नाहीं असा स्पष्ट उल्लेख करणें प्रामाणिकपणाचें झालें असतें.

यावर प्रो. ए. बी. कीथ यांनीं जें म्हटलें आहे तें महत्त्वाचें आहे. " मजूर व प्रागतिक पक्षांना डोमिनिअन स्टेटस हा शब्द ध्येय म्हणून या कायद्यांत घालावयास पाहिजे होता. पण सरकारनीं चमत्कारिकच वृत्ति धारण केली. त्यांनीं १९१९ सालचे हेतुवाक्य व त्यावर १९२९ सालीं ग. जनरलनें त्या वेळच्या सरकारच्या संमतीनें जें भाष्य केलें तें मान्य केलें. त्या भाष्यांत हिंदुस्थानचें ध्येय वसाहतस्वराज्य आहे असें अभिप्रेत आहे. १९१९चा कायदा त्यांनीं रद्द केला आणि हेतुवाक्य मात्र कायम ठेवलें. या सरकारच्या राक्षसी कृत्याला टीकाकारांनीं दिलेली उपमा मोठी मार्मिक व यथार्थ आहे. मांजर नाहींसें झाल्यावर त्याचें हास्य कायम ठेवण्याच्या प्रयत्नांपैकींच हा प्रकार आहे. या डोमिनिअन स्टेटसच्या अनुल्लेखामुळें हिंदी लोकांना दुःख झालेंच पण सरकारला पाठिंबा देणारालाहि ते त्रासदायक झालें."( P. P. 315-316 Constitutional History of India.

पार्लमेंटांत सरकारतर्फे हेतुवाक्य ठेवण्याबद्दल व वसाहतीच्या स्वराज्याचा उल्लेख टाळण्याबद्दल पुष्कळ वादविवाद झाले. पण सरकारनीं कोणालाहि दाद दिली नाहीं. चर्चिल,पेज क्रॉफ्टसारख्या डायहार्डसना ( कट्टराना ) भडकून देण्याकरतां आम्ही हा उल्लेख टाळीत आहों, पण आमची अंतिम इच्छा हिंदुस्थानला वसाहतीचें स्वराज्य द्यावयाची आहे असें कांहीं धूर्त व धोरणी म्हणत राहिले. फेडरेशन स्थापन झाल्यानंतर त्यांत संस्थानें येतील, ब्रम्हदेश तर निराळा झालाच आहे, प्रांतांतहि फेरबदल झाले आहेत, ही सर्व परिस्थिति बदलल्यानंतर जुनेंच ध्येय आपण पुनर्घोषित करूं असें म्हणणें अप्रामाणिकपणाचें आहे.

हिंदुस्थानचें १९२९ सालीं असलेले भारतमंत्री डिसेंबरमध्यें भाषण करतांना म्हणाले कीं,हिंदुस्थानला डोमिनिअन स्टेटस जरी शब्दांत मिळालें नसलें तरी कृतींत मिळालेंच आहे. त्याचें प्रत्यंतर व्हर्सा-यच्या तहावर हिंदुस्थाननें सही केली तेव्हांच आलें. डोमिनअन्स-मध्यें जसा हायकमिशनर असतो तसा हिंदी हायकमिशनर नेमला आहे. राष्ट्रसंघांत हिंदी प्रतिनिधि आहे, वसाहतींच्या कायदेमंड-ळाची परिषद भरते तेव्हां हिंदुस्थानला स्थान मिळतें. पांच राष्ट्रांची जी आरमारी परिषद झाली तींत हिंदुस्थान होतें.आंतरराष्ट्रीय मजूर-परिषदेंतील नियामकमंडळांत हिंदुस्थानला जागा आहे. हीं सर्व उदाहरणें हिंदुस्थानला वसाहतीचें स्वराज्य मिळालें आहे याचें द्योतक म्हणून बेनसाहेबांनीं जगाला सांगितलें ! पण हिंदी लोक अशा युक्तीनें थोडेच फसणार !

म. गांधींच्या सावधगिरीच्या नेतृत्वाखालीं कॉंग्रेस फक्त स्वरा-ज्याची घोषणा करीत असे. जरूर साम्राज्यांत अवश्य

तर साम्राज्याच्या बाहेर असें या स्वराज्याचें स्वरूप होतें. समाईक भागीदारीचेंहि ध्येय कांहीं वर्षे कॉंग्रेसमध्यें सांगितलें जात होतें. १९२७ च्या मद्रास कॉंग्रेसमध्यें हिंदुस्थानचें ध्येय संपूर्ण स्वातंत्र्य आहे असें घोषित केलें. त्या वेळीं पं.जवाहरलाल नुक्तेच युरपमधून आले होते व सांगत होते कीं रशिया, जर्मनी,फ्रान्स वगैरे देशांतील लोकांना वसाहतीचें स्वराज्य ही काय चीज आहे हें कळत नाहीं आणि तें खरेंच आहे.एवढी प्रचंड चळवळ करावयाची आणि ध्येय काय तर म्हणे ब्रिटिश साम्राज्यांत रहाण्याचें.डॉ. बिझंट यांनीं सुद्धां मद्रासला स्वातंत्र्याचें ध्येय मान्य केलें. पण ज्या वेळीं हा ठराव पास झाला त्या वेळीं झालेल्या कमिटीच्या बैठकीला म.गांधी हजर नव्हते. त्यांना मागाहून ही हकिगत कळली.

पण ह्या ठरावाला कलकत्ता कॉंग्रेसमध्यें पुस्ती जोडण्यांत आली. त्या वेळीं पं. मोतीलाल नेहरु यांच्या अध्यक्षतेखालीं सर्वपक्षीय परिषद भरली होती व तिच्या शिफारसी बाहेर पडल्या होत्या. त्या शिफारसींत सर्व पक्षांना संमत होतील अशा सुधारणा असल्यामुळें त्या व्यवहार्य व ताबडतोबीच्या म्हणून कलकत्ताकॉंग्रेसनें मान्य केल्या. अर्थात् संपूर्ण स्वातंत्र्याचें ध्येय कायमच होतें. नेहरु-कमिटीच्या शिफारसी जर ३१ डिसेंबर१९३०च्या आंत मान्य केल्या नाहींत तर करबंदी करावी व असहकारिता पुकारावी असेंहि ठरविण्यांत आलें. संपूर्ण स्वातंत्र्याच्या ध्येयाचा प्रचार करण्यास मोकळीकहि देण्यांत आली.

म. गांधींनीं हा ठराव मांडला होता, पण त्याला पं. जवाहरलाल यांनीं उपसूचना आणली. त्या उपसूचनेंत त्यांनीं नेहरु रिपोर्ट व्हाइसरॉयकडे पाठविण्याचें कलम गाळून टाकावें, असें म्हटलें

होतें. गांधीनेहरूंत तडजोड झाली पण सुभाषचंद्रांनीं उघडया बैठकींत तीच उपसूचना आणली व जवाहरलालनीं तिला दुजोरा दिला. गांधींना ही तडजोड मोडल्याबद्दल दु:ख झालें. पण शेवटीं उपसूचना नापास होऊन मूळ ठराव पास झाला.

१९२९ च्या ३१ डिसेंबरपर्यंत नेहरूरिपोर्टाला मान्यता न मिळाल्यामुळें व त्यांतील सूचना मुसलमानांनाहि नापसंत झाल्या-मुळें नेहरु रिपोर्ट गळला आणि रावी नदीच्या कांठीं ३१ डिसेंबरला स्वातंत्र्याची घोषणा करण्यांत आली. त्या वेळेपासून कॉंग्रेसनें स्वातंत्र्याचें ध्येय मान्य केलें.

पं. जवाहरलाल विलायतेंत हीच घोषणा करीत होते. स्वातं-त्र्याच्या घोषणेबरोबरच घटनापरिषदेची घोषणा केली जात आहे. अशा प्रकारें कॉंग्रेस ही वसाहतीचें स्वराज्यहि जेथें मान्य करीत नाहीं, तेथें क्रमशः हिंदुस्थानची उन्नति होत जावी व त्याला जबाबदारीचें स्वराज्य मिळावें अशी शुष्क व अर्थशून्य वाक्यें जर नव्या कायद्यांत असतील तर त्या वाक्यांनीं कॉंग्रेसचें समाधान कसें व्हावें ?

---

२५

# उपसंहार.

फेडरेशनच्या स्वरूपाची व गुणदोषांची चर्चा येथवर केली. त्यावरून फेडरेशनच्या सांगाड्याशिवाय दुसरा कोणताही तपशील स्वीकारणीय नाहीं अशीच प्रत्येकाची खात्री होईल. हिंदुस्थानला भावी काळांत फेडरेशनच पाहिजे आहे; त्याशिवाय एवढ्या अवाढव्य देशाचा कारभार नीटपणें चालणार नाहीं. या फेडरेशनमध्यें अंतर्भूत होणाऱ्या निरनिराळ्या घटकांत समान राज्यपद्धति असावी, त्यांना अंतर्गत स्वातंत्र्य पूर्णपणें उपभोगतां यावें आणि त्या सर्व घटकांनीं अखिल राष्ट्राच्या उत्कर्षाकरतां, आपआपल्या सामर्थ्याप्रमाणें अंशभागी व्हावें, हीच फेडरेशनमधील मूलभूत कल्पना हिंदुस्थानला ग्रहण केली पाहिजे. देशांतील निरनिराळ्या धार्मिक, सामाजिक व आर्थिक विचारप्रवाहांचें एकीकरण करावयास व त्या सर्वांच्या शक्तीचा नीटपणें उपयोग करावयास मध्यवर्ती सत्ता अत्यंत बलवान असावी लागेल. राष्ट्रामध्यें क्रांति झाल्यानंतर, मग ती कितीहि अल्प प्रमाणांत होईना, निरनिराळ्या हितसंबंधी लोकांच्या आकांक्षा उसळून वर येतात आणि कधींकधीं आपसांत लढे लागण्याचाहि संभव असतो. परराष्ट्राकडून येणाऱ्या हल्ल्याचें संकट हें तर नेहमींच जमेंत धरावें लागतें. अशा निरनिराळ्या कारणांकरतां मध्यवर्ती सत्ता ही अत्यंत बलाढ्य लागते.

ब्रिटिश सरकारनें हें फेडरेशन देतांना मध्यवर्ती सत्तेचा खंबीरपणा अबाधित ठेवला आहे. पण तो ब्रिटिश सरकार, ब्रिटिश

व्यापारी, ब्रिटिश नोकर वगैरेंच्या कल्याणाकरतां ठेवला असल्यामुळें हिंदुस्थानच्या सर्वस्वीं विरोधी अशी ती घटना आहे. प्रांतिक कारभारांत व्यापार, नोकऱ्या, राज्य, लष्कर वगैरेंचा संबंध ब्रिटिशांच्या हिताशीं येत नसल्यामुळें तो कारभार हिंदी लोकांच्या हातीं दिला आहे. पण मध्यवर्ती सत्ता वरील कारणांकरतां हिंदी लोकांच्या ताब्यांत देण्यांत आली नाहीं.

या सर्व हितसंबंधी लोकांचें संरक्षण करून हिंदी लोकांना हक्क देणें शक्यच नाहीं. एकतर ब्रिटिशांच्या हातांत सत्ता राहील, किंवा हिंदी लोकांच्या हातीं सत्ता जाईल. उभय राष्ट्रांचीं हितें परस्परविरोधी असल्यामुळें दोघांचा समन्वय करण्याची भाषा ही असत्य व भ्रामक आहे. त्यामुळें सध्यांच्या फेडरेशनमध्यें काय सुधारणा केल्या म्हणजे ती स्वीकारणीय होईल हा प्रश्नच उद्भवत नाहीं. फेडरेशन देण्यामागील बुद्धि ही हिंदुस्थानचें कल्याण करावें अशी नाहीं. ती जर तशी असती तर सध्यांच्या फेडरेशनचें स्वरूप असें राहिलें नसतें. तेव्हां सध्यांच्या फेडरेशनमध्यें दुरुस्ती करावयाची असेल तर ती आमूलाग्र करावी लागेल. नुसतीं ठिगळें लावून फाटलेल्या कांबळीची शालजोडी होणार नाहीं.

हिंदुस्थानला हें ठाऊक आहे कीं, जगांतील कोणताही देश हा तुटक राहूं शकत नाहीं. आर्थिक, सामाजिक, शास्त्रीय आणि राजकीय दृष्ट्या जग हें जवळजवळ येत चाललें आहे. अमेरिकेच्या कापसाचे धक्के हिंदुस्थानच्या कापसाला बसतात, जर्मनींतील शास्त्रीय शोधांमुळें झेकोस्लोव्हाकियाचा प्राण कासावीस होतो, स्पेनच्या कलहाचा परिणाम इटली फ्रान्सवर होतो, हें आपण जाणतों. तेव्हां ह्या जगाच्या घडामोडींकडे लक्ष देऊन हिंदुस्थानला

वागावें लागणार आहे. हिंदुस्थान उद्यां स्वतंत्र झाला तरी त्याला कोणाबरोबर मैत्री करावयाची हें ठरवावेंच लागेल. इंग्लंडच्या भांडवलशाहीबरोबर सख्य करावयाचें, कां रशियाच्या सोव्हिएट पद्धतीशीं सख्य करावयाचें, कां हिटलर—मुसोलिनीच्या फॅसिस्ट पद्धतीशीं सख्य जोडावयाचें हा हिंदुस्थानला विचार करण्यासारखा प्रश्न उपस्थित होईल.

हिंदुस्थानच्या वृद्धिंगत होणाऱ्या अहिंसावादाशीं कोणत्या पद्धतीचें जमतें हें कांहीं कालानंतर ठरणार आहे. इंग्रजांच्या बरोबर आम्ही भविष्यकालांत समानतेनें वागणार नाहींच असें नाहीं. हिंदुस्थानला असें पटलें कीं, जगांत शांतता नांदण्याकरतां आपण अमुक राष्ट्राशीं सख्य करणें आवश्यक आहे, तर हिंदुस्थान त्या राष्ट्राशीं सख्य केल्यावांचून रहाणार नाहीं. युरोपखंडांत जो रक्ताचा पाऊस सतत पडत आहे, तसा पाऊस पडण्यास अगर पाडण्यास हिंदुस्थान प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष कारणीभूत व्हावा अशी आमची इच्छा नाहीं. रक्तमय क्रांतींतून स्थायी शांतीचा जन्मच होत नाहीं. त्यामुळें अशा सर्व रक्तलांछित मार्गाचा त्याग करणें हिंदुस्थानला भाग आहे.

हिंदुस्थानला मध्यवर्ती राज्यपद्धति फेडरल पाहिजे आणि ती मिळविण्याकरतां शांततामय मार्गाचा अवलंब केला पाहिजे असें सांगितल्यावर फेडरेशनच्या स्वरूपाची अत्यंत थोडक्यांत कल्पना करून देणें अवश्य आहे.

हिंदुस्थानचें सार्वभौमत्व जें इंग्लंडच्या राजाच्या ताब्यांत आहे तें हिंदुस्थानांतील फेडरल सरकारच्या ताब्यांत आलें पाहिजे. लष्करी, आरमारी व वैमानिक संरक्षण हेंहि फेडरल सरकारच्या

हातीं पाहिजे. व्यापार, जकाती, रेल्वे, बँका, कर, वगैरे सर्व आर्थिक उत्पादक खातीं हीं पूर्णपणें हिंदी मंत्रि-मंडळाच्या हातीं पाहिजेत. जमाखर्च व आर्थिक व्यवहार हेहि फेड-रेशनच्या ताब्यांत हवेत हें निराळें सांगण्याची जरूरी नाहीं. चवथी गोष्ट म्हणजे फेडरेशनमधील सर्व घटक, प्रांत व संस्थानें धरून, पूर्णपणें जबाबदार राज्यपद्धति उपभोगणारे असले पाहिजेत. एवढ्या चार सुधारणा सध्यांच्या फेडरेशनमध्यें झाल्या तर तें हिंदु-स्थानकडून स्वीकारलें जाईल.

पण सध्यांचें फेडरेशन हिंदी लोकांच्या इच्छेविरुद्ध जर लादलें गेलें तर काय करावयाचें हेंहि आपण पाहिलें पाहिजे. इंग्रजींत एक म्हण आहे, कीं प्रत्येक राष्ट्राला त्याच्या योग्यतेप्रमाणें राज्यसत्ता मिळत असते. ही म्हण खोटी आहे असें मानण्याचें कारण नाहीं. तेव्हां फेडरेशनचें भवितव्य काय होणार हें इंग्रज सरकार ठरवि-णार नसून आपणच ठरविणार आहों. हिंदुस्थानांत जितकी शक्ति असेल तितक्या मानानें त्याला स्वातंत्र्याचे हक्क मिळतील. त्यामुळें फेडरेशनच्या भवितव्याचा विचार म्हणजे आपल्या शक्तीचा विचार होय. ही शक्ति ध्येयशुद्धीवर, संघटनेवर आणि साधनावर अवलंबून आहे. साधन काय, साध्य काय किंवा संघटना काय ही एकेकटी कार्यक्षम होऊं शकत नाहीं. या तिहींचा समन्वय झाला तरच यशप्राप्ति होऊं शकते.

हिंदुस्थानच्या ध्येयाविषयीं बरीचशी एकवाक्यता आहे. पण संघटना व साधनाबद्दल अद्याप पुष्कळच मजल गाठावयाची आहे. एका संस्थेंत आल्यानें संघटना होतेंच असें नाहीं. उद्यां सर्व हिंदुस्थान कॉंग्रेसचे सभासद झाले तर कॉंग्रेस बलवान झाली असें

म्हणण्याइतकें अप्रबुद्ध कोणी नाहींत. ध्येयाबद्दलच्या तळमळीनें आणि स्वार्थत्याग बुद्धीनें एकत्र आलेलीं थोडीं माणसें हीं जास्त प्रभावी असतात. या दृष्टीनें आपण हिटलरच्या नाझीपक्षाच्या संघटनेकडे किंवा रशियाच्या कॉमिन्टर्न संघटनेकडे पाहिलें पाहिजे. सबंध जगाला हालवून सोडतील अशा संघटना त्यांनीं निर्माण केल्या. अनेकजण असें म्हणतात कीं, कॉंग्रेस कांहीं पक्ष नाहीं, ती एक लोकशाही संस्था आहे. या लोकशाही संस्थेंतील निरनिराळे पक्ष संघटित होऊं शकतील पण साऱ्या संस्थेची संघटना करणें शक्य नाहीं, इष्ट नाहीं व लोकशाहीला धरूनहि नाहीं असेंहि म्हणण्यांत येतें. कॉंग्रेसच्या संघटनेला जर हीं बाह्य कारणांचीं विघ्नें येत असतील तर कॉंग्रेस तरी मोडून जाईल आणि कॉंग्रेसला जर जगावयाचें असेल तर तिनें अनेक पक्षांची खिचडी करून न जगतां एका विशिष्ट पक्षाची संस्था म्हणून तरी जगणें जरूर आहे.

राष्ट्रीयत्वाचा प्रचंड वेगवान प्रवाह जर कमजोर करावयाचा नसला तर त्याला जाती, धर्म, वर्ग, प्रांत वगैरे भेदांचे पाट फोडून भागणार नाहीं. विद्युत्‌शक्ति निर्माण व्हावयास पाण्याच्या लोंढयाची धार जितकी विद्युज्जनक चक्रावर जोरानें पडत जाईल, तितकी त्या चक्रांना गति मिळेल आणि त्यामुळें विजेचा प्रचंड साठा तयार होईल. राष्ट्रीय संघटनेच्या आड ज्या ज्या गोष्टी, जे जे विचार येत असतील त्या सर्वांचा निरास करणें अत्यंत आवश्यक आहे. कोणतेंहि राष्ट्र अगर समाज पूर्णपणें निर्दोष नसतो. त्यांतील उणीवा ह्या विशिष्ट ध्येयाच्या जोपासनेनेंच काढून टाकाव्या लागतात. त्याकरतां परस्परांचा परस्परांवर विश्वास लागतो व प्रसंगीं त्यागाचीहि तयारी लागते. या त्यागावर व विश्वासावरच कोणतीहि संघटना प्रभावशाली होऊं शकते.

हिंदुस्थानला अहिंसात्मक प्रतिकारानेंच आतांपर्यंत थोडेफार हक्क मिळाले आहेत. तेव्हां भूतकाळांतील साधनांबद्दल जर आपल्याला पश्चात्ताप होत नसेल तर भविष्यकाळांतील ह्याच साधनाबद्दल शंकित होण्याचें कारण नाहीं. म. गांधींनीं दाखवून दिलेल्या अहिंसेच्या मार्गानें आपण ब्रिटिशांशीं दोन लढे केले व याच अहिंसेच्या मार्गानें आज संस्थानांत लढे सुरू आहेत. तेव्हां सर्वत्र यशस्वी होत असलेल्या अहिंसात्मक प्रतिकाराच्या साधनावर जितका आपला विश्वास दृढ होत जाईल तितकी साधनाबद्दलची निश्चिति निर्माण होईल.

संघटना करण्याला व साधनाची परीक्षा पहावयाला जास्तींत जास्त व्यापक स्वरूपाचें अधिष्ठान पाहिजे. हें अधिष्ठान जातीविशिष्ट अगर वर्गविशिष्ट पक्षांत उपलब्ध होणार नसून कॉंग्रेससारख्या राष्ट्रीय संस्थेंत उपलब्ध होईल. कॉंग्रेसनें आपल्या कामगिरीनें हें स्थान अगोदरच संपादन केलें आहे व हें स्वयंसंपादित स्थान कोणीहि हिरावून घेऊं शकणार नाहीं. तेव्हां ज्यांना ज्यांना सध्यांचें फेडरेशन नको आहे व ज्यांना स्वयंनिर्णित घटना हवी आहे, त्यांना राष्ट्रीय स्वातंत्र्य हेंच ध्येय, अहिंसात्मक प्रतिकार हेंच साधन, आणि कॉंग्रेस हीच एक लढाऊ संस्था एवढ्या गोष्टी मान्य केल्या पाहिजेत. आमच्या दृष्टीनें इंग्रजांचा कमजोरपणा अगर उदार बुद्धि हें आमचें सामर्थ्य अगर लायकी ठरत नसून आमची संघटना, आमची प्रतिकारशक्ति व आमची कॉंग्रेसनिष्ठा हेंच आमचें सामर्थ्य आहे. ह्या सामर्थ्याची प्रतीति ज्यांना होईल तेच फेडरेशनचें व हिंदुस्थानचें भवितव्य काय हें ठरवूं शकतील. हें भवितव्य स्वातंत्र्याशिवाय कोणतें असणार ?

—समाप्त—

# परिशिष्ट १.

## कौन्सिल ऑफ स्टेट

### ब्रिटिश हिंदुस्थानचे प्रतिनिधी.

| १<br>प्रांत अगर जात. | २<br>एकूण जागा. | ३<br>सर्व सामान्य जागा. | ४<br>शेडयूलजातींकरतां जागा. | ५<br>शीख | ६<br>मुसलमान. | ७<br>स्त्रिया. |
|---|---|---|---|---|---|---|
| मद्रास | २० | १४ | १ | ... | ४ | १ |
| मुंबई | १६ | १० | १ | ... | ४ | १ |
| बंगाल | २० | ८ | १ | ... | १० | १ |
| संयुक्तप्रांत | २० | ११ | १ | ... | ७ | १ |
| पंजाब | १६ | ३ | ... | ४ | ८ | १ |
| बिहार | १६ | १० | १ | ... | ४ | १ |
| मध्यप्रांत वऱ्हाड | ८ | ६ | १ | ... | १ | ... |
| आसाम | ५ | ३ | ... | ... | २ | ... |
| सीमाप्रांत | ५ | १ | ... | ... | ४ | ... |
| ओरिसा | ५ | ४ | ... | ... | १ | ... |
| सिंध | ५ | २ | ... | ... | ३ | ... |
| ब्रि० बलुचिस्थान | १ | ... | ... | ... | १ | ... |
| दिल्ली | १ | १ | ... | ... | ... | ... |
| अजमेर-मेरवाडा | १ | १ | ... | ... | ... | ... |
| कूर्ग | १ | १ | ... | ... | ... | ... |
| अँग्लो-इंडियन | १ | ... | ... | ... | ... | ... |
| रोपीअन्स | ७ | ... | ... | ... | ... | ... |
| हिंदी ख्रिश्चन | २ | ... | ... | ... | ... | ... |
| एकूण | १५० | ७५ | ६ | ४ | ४९ | ६ |

# संयुक्त–कौन्सिलच्या त्रैवार्षिक निवडणुकीकरितां जागांची विभागणी.

| १ | ३ वर्षांकरितां प्रथम भरावयाच्या जागा | | | | | ६ वर्षांकरितां प्रथम भरावयाच्या जागा | | | | | ९ वर्षांकरितां प्रथम भरावयाच्या जागा | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| प्रांत | २ सर्व सा-मान्य | ३ हरिजन | ४ शिख | ५ मुसल मान | ६ स्त्रिया | ७ सर्वसा मान्य | ८ हरिजन | ९ शीख | १० मुसल-मान | ११ स्त्रिया | १२ सर्वसा-मान्य | १३ हरिजन | १४ शीख | १५ मुसल-मान | १६ स्त्रिया |
| मद्रास | ... | ... | ... | ... | ... | ७ | ... | .... | २ | १ | ७ | १ | ... | २ | .... |
| मुंबई | ५ | ... | ... | २ | १ | ... | ... | ... | .... | ... | ५ | १ | ... | २ | .... |
| बंगाल | ४ | १ | ... | ५ | ... | ... | ... | ... | .... | ... | ४ | ... | ... | ५ | १ |
| संयुक्तप्रांत | ५ | १ | ... | ३ | १ | ६ | ... | .... | ४ | .... | ... | ... | ... | ... | ... |
| पंजाब | २ | ... | २ | ४ | ... | १ | ... | २ | ४ | १ | ... | ... | ... | ... | ... |
| बिहार | ... | ... | ... | ... | ... | ५ | १ | ... | २ | ... | ५ | .... | ... | २ | १ |
| मध्यप्रांत वऱ्हाड | .... | ... | ... | ... | ... | ६ | १ | .... | १ | ... | ... | ... | ... | ... | .... |
| आसाम | ... | ... | ... | ... | ... | ३ | ... | ... | २ | ... | ... | ... | ... | ... | .... |
| सीमाप्रांत | ... | ... | ... | ... | ... | ... | ... | ... | ... | .... | १ | ... | ... | ४ | ... |
| ओरिसा | ४ | ... | ... | १ | ... | ... | ... | .... | ... | ... | ... | ... | ... | ... | .... |
| सिंध | २ | ... | ... | ३ | ... | ... | ... | .... | ... | ... | ... | ... | ... | ... | ... |
| ब्रिटिश बलुचिस्थान | ... | ... | ... | ... | ... | ... | ... | ... | .... | ... | .... | ... | ... | १ | .... |
| दिल्ली | ... | ... | ... | ... | .... | .... | ... | ... | ... | .... | १ | ... | ... | ... | .... |
| अजमेर-मेरवाडा | ... | ... | ... | ... | ... | ... | ... | ... | ... | .... | १ | ... | ... | ... | ... |
| कूर्ग | ... | ... | ... | ... | ... | .... | ... | ... | ... | .... | १ | .... | ... | .... | ... |
| एकूण | २२ | २ | २ | १८ | २ | २८ | २ | २ | १५ | २ | २५ | २ | ... | १६ | २ |

## फेडरल कायदेमंडळ—ब्रिटिश हिंदुस्थानचे प्रतिनिधि.

| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | सर्वसामान्य जागा | | | | | | | | | | |
| प्रांत | एकूण जागा | एकूण सर्व-सामान्य | हारिजन | शीख | मुसलमान | अँग्लो-इंडियन | युरोपीअन्स | हिंदी ख्रिश्चन | उद्योग-धंदे व्यापारी प्रतिनिधि | जमीनदार | मजूर प्रतिनिधि | स्त्रिया |
| मद्रास | ३७ | १९ | ४ | ... | ८ | १ | १ | २ | २ | १ | १ | २ |
| मुंबई | ३० | १३ | २ | .... | ६ | १ | १ | १ | ३ | १ | २ | २ |
| बंगाल | ३७ | १० | ३ | .... | १७ | १ | १ | १ | ३ | १ | २ | १ |
| संयुक्तप्रांत | ३७ | १९ | ३ | ... | १२ | १ | १ | १ | ... | १ | १ | १ |
| पंजाब | ३० | ६ | १ | ६ | १४ | ... | १ | १ | ... | १ | ... | १ |
| बिहार | ३० | १६ | २ | ... | ९ | ... | १ | १ | ... | १ | १ | १ |
| मध्यप्रांत वऱ्हाड | १५ | ९ | २ | ... | ३ | ... | .... | ... | ... | १ | १ | १ |
| आसाम | १० | ४ | १ | ... | ३ | ... | १ | १ | ... | .... | १ | ... |
| सीमाप्रांत | ५ | १ | ... | .... | ४ | ... | ... | ... | ... | .... | ... | ... |
| ओरिसा | ५ | ४ | १ | ... | १ | ... | ... | ... | ... | ... | ... | ... |
| सिंध | ५ | १ | ... | ... | ३ | ... | १ | ... | ... | .... | .... | ... |
| ब्रिटिश बलुचिस्तान | १ | ... | ... | ... | १ | ... | .... | ... | ... | ... | ... | .... |
| दिल्ली | २ | १ | .... | ... | १ | ... | ... | ... | ... | .... | .... | ... |
| अजमेर-मेरवाडा | १ | १ | .... | ... | .... | ... | ... | ... | ... | ... | ... | .... |
| कूर्ग | १ | १ | .... | ... | .... | ... | ... | ... | ... | ... | .... | ... |
| इतर प्रांतरहित | ४ | ... | ... | ... | ... | .... | ... | ... | ३ | ... | १ | ... |
| एकूण | २५० | १०५ | १९ | ६ | ८२ | ४ | ८ | ८ | ११ | ७ | १० | ९ |

उद्योगधंद्याच्या प्रांतरहित जागांची अशी वांटणी आहे.

१ असोशिएटेड चेंबर ऑफ कॉमर्स.

१ फेडरेटेड चेंबर ऑफ कॉमर्स.

१ उत्तर हिंदुस्थानांतील औद्योगिक मंडळें.

---

मजूर प्रांतरहित जागा:—

जे मजूरसंघ ठरविले जातील ते.

# परिशिष्ट २.

सोबतच्या कोष्टकांत कोणत्या संस्थानाला किती जागा दिल्या आहेत हें दाखविलें आहे. या जागांची निवड कशी करावयाची हें सांगितलें पाहिजे. ब्रिटिश हिंदुस्थानांतील जागांच्या निवडणुकीबद्दल योग्य स्थळीं माहिती देण्यांत आलीच आहे. संस्थानिकांच्या जागांबद्दल जरूर तेवढीच माहिती येथें देत आहे.

संयुक्त कायदेमंडळाच्या वरिष्ठ किंवा कनिष्ठ गृहांत ज्याची नेमणूक करावयाची तो ब्रिटिश प्रजाजन किंवा संस्थानिक किंवा फेडरेशनमध्यें सामील झालेल्या संस्थानचा प्रजाजन असला पाहिजे. पण जर एखाद्या संस्थानचा अधिपति फेडरेशन सुरू होण्याच्या तारखेला अल्पवयी असल्यामुळें राज्यकारभार करीत नसला तर ग. जनरलनें तो संस्थानिक वयांत येऊन राज्यकारभार करूं लागे पर्यंत, त्या संस्थानच्या प्रजाजनाला किंवा प्रजेला वरील नियम लागू करूं नये. याचा अर्थ असाः—एखादें संस्थान, अधिपति अल्पवयी असल्यामुळें, फेडरेशनमध्यें सामील होऊं शकलें नाहीं, तरी त्या संस्थानचा प्रजाजन हा ॲसेंब्ली किंवा कौन्सिलमध्यें जाण्यास नालायक ठरणार नाहीं. पण संस्थानिक वयांत आल्यावर फेडरेशनमध्यें सामील झाला नाही तर तोच प्रजाजन नालायक ठरेल.

कौन्सिलमध्यें जाण्यास ३० वर्षें व ॲसेंब्लींत जावयास २५ वर्षें वय लागतें, पण जो संस्थानिक राज्यकारभार करीत असेल त्याला ही अट लागू नाहीं.

१६ व १७ व्या विभागांतील संस्थानांशिवाय बाकीच्या विभागांत ज्या संस्थानांना वरिष्ठ गृहाकरितां जागा दिली असेल ती संस्थानिकांनीं पाळीपाळीनें भरावी. पण कनिष्ठ गृहाकरितां जी संस्थानांनीं गटानें जागा भरावयाची ती सर्व संस्थानिकांनीं मिळून भरावयाची आहे. वरिष्ठ गृहाकरितां दोन किंवा अधिक संस्थानांना जर पाळीपाळीनें जागा भरावयाची असेल तर ती जागा ग. जनरलच्या संमतीनें त्या संस्थानिकांनीं मिळून भरावी.

कौन्सिल ऑफ स्टेटकरितां किती वर्षेंपर्यंत नेमणूक करतां येते, तें आतां पाहूं.

( १ ) जर एखाद्या संस्थानिकाला स्वतंत्र प्रतिनिधित्व दिलें असेल तर ९ वर्षें.

( २ ) गटांतील सर्व संस्थानें फेडरेशनमध्यें सामील झालीं तर त्या सर्वांनीं मिळून नेमणूक केली तर मुदत ३ वर्षें.

( ३ ) पाळीपाळीनें जर संस्थानिकांनीं नेमणूक करावयाची असेल तर त्याची मुदत १वर्ष. फक्त पन्ना व मयूरभंज यांना दोन वर्षें व पदुकोटाला तीन वर्षें मुदत दिली आहे.

( ४ ) एखाद्या गटानें मिळून निवडणूक करावयाची असेल पण त्या गटांतील सर्व संस्थानें जर फेडरेशनमध्यें सामील झालीं नसतील तर त्यांची मुदत प्रत्येकानें आपापल्या पाळीप्रमाणें मिळून जितकीं वर्षें एखाद्याची नेमणूक केली असती तितकी किंवा ३ वर्षें पण या दोहोंत कमी असेल ती.

( ५ ) दुसऱ्या कोणत्याही रीतीनें केल्यास तीन वर्षें.

फेडरल ॲसेंब्लींत जी नेमणूक केली जाईल ती ॲसेंब्ली संपेपर्यंत असेल.

वरिष्ठ कायदेमंडळांत ज्या पहिल्या नेमणुका करावयाच्या आहेत, त्या करतांना ज्या संस्थानांना स्वतंत्र प्रातिनिधित्व मिळालें आहे, त्यांतील १/३ तीन वर्षांकरितां, १/३ सहा वर्षांकरतां व १/३ नऊ वर्षांकरितां नेमले जातील अशी ग. जनरल स्वतःच्या हुकमान्वयें व्यवस्था करतील.

दोन किंवा अधिक संस्थानांनीं मिळून जर एक जागा वरिष्ठ किंवा कनिष्ठ सभागृहांत भरावयाची असेल तर त्या गटांतील संस्थानास फक्त एकेकच मत देतां येईल. सारखीं सारखीं मतें पडलीं तर त्याचा निकाल चिठ्ठ्यांनीं (ballot) किंवा इतर मार्ग ठरेल त्याप्रमाणें करावा. मयूरभंज व पन्ना यांना मात्र दोन मतें व पदुकोटाला तीन मतें अपवादादाखल दिलीं आहेत.

कोणत्याहि गृहांत एका संस्थानिकाला एक जागा दिली असेल तर ती जागा संस्थानिक फेडरेशनमध्यें आला नाहीं तर रिकामी राहील. तसेंच संस्थानिकांच्या गटांना मिळून एकच जागा दिली असेल आणि त्या गटांतील निम्मे संस्थानिक फेडरेशनमध्यें सामील झाले नसतील तर ती जागा रिकामी राहील. पण वरील दोन्ही प्रकारची संस्थानें संस्थानिकांच्या अल्पवयामुळें किंवा इतर कारणांकरतां फेडरेशनमध्यें आलीं नाहींत आणि त्यांनीं भरावयाच्या जागांपैकीं कमीत कमी १/१० जागा कोणत्याहि गृहांत भरल्या नाहींत तर संस्थानिकांनीं जे लोक त्या जागा भरण्याकरतां नेमले असतील त्यांनीं रिकाम्या राहिलेल्या जागांपैकीं १/२ जागा वेळोवेळ ठरेल त्या पद्धतीनें त्या त्या गृहांत भराव्या. हा जादा जागा भरण्याचा हक्क वीस वर्षांनंतर अंमलांत रहाणार नाहीं. तसेंच ह्या जादा जागांचे दोन्ही गृहांचे प्रतिनिधी हे फक्त एक वर्षापुरतेच नेमले जातील.

१६ व्या विभागांत, ९ व्या व १० व्या संस्थानांच्या गटांनीं ॲसेंब्लीच्या तीन तीन जागा भराव्या असें म्हटलें आहे. पण त्यांतील कमीत कमी दोन संस्थानें जर फेडरेशनमध्यें आलीं नाहींत तर तीनही जागा रिकाम्या रहातील. तसेंच चार संस्थानें सामील झालीं नाहींत तर तीनपैकीं दोन जागा रिकाम्या रहातील.. आणि सहा संस्थानें सामील झालीं नाहींत तर एक जागा रिकामी राहील.

१७ व्या विभागासंबधी अशी योजना आहे. यांत २ जागा वर व ५ जागा खालच्या गृहाला दिल्या आहेत. या विभागांत खालील विभागातील संस्थानें येतात.१ जानेवारी१९३५ रोजीं जी संस्थानें १ वेस्टर्न इंडिया एजन्सी, २गुजराथ स्टेटस् एजन्सी, ३डेक्कन स्टेट्स एजन्सी, ४ईस्टर्न स्टेटस् एजन्सी, ५सेंट्रल स्टेटस् एजन्सी किंवा राजपुताना एजन्सीमध्यें होतीं किंवा पंजाब किंवा आसाम सरकारशीं ज्यांचा राजकीय संबंध होता त्यांचा समावेश ग. जनरल ठरवील त्याप्रमाणें करण्यांत येईल.

ग. जनरल या संस्थानांचे पांच विभाग करील व एका विभागाला एक अशी जागा खालच्या गृहांत वाटून देईल. ज्या विभागांत निम्म्याहून अधिक संस्थानें फेडरेशनमध्यें येणार नाहीत, त्या विभागांतील जागा रिकामी राहील. अर्थात् वर ९ १० जागांचा जो नियम सांगितला आहे तो सर्व संस्थानांना लागूच आहे.

कौन्सिलच्या ज्या दोन जागा या विभागांतील संस्थानांना दिल्या आहेत, त्या फेडरल ॲसेंब्लींत ५ सभासद संस्थानिकांनीं नियुक्त केलेल्या ज्या लोकांच्या-तर्फे जातील त्यांनीं ठरेल त्या पद्धतीनें नेमावयाचे आहेत. या ५ जागांपैकीं ३ जागा रिकाम्या राहिल्या तर वरिष्ठ गृहाची एक जागा रिकामीच राहील.

खालीं जे संस्थानांचे गट पाडले आहेत, त्यांतील एखादें संस्थान दुसऱ्या गटांत बादशाहाला मंत्रिमंडळाच्या सल्लयानें घालण्याची सत्ता आहे.

दोन्ही गृहांत पाठविण्याच्या सभासदांची नेमणूक कशी व केव्हां करावयाची वगैरेचे नियम करण्याची ग. जनरलला सत्ता दिली आहे.

# जागांची विभागणी

## कौन्सिल ऑफ् स्टेट आणि फेडरल असेंब्ली यांत येणाऱ्या संस्थानिकांच्या प्रतिनिधींचा तक्ता.

| १<br>संस्थानें किंवा—<br>संस्थानिकांचे गट. | २<br>कौ. ऑफ् स्टेट मधील जागा. | ३<br>संस्थानें किंवा संस्था-निकांचे गट. | ४<br>फे. असेंब्ली-तील जागा. | ५<br>लोकसंख्या |
|---|---|---|---|---|
| | | भाग १ ला. | | |
| हैद्राबाद. | ५ | हैद्राबाद. | १६ | १४४३६१४८ |
| | | भाग २ रा. | | |
| म्हैसूर | ३ | म्हैसूर. | ७ | ६५५७३०२ |
| | | भाग ३ रा. | | |
| काश्मीर. | ३ | काश्मीर. | ४ | ३६४६२४३ |
| | | भाग ४ था. | | |
| ग्वाल्हेर. | ३ | ग्वाल्हेर. | ४ | ३५२३०७० |
| | | भाग ५ वा. | | |
| बडोदा. | ३ | बडोदा. | ३ | २४४३००७ |
| | | भाग ६ वा. | | |
| कलात. | २ | कलात. | १ | ३४२१०१ |
| | | भाग ७ वा. | | |
| सिकीम. | १ | सिकीम. | – | १०९८०८ |
| | | भाग ८ वा. | | |
| १ रामपूर. | १ | १ रामपूर. | १ | ४६५२२५ |
| २ बनारस | १ | २ बनारस. | १ | ३९१२७२ |
| | | भाग ९ वा. | | |
| १ त्रावणकोर. | २ | १ त्रावणकोर. | ५ | ५०९५९७३ |
| २ कोचीन. | २ | २ कोचीन. | १ | १२०५०१६ |
| ३ पदुकोटा. | | ३ पदुकोटा. | | ४००६९४ |
| बंगनपल्ली. } | १ | बंगनपल्ली. } | १ | ३९२१८ |
| सोंडूर. | | सोंडूर. | | १३५८३ |

| १<br>संस्थानें किंवा—<br>संस्थानिकांचे गट | २<br>कौ. ऑफ स्टेट मर्यादित जागा. | ३<br>संस्थानें किंवा संस्थानिकांचे गट. | ४<br>फे. असेंब्ली-तील जागा. | ५<br>लोकसंख्या |
| --- | --- | --- | --- | --- |
| | | **भाग १० वा** | | |
| १ उदेपूर. | २ | १ उदेपूर. | २ | १५६६९१० |
| २ जयपूर. | २ | २ जयपूर. | ३ | २६३१७७५ |
| ३ जोधपूर. | २ | ३ जोधपूर. | २ | २१२५९८२ |
| ४ बिकानेर | २ | ४ बिकानेर. | १ | ९३६२१८ |
| ५ अलवार. | १ | ५ अलवार. | १ | ७४९७५१ |
| ६ कोटा. | १ | ६ कोटा. | १ | ६८५८०४ |
| ७ भरतपूर. | १ | ७ भरतपूर. | १ | ४८६९५४ |
| ८ टोंक. | १ | ८ टोंक. | १ | ३१७३६० |
| ९ धोलपूर. | १ | ९ धोलपूर. } | १ | २५४९८६ |
| १० कारुली. | १ | कारुली. } | | १४०५२५ |
| ११ बुंदी. | १ | १० बुंदी. } | १ | २१६७२२ |
| १२ सिरोही. | १ | सिरोही. } | | २१६५२८ |
| १३ डुंगरपूर. | १ | ११ डुंगरपूर. } | १ | २२७५४४ |
| १४ बान्सवाडा. | १ | बान्सवाडा. } | | २६०६७० |
| १५ प्रतापगड. } | १ | १२ प्रतापगड. } | १ | ७६५३९ |
| झालवार. } | | झालवा . } | | १०७८९० |
| १६ जेसलमीर. } | १ | १३ जेसलमीर. } | १ | ७६२५५ |
| किसनगड. } | | किसनगड. } | | ८५७४४ |
| | | **भाग ११ वा.** | | |
| १ इंदूर. | २ | १ इंदूर. | २ | १३२५०८९ |
| २ भोपाळ. | २ | २ भोपाळ. | १ | ७२९९५५ |
| ३ रेवा. | २ | ३ रेवा. | २ | १५८७४४५ |
| ४ दातिया. | १ | ४ दातिया. } | १ | १५८८३४ |
| ५ ओरछा. | १ | ओरछा. } | | ३१४६६१ |
| ६ धार. | १ | ५ धार. } | १ | २४३४३० |
| ७ देवास.थो.पाती } | १ | देवास.(सी.) } | | ८३३२१ |
| देवास.धा.पाती } | | देवास.(ज्यू.) } | | ७०५१३ |

